॥ श्रीगुरुः शरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# श्रीथोरलेस्वामीमहाराज

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती
टेंम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ६ )

– खंड सातवा –



–: लेखक :–

श्री. द. मा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी एम्. ए; पी.एच्. डी.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

ॐ

# श्रीथोरलेस्वामीमहाराज

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र

(उत्तरार्ध-सिद्धखण्ड-क्रमाङ्क ६)

## - खण्ड सातवा -




-: लेखक :-

द. सा. मांजरेकर

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए; पीएच्. डी.

 प्रकाशक :

व्यवस्थापक,
सिद्धयोग प्रकाशन,
२६/२०२ लक्ष्मीनगर,
पुणे–९.
पिन–४११ ००९.

*

 मुद्रक :

श्री. योगेश हरिहर जोशी
प्रसाद मुद्रणालय,
२६/२०२ लक्ष्मीनगर,
पुणे–९.
पिन–४११ ००९.

*

 प्रकाशनकाल :

प्रथमावृत्ती १९९३

*

मूल्य १०० रुपये

## – नमन –

श्रीवासुदेवा जगत्पालका । जय विधे जगत्कारका ।
जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो ॥ १ ॥
तूंची आर्यसंरक्षक । तूंची अनार्यशिक्षक ।
तूंची हे ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया ॥ २ ॥
परात्पर परंज्योती । तूंची परब्रह्ममूर्ती ।
कोण जाणे तुझी गती । स्वयंज्योती तूं श्रीदत्त ॥ ३ ॥
विविध धर्मान्वित । ज्ञानभक्तिरसभरित ।
असे हे श्रीवासुदेव चरित । मूर्तिमंत अमृत कीं ॥ ४ ॥
विहार तुझा स्वभक्त हृदयांत । तूं भक्ताधीन सतत ।
केशव मागतो पसरून हात । ह्या ग्रंथीं सतत सान्निध्य ठेवी ।



## – समर्पण –

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल भक्ताभिमानि भक्तकामकल्पद्रुम भक्तहृदयनिवासी राजराजेश्वर श्रीसद्-गुरुनाथवासुदेवस्वरूप श्रीमन् शक्तिपाताचार्यमहासिद्धयोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ सकलसन्तश्रेष्ठ श्रीसद्गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या परमपवित्र व परमकोमल चरणी कोटी कोटी साष्टांग दण्डवत् प्रणाम करून परमप्रेम-पूर्वक व परमशरणागतीपूर्वक सादर समर्पण.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

## – श्रीसद्गुरुध्यान –

आदौ यस्य भवो हि दत्तविभवष्टेम्बेकुलोद्भासको ।
बाल्ये ब्रह्मतपोनुकूलपठनं पश्चाद्गृहस्थाश्रमः ॥
तत्र श्रीगुरुदत्तपादभजनं संसारत्यागस्ततः ।
आब्रह्मस्थितिलोकदेशिक नमःश्रीवासुदेवाय ते ॥ १ ॥
धर्मं गोप्तुं सततस्त्रातुं चचार धरणीतले ॥
मेनिरे भगवद्रूपं वासुदेवं त्र्यधीश्वरं ॥
कुण्डीदण्डधरं शान्तं काषायाम्बरधारिणम् ॥ २ ॥
वासुदेवाय दत्ताय दण्डकुण्डीधराय च ।
नतोऽस्मि विश्वरूपाय भवभीतिहराय च ॥ ३ ॥



## ॥ श्रीसद्गुरुचरणी विज्ञापना ॥

गुरुराया धांव रे लवकरी । तव विरहें मज दुःख होय भारी ॥धृ०॥
गुंतलासी कोणत्या भक्तकाजा । येई धांवुनि तूं राखि प्राण माझा ॥१॥
भक्तवत्सल तूं असिसि जगन्नाथा । राखिं ब्रीद आपुले दीनानाथा ॥
दयाळूं तूं सर्वज्ञ जरी होशी । कृपा करूनी मज राखिं पायांपाशीं ॥२॥
भवरोगें त्रासलों स्वामिराया । ज्ञानभेषज देउनी हरीं माया ॥
कसा निष्ठुर तूं होसि वासुदेवा । सीतारामाचा नायकशी धांवा ॥३॥

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः ॥

## प्रस्तावना :–

## ॥ श्रीश्रीसद्गुरुचरित्रसंग माहात्म्य ॥

नमो गुरू कृपाकरा नमो गुरू गुणाकरा ।
नमो गुरू परात्परा नमो गुरू महत्तरा ॥
नमो गुरू सनातना नमो गुरू मनोन्मना ।
नमो गुरू घनाघना नमो गुरू निरंजना ॥ १ ॥

★ ★ ★

पूर्वापार आमुचे वंशीं । गुरुप्रसन्न अहर्निशीं ।
निरोप देती मातें परियेसीं । चरित्र आपुले विस्तारावया ॥१॥
म्हणे ग्रंथ कथन करीं । अमृतघट स्वीकारीं ।
तुझे वंशीं पारंपरीं । लाधती चारी पुरुषार्थ ॥ २ ॥
श्रीगुरुवाक्य मज कामधेनू । मनीं नाहीं अनुमानू ।
सिद्धि पाववविणार आपणू । श्रीवासुदेवानन्दसरस्वती ॥ ३ ॥
त्रैमूर्तीचा अवतार । झाला श्रीवासुदेवानन्दसरस्वती नर ।
कवण जाणे याचा पार । चरित्र कवणा वर्णवे ॥ ४ ॥
चरित्र ऐसें श्रीगुरूंचें । वर्णूं न शकें मी वाचे ।
आज्ञा असे श्रीगुरूंची । म्हणोनि वाचें बोलतसें ॥ ५ ॥
ज्यास पुत्रपौत्रीं असे चाड । त्यासीं कथा हे असे गोड ।
लक्ष्मी वसे अखंड । तया भवनीं परियेसा ॥ ६ ॥
ऐसी कथा जयांचें घरीं । वाचिती नित्य प्रेमभरीं ।
श्रियायुक्त निरंतरीं । नांदती पुत्रकलत्र युक्त ॥ ७ ॥

रोग नाहीं तया भवनीं । सदा संतुष्ट गुरुकृपें करोनी ।
निःसंदेह प्रति दिनीं । वाचिता बंधन तुटे जाणा ॥ ८ ॥
ऐसी पुण्यपावन कथा । सांगेन ऐक विस्तारता ।
सायासाविण होय साध्यता । सद्यःफल प्राप्त होय ॥ ९ ॥
निधान लाधे अप्रयासीं । तरी कां कष्ट सायासीं ।
विश्वास माझिया बोलासी । ऐका श्रोते एकचित्तें ॥ १० ॥
आम्हां साक्षीं ऐसें घडलें । म्हणोनि विनवीतसें बळें ।
श्रीगुरुस्मरण असे भलें । अनुभवा हो सकळिकां ॥ ११ ॥
तृप्ति झालिया ढेकर । जेवीं देती जेवणार ।
श्रीगुरुमहिमेचा उद्गार । बोलतसें अनुभवोनी ॥ १२ ॥
मी सामान्य म्हणोनी । उदास व्हाल माझे वचनीं ।
मक्षिकेच्या मुखांतुनी । मधु केवीं ग्राह्य होय ॥ १३ ॥
जैसें शिंपल्यांत मुक्ताफळ । अथवा कर्पूर कर्दळ ।
विचारितां अश्वत्थमूळ । कवणापासाव उत्पत्ती ॥ १४ ॥
ग्रंथ कराल उदास । वांकुडा कृष्ण दिसे ऊंस ।
अमृत निघे त्यांत रस । दृष्टी द्यावी तयावरी ॥ १५ ॥
तैसें माझें बोलणें । ज्यांसी चाड गुरुस्मरणें ।
अंगिकार करणार शहाणे । अनुभविती एकचित्तें ॥ १६ ॥
ब्रह्मरसाचीं गोडी । अनुभवितां फळें रोकडीं ।
या बोलाची आवडी । ज्यांसीं संभवे अनुभवा ॥ १७ ॥
श्रीगुरुचरित्र कामधेनु । ऐकतां होय महाज्ञानु ।
श्रोतीं करोनियां सावध मनु । एकचित्तें परियेसा ॥ १८ ॥

* * *

श्रीमान् शक्तिपाताचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीसन्त सद्गुरू श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या असीम व लोकोत्तर

प्रेमकृपाशीर्वाद बलाने, आज त्यांचे श्रीसमर्थ सद्गुरू " श्रीथोरलेस्वामीमहाराज " अर्थात् अनन्त कोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीमत् परहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांच्या विस्तृत व खण्डशः प्रसिद्ध होणाऱ्या चरित्राचा शेवटचा सातवा खंड अर्थात् उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क सहा हा प्रसिद्ध होत आहे, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

" श्रीथोरलेस्वामीमहाराज " या खण्डात्मक चरित्रग्रंथाच्या पहिल्या खण्डाच्या प्रस्तावनेत कथन केल्याप्रमाणे हे " श्रीवासुदेवमाहात्म्य " किंवा " श्रीवासुदेवमहापुराण " असून या अलौकिक, लोकोत्तर व एकमेवाद्वितीय अशा महापुराणाच्या पहिल्या खण्डात श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र माणगाव येथे जन्म झाल्यापासून म्हणजे शके १७७६ अर्थात् इ. स. १८५४ ते त्यांनी श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे दण्डग्रहण केला म्हणजे शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ पर्यन्तचा जीवनवृत्तान्त कथन केला आहे. अर्थात् प्रथम खण्डात श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ३६ व्या वर्षापर्यन्तची सर्व हकीकत आली असून एक प्रकारे त्यांच्या जीवनाच्या पूर्वार्धामधील साधन काळातील वृत्तान्त यात सामाविलेला आहे. त्यामुळे या खण्डाला पूर्वार्ध साधनाखण्ड असे म्हटले आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ३६ व्या वर्षी ज्यावेळी श्रीगोदावरीनदीच्या तीरी श्रीक्षेत्र गंगाखेड येथे त्यांची मंडळी सौ. अन्नपूर्णाबाई यांना देवाज्ञा झाली त्यावेळी त्यांनी आपल्या सौ. पत्नीच्या तेराव्या दिवसांपर्यंतच्या सर्व क्रिया यथाविधी केल्यानंतर चौदाव्या दिवशी संन्यास घेऊन पुढे श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे जाऊन श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीनारायणानन्दसरस्वतीस्वामीमहाराज यांच्याकडून दण्ड ग्रहण केला. त्यावेळी श्रीदत्तप्रभूंनी त्यांना अशी आज्ञा केली की, " आज

सर्वत्र वर्णाश्रमधर्माचा लोप झालेला आहे; तरी यापुढे सर्व भरत-खण्डात पायीच संचार करून सर्व लोकांना दीक्षोपदेश द्यावा व धर्ममार्गाची स्थापना करून ईश्वरनिष्ठा व स्वधर्मनिष्ठा जागृत करावी." या आज्ञेचे श्रीक्षेत्र उज्जयिनी येथपासून पालन करता करता वयाच्या ६० व्या वर्षी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे समाधी घेई-पर्यन्त श्रीस्वामीमहाराजांचे एकूण २३ चातुर्मास झाले. त्यातील शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ ते शके १८२६ अर्थात् इ. स. १९०४ पर्यन्तच्या १४ चातुर्मासांचा म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या वयाच्या ५० व्या वर्षांपर्यन्तचा काल दुसऱ्या खण्डात अर्थात् "उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क १" यात कथन केला असून शके १८२७ अर्थात् इ. स. १९०५ च्या १५ व्या चातुर्मासापासून शके १८३० अर्थात् इ. स. १९०८ च्या १८ व्या चातुर्मासापर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५५ व्या वर्षांपर्यन्तचा काळ तिसऱ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क २" यात चित्रित केला आहे. चवथ्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ३" मध्ये शके १८३१ अर्थात् इ. स. १९०९ च्या १९ व्या चातुर्मासापासून शके १८३२ अर्थात् इ. स. १९१०–११ च्या २० व्या चातुर्मासा-पर्यन्तचा म्हणजे वयाच्या ५७ व्या वर्षांपर्यन्तचा काळ चित्रित केला असून पाचव्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध-सिद्धखण्ड-क्रमांङ्क ४" मध्ये शके १८३३ अर्थात् इ. स. १९११ च्या २१ व्या चातुर्मासा-पर्यन्तचा म्हणजे त्यांच्या वयाच्या ५८ व्या वर्षांपर्यंतचा काळ चित्रित केला आहे. सहाव्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध-सिद्धखण्ड-क्रमांङ्क ५" मध्ये शके १८३४ अर्थात् इ. स. १९१२ ला श्रीक्षेत्र चिखलदा येथे श्रीस्वामीमहाराजांचा २२ वा चातुर्मास सुरू झाल्यापासून ते पुढे श्रीक्षेत्र कातरखेडा येथे दोन–तीन महिने राहून श्रीक्षेत्र

गरुडेश्वर येथे चैत्र वद्य ८ शके १८३५ अर्थात् इ. स. १९१३ ला जाईपर्यंतचा म्हणजे ५९ व्या वर्षांपर्यंतचा काळ चित्रित केला आहे. प्रस्तुत सातव्या खण्डात म्हणजे "उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमांङ्क ६" मध्ये शके १८३५ अर्थात् इ. स. १९१३ मध्ये चैत्र वैद्य ६ ला श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यानन्तर त्यांचा येथे २३ वा चातुर्मास सुरू झाल्यापासून ते त्यांनी येथेच आषाढ वद्य १ शके १८३६ ला म्हणजे दि. २३।६।१९१४ रोजी महासमाधी घेऊन आपली अवतारलीला समाप्त केली, तेथपर्यन्तचा म्हणजे ६० व्या वर्षांपर्यन्तचा काळ चित्रित केला आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या सिद्ध अशा लोकोत्तर जीवनातील कितीतरी महत्त्वाचे अपूर्व, अभ्यसनीय, आदर्श, मनोहारी व अलौकिक पैलू या सातव्या खंडात कथन केलेल्या जीवन-चरित्रात घडलेल्या अनेक घटनांतून व कथेतून प्रकट झालेले दिसून येतात. त्यातील काही मनोज्ञ पैलूंचे दिग्दर्शन केले; तर ते सर्व साधक–भक्तांना आपली त्यांच्या चरणांवरील श्रद्धा दृढतम करण्याला, उत्तरोत्तर शरणागती वृद्धिंगत करण्याला व त्यांच्यावरील भक्तिप्रेमाची चढती कमान कायम ठेवण्याला उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या सातव्या खंडात श्रीनर्मदा नदीच्या उत्तर तीरावरील श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे त्यांच्या जीवनाचा शेवटचा जवळ जवळ दीड वर्षांचा काळ चित्रित झालेला आहे. या काळात त्यांच्या जीवनात प्रकट झालेला सर्वात महत्त्वाचा पहिला पैलू "श्रीनर्मदामातेचे त्यांच्यावरील व त्यांचे श्रीनर्मदामातेवरील अलौकिक प्रेम" हा आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे

...२

आल्यावर "आता येथे आल्यानंतर यापुढे येथून दुसरीकडे कोठेही जावयाचे नाही," अशी जणूकाही श्रीनर्मदामातेच्या इच्छेनुसार श्रीदेवांनीच त्यांना आज्ञा केली होती. श्रीस्वामीमहाराजांचा देह त्यांच्या महासमाधीनंतर आपल्या प्रवाहात समाविष्ट व्हावा, आपण श्रीस्वामीमहाराजस्वरूप होऊन प्रवाहित व्हावे व समाजाचे अखंड कल्याण–मंगल करावे, ही श्रीनर्मदामातेची श्रीदेवांच्या मुखातून निसृत झालेली इच्छारूप आज्ञा शिरसावंद्य मानून "यापुढे आता येथून आपले दुसरीकडे कोठेही जाणे होणार नाही," असे त्यांनी श्री. रामशास्त्री प्रकाशकरांना व पर्यायाने सर्व भक्त-मंडळींना स्पष्टपणे सांगून श्रीनर्मदास्वरूप श्रीदेवांच्या आज्ञेचे केलेले पालन म्हणजे श्रीनर्मदामातेच्या त्यांच्यावरील व त्यांचे श्रीनर्मदा मातेवरील भावविश्वरूप व प्रेमविश्वरूप सामरस्याचे अपूर्व, अलौकिक व लोकोत्तर दर्शनच आहे, यात काहीच शंका नाही. (पृ. ७ ते ९)

श्रीनर्मदामातेवर श्रीस्वामीमहाराजांचे इतके प्रेम होते की, एकदा गड्याच्या हातून स्वयंपाकाचे एक पातेले श्रीनर्मदेच्या प्रवाहाबरोबर वाहत गेले असता त्यांनी तिची प्रार्थना करून ते परत मागितले असता तिने ते पातेले आपल्या लाटांच्या धक्क्यांनी त्यांच्या चरणांजवळ आणून दिले. ही सर्वच कथा मोठी वाचनीय आहे. ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणे जडावर सत्ता चालविण्याचे अपरंपार सामर्थ्य अंगी असूनही हे सामर्थ्य आपले नसून श्रीनर्मदामातेने आपल्यावरील प्रेमाने ते पातेले परत केले असे सर्व जगाला भासवून आपले लोकोत्तरत्व लपविण्याचे जे अलौकिकत्व श्रीस्वामीमहाराजांनी प्रकट केले ते पाहिले म्हणजे " पार्था तेणें पाडें। सन्मानें जो सांकडें। गरिमेतें

आंगाकडे । येवोंचि नेदी ।। ज्ञानेश्वरी १३.१८८ ।। " हे जे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी " अमानित्व " या अमूर्त गुणाचे वर्णन केले आहे ते श्रीस्वामीमहाराजांनी समूर्त करून दाखवून सर्व जगाला थक्क केले आहे हेच खरे आहे. (पृ. १८४–१८५) याप्रमाणेच " श्रीनर्मदालहरीस्तोत्र " रचून श्रीस्वामीमहाराजांनी श्रीनर्मदामातेवरील जे प्रेम, भक्तिभाव व भावना आणि तिचे महत्त्व, माहात्म्य व श्रेष्ठत्व वर्णन केले आहे ते पाहिले म्हणजे त्यांच्या अलौकिक भावनाविष्कारामुळे आपले अंतःकरण अगदी भरून येते. (पृ. ३३१ ते ३४४)

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील दुसरा महत्त्वाचा पैलू " शिष्यांवरील अलौकिक प्रेमाने " नटलेला आहे. आईचे आपल्या मुलावर जसे निरतिशय व एकांतिक प्रेम असते तसेच श्रीस्वामीमहाराजांचे आपल्या सर्व शिष्यांवर अत्यंत उत्कट व अलौकिक असे प्रेम होते. ते खऱ्या अर्थाने साधकांची व शिष्यांची माउली होते. त्यामुळे त्यांचे हे प्रेम कधी कधी स्नेहाच्या व कधी कधी रागाच्या आविष्काराने व अवगुंठनाने प्रकट झाल्याचे दिसून येते. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर सुरुवातीच्या काळात श्री. वासुदेवशास्त्री फणसे हे स्वतः जी भिक्षा मागून आणीत असत ती श्रीस्वामीमहाराज मोठ्या आनंदाने व प्रेमाने स्वीकारीत असत. (पृ. ९) श्री. घोंडोपंत कोपरकरांनी आणलेल्या नानाविध खाद्यपदार्थांपैकी फणसपोळी भिक्षेच्या वेळी घेण्यासाठी ठेवून घेऊन त्यांच्या प्रेमपूर्ण वागण्याने प्रसन्न होणे (पृ. ११), त्यांनी आपल्यासाठी बांधलेल्या पर्णकुटीचा स्वीकार करणे (पृ. १२), त्यांनी श्रीनर्मदानदीत बुडताना केलेल्या आर्त प्रार्थनेला धाऊन जाऊन त्यांना व नावेतील सर्व भक्तमंडळींना वाचविणे

(पृ. ६७ ते ६९) व शेवटी त्यांना छाटीचा प्रसाद देऊन उपदेश करणे (पृ. ३१५) इत्यादि सर्व कथाभाग या दृष्टीने अत्यंत वाचनीय आहे. त्याचप्रमाणे श्रीगांडामहाराजांना त्यांच्या वडिलांच्या सेवेसाठी घरी पाठविणे (पृ. ३८), तिलकवाडा येथे मुंजीला जाणे रद्द झाल्यावर उद्भवलेल्या प्रसंगात श्री. सखाराम शास्त्री टिल्लू व श्रीगांडामहाराज यांच्यावर कृतककोप धारण करून बोलणे (पृ. ४७ ते ५२), सर्व पट्टशिष्यांनी आसक्तिरहित राहावे व त्यांचे मन आपल्या सगुण स्थूल रूपात गुंतू नये म्हणून त्या सर्वांना महासमाधीच्या वेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथून परत पाठविणे (पृ. ६४, ६५ व २५५, २५८), श्री. गोपाळराव राजाध्यक्ष यांच्याकडे प्रथम दुर्लक्ष झाल्यामुळे दुसऱ्या दिवशी त्यांच्याकडे स्वत: जाऊन चौकशी करणे व श्रीकृष्णाकाठी एकांतात राहून भजन केल्यानेच मुक्ती प्राप्त होईल असा उपदेश करणे (पृ. १०८ ते १११), श्री. अमृतराव सबनीस यांना आसन व एका विशिष्ट रीतीने म्हणजे "सोऽहं" मंत्राच्या द्वारा प्राणायाम करावयास शिकवून मनोलयद्वारा समाधीची प्राप्ती करून देणे (पृ. ११२ ते १२६), त्यांच्यासाठी श्रीदेवाला रुद्राच्या एकादशिनीची व्यवस्था करणे (पृ. १८३), त्यांना प्रसाद व ताक देऊन त्यांच्यावर पुत्रवत् प्रेम करणे (पृ. १११ ते ११७), श्री. गणपतीबुवा महंतांना त्रास होऊ नये म्हणून त्यांना वडोद्याला जाऊ नका असे सांगणे (पृ. १८५), एका गुजराथी बाईंना चरणांवर मस्तक ठेवून नमस्कार करण्यास परवानगी देणे (पृ. १९१–१९२), अहमदाबादहून चालत येऊन एका बाईंनी आणलेल्या मुगाला मोड आल्यामुळे स्वयंपाकगृहातील बाईंनी ते मूग निरुपयोगी आहेत असे सांगितले; तरी त्या बाईंचा भक्तिभाव पाहून ते मूग

स्वतः श्रीनर्मदानदीवर नेऊन व धुऊन त्यांचा रात्री श्रीदेवांना नैवेद्य करविणे (पृ. १९२ ते १९५), राजपिपळ्याच्या एका स्त्रीच्या दास्यभक्तीने प्रसन्न होणे (पृ. २०३ ते २०८), स्वप्नात दर्शन देऊन एका बाईंना पोटदुखीमुळे जडलेले तंबाखूचे व्यसन सोडविणे व त्यांची पोटदुखी दूर करणे (पृ. २१० ते २१४), श्रीसंत गुळवणीमहाराजांना कैवल्यादि उपनिषदांच्या द्वारा वेदान्त सांगणे, दररोज दुपारी जेवण झाल्यावर हातावर पाणी घालावयास सांगणे, श्रीदत्तात्रेयांचे चित्र काढावयास सांगणे, हरतालिकेच्या मूर्ती तयार करण्यास सांगणे, पत्रोत्तरे लिहावयास सांगणे, इत्यादि नानाविध पद्धतीने सेवा करवून घेऊन त्यांच्यावर कृपा करणे (पृ. २१६ ते २३६), त्यांचा ताप दूर होण्यासाठी स्वतः डाळिंबाचा रस काढून त्यात माक्षिक (औषध) कालवून ते देणे (पृ. २४९, २५०), ताप अंगात असताना ते श्रीनर्मदानदीवर स्नानाला आले असताना त्यांच्या अंगावर श्रीनर्मदाजल शिंपडून त्यांना "स्नान झाले की नाही ?" असे विचारणे (पृ. २५१), हरिजनांचा भक्तिभाव पाहून त्यांना चरणस्पर्शपूर्वक दर्शन घेण्यास परवानगी देणे (पृ. २३७–२३८), एका शूद्र भक्ताला पादुका देऊन त्याच्यावर कृपा करणे (पृ. २३९ ते २४४), श्री. धुंडिराजबुवा पुराणिक यांना श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आग्रहाने राहवून घेणे (पृ. २५८–२५९) आणि श्रीमन्नृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज हे आपल्यापेक्षा काकणभर अधिकच श्रेष्ठ आहेत असे कथन करून आपल्या शिष्याबद्दल सार्थ अभिमान प्रकट करणे (पृ. २७५–२७६) इत्यादि सर्व कथा या श्रीस्वामीमहाराजांच्या शिष्यांवरील प्रेमाच्या निदर्शक असून त्या या दृष्टीने अत्यंत वाचनीय व मननीय अशा आहेत.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनचरित्राचा तिसरा महत्त्वाचा पैलू "स्वधर्माचरणाचे व शास्त्रनियमांचे काटेकोर पालन," या गुणाने मंडित झालेला आहे. हा पैलू प्रकट करून त्यांनी सर्व समाजापुढे एक महान् आदर्शच उभा केला आहे, याची प्रतीती पुढील गोष्टींवरून येते. दक्षिणी ब्राह्मणांशिवाय इतर कोणत्याही ब्राह्मणाच्या हातची भिक्षा अर्थात् शिजविलेले अन्न घ्यावयाचे नाही असा नियम असल्यामुळे गुजराथी ब्राह्मणांकडून फळाची व ताकाची भिक्षा घेणे (पृ. ९), पर्णकुटीची वास्तुशांती करणे (पृ. १२), संन्यासाश्रमाचा महिमा प्रकट करणे (पृ. २४ ते ३८), वेदोक्त प्रकरणामुळे श्रीदेवांनी गायकवाडांच्या राज्यात पाय ठेवण्यास मनाई केल्यामुळे तिलकवाडचाला न जाणे (पृ. ५३ ते ६४), श्री. अमृतराव सबनीसांनी डोक्यावर केस ठेवले म्हणून त्यांना प्रथम दर्शनास नकार देणे व त्यांनी क्षौर केल्यावर नंतर त्यांना दर्शन देणे (पृ. ११२), स्त्रीने शास्त्राज्ञेप्रमाणे पतिव्रता धर्माचेच पालन करावे अशी अपेक्षा असल्यामुळे एका स्त्रीला उपदेश देण्यास नकार देणे (पृ. १२६ ते १३२), श्री. अमृतराव सबनीस यांची परवानगी घेतल्यावरच त्यांच्या पत्नीला उपदेश करणे (पृ. १३२ ते १३५), द्वादशीच्या पारण्याला जेवावयास बसल्यावर एका सुवासिनी स्त्रीने पानावर लिंबाची फोड वाढल्यामुळे न जेवताच उठणे (पृ. १३५ ते १३९), श्रीदत्तमूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाल्यावरही तिची अर्चा करून मूर्तिपूजेचे महत्त्व पटविणे (पृ. १४५ ते १५१), वेदान्तासंबंधाने शंका विचारावयास आलेल्या एका गृहस्थांना अंतर्ज्ञानाने तुमचे जानवे तुटले आहे हे सांगून "आचारः (प्रथमो) प्रभवो धर्मः।" हा सिद्धान्त पटवून देणे (पृ. १७२ ते १७९), हरिजनांच्या भक्तीमुळे त्यांच्यावरील प्रेमाने त्यांना

चरणस्पर्शपूर्वक दर्शन दिल्यावर शास्त्रमर्यादा व धर्ममर्यादेचे रक्षण करण्याकरिता तीन दिवस तपश्चर्या करणे (पृ. २३९) आणि "प्रारब्धकर्मणां भोगादेवक्षयः।" अशी वृत्ती ठेवून आयुष्यभर आचरण ठेवणे (पृ. ३०९ ते ३११) इत्यादि सर्वच कथाभाग आपल्या आयुष्याच्या वाटचालीत मार्गदर्शनाच्या दृष्टीने साधक-भक्तांनी अभ्यास करण्यासारखा आहे, यात तिलःप्राय शंका नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने वैराग्य, अमानित्व इत्यादि कितीतरी अमूर्त गुण समूर्त झालेले दिसतात. त्यामुळे त्यांच्या रूपाने आपणास अलौकिक व झळझळीत वैराग्यसंपन्नता आणि पराकोटीचे अमानित्व कसे असते, याचे दर्शन होते. श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा हा चौथा पैलू मोठा विलोभनीय आहे, यात काहीच शंका नाही. या दृष्टीने "भिक्षौषधं भुज्यताम्" अशी वृत्ती ठेवून अल्प आहार, ठराविक पदार्थ व फक्त ताकच घेणे (पृ. १०-११), श्री. शंकरराव आजेगावकरांनी वाळूत दोन छाटचा अंथरल्यावर त्यातील एक छाटी काढावयास लावून व त्यावेळीच संन्याशाचा धर्म सांगून परवैराग्याचे दर्शन घडविणे (पृ. २४४ ते २४९), श्रीमन्नृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांनी स्तुतियुक्त श्लोक-बद्ध हार गुंफून पाठविलेले चित्र त्यांना परत करणे (पृ. २५१ ते २५६), "हा देह लवकरच सोडून जावयाचे आहे," असे सांगून श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे देवावर चालू असलेले संततधार अनुष्ठान बंद करावयास लावणे (पृ. २७४) व औषध घेण्यास नकार देणे (पृ. २८१), "औषधं जान्हवी तोयं वैद्यो नारायणो हरिः।" अशा वृत्तीने देहाबद्दल उदासीन राहून कधीही औषध न घेणे (पृ. ३१२ ते ३१५) आणि श्री. गोपाळराव राजाध्यक्ष यांना भजनात स्वतःचे नाव घेण्यास व जयजयकार करण्यास

मनाई करणे (पृ. ११०) इत्यादि सर्व कथा, हे गुण साधकभक्तांनी आपल्या अंगी बाणविण्यासाठी, पुनःपुन्हा वाचणे व त्यांचे मनन करणे नितांत आवश्यक आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा पाचवा महत्त्वाचा पैलू त्यांची "अपूर्व व अलौकिक यौगिक सामर्थ्यशक्ती," हा आहे. या पैलूचे आपण सर्वांगांनी दर्शन घेतले म्हणजे रिद्धी–सिद्धी त्यांच्या येथे पाणी भरत होत्या व श्रीस्वामीमहाराज हे नरदेह-धारी साक्षात् ईश्वरच होते, याचा प्रत्यय येऊन मन विस्मयचकित झाल्याशिवाय राहात नाही. (पृ. ११८) हस्तस्पर्शाने व सान्निध्याने कडुनिंब गोड करणे (पृ. १२), रोज किती लोक जेवावयास येणार ते सकाळीच सांगणे (पृ. १९–२०), आपला दंड श्रीनर्मदा-नदीच्या पाण्याला लावून तिच्या पुराचे पाणी उरविणे (पृ. ६५ ते ६७), श्री. मणिभाई उमरेडकर, श्री. गणपती व श्री. विष्णुपंत सोमण यांच्या मुलाला एका दृष्टिक्षेपात बरे करणे (पृ. ७७), चरणदर्शनाला आलेल्या एका बाईंची हरविलेली नथ प्रसादाच्या नारळातून परत करणे (पृ. ८६), भक्तिभावाने चरणदर्शनाला आल्यामुळे नोकरी गेलेल्या श्री. रामचंद्रपंत तेंडुलकरांना नोकरी परत लावून देणे (पृ. ८६ ते ९२), सौ. सखूबाईंनी चुकीने सोन्याची गिन्नी दक्षिणा म्हणून दिल्याने त्यांच्या मनात आलेला विकल्प ओळखून ती गिन्नी स्वतःहून प्रसादाच्या नारळातून परत करणे (पृ. १०७), छोट्याशा भांड्यातील प्रसाद सर्वांना पुरविणे (पृ. ११७–११८), श्रीकृष्णाष्टमीचा उत्सव निर्विघ्नपणे पार पडावा म्हणून पाऊस थांबविणे (पृ. ११९), एका ब्राह्मण गृह-स्थांना व श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या बाईंना अघटित घटना घडवून आणून श्री. अमतराव सबनीसांकडून साबुदाणे देवविणे (पृ. १२०,

१२१), एका गुजराथी ब्राह्मण गृहस्थांच्या मुलीचे पिशाच्च काढणे (पृ. १८०–१८१), श्री. माधवराव परांजपे या श्रीनर्मदा-प्रदक्षिणावासी ब्राह्मणाला तांदूळ प्रसाद म्हणून देऊन रिद्धी-सिद्धी देणे (पृ. १९०–१९१), कमंडलूतील तीर्थ कधीही न संपणे (पृ. ३०३), जगतातील कोणतीही गोष्ट व काहीही देण्याचे सामर्थ्य असणे (पृ. ३०४) आणि सिद्धींचा वापर करून महा-पर्वणीचा महामुहूर्त साधून श्रीनर्मदानदीत स्नान करणे (पृ. ३०८, ३०९) इत्यादि सर्वच कथा या गुणपैलूच्या दर्शनदृष्टीने समस्त साधकभक्तांनी मोठ्या साक्षेपाने वाचल्या म्हणजे त्यांना श्रीस्वामी-महाराजांच्या अलौकिक सामर्थ्याची प्रचीती आल्याशिवाय राहणार नाही.

श्रीस्वामीमहाराज हे "दीक्षाचार्य श्रीसद्गुरू" होते. त्यांच्या जीवनचरित्राचा हा सहावा पैलू मोठा विलोभनीय, आकर्षक व अपरूप असा आहे. त्यांच्या या पैलूचे सम्यक् दर्शन सर्व जगाला त्यांच्या चरणी नतमस्तक करावयास लावणारे आहे; कारण दीक्षाचार्य श्रीसद्गुरूंचा महिमा वर्णन करताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की, "परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्ति-पातेन। योजयति परे तत्त्वे स दीक्षयाऽचार्य मूर्तिस्थः॥" याचा अर्थ असा आहे की, ज्यावेळी शिष्याचा मूळ आवरणरूप मल हा परिपक्व होऊन गळून पडण्याच्या अवस्थेत येतो त्यावेळी श्रीसद्गुरू शक्तिपात करून शिष्याच्या मलादि आवरणाचा भेद करतात व त्याची परतत्त्वाशी गाठ घालून देतात. अशा प्रकारे शक्तिपाताने ज्ञानदान करणाऱ्या श्रीसद्गुरूंना मूर्तिमंत दीक्षाचार्य म्हणतात. यामुळेच श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनात ज्ञानयज्ञाला मूर्धन्य

...३

स्थान कसे प्राप्त झाले होते हे पाहण्यासारखे आहे. या दृष्टीने श्री. रामचंद्रराव तेंडुलकर यांना योगतारावली व पंचदशी हे ग्रंथ भेट म्हणून देऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचे जीवन कृतार्थ कसे केले (पृ. ९२ ते १०६), श्रीगुळवणीमहाराजांना दशोपनिषदे व कैवल्यादि उपनिषदांचे पाठ आणि "सोऽहं" जपाची दीक्षा देऊन कृतकृत्य कसे केले (पृ. २१६ ते २३६) आणि शेवटी ज्ञानाच्या सप्तभूमिका सांगून सर्व भक्तसाधक मंडळींना साररूप उपदेश कसा केला (पृ. २५९ ते २७०) इत्यादि सर्वच भाग अत्यंत चिंतनीय व मननीय असा आहे. या दृष्टीने विचार केला म्हणजे "अनुभवामृत" या ग्रंथात श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीसद्‌गुरूंचे जे पररूप वर्णन केले आहे तेच श्रीस्वामीमहाराजांचे खरे स्वरूप होते याची प्रचीती येऊन मन आनंदाने भरून येते. श्रीसद्‌गुरूंचे हे पररूप वर्णन करताना श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शांकरी। जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरन्तरम् ॥२॥" याचा अर्थ असा आहे की, तिन्ही लोकांमध्ये गुरू म्हणजे सर्वश्रेष्ठ अशी साक्षात् म्हणजे प्रत्यक्ष शांकरी अर्थात् शं म्हणजे मूढांना ज्ञानप्राप्तिरूप सुख प्राप्त करून देणारा जो शंकर त्या शंकररूप सत्तामय, परब्रह्मसत्स्वरूपमय, विद्या म्हणजे चित्कला, चित्शक्ती व ज्ञप्ती या नावाची असते. अशा या आज्ञा म्हणजे ज्ञानस्वरूप किंवा कुंडलिनीस्वरूप श्रीसद्‌गुरूंचा अखंड जयजयकार असो. ही नित्य निवृत्तिनाथरूप किंवा श्रीवासुदेवरूप चित्कला कुण्डलिनीशक्तिरूप श्रीगुरुमूर्ती दयेने ओथंबिलेली असल्याने त्या पूर्णदयाघन देवीमातेला अखंड व अहर्निश नमन असो.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनचरित्रात व सर्वात् महत्त्वाचा

पैलू "करुणासंपन्नता व सर्व भूतमात्रांना अभय देणे" हा असून जर आपण या पैलूचे अत्यंत साक्षेपाने दर्शन घेतले तर श्रीस्वामी-महाराज हे करुणेची साक्षात् मूर्तीच होते व ते अभयरूप ब्रह्म झाले होते याची प्रचीती येऊन मन स्तिमित झाल्याशिवाय राहणार नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी भूतमात्राच्या व पर्यायाने जगताच्या उद्धाराची जी तीव्र तळमळ होती ती कितीतरी प्रसंगातून प्रकट झाल्याचे दिसून येते. या उत्कट तळमळी-पोटीच श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रसोड्यात स्वयंपाक करणाऱ्या स्त्रियांना स्वतः भाजी चिरता चिरता पुराणे सांगणे (पृ. २०), श्री. जमीयतराम नरभेराम या भोळसट ब्राह्मण गहस्थांना चांदोद येथे श्रीनर्मदा किनाऱ्यावर प्रकट होऊन दर्शन देणे (पृ. ७८ ते ८०), श्री. गोळे यांच्या मुलाला अंगारा देऊन वरे करणे (पृ. ८४), श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या प्रमाणे सर्वांना अध्यात्मदान व ज्ञानदान करणे (पृ. ३०५ ते ३०७) आणि पूर्वाश्रमात अभि-चारिक प्रयोग करणावर तो प्रयोग उलटविण्यास अंतरंग शिष्यांना नकार देऊन "संन्यास घेताना सर्वांना अभय देण्याचे व्रत घेतले आहे" हे निक्षून सांगणे (पृ. ३१९ ते ३२५) इत्यादि सर्व कथा या दृष्टीने अत्यंत मननीय, चिंतनीय व अभ्यसनीय अशा आहेत. अभय म्हणजे भयशून्यता होय. श्रीभगवंताचे परमपदच अभयपद असल्यामुळे ते प्राप्त झाल्यावर पुन्हा चित्त संसाराभिमुख होत नाही. त्यामुळेच "अभयं सर्वभूतेभ्यः।" असा श्रुतीने आदेश दिला आहे. ही वृत्ती उदित झाली व पूर्णपणे अंगी वाणली की, परिपूर्ण अहिंसा अंगी बाणते. अशी अहिंसा प्रतिष्ठित झाली की, वैरत्याग होतो. अशी ही स्थिती म्हणजे भयशून्यता, अहिंसा व वैरत्याग अंगी परिपूर्ण बाणल्यामुळे श्रीस्वामीमहाराज अभयरूप

ब्रह्मच झाले होते, हे नितांत सिद्ध आहे. अशा प्रकारे अभयदान करणारा साधक ब्रह्मरूप होऊन जन्म-मरण परंपराचक्रातून मुक्त होतो, हे सिद्धांतरूपाने सांगताना श्रीस्वामीमहाराजांनी स्वकृत "आत्मानात्मविचार पूर्वभाग" या प्रकरण ग्रंथात असे म्हटले आहे की–

**सर्वभूतीं तो जाणून। सर्वां द्यावें अभयदान।**
**हेंचि तयाचें पूजन। पुनः जनन नच दे जें ॥१००॥**

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा आठवा पैलू "देवभक्तांची अप्राकृत लीला" हा आहे. श्रीदेवांचे श्रीस्वामीमहाराजांवर एकांतिक प्रेम असल्यामुळे आपल्या स्वरूपाशी अभिन्न असलेल्या भक्ताला "आता यापुढे श्रीक्षेत्र गरुडेश्वर सोडून जावयाचे नाही," ही प्रथमतः दिलेली आज्ञा त्याने पाळलीच पाहिजे, अशी श्रीदेवांची इच्छा होती. त्यामुळे मुंजीसाठी तिलकवाड्याला जाऊ न देणे, तिकडे जाण्यासाठी दंडाला हात लावल्यावरोवर विंचू चावल्यासारख्या वेदना देणे, पोटात वेदना देणे किंवा वेदोक्ताचे कारण सांगून जाऊ न देणे (पृ. ४२ ते ४७) आणि "आम्हाला येथेच राहावयाचे आहे. आमची मूर्ती कोठेंही पाठवू नये," असे सांगणे आणि आपण सांगितल्याप्रमाणे व श्रीनर्मदामातेच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे महासमाधी घेणार असल्यामुळे व ते आपल्याशी एकरूप होणार असल्याने त्यांच्या रूपाने श्रीनर्मदा किनारी भक्तोद्धाराची आजतागायात लीला करणे ( पृ. २७९) इत्यादि सर्व कथा साधकभक्तांनी लक्षपूर्वक वाचाव्यात म्हणजे देवभक्तांचा अंतरंग अशा अप्राकृत लीलेत प्रवेश करता येईल.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा नववा महत्त्वाचा पैलू "सर्वधर्मसमभाव" हा आहे. या दृष्टीने त्यांनी हिंदू, मुसलमान

(पृ. ७१) व गारशी (पृ. ७३ तें ७७) अशा सर्व ज्ञातीतील भक्तांना मंत्र सांगून त्यांची व्याधीतून मुक्तता कशी केली, या सर्व कथा पाहण्यासारख्या आहेत.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा दहावा महत्त्वाचा पैलू "अन्तर्यामित्व" हा आहे. या पैलूचे यथातथ्य दर्शन घेतले म्हणजे श्रीस्वामीमहाराज किती अंतर्ज्ञानी होते हे स्पष्ट होते. वडोदा येथील श्रीसिद्धनाथ मंदिराचे महन्त श्री. गणपतीबुवा यांनी प्रश्न विचारण्यापूर्वीच त्यांच्या मनातील प्रश्न ओळखून त्यांना उत्तर देणे (पृ. ८१),आपल्याकडे आलेल्या गृहस्थांना आपादमस्तक न्याहाळून ते खरे अधिकारी आहेत, हे क्षणात ओळखून त्यांना ज्ञानदान करणे (पृ. १६३) आणि एका बाईंनी आपण सांगितलेल्या मंत्राचा रुद्राक्ष-माळेवर जप केल्यामुळे त्यांना इष्टफल प्राप्त होत नाही हे ओळखून स्फटिकाच्या माळेवर जप करावयास सांगून इष्टफल प्राप्त करून देणे (पृ. १८१, १८२) इत्यादि सर्व कथा या दृष्टीने वाचनीय आहेत.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा अकरावा महत्त्वाचा पैलू "श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या पुजाऱ्यांवर उत्कट प्रेम" हा आहे. श्रीमंत सौ. इंदिराबाईराणी होळकरसाहेब यांचे लग्न श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीचे पुजारी श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांच्या सांगण्यामुळे कसे घडून आले, या प्रसंगाची सर्वच हकीकत या दृष्टीनें मोठी विलोभनीय आहे. (पृ. १५२ ते १५७) श्रीगुरुचरित्र या ग्रंथात कथन केल्याप्रमाणे "श्रीगुरुमूर्ती नरसिंहमंत्रें उपासना करिती ॥" अशी श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे उपासना केलेली असल्यामुळे हे क्षेत्र तपश्चर्याभूमी व सिद्धभूमी झाले. अशा या सिद्धभूमीतील पुजारी मंडळी श्रीदेवांचे एकांतिक

भक्त असल्यामुळे त्यांच्यावर श्रीस्वामीमहाराजांचे किती निरतिशय प्रेम होते हे उपरोक्त प्रसंगावरून स्पष्टच होते.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचा बारावा महत्त्वाचा पैलू "सर्व प्राणिमात्रांविषयी त्यांचे अन्तःकरण अत्यन्त कोमल होते," हा आहे. त्यामुळे प्रेम, दया इत्यादि गुणांचा त्यांच्या ठिकाणी एकत्रित असा अपूर्व समुच्चय झालेला दृष्टीस पडतो. झोपडीत साप निघाला असता पहिल्या दिवशी त्याला कोणाच्या दृष्टीस पडू नको म्हणून सांगणे, दुसऱ्या दिवशी प्रवचन चालू असताना तो आला असता त्यावेळी त्याला निघून जाण्यास सांगणे आणि तो बाहेर गेल्यावर त्याला न मारता श्रीनर्मदानदीत सोडून देण्यासंबंधी भक्तमंडळींना सांगणे (पृ. १५७, १५८) आणि श्रीगुरुद्वादशीच्या दिवशी सर्व भक्त-मंडळींना आग्रह करून भोजन घालणे व दररोज दर्शनासाठी आलेल्या सर्व भक्तमंडळींची उत्तम व्यवस्था करणे (पृ. १८२, १८३) इत्यादि सर्व कथाभाग त्यांच्या या गुणांचा पुरेपुर प्रत्यय आणून देतो. श्रीस्वामीमहाराजांसारखे दिव्य प्रेम आपल्या अंगात बाणविण्यासाठी साधकभक्तांना या गोष्टी कायम पथप्रदर्शक ठरतील यात काहीच शंका नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा तेरावा महत्त्वाचा पैलू "श्रीदेवांवर निरतिशय प्रेम व विश्वास" हा आहे. श्री. रामभाऊ सबनीस यांनी "पेटीतोल सर्व पैसे संपले," असे सांगितल्यावर त्यांना "श्रीदेवांच्या इच्छेने पैशाची सर्व व्यवस्था होईल," असे अगदी निःशंकपणे सांगणे (पृ. १५९), त्याप्रमाणे श्री. अंबादास भोकेंकडून पैशांची व्यवस्था होणे (पृ. १६० ते १६३) आणि महा-समाधी घेण्यापूर्वी शेवटच्या काळात श्रीमन्नृसिंहसरस्वती दीक्षित-स्वामीमहाराजांनी आपल्याला बरे वाटावे म्हणून श्रीक्षेत्र नरसोबा-

वाडी येथे श्रीदेवांवर संततधार अनुष्ठान सुरू केले आहे हे कळल्यावर "देवाला त्रास देऊ नका," असे कळवून ते बंद करविणे (पृ. २७४) इत्यादि सर्व कथाभाग या दृष्टीने साधकभक्तांनी अवश्य वाचावा. "आपल्या देहासाठी श्रीदेवांना त्रास होऊ नये," ही श्रीस्वामीमहाराजांची दृष्टी पाहिली म्हणजे "नारदस्तु तदर्पिताखिलाचारिता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ।। १९ ।।" आणि "तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः ।। २२ ।।" या देवर्षी श्रीनारदांच्या म्हणण्याचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही. आपली सर्व कर्मे श्रीभगवंताला अर्पण करणे आणि त्याचे क्षणभर जरी यत्किंचितही विस्मरण झाले तरी परमव्याकुळ होणे हीच खरी भक्ती होय, असे देवर्षी श्रीनारदांचे मत आहे. ।। १९ ।।. या निस्सीम प्रेमाच्या अवस्थेतही श्रीकृष्णांच्या दैवी माहात्म्याची गोपिकांना पळभरही विस्मृती होत होती (अथवा त्यांना त्यांचे विभुत्व माहीत नव्हते) असा अपवादकिंवा आरोप करताच येणार नाही. ।।२३।। श्रीनारद महर्षींनी भक्तिसूत्रात सांगितलेल्या भक्तीच्या या महनीय सूत्रांच्या अन्तरंगात प्रवेश करता आला तर श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीदेवांबद्दलच्या अपूर्व भक्तिप्रेमाच्या अवस्थेचे दर्शन घेता येईल. अशा प्रकारचे दर्शन घेण्याचा प्रयत्न साधकभक्तांनी अवश्य करावा.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा चौदावा महत्त्वाचा पैलू "स्ववर्णाश्रमोचित निष्कामकर्मादि क्रमालाच मान्यता" हा आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांना एका गृहस्थाने ज्ञान व भक्तीबद्दल प्रश्न विचारल्यावर त्याला त्यांनी जे उत्तर दिले त्या उत्तरातूनच त्यांना प्रथम स्वर्णाश्रमोचित्त निष्कामकर्म, तद्द्वारा चित्तशुद्धी, मग भक्ती–उपासना, वैराग्यप्राप्ती व वैराग्यामुळे तीक्ष्ण झालेल्या बुद्धीमध्ये ज्ञानाचा उदय होऊन मुक्ती प्राप्त होणे हाच

क्रम मान्य होता हे स्पष्ट होते. (पृ. १६४ ते १७२)

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा पंधरावा महत्त्वाचा पैलू "श्रीदत्तभक्ती, योग व ज्ञानाच्या प्रसारासाठी ग्रंथलेखन, प्रकाशन आणि ग्रंथांचे मुक्तहस्ताने वितरण" हा आहे. श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर आत्मानात्मविचार, चित्तसद्-बोधनक्षत्रमाला, श्रीदत्तभावसुधारसस्तोत्रादि ग्रंथांची रचना करून, ते छापवून आणून व त्यांच्या प्रसारासाठी त्यांचे मुक्तहस्ताने वितरण करून श्रीदत्तभक्तीच्या व योगाच्या प्रसाराचे आणि ज्ञानदानाचे जे अपूर्व कार्य केले त्या कार्याला सर्व भारतवर्षात क्वचित्च तोड सापडेल असे वाटते. (पृ. १७९, १८०).

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा सोळावा महत्त्वाचा पैलू म्हणजे त्यांचे "व्यवहारदक्ष वागणे" हा आहे. श्रीस्वामीमहाराजांचे जरी आपल्या सर्व अंतरंग भक्तमंडळीवर व शिष्यांवर निरतिशय प्रेम असले तरी ते त्यांच्याशी एकांतातच प्रेमाने बोलत असत. लोकांतात बोलत नसत. बाहेरील लोक दर्शनासाठी, चर्चेसाठी, प्रश्न विचारण्यासाठी किंवा अन्य कारणासाठी आले की, अन्तरंग शिष्यांनी व भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांशी आपला काही परिचय नाही असे वागले पाहिजे अशी श्रीस्वामीमहाराजांची अपेक्षा असे. (पृ. १०७, १०८)

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा सतरावा महत्त्वाचा पैलू म्हणजे त्यांची "सर्व कामे करण्याची तयारी" हा आहे.या दृष्टीने श्रीकृष्णाष्टमीच्या उत्सवाचा दिवस जवळ येऊनही उत्सवाची ठर-लेली जागा भक्तमंडळींनी साफ केली नाही म्हणून तिची स्वतः साफ-सफाई करणे (पृ. ११८) व स्वतः रसोड्यात जाऊन भाज्या चिरणे (पृ. २०) इत्यादि सर्व कथा मोठ्या वाचनीय आहेत. श्रीस्वामी-

महाराजांच्या जीवनाचा हा पैलू अत्यन्त विलोभनीय असा आहे यात काहीच शंका नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा अठरावा महत्त्वाचा पैलू त्यांचे " उत्सवप्रेम " हा आहे. श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगोकुळाष्टमी (पृ. ११८), दीपावली (पृ. १८८, १८९), श्रीदत्तजयंती (पृ १९०), श्रीगुरुद्वादशी, (पृ. १८२, १८३), दसरा (पृ. २५०) इत्यादि सर्व उत्सव श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे अत्यन्त मोठ्या प्रमाणावर व श्रीमंती थाटात जे साजरे केलेले दिसतात, त्यात समाजप्रबोधन, लोकजागृती, श्रीदेवांच्या भक्तीकडे स्थूलात्मक आधाराने दृष्टी वळविणे हे व इतर उदात्त हेतूच असल्याचे दिसून येते.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा एकोणिसावा महत्त्वाचा पैलू "श्रीगुरुचरित्रप्रेम" हा आहे. या प्रेमापोटी व या ग्रंथाचे लोकोत्तरत्व सर्वांगांनी समाजात दृढमूल व्हावे म्हणून या ग्रंथावर आधारित मराठी " श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार " व संस्कृत " द्विसाहस्री, " " समश्लोकी " इत्यादि ग्रंथ श्रीस्वामीमहाराजांनी लिहिल्याचे आपण या पूर्वीच्या ६ खण्डात पाहिले आहेच. असे असले; तरी श्रीस्वामीमहाराजांचे श्रीसरस्वती गंगाधर विरचित मूळ मराठी " श्रीगुरुचरित्र " या ग्रंथावर किती प्रेम होते याची प्रचीती एका संस्कृतप्रेमी श्री. शास्त्रीबुवांना आपल्या समाधीनन्तर स्वप्न-दृष्टान्ताने देऊन व त्यांना श्रीगुरुचरित्र वाचावयाला लावून त्यांच्या पत्नीला कसे बरे केले (पृ. २०० ते २०३), ही सर्व कथा वाचनीय व चिन्तनीय अशी आहे.

श्रीस्वामीमहाराज " अलौकिक, लोकोत्तर व एकमेवाद्वितीय असे भक्त, योगी व ज्ञानी होते. " त्यांच्या जीवनाचा हा विसावा पैलू

...४

अत्यन्त विलोभनीय व स्पृहणीय असा आहे. श्रीस्वामीमहाराजांनी शेवटी "भीष्मस्तवराज" म्हणून श्रीकृष्णांची जी अपूर्व स्तुती केली होती त्यातून त्यांच्या भक्तीचा पैलू स्पष्टपणे दृग्गोचर होतो. (पृ. २८२ ते ३०१) श्रीस्वामीमहाराजांनी शेवटी आपल्या स्वस्वरूपी जी लीनता साधली (पृ. २७० ते २७२) त्यातून त्यांच्या ज्ञानाचा पैलू आणि शेवटी त्यांनी आपल्या प्राणांचा ज्या अपूर्व पद्धतीने त्याग केला ( पृ. ३२५, ३२६ ) त्यातून त्यांचा योगाचा पैलू स्पष्टपणे दृष्टीस पडतो.

येथपर्यन्त श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाच्या विविध पैलूंचे मनोहारी दर्शन घेतल्यावर या ग्रंथात समाविष्ट केलेल्या परिशिष्टांकडे दृष्टिक्षेप टाकू. श्रीदेवांनी श्रीस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे कायम वास्तव्य करावयास सांगितल्यामुळे व त्यांनी तेथे श्रीनर्मदामातेच्या व श्रीदेवांच्या इच्छेप्रमाणे महासमाधी घेतलेली असल्यामुळे या क्षेत्राचे माहात्म्य काय आहे, हे सर्वांना कळावे म्हणून परिशिष्ट क्रमांक १ मध्ये "श्रीक्षेत्र गरुडेश्वर माहात्म्य," परिशिष्ट क्रमांक २ मध्ये "श्रीनारदतीर्थ माहात्म्य" व परिशिष्ट क्रमांक ३ मध्ये "श्रीकरोडीश्वरतीर्थ माहात्म्य" काय आहे, हे सांगितले आहे. त्यानन्तर परिशिष्ट क्रमांक ४ मध्ये "श्रीगुरुमहाराजांच्या तोंडचे तत्त्वज्ञान," परिशिष्ट क्रमांक ५ मध्ये "श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांनी महासमाधी घेतल्यावरही तेथे त्यांचे निरंतर वास्तव्य असल्याची प्रचीती" व परिशिष्ट क्रमांक ६ मध्ये श्रीसीताराममहाराज विरचित "श्रीमद्वासुदेवानन्दलहरी" देऊन वेदान्तज्ञान, उपासना अर्थात् भक्ती, कर्म व योग या सर्वांचे श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीने महत्त्व काय होते, हे स्पष्ट केले आहे.

सारांश, श्रीथोरलेस्वामीमहाराज ... यामध्ये

व यापूर्वीच्या सहा खण्डांच्या प्रस्तावनांमध्ये त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या पैलूंचे दिग्दर्शन करून जे गुणवर्णन केले आहे ते काही त्यांचे परीक्षण नाही. अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांचे परीक्षण करण्याचे सामर्थ्य माझे तर नाहीच नाही; पण या भूतलावर कोणाचेही नाही, हे त्रिकालबाधित सत्य आहे. असे असले; तरी गेली वीस वर्षे श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या संशोधनाचा, लिखाणाचा व छापण्याचा जो उपक्रम केला आहे; त्या मागची मनातील नम्र भूमिकाच व्यक्त करावयाची झाली; तर श्रीसन्त ज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात असे म्हणता येईल की—

मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु।
अद्वयाब्जिनीविकाशु। वंदूं आतां ॥ ज्ञानेश्वरी १६.१ ॥
तो अहोरात्रांचा पैलकडु। कोणें देखावा ज्ञानमार्तंडु।
जो प्रकाश्येंवीण सुरवाडु। प्रकाशाचा ॥ १६ ॥
तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती। आतां नमों म्हणों पुढतपुढती।
जे का बाधका येइजतसे स्तुती। बोलाचिया ॥ १७ ॥
देवाचें महिमान पाहोनियां। स्तुती तरी येईजे चांगावया।
जरी स्तव्यबुद्धीसीं लया। जाईजे कां ॥ १८ ॥
जो सर्व नेणिवां जाणिजे। मौनाचिया मिठीया वानिजे।
कांहींच न होनि आणिजे। आपणपयां जो ॥ १९ ॥
तया तुझिया उद्देशासाठीं। पश्यंती मध्यमा पोटीं।
सूनि परेसींही पाठीं। वैखरी विरे ॥ २० ॥
तया तूतें मी सेवकपणें। लेववीं बालकेया स्तोत्राचें लेणें।
हें उपसाहावेंही म्हणतां उणें। अद्वयानंदा ॥ २१ ॥
परी रंकें अमृताचा सागरु। देखिलिया पडे उचिताचा विसरु।
मग करूं धांवे पाहुणेरु। शाकांचा तया ॥ २२ ॥

तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा। तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा।
उजळोनि दिव्यतेजा हातिवा। ते भक्तीचि पाहावी ।। २३ ।।
बाळा उचित जाणणें होये। तरी बाळपणचि कें आहे ?।
परी सार्चचि येरी माये। म्हणौनि तोषे ।। २४ ।।
हां गा गांवरसें भरलें। पाणी पाठीं पाय देत आलें।
तें गंगा काय म्हणितलें। परतें सर ? ।। २५ ।।
जी भृगूचा कैसा अपकारु। कीं तो मानूनि प्रियोपचारु।
तोषेचिना शाङ्‌र्गधरु। गुरुत्वासीं ? ।। २६ ।।
कीं आंधारें खतेलें अंबर। झालेया दिवसनाथासमोर।
तेणें तयातें पऱ्हा सर। म्हणितले काई ? ।। २७ ।।
तेवीं भेदबुद्धिचिये तुळे। घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळे।
तुकिलासि तें येकी वेळे। उपसाहिजो जी ।। २८ ।।
जिहीं ध्यानाचा डोळां पाहिलासी। वेदादि वाचां वानिलासी।
जें उपसाहिलें तयासि। तें आम्हांही करीं ।। २९ ।।
परी मी आजि तुझ्या गुणीं। लांचावलों अपराधु न गणीं।
भलतें करीं परी अर्धधणीं। नुठी कदा ।। ३० ।।

याचा अर्थ असा आहे की, विश्वाचा आभास नाहीसा करणारा व अद्वैत स्थितिरूप कमलाच्या सर्व पाकळ्यांना संपूर्णपणे उमलविणारा असा अत्यंत आश्चर्यकारक श्रीगुरुरूपी सूर्योदय झाला आहे. त्यांना माझा नमस्कार असो. ।।१।। श्रीगुरुरूपी सूर्य हा रात्र व तत्सापेक्ष दिवस यांच्या पलीकडे म्हणजे ज्ञानाज्ञानातीत केवळ चित्स्वरूप आहे. तो प्रकाश्य म्हणजे दृश्य पदार्थाविना केवळ प्रकाशमय असा प्रकाशाचा सुकाळ आहे. श्रीगुरू हे ज्ञानरूपी सूर्य असून ते सर्व प्रमाणांच्या पलीकडे असल्याने त्यांना कोणी कोणत्या साधनाने पाहावे ? किंवा ओळखावे ? ।।१६।। श्रीनिवृत्ति

नाथमहाराज अर्थात् श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज हे चैतन्यरूपी सूर्यच आहेत. त्यांना माझा नमस्कार असो. श्रीसद्गुरूंची वाणीने शब्दद्वारा जी स्तुती केली जाते त्यामुळे त्यांच्या महिम्याला बाधाच येते. त्यामुळे अशी स्तुती त्यांना शोभत नाही; ॥१७॥ कारण ज्यावेळी स्तव्य बुद्धिसह स्तुती करणारा, स्तोत्र व ज्याची स्तुती करावयाची तो अशी त्रिपुटीच नाहीशी होते त्यावेळीच श्रीसद्गुरुदेवांच्या महतीच्या योग्यतेच्या मानाने त्यांची खरी स्तुती होते. ॥ १८ ॥ काही न जाणणे व सर्व वस्तूंचे ज्ञान नाहीसे होणे, हेच श्रीसद्गुरूंना जाणणे होय. मौनाला मिठी मारून अर्थात् मौनाच्या पलीकडे जाऊन श्रीसद्गुरूंचे काही एक वर्णन न करणे, हेच खरे त्यांचे वर्णन करणे होय आणि आपण काहीच न होणे म्हणजे द्वैताद्वैतविवर्जित अशा ब्रह्मस्थितीला प्राप्त होणे हेच श्रीगुरूंना आपल्या ठिकाणी आणणे होय अर्थात् त्यावेळेसच त्यांची आत्मत्वाने प्राप्ती होते. ॥ १९ ॥ अशा प्रकारे श्रीसद्गुरूंची प्राप्ती करीत असताना पश्यन्ती व मध्यमा या वाचा परेसह वैखरीस पोटात घालून लय पावतात. ॥ २० ॥ हे अद्वयानंदरूपी श्रीसद्गुरो ! तुम्ही असे ब्रह्मरूप आहात. मी सेवकपणाच्या नात्याने शब्दांचे स्तुतिरूपी अलंकार तुम्हाला घालतो. वास्तविक पाहता हेही कमीपणाचे असल्यामुळे तो माझा अपराधच आहे; तरीपण हा अपराध सहन करून आपण माझ्या स्तुतीचा स्वीकार करावा. ॥ २१ ॥ कारण एखाद्या दरिद्री माणसाला अमृताच्या सागराचे दर्शन झाल्यावर आनंदाचे भरते आल्यामुळे व स्वतःचे भान न राहिल्यामुळे उचित गोष्टींनी त्याचा सत्कार करण्याचे तो विसरतो व आपल्या योग्यतेनुसार भाजीपाल्यांची मेजवानी करून पाहुणचार करतो. ॥२२॥ अशा वेळी हे सद्गुरो ! आपण भाजीपाल्याची

किंमत मनात न आणता हे पक्वान्न समजून त्याचा हर्षनिर्भर होऊन पाहुणचार घ्यावा व पूर्ण उत्कट इच्छेचीच किंमत अधिक मानावी किंवा आपल्या सारख्या सूर्याच्या दिव्य तेजाला माझ्या सारखा काडवातीने ओवाळू लागला तर त्या काडवातीच्या उजेडाचा कमीपणा मनात न आणता माझी भक्तीच विशेष मानावी अशी माझी प्रार्थना आहे. ।।२३।। लहान बालकाला योग्य काय व अयोग्य काय हे जर समजले असते तर मग त्याचे बालपण ते काय राहिले ; पण त्याच्या बाळलीलांचेच त्याची आई कौतुक मानून संतोष पावते. ।।२४।। हे श्रीसद्गुरो ! असे पाहा की, गावातील नाल्याच्या पाण्याचे लोट गंगेच्या पाण्यावर पाय देऊन आत घुसले तर ती गंगा त्याला "तू घाण पाणी आहेस, बाजूला हो ! परत जा !" असे म्हणते का ?।।२५।। श्रीसद्गुरुमहाराज ! भृगुऋषींनी श्रीकृष्णांच्या हृदयावर लाथ मारली, हा खरोखर केवढा चीड आणण्यासारखा अन्याय त्यांनी केला: परंतु उलट तोच प्रेमाने दिलेला उपचार व अलंकार आहे असे समजून तो श्रीकृष्णांनी आपल्या हृदयावर श्रीगुरुप्रसाद अर्थात् श्रीवत्सलांछन चिन्ह म्हणून बाळगल्यामुळे ते संतोष पावले नाहीतका? ।।२६।। किंवा अंधाराने भरलेले जग—आकाश सूर्यासमोर आल्याबरोबर उजेडाने भरते त्यावेळेस सूर्याने अंधारास किंवा त्या आकाशास "मागे सर रे" म्हणून म्हटले आहे काय ? ।।२७।। त्याचप्रमाणे हे श्रीसद्गुरो ! भेदबुद्धीचा तराजू करून त्याच्या एका पारड्यात तुम्हाला व एका पारड्यात सूर्याला घालून तुमची त्याच्याशी तुलना केली, या माझ्या हातून घडलेल्या अपराधाची आपण एकवेळ क्षमा करावी. ।।२८।। हे श्रीसद्गुरो ! प्रभो ! योग्यांनी ध्यानाच्या डोळ्यांनी आपल्याला पाहून आपली प्राप्ती करून घेतली आणि

वेदादिकांनी आपल्या वाचेने आपले वर्णन केले, हे जसे तुम्ही सहन केले तसे मी जी तुमची तुलना केली ती तुम्ही सहन करून मला क्षमा करा. ॥२९॥ खरोखर हे श्रीसद्‌गुरो ! तुमचे गुणानुवाद करण्यास मी सोकावलो आहे. त्यामुळे तुमची स्तुती केल्यावाचून मला राहवतच नाही. हा माझा अपराध न समजता त्याबद्दल आपण पाहिजे ते करा; परंतु मी अर्धपोटी उठणार नाही. अर्थात् मी तृप्ती होईपर्यंत आपली स्तुती केल्याशिवाय राहणारच नाही. ॥३०॥

आता श्रीस्वामीमहाराजांच्या सप्तखंडात्मक चरित्राचा हा जो उपक्रम केला त्याचे माहात्म्य स्पष्ट करावयाचे झाले तर श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात एवढेच म्हणता येईल की–

तेणें अबालसुबोधें । ओवीयेचेनि प्रबंधें ।
ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ ज्ञानेश्वरी– १८.१७४३ ॥
आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरी ।
पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥ ४४ ॥
तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी ।
ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ? ॥ ४५ ॥
पाठ करिता व्याजें । पांडित्यें येती वेषजे ।
तैं अमृतातें नेणिजे । फावलिया ॥ ४६ ॥
तैसेंनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपेणें ।
मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥ ४७ ॥
हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल ।
सर्वेंद्रिय पोषवील । श्रवणाकरवीं ॥ ४८ ॥
चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे ।
परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥ ४९ ॥

तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारिये ।
परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ ५० ॥
ऐसें श्रीवामननाथाचें । गौरव आहे जी साचें ।
ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥ ५१ ॥

याचा अर्थ असा आहे की, या ग्रंथात आबालवृद्धास सहज समजण्याजोग्या ओव्या (अर्थात् वाक्ये) रचून हा प्रबंध मी लिहिला आहे.यात परिपूर्ण असा रुचकर ब्रह्मरस भरला असून त्याचा आस्वाद सर्वांना घेता येईल अशा अक्षरांची मी योजना केली आहे. ॥४३॥ चंदनाचे सर्वांग सुगंधमय असल्यामुळे त्याच्या झाडाजवळ वास घेण्यास गेल्यावर त्याला फळे नाहीत म्हणून खिन्न होण्याचे कारण नाही किंवा त्याला फुले येईपर्यन्त वाट पाहात थांबण्याचेही कारण असत नाही. ॥ ४४ ॥ तसे पाहिले तर हा माझा ( चरित्र ) ग्रंथ केवळ नुसता कानावर पडताक्षणीच श्रोत्याला समाधी प्राप्त करून देणारा आहे. अशा स्थितीत जर हा ग्रंथ मनःपूर्वक ऐकला तर तो पुनःपुन्हा ऐकण्याचे (वाचण्याचे) वेड लावणार नाही का ? ॥४५॥ या माझ्या ग्रंथाचा पाठ केला असता अर्थात् तो वारंवार वाचला असता पांडित्य सहजच प्रकाशित होते अर्थात् त्यातील रहस्यमय प्रमेयांच्या अर्थाचा बोध होतो व या ग्रंथाच्या गोडीचा अनुभव लाभला म्हणजे अमृताचीही आठवण होत नाही. ॥ ४६ ॥ असा हा अमृताहून सुरस असा ग्रंथ श्रीगुरुप्रसादाने निर्माण झाला असल्यामुळे याच्या श्रवणाने (वाचनाने), मनन व निदिध्यास यांना जिंकले आहे अर्थात् या ग्रंथाच्या वाचनानन्तर इतरांची जरूरी नाही. ॥ ४७॥ हा माझा ग्रंथ वाटेल त्याला आत्मस्वरूपाच्या आनन्दाचा शेलका वाटा देईल आणि श्रवणेंद्रियांच्या द्वारा सर्व इंद्रियांना तृप्त करून त्यांचे पोषण करील. ॥ ४८ ॥ ज्याप्रमाणे आपल्या अंगभूत शक्तीने

चकोर पक्षी चंद्राच्या अमृताचा जसा उपभोग घेऊन चतुर ठरला आहे तसा उपभोग सर्वांना घेता येत नसला तरी चांदण्याच्या शीतलतेचा उपयोग मात्र सर्वांना होतो. ॥ ४९ ॥ त्याप्रमाणे या अध्यात्मशास्त्रात (श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रग्रंथात) जितेंद्रिय व अंतर्मुख वृत्ती झालेलेच अधिकारी आहेत व त्यांनाच खरा आनंद प्राप्त होईल हे जरी खरे असले; तरी इतर सामान्य लोकही माझ्या या साहित्यात्मक वाक्‌चातुर्याने सुखी होतील. ॥ ५० ॥ हे सर्व श्रीसद्‌गुरू वामननाथमहाराजांचेच खरे ऐश्वर्य आहे. त्यामुळे हा नुसता ग्रंथ ( हे सप्तखंडात्मक चरित्र) नसून केवळ त्यांच्या कृपेचे अपार असे वैभवच आहे. ॥ ५१ ॥

श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र म्हणजे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात सांगावयाचे झाले; तर "हे अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें। गगन मुठीं सुवावें। मशकें केवीं ? ॥ज्ञानेश्वरी–१ ७४॥" असेच आहे यात काहीच शंका नाही. असे असले; तरी "आधींच तंव तो कृपाळू। वरी गुरुआज्ञेचा बोलू। जाला जैसा वर्षाकाळू। खवळणें मेघा ॥१८.१७६१॥ मग आर्तिचेनि वोरसें। गीतार्थग्रंथनमिसें। वर्षला शांतरसें। तो हा ग्रंथु ॥१७६२॥ या न्यायाने श्रीगुर्वाज्ञेनेच हा ग्रंथ लिहिला आहे, यात तिल:प्राय शंका नाही. त्यामुळे या ग्रंथाचे सर्व कर्तृत्व श्रीगुरुमहाराजांचे आहे, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात नम्रपणे एवढेच म्हणावेसे वाटते की–

"तेथ पुढां मी बापिया। मांडला आर्ती आपुलिया।
कीं यासाठीं येवढिया। आणिलों यशा ॥ ज्ञानेश्वरी १८.१७६३

एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें।
तें ग्रंथें बोधौनि दिधले। गोसावी मज ॥ ६४ ॥
वांचूनि पढे ना वाची। ना सेवाही जाणें स्वामीची।
ऐशिया मज ग्रंथाची। योग्यता कें असे ? ॥ ६५ ॥
परी साचचि गुरुनाथें। निमित्त करूनि मातें।
प्रबंधव्याजें जगातें। रक्षिलें जाणा ॥ ६६ ॥
तऱ्ही पुरोहितगुणें। मी बोललों पुरें उणें।
तें तुम्हीं माउलीपणें। उपसाहिजो जी ॥ ६७ ॥
शब्द कैसा घडिजे। प्रमेयीं कैसा पां चढिजें।
अळंकारु म्हणिजे। काय तें नेणें ॥ ६८ ॥
सायिखडेयाचें बाहुलें। चालवित्या सूत्राचेनि चाले।
तैसा मातें दावीत बोले। स्वामी तो माझा ॥ ६९ ॥
यालागीं मी गुणदोष–। विषीं क्षमाविना विशेष।
जे मी संजात ग्रंथलों देख। आचार्यें कीं ॥ ७० ॥

याचा अर्थ असा आहे की, पीडित झालेल्या लोकांना दु:खापासून सोडवावे या कळकळीने (श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रलेखनाच्या) गीतार्थ करण्याच्या निमित्ताने शांतरसाचा जो श्रीनिवृत्तिनाथांनी (श्रीवामननाथांनी) वर्षाव केला, तोच हा ग्रंथ होय. ॥ ६२ ॥ ज्यावेळी मी चातकपक्षासारखा श्रीगुरूंचा प्रसाद प्राप्त व्हावा म्हणून इच्छा करून त्यांच्यापुढे जाऊन बसलो त्यावेळी मी अनन्य शिष्य आहे असे पाहून त्यांनी माझ्यावर कृपा केली. त्यामुळेच हे सप्त खंडात्मक ग्रंथकर्तृत्वाचे यश सिद्धीस गेले आहे. ॥ ६३ ॥ अशा प्रकारे करून श्रीगुरुपरंपरेने प्राप्त झालेले आपले जे समाधिधन (चरित्र धन) एके ठिकाणी बांधून माझ्या श्रीनिवृत्तिनाथांनी (श्रीवामन नाथांनी) ग्रंथरूपाने रचना करून मला दिले. ॥ ६४ ॥ वास्तवि

पाहता मी काही अध्ययन केलेले नाही, काही वाचलेले नाही व श्रवणही केलेले नाही. त्याच प्रमाणे मला श्रीस्वामींची सेवा करण्याचेही ज्ञान नाही. असे असल्यामुळे मला ग्रंथरचना करण्याची योग्यता कोठून असणार ? ।। ६५ ।। असे असले; तरी श्रीगुरूंनी माझे निमित्त करून जो (हा चरित्र) ग्रंथ केला, त्या ग्रंथाच्या योगाने सर्व जगाचे रक्षण केले आहे असे समजा. ।। ६६ ।। यामुळे श्रीगुरूंचा पुरोहित म्हणून मी जे काही बोललो असेन, ते आपण संतजनांनी माउलीप्रमाणे सहन करावे. ।। ६७ ।। शब्दांची रचना कशी करावी, त्यातून इच्छित सिद्धान्त कसा काढावा व साहित्य शास्त्रातील अलंकार कशाला म्हणावे, हे मला काहीही माहीतच नाही. ।।६८।। (मग हा ग्रंथ कसा लिहिला असे विचाराल तर) ज्याप्रमाणे कळसूत्री वाहुले सूत्रधाराच्या सूत्राने हलविल्याप्रमाणे हलते व चालते त्याप्रमाणे मला पुढे करून माझ्या श्रीगुरूंनीच (माझ्या अंतःकरणात प्रकाशित होऊन) हा ग्रंथ लिहिला आहे. ।। ६९ ।। याकरिता या ग्रंथातील गुणदोषांविषयी किंवा ते सहन करण्याविषयी मी विशेष असे काहीच म्हणत नाही; कारण माझ्या श्रीगुरूंनीच निर्माण केलेला व ज्याला केवळ मी निमित्त झालो आहे, असा ग्रंथ मी आपल्यापुढे मांडला आहे. ।। ७० ।।

येथे एक गोष्ट नमूद करणे आवश्यक वाटते की, श्रीस्वामी-महाराजांचे हे चरित्र खंडशः प्रसिद्ध करीत असताना त्यांचे दर्शन व अनुग्रह घेतलेल्या व्यक्तींना भेटणे, त्यांच्या चातुर्मासात व इतर वेळी ज्या ज्या ठिकाणी ते राहिले ती स्थाने पाहणे, तेथील श्रीस्वामीमहाराजांच्या वस्तूंची व वास्तूंची छायाचित्रे घेणे, त्यांच्या प्रभावळीतील थोर सत्पुरुषांच्या जीवनचरित्राची माहिती गोळा करणे इत्यादि कार्येही चालू होती व आहेत. या कार्याच्या

पूर्तीसाठी शके १९१५ च्या ज्येष्ठ अर्थात् इ. स. १९९३ च्या जून महिन्यात मी १०-१२ लोकांसह श्रीक्षेत्र प्रयाग, श्रीक्षेत्र वाराणसी, श्रीक्षेत्र चित्रकूट व श्रीक्षेत्र ब्रह्मावर्त इत्यादि ठिकाणी गेलो होतो. श्रीक्षेत्र ब्रह्मावर्त येथे शके १९०९ च्या वैशाख अर्थात् इ. स. १९८७ च्या मे महिन्यात गेलो असताना तेथून श्रीस्वामी-महाराजांची कंथा, छाटी व कमंडलू इत्यादि वस्तू आणल्या होत्या. त्या वस्तू का व कशाकरिता आणल्या या संबंधीची माहिती खंड तिसरा, प्रस्तावना पृष्ठ १७ वर दिली आहे. यावेळी दि. ८–६–९३ रोजी तेथील विद्यमान विश्वस्त श्री. सुभेदार यांच्या इच्छेप्रमाणे पूजा–अर्चा–नैवेद्यादि सर्व व्यवस्था उत्तम व्हावी म्हणून तेथील श्रीदत्तमंदिरातील फडताळात असलेली श्रीस्वामीमहाराजांची छाटी व श्रीदत्तात्रेयांच्या मूर्तीखाली ठेवलेला श्रीस्वामीमहाराजांचा वसावयाचा पाट घेऊन आलो. सध्या या वस्तू २६।२०२ लक्ष्मीनगर, पुणे–४११००९ येथे ठेवल्या असून त्यांची समंत्रक पूजा–अर्चा–नैवेद्यादि सर्व व्यवस्था माझे बंधू श्री. हरिहर रामचंद्र जोशी, त्यांची मंडळी चि. सौ. रमा हरिहर जोशी व त्यांचे सुपुत्र चि. योगेश हरिहर जोशी हे अत्यंत भक्ति-भावाने व प्रेमाने करीत असतात. येथे श्रीस्वामीमहाराजांच्या व श्रीगुरुचरणांच्या इच्छेप्रमाणे व संकल्पाप्रमाणे भजन, पूजन, अर्चन उत्सवादि होत असतात. या वस्तूंच्या रूपाने श्रीस्वामी-महाराजच अत्यंत प्रेमाने सर्व साधक–भक्तांवर अनुग्रह व मार्ग-दर्शन करण्यासाठी आपल्या येथे आले आहेत अशी आम्हा सर्वांची दृढ श्रद्धा आहे. श्रीस्वामीमहाराजांची चरण सेवा पराकाष्ठेच्या प्रेमाने, उत्कट भक्तीने, अपूर्व श्रद्धेने व एकांतिक निष्ठेने त्यांनी आम्हा सर्व सेवक–भक्तांकडून करून घेऊन आम्हा सर्वांवर

आपल्या प्रेमकृपामृताचा अखंड वर्षाव करून आमचे जीवन धन्य व कृतार्थ करावे अशी आम्हा सर्वांची त्यांच्या व त्यांचे परमभक्त माझे श्रीसद्‌गुरुनाथमहाराज यांच्या चरणी पराकोटीच्या शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

उपरोक्त वर्णन केलेल्या याच प्रवासात दि. ४ व ५ जून १९९३ रोजी श्रीक्षेत्र वाराणसी येथे गेलो असताना श्रीवल्लभराम शालिग्राम सांगवेद विद्यालय, रामघाट येथे श्री. विश्वेश्वरशास्त्री द्राविड, अध्यक्ष व श्री. गणेश्वरशास्त्री द्राविड, न्यायशास्त्राध्यापक यांची भेट घेऊन श्रीस्वामीमहाराजांचे एक पट्टशिष्य श्री. गोविंदमहाराज पंडित यांच्या चरित्राची माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला. या दोघांनी या दृष्टीने खूपच मदत केली. कालौघात त्यांनी दिलेल्या माहितीचा उपयोग करून श्री. गोविंदमहाराज पंडित यांचे चरित्र वाचकांना उपलब्ध करून देता आले तर ती मोठी स्पृहणीय गोष्ट होईल यात काहीच शंका नाही.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या सातव्या खंडात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील सर्व छायाचित्रे एकत्रित करून समाविष्ट केली आहेत. ही सर्व छायाचित्रे श्री. विनय मुरलीधर देशपांडे, दीपनगर, यांनी मोठ्या प्रेमाने, आपुलकीने व आत्मीयतेने त्या ठिकाणी स्वखर्चाने स्वतः जाऊन काढून आणून दिली. त्याचप्रमाणे डायमंड स्टुडिओचे मालक श्री. मु. कृ. जोशी, वडोदा, माजी विश्वस्त, श्रीदत्त संस्थान, श्रीक्षेत्र गरुडेश्वर यांनीही आत्तापर्यंत काढलेली तेथील सर्व छायाचित्रे या खंडात समाविष्ट करण्यासाठी मोठ्या प्रेमाने दिली. याबद्दल मी श्री. जोशी यांचा ऋणी आहे. श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील धाकटे बंधु व त्यांचे परमभक्त श्री. सीतारामंमहाराज यांनी श्रीस्वामीमहाराजांविषयी लिहितांनी

" मना ध्यायिं गुरुवासुदेवासि चित्तीं । याहुनी अन्य तुज किमपि नाहीं ॥ " आणि " वासुदेवगुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायीं ॥ " असे म्हणून त्यांच्याबद्दल जी पराकाष्ठेची भक्ती, एकांतिक निष्ठा व लोकोत्तर आदर प्रकट केला आहे तशीच पराकाष्ठेची भक्ती, एकांतिक निष्ठा व लोकोत्तर आदर माझ्या अंतःकरणात वसत असल्यामुळे हा महदुद्योग केला आहे. श्रीस्वामी-महाराजांच्या या श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील सर्व स्थानांच्या व वस्तूंच्या छायाचित्रांचे सर्व साधकभक्त व वाचक अत्यंत प्रेमाने, भक्तीने व निष्ठेने स्वागत करतील अशी नितांत खात्री वाटते. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांनी महासमाधी घेतल्या-मुळे आम्हा सर्व साधक भक्त मंडळींच्या दृष्टीने ते या भूतलावरील सर्वांत पवित्रतम व श्रेष्ठतम तीर्थक्षेत्र झाले आहे. या दृष्टिकोना-तून या क्षेत्राच्या छायाचित्रांचे अनन्यसाधारण महत्त्व साधकांच्या लक्षात येईल. श्रीस्वामीमहाराजांनी ही सेवा मान्य करून घेऊन सर्व भक्तमंडळींवर कृपा करावी अशी त्यांच्या परमकोमलचरणी पराकोटीच्या शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

सारांश, श्रीथोरलेस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या सातव्या खंडात चित्रित झालेले श्रीस्वामीमहाराज " किंवहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं (वासुदेवीं) । अखंडित ॥१८.१८००॥ " या श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "श्रीज्ञानेश्वरीत" सांगितलेल्या न्यायाने लोकोत्तर कोटीचे अवतारी महापुरुष होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांसारख्या अवतारी, सज्जन व भगवद्भक्त महापुरुषांच्या कृपेमुळे सर्व त्रैलोक्य अपूर्व सुखाने परिपूर्ण व्हावे आणि सर्व प्राणिमात्रांनी आदिपुरुषरूपी श्रीवासुदेवाचे किंवा श्रीहरीचे अर्थात् श्रीस्वामीमहाराजांचे अखंड

भजन, स्मरण, कीर्तनादि नवविधा भक्ती करून अध्यात्माची, धर्माची व कृतकृत्यतेची प्राप्ती करून घ्यावी म्हणून त्यांच्याच चरणी अखंड प्रार्थना आहे. याकरिता "श्रीवासुदेवः शरणं मम ।।" असा अखंड जप करीत आपले जीवन कृतकृत्य करण्यातच खरी धन्यता आहे. श्रीस्वामीमहाराजांचे अनन्य भक्त व त्यांचे पूर्वाश्रमातील धाकटे बंधू श्रीसीताराममहाराज यांनी "श्रीमद्वासुदेव स्वामिन् । दयाब्धे तारकपददायिन् ।।" असे त्यांचे भजन करून ज्या अपूर्व पद्धतीने गौरवपूर्वक व शरणागतीपूर्वक स्मरण करण्याचा मार्ग उपलब्ध करून दिला आहे, त्या भजनाचाच आश्रय घेऊन "जैसें घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ।।१८.१३९९।।" या श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने श्रीस्वामीमहाराजांच्या तारकपदाला शरण जाऊन त्या पदकमलाशी एकरूप होता यावे म्हणून पुढीलप्रमाणे त्यांची अनन्यभावाने शरणागतीपूर्वक प्रार्थना व आरती करणेंच योग्य ठरेल.

★ ★ ★

## ।। श्रीसद्गुरुप्रार्थना ।।

जयगरुडेश्वरवासिन् सद्गुरो । पालय मां प्रभो दीनदयाघन ।।धृ०।।
पतितोद्धारा अखिलउदारा । कुरुभयशमनं यतिराड्भूमन् ।।
जयगरुडेश्वरवासिन्० ।। १ ।।
त्वमसि पिता त्वं माता त्वमेवहि । ममापराधन् क्षमस्व भूमन् ।।
जयगरुडेश्वरवासिन् ।। २ ।।
जयजय भगवन्नचिन्त्[illegible]महिमन् । मामुद्धर भो सद्गतिदायिन् ।।
जयगरुडेश्वरवासिन् ।। ३ ।।

# ॥ आरती ॥

चिन्मूर्ते वासुदेवा, करितों मी आरती ॥
ओंवाळूं प्रेमभावें, दे भजकां सन्मती ॥ धृ० ॥
सह्यागिरी दक्षिणेसी विख्यात कोंकणीं ॥
भृगुपतिचा तनय जेथें तप करितो अनुदिनीं ॥
तत्क्षेत्रीं अत्रिगोत्रीं अवतरला सुरमणी ॥ चाल ॥
करि लीला जो विचित्र, निजभजकां रक्षणीं ॥
चिन्मूर्ते वासुदेवा० ॥ १ ॥

निर्गुणची असुनि जो का, हो देही गुणमय ॥
सद्धर्मा उद्धराया, गृहि होई जो स्वयें ॥
करि पूजा मनोभावें, द्विज देवां अन्वयें ॥ चाल ॥
वंदं तया गुरुरायां, हरि जो कां भवभयें ॥
चिन्मूर्ते वासुदेवा० ॥ २ ॥

करि अटना भूवरी जो, यतिरूपा घेऊनी ॥
निजहस्तें घेइ दंडा, दुष्टजना शिक्षणीं ॥
सद्विद्या बोधि जो का, श्रुतिशास्त्रां मंथुनी ॥ चाल ॥
करि पूत सकळ तीर्थां, निजचरणा स्पर्शुनी ॥
चिन्मूर्ते वासुदेवा० ॥ ३ ॥

जो कृष्णा पंचगंगा संगमि राही हरी ॥
तो दत्त माणगांवीं यशोदेचे ऊदरीं ॥
प्रगटोनी स्मर्तगामी, निजभजकां उद्धरी ॥ चाल ॥
सीतारामा पूर्णकामा, संसृतिचे भय हरीं ॥
चिन्मूर्ते वासुदेवा० ॥ ४ ॥

अशा रीतीनें श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना व आरती करून त्यांचें स्मरण व गुणगान केलें म्हणजे श्रीसद्गुरू हे सर्व संसारभ्रम

दूर करून व स्वस्वरूपी एकरूप करून सामरस्यात्मक विश्रांती देणारे आणि कल्याणरूप अमात्रक व अमनस्क स्थिती प्राप्त करून देणारे आहेत अशी धारणा अंतःकरणात उत्पन्न होते. ही धारणा अधिक दृढ व्हावी म्हणून श्रीसीतारामंमहाराजांच्या शब्दात आपण श्रीकृष्णरूप श्रीस्वामीमहाराजांची पुन्हा एकदा पुढीलप्रमाणे प्रार्थना करू.

## ॥ पद ॥

घडि घडि पल सतत तुझे पाय स्मरूं कृष्णा ।
षड्रिपु मज गांजिती हे वारी भवतृष्णा ॥ धृ० ॥
मायामय भवसागर । वाटे बहु अति दुर्धर ॥
बुडतों मी देउनि कर । काढि सख्या कृष्णा ॥घडि०॥१॥
अंबकुंड अति सुंदर । वाटे तुज बहु प्रियकर ।
राधेसह वससि नित्य । तूंचि मेघःश्यामा ॥ घडि० ॥२॥
अति विनयें करितों स्तवन । चरणिं अर्पि हृदयसुमन ॥
भक्तिभावें ध्याईं चरण । ने मज निजधामा ॥घडि०॥३॥
तारियले भक्त अमित । गोपवधू होति मुक्त ॥
धांव प्रभो पहासि अंत । तारि सीतारामा ॥ घडि० ॥४॥

आता खंडशः प्रसिद्ध होणाऱ्या या बृहत् चरित्राच्या लेखनासाठी, छायाचित्रे काढण्यासाठी, छपाईसाठी व प्रसारासाठी ज्यांचे साहाय्य झाले व होत आहे त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे.

श्रीथोरलेस्वामीमहाराज यांच्या चरित्राच्या पहिल्या सहा खंडांना व विशेषतः या सातव्या खंडाला श्री. भगवानराव यशवंतराव ऊर्फ श्री. तात्यासाहेव कुलकर्णी, चेंबूर, यांनी आर्थिक

...६

साहाय्य करून आपल्या प्रथम पत्नी कै. सौ. इंदिराताई भगवानराव ऊर्फ आक्का कुलकर्णी, चेंबूर यांच्या स्मरणार्थ हा खण्ड श्रीस्वामी-महाराजांच्या चरणी सप्रेम अर्पण केला आहे. त्यांच्या या सत्कार्यात त्यांच्या द्वितीय पत्नी अर्थात् कै. सौ. इंदिराताई भगवानराव कुलकर्णी यांच्या कनिष्ठ भगिनी सौ. उषाताई भगवानराव ऊर्फ मावशी कुलकर्णी, त्यांचे सुपुत्र श्री. अजितराव व श्री. छोटुसाहेब आणि कै. सौ. इंदिराताई यांचे सुपुत्र श्री. भाऊसाहेब व श्री. बाळासाहेब कुलकर्णी यांचा सिंहाचा वाटा आहे, यात तिल:प्राय शंका नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या बृहत् कार्यासाठी श्री. कुलकर्णी कुटुंबीय मंडळी अत्यंत प्रेमाने, आपुलकीने व निरपेक्षपणे जे सहकार्य करीत आहेत व पुढील खंडांना जे साहाय्य करणार आहेत, ते साहाय्य हे नुसते साहाय्य नसून, ती धर्माची व पर्यायाने समाजपुरुषाची सेवा आहे. त्यांची ही धर्मसेवा अत्यन्त निरपेक्ष असल्यामुळे ती श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या दोघांनी आपल्या कृपाशीर्वादाचे छत्र त्यांच्यावर धारण करून त्यांची ऐहिक व पारलौकिक उन्नती करून त्यांच्या घरातील सर्वांचे अखंड कल्याण-मंगल करावे अशी दोघांच्या चरणी नित्यश: प्रार्थना आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचे सर्व खण्ड उत्तमरीतीने व निर्विघ्नपणे प्रसिद्ध व्हावेत म्हणून माझे गुरुबन्धू श्री. अरुणकुमार शंकरराव वाघ व त्यांच्या धर्मपत्नी डॉ. सौ. कुमुदिनीताई अरुणराव वाघ यांनी प्रथम पासून जे लक्ष दिले व सर्वतोपरी आर्थिक साहाय्य केले ते अत्यन्त स्पृहणीय व अनुपमेय असे आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. या सातव्या खण्डासाठीही त्यांनी जे साहाय्य केले ते अत्यन्त मोलाचे ठरले.

सर्व साहाय्यात त्यांचे चि. मिलिंद अरुणकुमार वाघ, वकील, यांचा वाटाही अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा आहे, हे नमूद करावे लागेल. या तिघांची सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या प्रेमकृपाशीर्वादाचे छत्र या तिघांवर व त्यांच्या सर्व कुटुंबीय मंडळींवर धारण करून त्यांची ऐहिक भरभराट व पारमार्थिक उन्नती करावी, अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

याशिवाय श्रीथोरलेस्वामीमहाराज यांच्या सातही खण्डांच्या छपाईसाठी ज्यांनी अत्यन्त आत्मीयतेने, आपुलकीने व प्रेमाने आर्थिक साहाय्य करून हे बृहत् कार्य केव्हाही अडू दिले नाही त्यात श्री. श्रीराम गोपाळराव खांडेकर, श्री. परमानन्द नैलवाल, श्रीमती कान्ताबेन प्राणुभाई देसाई, श्री. भास्कर मोरेश्वर आठवले, श्री. उदय मोतीराम पाटील, श्री. अ. शं. महावादी, श्री. रघुनाथ राजाराम आपटे, श्री. अरुण प्रभाकर राजे, श्री. उत्तमराव दिनकरराव पाटील, श्री. चन्द्रकान्तराव रघुनाथराव पाटील, श्री. शिरीष इच्छाराम चौधरी, श्री. मंगलदास शंकरराव अंजने, प्रा. प्रकाश मोतीराम पाटील, सौ. अनसूयाबाई मोतीराम पाटील, श्री. सुरेशराव रघुनाथराव पंडित, श्री. प्रभाकर नानाजी चौवळ, श्री. विजय प्रभाकर चौवळ, श्री. मुकुन्दराव नारायणराव केंदूरकर, श्री. माधवराव धोंडोपंत अजोतीकर, श्री. दामोदर दत्तात्रेय पोळ, श्री. बबनराव देवबा लांडगे, श्री. रामचंद्र प्रभाकर भिडे व श्री. सुहासराव वासुदेवराव भारंबे या सर्व साधक-भक्त व गुरुबन्धूंचा उल्लेख अत्यंत आवर्जून करणे नितांत आवश्यक आहे; कारण या सर्व लोकांनी श्रीस्मामीमहाजांच्या चरित्राच्या छपाईसाठी गेली आठ वर्षे चाललेले हे बृहत् कार्य आपल्या घरातील आपलेच

कार्य आहे या दृष्टीनेच याच्याकडे पाहिले. श्रीथोरलेस्वामी-महाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या या सर्व अंतरंग भक्तांचा ह्रा आपलेपणा व हे प्रेमच त्यांच्यावर या दोघांची अखंड कूर्मदृष्टी कशी आहे, हे सिद्ध करणारी आहे. अशा प्रकारेच श्रीस्वामी-महाराजांनी व श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी या सर्वांवर व यांच्या कुटुंबीय मंडळींवर अखंड प्रेमपूर्ण कूर्मदृष्टी ठेवून त्यांचे इहपर अखंड कल्याण-मंगल करावे व त्यांच्या कडून अशीच चरणसेवा करून घेऊन ती चरणी रुजू करून घ्यावी आणि आपल्या कृपा-आशीर्वादाचे अखंड छत्र या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबीय मंडळींवर ठेवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

आता प्रथमतः श्रीस्वामीमहाराजांचे एकांतिक भक्तश्रेष्ठ परम-पूजनीय श्री. नि. अ. तथा श्री. राजाभाऊ करंदीकरमहाराज, संस्थापक, श्रीवासुदेवानंदसरस्वती ॐ श्रीसद्गुरु प्रतिष्ठान, बोरिवली, त्यांचे सर्व साधक, भक्त व कार्यकर्ते, माझे गुरुबंधू श्री. यशवंत महादेव बाक्रे, बोरिवली आणि श्री. दत्तात्रेय कोंडीराम शिंदे व त्यांच्या धर्मपत्नी सौ. सुलभाताई दत्तात्रेय शिंदे, बोरिवली या सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या छपाईसाठी आणि त्यांनी रचलेल्या इतर ग्रंथांच्या प्रसारासाठी जे साहाय्य व अमोलिक मदत करून अपार कष्ट घेतले, घेत आहेत व घेणार आहेत त्याबद्दल मी त्यांचा अपार ऋणी आहे. याबाबतीत परम-पूजनीय श्रीस्वामीचरणभक्तश्रेष्ठ श्री. करंदीकरमहाराज यांचे साहाय्य व परिश्रम हे शब्दातीत असून त्यांच्या या उभयविध सहकार्याबद्दल त्यांना व त्यांच्या साधक–भक्त कार्यकर्त्यांना माझे शतशः हार्दिक धन्यवाद आहेत !

याशिवाय श्री. सूर्यकांत काशिनाथ भावे, सौ. उषाताई सूर्यकांत

भावे, सौ. विजयाताई रघुवीर माटेगावकर, श्री. कृष्णाजी शिवराम आठवले, श्री. गोपाळराव सदाशिवराव खांडेकर, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे, सौ. हेमलताताई उत्तमराव पाटील, सौ. रेखाताई चंद्रकांतराव पाटील, श्री. यशवंतराव गजाननराव ताटके, श्री. श्रीधर दिनकर ऊर्फ दादा खांडेकर, श्रीमती पद्मजा प्रशांत सोनारीकर, श्री. पंडितराव रामचंद्रराव दातार (वकील), कै. बाळकृष्ण सिद्धेश्वर कुलकर्णी, श्री. मधुकर शंकर दळवी, श्री. प्रभाकर धोंडोपंत अजोतीकर, श्री. सुभाष दिनकर ऊर्फ नाना खांडेकर, श्री. किशोर नारायण गोराडे, श्री. दत्तात्रेय वासुदेव ऊर्फ पोपटराव जोशी, सौ. सखूबाई दगडू पाटील, श्री. सदाशिवराव भालचंद्र शारंगपाणि, सौ. विद्याताई सदाशिवराव शारंगपाणि, श्री. मधुसूदन शंकरराव अंजने, श्री. आनंदराव कृष्णाजी पाठक, श्री. गोपाळराव रामचंद्रराव देशपांडे, श्री. सुधीर मनोहर देसाई, श्री. व्ही. जी. खेर, श्री. कमलाकरराव गजाननराव पाटील, कै. श्रीमती विजयाताई यज्ञेश्वर पंडित, कै. श्री. सुरेशराव रामचंद्रराव मल्लापूर, श्री. श्रीकांत दिनकर ऊर्फ बंडोपंत खांडेकर, श्री शा. द. करंदीकर, श्री. लक्ष्मणराव परशुरामराव पाटील, सौ. मालतीबाई लक्ष्मणराव पाटील, गं. भा. द्वारकाताई नथ्थू चौधरी, सौ. प्रतिभाताई सुहासराव भारंबे, श्री. घनःश्यामराव बाबूराव बायंगणकर, श्री. अनिल शंकर मुळचे, श्रीमती मंदाकिनी-ताई मराठे (परमपूजनीय श्री. वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या नावाने साहाय्य), श्री. सदाशिवराव श्रीनिवासराव कुलकर्णी, श्री. दत्तात्रेय मुकुंद सरदेसाई, श्री. श्रीकांत दत्तात्रेय सरदेसाई, श्री. दत्तात्रेय गुलाबसा क्षत्रीय, श्री. हरिभाऊ नारा-यणराव कुलकर्णी, सौ. मीराताई हरिभाऊ कुलकर्णी, श्री. दत्तात्रेय

नारायण मोहन–पाटील, सौ. गयाबाई दत्तात्रेय मोहन–पाटी
सौ. गंगुताई शहादू महाजन, श्री. विश्वनाथराव आनंदराव पाटी
सौ. सुमनताई विश्वनाथराव पाटील, श्री. अ. स. कानेटकर, श्री
श्री. हरिहर गोपीनाथराव दाभाडे, श्री. बळवंतराव केशवरा
जोशी, श्री. दादासाहेब यंदे, सौ. शांताताई पंढरीनाथ विराद
श्रीमती सुमतीताई विजयराव परळकर, श्री. ज. पां. खवणेक
कै. श्री. प्रभाकर कृष्णाजी भिडे, श्री. विष्णुपंत वाळकृ
आपटे, श्री. पुरुषोत्तम विष्णू आपटे, श्री. त्र्यंबकराव रामच
बेलापूरकर, श्री. सुरेन्द्र मधुकरराव देशमुख, श्री. अ
कमलाकर भवाळकर, श्री. सुधीर अनंत चौधरी, श्री. रमणला
राजाराम आळतेकर, श्री. सदानंद शांताराम पारकर, श्री. प्रभा
आनंदराव तगरसे, श्री. गोकुळदास वा. चिमलकर, सौ. वेदव
विजयकुमार कुलकर्णी, डॉ. श्री. मनोहर अनन्त फणसळकर, स
सुजाताताई मनोहर फणसळकर, डॉ. श्री. रमेश लक्ष्मण पाटक
सौ. अनुराधाताई दामोदर पोळ, कै. सौ. सुजाताताई भायदे, श्री
लक्ष्मणराव राजाराम महाजन, श्री. श्रीकृष्ण सदाशिव महाडेश्व
श्री. प्रदीप पीरचंद पाटील, डॉ. श्री. गोविंद हरि चौधरी, स
राधाताई गोविंद चौधरी, श्रीमती पद्मावतीताई एकनाथरा
कुलकर्णी, श्री. न. रा. अभ्यंकर, श्री. स. ल. खाडिलकर, श्री. नवीन
चंद्र चंदुलाल पटेल, सौ. मंजुळाताई नवीनचंद्र पटेल, श्री. कृ. न
गोरे, कै. श्यामराव गोपाळराव पाटील, श्रीमती सुधाताई श्यामरा
पाटील, श्री. विजयकुमार कुलकर्णी, श्री. तुषार चिंतामणी उपा
श्रीमती मालतीताई कमलाकर वालावलकर, श्रीमती मंजुळाता
भ. गोकुळ राणे, श्री. विश्वेश्वरशास्त्री द्राविड, श्री. गणेश्वरशास्त्री
द्राविड, श्री. नितीन यशवंत रोडे, श्री. संतोष जयवंत ...कर, श्री

विनोद हेमचंद्र मनाटकर, श्रीमती आशाताई अशोक धुपकर, कु. अंबुताई गोविंद गुळगुळे, श्रीमती गीताताई पुरुषोत्तम बोंडेकर, श्री. लक्ष्मण धोंडिबा पवार या व इतरही सर्व गुरुबन्धू, गुरुभगिनी, साधक व प्रेमी मंडळींचे श्रीथोरलेस्वामीमहाराज यांच्या चरित्राच्या प्रकाशन कार्यासाठी अपरंपार साहाय्य झाले असून पुढील सर्व खण्डांसाठी हे व इतरही सर्व साधकप्रेमी मंडळी साहाय्य करणार आहेत, ही श्रीस्वामीमहाराजांची व श्रीगुरुचरणांची अपार कृपा आहे, यात काहीच शंका नाही. या सर्वांच्या साहाय्याविना श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचा हा सहावा खण्ड छापून प्रसिद्ध होणे कदापीही शक्य झाले नसते व पुढील खण्डही छापून प्रसिद्धी होणे शक्य नाही, हे नितान्त सत्य आहे. या सर्वांचे हे साहाय्य अत्यन्त निरपेक्ष असल्यामुळे त्यांनी केलेली ही सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या प्रेमकृपाशीर्वादाचे अखंड छत्र या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबीय मंडळींवर ठेवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

या सातव्या खण्डाची छपाईप्रत माझे धाकटे बंधू चि. हरिहर यांच्या दोन्ही मुली चि. सौ. विजयागौरी महेश पटवर्धन व चि. सौ. रोहिणी गुरुप्रसाद पुजारी या दोघींनी मिळून अत्यन्त सुवाच्च अक्षरात खूप कष्ट घेऊन लिहून देऊन माझे श्रम हलके केले. श्री. द. सा. मांजरेकर यांनी अपरंपार कष्ट घेऊन हे चरित्र लिहून श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांची जी सेवा केली आहे, ती मोठी स्पृहणीय आहे, यात काहीच शंका नाही. त्याचप्रमाणे या चरित्राची मुद्रिते वाचणे, तपासणे इत्यादि सर्व कामे श्री. माधवराव धोण्डोपंत अजोतीकर, चि. अजय सूर्यकांत भावे, चि. धनंजय गजानन जोशी, श्री. शरद सीताराम ऊर्फ राजाभाऊ अत्रे, श्री. मधुकरराव गावडे, श्री.

महेश हरि पटवर्धन, चि. हरिहर, सौ. रमा, चि. योगेश, चि. सौ
विजयागौरी व चि.सौ.रोहिणी या सर्व घरातील मंडळींनी श्रीस्वामी
महाराजांची व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची अत्यन्त प्रेमाने सेवा
म्हणून केली, ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. उपरोक्त सर्वांनी
केलेली ही त्यांची विविध सेवा, प्रेम व भक्ती श्रीस्वामीमहाराजांनी
व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी मान्य करून घेऊन, या सर्वांना
त्यांच्या कुटुंबीय मंडळींना धन्य व कृतार्थ करून त्या सर्वांवर प्रेम
कृपाशीर्वादाचे छत्र अखण्ड धारण करावे म्हणून या उभयतांच्या
चरणी शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्र ग्रंथाच्या या सातव्या खण्डाचे
छपाई माझा पुतण्या चि. योगेश हरिहर जोशी याने आपल्या प्रसाद
मुद्रणालयात अत्यन्त आत्मीयतेने, प्रेमाने व श्रीस्वामीमहाराजांचे
चरण सेवा म्हणून करून दिली. यामुळे तो श्रीस्वामीमहाराजांच्या
व श्रीगुरुचरणांच्या कृपेला पात्र होऊन त्याचे इहपर अखंड कल्याण
मंगल व्हावे म्हणून या दोघांच्या चरणी प्रार्थना आहे. या प्रसाद
मुद्रणालयाची उभारणी माझे थोरले बन्धू श्री. गोविंद रामचंद्र जोशी
व त्यांचे चिरंजीव श्री. राजीव गोविंद जोशी यांनी श्रीस्वामी
महाराजांच्या वश्रीगुरुमहाराजांच्या चरणांची सेवा घडावी म्हणून
करून दिली आहे. त्या दोघांची व त्यांच्या घरातील सर्वांची ही
सेवा श्रीस्वामीमहाराजांच्या व श्रीगुरुमहाराजाच्या चरणी रु
होऊन त्यांनी आपले प्रेमकृपाशीर्वादाचे अखंड छत्र या सर्वांवर
ठेवावे व त्यांचे ऐहिक व पारलौकिक कल्याण करावे, अशी त्या
दोघांच्या चरणी प्रार्थना आहे. त्याचप्रमाणे प्रसाद मुद्रणालयातील
काम करणाऱ्या सर्वांचे अपरिमित साहाय्य झाले, होत आहे
होणार आहे हे नमूद करताना अत्यन्त समाधान वाटत आहे. य

सर्व प्रेमी कर्मचारी बंधूंनना श्रीस्वामीमहाराजांनी प्रेम, कृपा व आशीर्वाद देऊन त्यांचे इहपर अखंड कल्याण करावे म्हणून त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

इत्यलम् । श्रीसरस्वती गंगाधर यांच्या " श्रीगुरुचरित्र " या ग्रंथातील शब्दात अल्पसा वदल करून असे म्हणता येईल की, " श्रीस्वामीचरित्रामृत । सेविता तृष्णा अधिक होत ।। " हेच खरे आहे; कारण " श्रीस्वामीचरित्र ऐकता । लाघली सकळाभीष्टता । या कारणे ऐका समस्ता । श्रीस्वामीचरित्र कामधेनू ।। ५१.६८ ।। अमृताची असे माथणी । स्वीकारिता भाविकजनीं । धर्मार्थकाम-मोक्षसाधनीं । हेंचि कथा ऐकावी ।। ६९ ।। चतुर्विध पुरुषार्थ । लाधती श्रवणें परमार्थं । श्रीवासुदेवानन्दसरस्वती गुरुनाथ । रक्षी त्यांचे वंशोवंशी ।। ७१ ।। " अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे हे चरित्र कामधेनू व चिन्तामणी असल्यामुळे श्रीसन्त निरंजन रघुनाथ यांच्या शब्दात अल्पसा वदल करून त्यांचे गुणगान करताना असे म्हणता येईल की–

**श्रीक्षेत्र गरुडेश्वर नर्मदातिरी । वसे श्रीगुरूराज सर्वज्ञ योगी ।**
**जगीं योग्य जो कीर्ति वाचेसि गाया । नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां**
**वैराग्य ज्याचें वदुं काय वाणी । स्वर्गादिकीं भोगहि तुच्छ मानी ।**
**नसे दूसरा त्यापरी आचराया । नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।।२।।**
**रक्षोनिया धर्म वर्णाश्रमातें । सदा आचरे वेद आज्ञा क्रमातें ।**
**लावीतसे लोकहि आचराया । नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।।३।।**
**क्षमादयाशांति उदारतेला । सेवोनिया पूर्णपणें निवाला ।।**
**जयाचे घरीं बोध आला वसाया । नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।४।**
**विज्ञानिचा केवळ पूर्ण सिंधू । नसे चित्तवृत्ती तरंगादि बाधू ।**

...७

करी योजना साधकांतें तराया। नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।५
वदे सर्वदा नम्रवाचेसि वाणी। वसे अर्थ तो वेदशास्त्रीं पुराणीं।
सदा झीजवी उपकारार्थ काया। नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।६
मुमुक्षू जनांतें करी शक्तिपाता। करूं जे शकेना कदाही विधाता।
अनाथा जीवाची करी दूर माया। नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ।७
नव्हे सद्‌गुरू मानवी हा कदापी। परब्रह्मरूपें जगा मुक्ति मापी
वसे नित्य केशवाचेचि ठाया। नमस्कार त्या श्रीवासुदेव पायां ॥८

सारांश " सांडूनि मीठपणाचा लोभू। मिठें सिंधूचा घेतला लाभू
तैसा अहं देऊनि मी शंभू। शांभवी झालों ।। १.६३ ।। " असे
सकलसन्तशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " अनुभवामृत
ग्रंथात असे म्हटले आहे त्याप्रमाणे शिवशक्तिसमावेशपूर्व
श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी नमनरूप सामरस्य घडून यावे म्हणू
श्रीनिरंजनरघुनाथ यांच्या शब्दात त्यांच्या चरणदर्शनाचा आनं
व्यक्त करून त्यांच्या कृपेसाठी त्यांच्या चरणी प्रार्थना प्रस्तुत करी
आहे.



## ॥ श्रीसद्‌गुरुचरणदर्शनानंद ॥

धन्य आजि भाग्य माझें उदयासी आलें।
सद्‌गुरुचे पाय निजनयनीं पाहिले ।। ध्रु० ।।
सद्‌गुरुचे पदीं ऐसें अनन्त ब्रह्माण्ड।
होती जाती परि गुरुपाउले अखण्ड ।। १ ।।
सर्वांचें तें सार नाहीं जयालागि पार।
तयाच्या दर्शनें जाला नाहीं संसार ।। २ ।।
पाहतांचि क्षणीं नाहीं आपणा ठिकाण।

सर्वहि दाटला चिदानन्द पूर्णघन ।। ३ ।।
निरंजन (केशव) म्हणे मुख्य सद्‌गुरुचे पाय।
पाहिल्या वांचुनि नाहि आणि तरणोपाय ।। ४ ।।



## ।। श्रीसद्‌गुरुचरणी प्रार्थना ।।

सत्वरि धाउनि आतां येई दयावन्ता।
मजवरि कृपा करी लक्ष्मीच्या कान्ता ।। धृ० ।।
गोविन्दा गोपाळा कृष्णा माधवा अनन्ता ।
तुजविण मनीं माझ्या वाटतसे चिन्ता ।। १ ।।
संसार–सागरि बहु जहालों मी श्रमी ।
तुझिया चरणीं देवा राहिन विश्रामीं ।। २ ।।
अनाथा लागुनि आम्हां कोण तुजवीण ।
निर्वाणीं रक्षिता आहे पाहे विचारून ।। ३ ।।
निरंजन (केशव) म्हणे शेषशायी नारायणा ।
अनाथा जीवाची स्वामी येऊं दे करुणा ।। ४ ।।

श्रीस्वामीमहाराज ! आपण उपरोक्त प्रार्थनेचा स्वीकार करून आम्हा सर्वांवर शिष्यरूपाने अनुग्रह करावा आपि आम्हा सर्व साधक-भक्तांना आपल्या अप्राकृत गुरुशिष्यरूपी क्रीडेत समाविष्ट करून घ्यावे अशी आपल्या चरणी आम्हा सर्व सेवकांची अनन्यशरणागतीपूर्वक अखंड प्रार्थना आहे. इत्यलम् ।

श्रीगुरुचरणरजसेवक
केशव रामचंद्र जोशी

# श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांच्या साधक भक्तांसाठी आगामी योजना व नम्र निवेदन

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांचे वृहत् चरित्र श्रीगुर्वाज्ञेप्रमाणे व श्रीगुर्वेच्छेप्रमाणे सात खण्डात छापून पूर्ण झाले. असे असले; तरी त्यांच्या चरित्रातील काही कथा भाग मागाहून उपलब्ध झाल्यामुळे तो या सात खण्डात समाविष्ट करता आला नाही. त्याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे समग्र वाङ्मय व तत्त्वज्ञान आणि त्यांच्या प्रभावळीतील श्रेष्ठ श्रेष्ठ अंतरंग शिष्यांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राशी संबंधित अशा जीवनभागातील व कालातील यत्रतत्र उल्लेखाशिवाय, अधिक विस्तृत माहिती अगर जीवन चरित्रे देता आली नाहीत. याकरिता श्रीस्वामीमहाराजाभिन्न श्रीगुरुचरणकृपेने पुढील ग्रंथ क्रमाक्रमाने प्रसिद्ध व्हावेत म्हणून उभयतांची अभिन्नरूपाने प्रार्थना आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या व श्रीगुरुमहाराजांच्या सर्व साधक, भक्त व प्रमी मंडळींनी या वृहत् कार्यास पूर्वीप्रमाणेच आपले सर्व प्रकारचे सक्रीय साहाय्य द्यावे अशी त्यांना नम्र प्रार्थना आहे. आपण सर्वजण मिळून आपापला वाटा उचलून ही वाङ्मयसेवा करून ती श्रीस्वामीमहाराजांच्या व श्रीगुरु

महाराजांच्या चरणी अर्पण करू व या सेवेच्या रूपाने आपण सर्वजण त्यांच्या दृष्टिक्षेपाच्या झोतात राहून प्रेमकृपाशीर्वादास पात्र होऊन आपले मन भजनारूढ, उपासनारूढ, योगारूढ व ज्ञानारूढ राहील यासाठी निरन्तर प्रयत्नशील राहू. असे केले म्हणजेच आपण सामरस्याच्या राउळात अमात्रक व अमनस्क अशी कैवल्य–मोक्ष-मुक्तिरूप दीपावली भोगण्यास पात्र होऊ शकू असा विश्वास वाटतो. याकरिता आपण सर्वांनी हे वाङ्मय खरेदी करून, ते इतरांनी खरेदी करावे म्हणून त्यांना उद्युक्त करून, त्याचा प्रसार करून व या कार्याला अधिकाधिक सक्रीय आर्थिक साहाय्य करून सर्वतोपरी मदत करावी अशी नम्र प्रार्थना आहे.



## – आगामी ग्रंथ योजना –

१) श्रीथोरलेस्वामीमहाराज चरित्र – परिशिष्ट खण्ड
२) श्रीस्वामीमहाराजांचे समग्र वाङ्मय व तत्त्वज्ञान
३) श्रीस्वामीमहाराजांची दिव्य प्रभावळ
   १) श्रीसन्त गुळवणीमहाराज चरित्र
   २) श्रीसद्गुरू श्रीसीतराममहाराज चरित्र
   ३) श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज चरित्र
   ४) श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीयोगानन्दसरस्वती ऊर्फ श्रीगांडामहाराज चरित्र

५) श्रीगोविंदमहाराज पंडित चरित्र
६) श्रीसद्गुरू दत्तमहाराज ऊर्फ
श्रीदिवाणमहाराज चरित्र
७) श्रीसद्गुरू रंगावधूतमहाराज चरित्र
८) श्रीसद्गुरू तराणेकरमहाराज चरित्र

उपरोक्त आवाहानाला आपण सर्व साधक, प्रेमी, भक्त, सांप्रदा प्रेमी व गुरुबंधूंनी अत्यन्त आपलेपणाने प्रतिसाद देऊन हे बृहतका शेवटास नेण्यास सहकार्य करावे अशी पुन्हा एकदा प्रार्थना क हे नम्र निवेदन पूर्ण करतो.

श्रीगुरुपादपद्मोपजीवी
केशव रामचंद्र जोशी



श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

।। भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ।।



जितेन्द्रियांचे अग्रणी । सदा रत परब्रह्मणी ।

स्वयं श्रीदत्तशिरोमणी । ते हे यतिश्रेष्ठ श्रीवासुदेव ।।

# – अनुक्रमणिका –





श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

।। श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ।।



जितेन्द्रियगणाग्रणीरतः परे ब्रह्मणि ।
कलौ श्रुतिपथावनेऽत्रितनयोऽवतीर्णः स्वयम् ।।
करात्तसुकमण्डलुः कुमतखण्डने दण्डभृत् ।
पदप्रणतवत्सलो जयति वासुदेवो यतिः ।।

## ॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



निम्नहातीं मालाकमण्डलू । मध्यहातीं त्रिशूल-डमरू ।
ऊर्ध्वहातीं शंखचक्रू । तो हा महायोगेश्वर श्रीदत्तात्रेय ॥

॥ श्रीदत्तगुरू भगवान् ॥

ीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ॥



जन्म : श्रावण कृष्ण ५ शके १७७६, दि. १३/८/१८५४ श्रीक्षेत्र माणगाव.



माधी : आषाढ शुद्ध १ शके १८३६ दि. २४/६/१९१४ श्रीक्षेत्र गरुडेश्वर.

## ॥ श्रीगुरुशिष्यपंचायतन ॥



मध्यभागी श्रीस्वामीमहाराज, उजव्या हाताला श्रीसीतारामहाराज, डाव्या हाताला प. प. श्रीदीक्षितस्वामीमहाराज, उजव्या हाताच्या वर प. प. श्रीगांडामहाराज व डाव्या हाताच्या वर श्रीपंडितमहाराज.

## ॥ योगिराज सद्गुरू श्रीसन्त वामनरावजी गुळवणीमहाराज ॥



शक्तिपाताचा महामेरू । बहुत जनांसी आधारू ।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू । शाम्भव योगी ॥

न्म : शके १८०८, दि. २३/१२/१८८६, मार्गशीर्ष वद्य १३, श्रीक्षेत्र कुडुत्री.
समाधी : शके १८९६, दि. १५/१/१९७४, पौष वद्य ८, श्रीक्षेत्र पुणे.

## ॥ श्रीसद्गुरू श्रीसीताराममहाराज टेंबे ॥



सीतारामो योगिवरो ब्रह्मचारी कवीश्वरः ।
गुरुपादार्पिततनुः समदृग्गुरुतांगतः ॥
समाधी : फाल्गुन शुद्ध ८, शके १८४० – इ. स. १९१८
श्रीक्षेत्र बढणेरी, जि. अमरावती.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
।। श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज ।।



प्रकटोनी या धरेवरती । निजजनोद्धार करती ।
शान्त दान्त मुनिस्वामी । ते हे नृसिंहसरस्वती यती ।।
जन्म : चैत्र शुद्ध १, शके १७८८, इ. स. १८६६ श्रीक्षेत्र सदलगा.
समाधी : अश्विन वद्य ७, शके १८४९, इ. स. १९२७ श्रीक्षेत्र अयोध्या.

## ।। श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीयोगानन्दसरस्वतीस्वामी ऊर्फ श्रीगांडामहाराज ।।



यो वै भूमा तत्सुखं त्वेतिगीतं गेयातीतं ध्यानगम्यं मुनीन्द्रम् ।
भक्तैकार्यं ह्यात्त मानुष्यमूर्तिं योगानन्दं तं यतीन्द्रं नतोऽस्मि ॥

जन्म : शके १७९०, इ. स. १८६८, मार्गशीर्ष शुद्ध १५, श्रीक्षेत्र तलंगा

समाधी : शके १८५०, इ. स. १९२८, फाल्गुन वद्य १२, श्रीक्षेत्र गुंज

## श्रीस्वामीमहाराजांच्या नित्याच्या वापरातील वस्तू



श्रीस्वामीमहाराजांची छाटी, दंडसूत्र व कटिसूत्र..
दण्डाला बांधावयाचे लक्ष्मीवस्त्र, पद्मपात्र इत्यादि (खण्ड २ पृ. १८१)

श्रीस्वामीमहाराजांच्या नित्याच्या वापरातील वस्तू



श्रीस्वामीमहाराजांचे पाणी पिण्याचे पद्मपात्र (नारळाची करवंटी),
श्रीदत्तयंत्र व पादुका (खंड २ पृ. १८१)

श्रीस्वामीमहाराजांच्या नित्याच्या वापरातील वस्तू



॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर ॥



श्रीस्वामीमहाराजांच्या चिरवियोगानंतर त्यांची जेथे षोडशोपचार पूजा केली ती जागा.
सध्या येथे वरील तुळशीवृंदावन बांधलेले आहे. (खण्ड ७ पृ. ३२७)

## ॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



कागलची श्रीदत्तमूर्ती. (खंड १ ला – पृ. १५७, १५८, २४५, २८१) (खंड २ – पृ. ५३, ५४) सध्या ही मूर्ती श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीदत्तमंदिरात आहे.



सिद्धासन घातलेली, सात बोटे उंचीची, द्विभुज व वराऽभयकर श्रीदत्तात्रेयांची पितळेची कामल येथे श्रीस्वामीमहाराजांनी तयार करून घेतलेली मूर्ती. (खण्ड १ पृ. १५७, १५८)



श्री. विठ्ठलराव सोनार, बडोदा, यांनी दिलेली पंचधातूची

श्रीदत्तमूर्ती. ( खण्ड ७ पृ. १३९ )



गरुडावर बसलेले श्रीस्वामीमहाराज व श्रीक्षेत्र गरुडेश्वराच्या दक्षिण तटावरून श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीचे व श्रीदत्तमंदिराचे दिसणारे विहंगम दृश्य.



श्रीस्वामीमहाराजांच्या समाधी मंदिराचे समोरून दिसणारे दृश्य.

।। श्रीक्षेत्र गरुडेश्वर ।।



श्रीस्वामीमहाराजांच्या समाधी मंदिरात लावलेले त्यांचे छायाचित्र.

## ॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर ॥



श्रीदत्तमंदिरातील श्रीआद्य शंकराचार्य (डावीकडे), श्रीदत्तात्रेय (मधे) व श्रीसरस्वतीदेवी (उजवीकडे).

|| श्रीक्षेत्र गरुडेश्वर ||



श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीचे बाजूने दिसणारे विहंगम दृश्य.



श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीचे व श्रीनर्मदामातेचे विहंगम दृश्य.

## ।। श्रीनर्मदादेवी ।।

उभयतट पुण्यतीर्था प्रक्षालित सकललोक तुरितौघा ।
देव-मुनि-मनुज वन्द्या हरतुसदा नर्मदा दुरितम् ।।



यन्मूलेऽस्त्यमरेश्वरो विजयते श्रीसिद्धनाथस्तथा ।
कावेरी परिवेष्टितो गतिदओंकारोऽपरेचामिताः ।।
मध्येऽन्येपिच शूलपाणिसहिता पश्चात्यभागे स्थिताः ।
सर्वेते भजतामभीष्ट फलदावर्वर्तिसा नर्मदा ।।

**भगवान् परमहंस परिव्राजकाचार्य**
**।। श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज ।।**



दीक्षा द्यावया साधुजना । उद्धरावया भक्तजना ।।
अवतरे श्रीदत्तमहाराणा । श्रीमन्नृसिंहसरस्वती शंकर ।।

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

॥ श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ॥



श्री प. प. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांनी श्लोकबद्ध हार गुंफून तयार केलेले श्रीस्वामीमहाराजांचे चित्र.

(खण्ड ७ पृ. २५१-२५२)

## ॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



मालाकमण्डलुरधःकरपद्मयुग्मे । मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे । वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।
(श्रीगुरुमहाराजांनी काढलेले व त्यांना प्रसाद म्हणून मिळालेले चित्र. खण्ड ७ पृ. २३३,

## ॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥



मालाकमण्डलुरधःकरपद्मयुग्मे । मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।

यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे । वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ॥

## ॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर ॥

श्रीस्वामीमहाराजांचे समाधिमंदिर, श्रीशिवमंदिर व श्रीनर्मदानदी यांचे विहंगम दृश्य.

## ॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर ॥





श्रीदत्तमंदिरातील उपास्य मूर्ती.

भगवान् श्रीमत् परमहंसपरिव्राजकाचार्य
॥ श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज ॥



श्रीवासुदेवानन्दसरस्वती । भगवान् स्वये श्रीदत्तमूर्ती ।

समर्थ श्रीसद्गुरू पावनकीर्ती । चक्रवर्ती योग्यांचे ॥

## कै. सौ. इंदिराताई भगवान ऊर्फ आक्का कुलकर्णी



जन्म : भाद्रपद वद्य ९ शके १८४६, दि. २२/९/१९२४ जळगाव
स्वर्गवास : पौष शुद्ध ८ शके १८०७, दि. १/१/१९८५ चेंबूर

स्वर्गीय कै. सौ. इंदिराताई भगवान ऊर्फ आक्का कुलकर्णी यांच्या स्म
श्री. भगवान यशवन्तराव कुलकर्णी व सौ. उषाताई भगवानराव ऊ
मावशी कुलकर्णी या उभयतांनी हा खंड श्रीस्वामीमहाराजांच्या च
सप्रेम सादर समर्पण केला आहे.

ॐ

॥ श्रीगुरु:शरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# श्रीथोरलेस्वामीमहाराज

श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती
टेम्बेस्वामीमहाराज यांचे चरित्र
( उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क ६ )

## – खंड सातवा –

## – अध्याय सत्ताविसावा –

॥ श्रीगुरुमूर्ती माहात्म्य ॥

यतिवर गुरुमूर्ती भूपती योगियांचे ।
प्रभुवर अवतार ख्यात दत्तात्रेयांचे ॥
सकलगुणनिधि श्रीवासुदेव प्रतापी ।
बलजलधिपुढें त्या अन्य योगज्ञ वापी ॥



## ।। अनन्य प्रार्थना ।।

गुरुराया कां हो ऐशी निष्ठुरता धरिशी ।।
आम्ही तुझे दीन सर्व कां दूर करिशी ।।
तान्ह्या बाळा टाकुनियां केंवि माता जाइल ।।
जीवनासी सांडुनियां मच्छ केवीं राहिल ।।
तुम्ही जातां दूर देशीं गति कैशी होइल ।।
अंत नको पाहुं आतां धरीं आम्हां पोटाशीं ।।
गुरुराया कां हो ऐशी निष्ठुरता धरिशी ।।

★ ★ ★

## ।। जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।।

जो काळमस्तकिं महाबळ मारि सोटा ।
तूं त्या समर्थ गुरुचा मम भक्त मोठा ।
तो वांचवील तुज तत्पदिं ठेवि भावा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। १ ।।
बाहेरि दुःखजळधींतुनि आर्त काढी ।
ज्यावीण एक जगिं हालत नाहिं काडी ।
सन्मूर्ति तो निजजनांप्रति देइ ठावा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। २ ।।
कारुण्यसागर अपार उदारराणा ।
सद्भक्तजीवन शरण्य सुरांनरांना ।
चिन्मूर्ति योगिमनिंचा अति गुप्त ठेवा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ३ ।।

जो पापताप अवघें विलयास नेई ।
नामेंचि मोक्षसुख भक्तजनांस देई ।
संसारिंचा सदय सोडवि बद्धजीवा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ४ ।।

ज्याचें सदैव भय पांचहि लोकपाळां ।
यत्पादधूलि सुर लाविती ते कपाळा ।
आनंदमूर्ति अखिलांतरिंचा विसावा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ५ ।।

जो दे दया करुनिया पुरुषार्थ चारी ।
ऐसा दुजा सदय कोण मनीं विचारी ।
अन्यत्र कां घडि घडी मग घेशि धांवा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ६ ।।

होईल सौख्य मजलागिं सदा कशानें ।
अंतासि कोण सगळी मम दुर्दशा ने ।
चिंता हरील सगळ्या शमवील हांवा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ७ ।।

सोडूनि साधनसमूह अखंड वाचे ।
घे नाम एक हरिचें अथवा शिवाचें ।
सोडोनि देवगुरु यांतिल भेदभावा ।
जाई मनें शरण त्या गुरुवासुदेवा ।। ८ ।।



## चातुर्मास तेविसावा – शके १८३५–३६–इ. स. १९१३-१४
## श्रीक्षेत्र गरुडेश्वर :– अवतार समाप्ती :–

श्रीक्षेत्र गरुडेश्वर हे ठिकाण पूर्वीच्या राजपिपला या संस्थाना येत असे. हल्ली हे ठिकाण वडोद्यापासून ४८ कि. मी. अंतराव असून ते राजपिपला तालुक्यात भरूच जिल्ह्यात येते. श्रीस्वामी महाराज चैत्र वद्य ६ शके १८३५ इ. स. १९१३ रोजी ज्यावेळ येथे आले त्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे गाव नव्हते. ढाक लोकांच्या पाच-सहा झोपड्या असलेली ही एक लहानशी वस होती. हे ढाकणे लोक सर्वसाधारणपणे भिल्लांसारखे हो पावसाळ्यात मासे मारणे व श्रीनर्मदानदीच्या प्रवाहातून वाह आलेली लाकडे पकडणे अशा सारखे उद्योग करून हे लोक प भरीत असत.

श्रीक्षेत्र गरुडेश्वरच्या आसपासच्या भागात श्रीनर्मदानदी दोन्ही तीरांवर सगळीकडे वहुसंख्य शंकराचीच देवळे आहेत. राहणाऱ्या सर्व लोकांची भावना अशी आहे की, "हर कं श्रीशंकर है।" श्रीविष्णूंचे वाहन श्रीगरुड याने या ठिकाणी तपश्च करून श्रीशंकरांना प्रसन्न करून घेतले होते म्हणून हे ठिकाण श्री गरुडेश्वर या नावाने प्रसिद्धीस आले (अधिक माहिती परिशि १ व २ मध्ये पाहा.) या ठिकाणी श्रीनर्मदानदी पश्चिम वाहि आहे. येथील श्रीनर्मदानदीच्या पूर्वेकडील बाजूला दोन्ही अंग ८० मैलापर्यंत श्रीशूलपाणिश्वराचे जंगल म्हणून प्रसिद्ध आहे. श्रीनर्मदानदीच्या उत्तर किनाऱ्यावर मोठमोठे खडक असून द किनारा रेतीयुक्त मातीचा आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वरी श्रीनर्मदान पात्र फार खोल असून या पात्रात ठिकठिकाणी डोह आहेत. श्रीनर्मदानदीच्या उत्तरेच्या बाजूला श्रीगरुडेश्वर, श्रीनारदेश्व

श्रीकरोटेश्वर, श्रीसंकेश्वर इत्यादि श्रीशंकरांची लहान लहान मंदिरे असून दक्षिणेच्या बाजूला श्रीइंद्रेश्वर व श्रीवरुणेश्वराची मंदिरे आहेत. ही मंदिरे आठ-दहा फूट लांब-रुंद असून वर घुमट व पुढे मोकळी जागा अशी आहेत. या मंदिरांमध्ये बहुधा शाळुंकेसह श्रीशंकरांची पिंड, त्यामागे श्रीनर्मदेची मूर्ती व बाजूला श्रीगणपतीची मूर्ती असे दृश्य असलेले दृष्टीस पडते.

श्रीस्वामीमहाराज येथे आले त्यावेळी जंगल खात्याच्या अधि-काऱ्याचा एक बंगला येथे होता. बाकी काही नव्हते. मात्र श्रीस्वामी-महाराजांचे या निर्जन ठिकाणी वास्तव्य झाल्यानंतर येथे वस्ती वाढली व हळूहळू येथे गाव वसले. येथे सुरवातीला कित्येक वर्षे तिलकवाडा किंवा चांदोद येथून सर्व सामान आणावे लागत असे. हल्ली येथे सर्व जिनसा मिळतात. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यापासून पुढे त्यांचे या ठिकाणी चौदा महिने वास्तव्य झाले. त्यामुळे निर्जन अशा या गावाला चौदा महिन्यात तीर्थक्षेत्राचे स्वरूप आले. सुरवातीच्या काही काळानंतर येथे दररोज जणू काही जत्राच भरत असे. याशिवाय वर्षभर श्रीस्वामीमहाराजांच्या भक्तांची सारखी ये जा चालू होती.

आता हे ठिकाण एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र झाले आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वराचे देवस्थान आता न्यासाच्या (ट्रस्टच्या) ताब्यात आहे. सध्या येथे श्रीस्वामीमहाराजांनी स्थापन केलेल्या भगवान् श्रीदत्तात्रेयांचे एक सुंदर मंदिर व परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांचे समाधी मंदिर असून लोकांच्या सोयीसाठी न्यासाने धर्मशाळा बांधल्या आहेत. अलीकडे श्रीदत्तमंदिरासमोरील टेकडीवर अद्ययावत् अशी पाकशाळा (रसोडा) बांधण्यात आली असून त्यावर राहण्यासाठी उत्तम

खोल्या बांधल्या आहेत. याशिवाय श्रीकरोटेश्वराच्या मंदिरात खोल्या असून आजूबाजूला धर्मशाळा आहेत. धर्मशाळांमध्ये दिवस भाडे न घेता राहू देतात. श्रीकरोटेश्वराच्या मंदिराती रसोड्यातील खोल्या भाड्याने मिळतात. तेथे व्यवस्था उत्तम दररोज ४ रुपये देऊन जेवणही मिळते. श्रीनर्मदेच्या किनाऱ्या श्रीस्वामीमहाराजांच्या पदस्पर्शाने, चौदा महिन्यांच्या प्र वास्तव्याने व आजतागायतच्या अप्रकट वास्तव्याने हे स्थान प झाले असून त्यांच्या शक्तीने भारलेले आहे, याची प्रचीती अल्पकाळ अनुष्ठान, तपश्चर्या व साधन केले तरी आजही इतकेच नव्हे; तर श्रीसरस्वती गंगाधरांच्या शब्दात अल्पसा करून असे म्हणता येईल की, " प्राप्त होण्या स्वस्वरूपासी। नि आतां परियेसीं। प्रकट बोलें हेंचि स्वभावेंसी। गुप्तरूपें येथें ।। स्थान आपुले गरुडेश्वरी। येथून न वचे निर्धारीं। लौ मतें अवधारीं। बोल करितों श्रीस्वरूपयात्रेचा ।। प्रकट का श्रीस्वरूपयात्रेसी। वास निरंतर श्रीक्षेत्र गरुडेश्वरासी। भक्त तारावयासी। राहूं येथें निर्धार ।। " या दृष्टीने साधकांनी व भ मंडळींनी येथे जाऊन याची प्रचीती घेणे आवश्यक आहे.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर प्र श्रीनारदेश्वराच्या मंदिरामध्ये उतरले; कारण त्यावेळी राहण्याची अन्य दुसरी कोणतीही सोय उपलब्ध नव्हती. श्रीना श्वराचे मंदिर अगदी लहान आहे. या मंदिरात एक मनुष्य ब इतकीच जागा आहे. तेथेच बसून श्रीस्वामीमहाराज आपले नि अनुष्ठान करीत व या मंदिराच्या बाहेर असलेल्या एका दगडा झोपत असत. श्रीस्वामीमहाराज ज्यावेळी येथे राहावयास त्यावेळी चैत्र महिना असल्यामुळे अत्यंत कडक उन्हाळा हो

श्रीनर्मदानदीच्या किनाऱ्यावरील माती, दगड व वाळू अगदी तापून निघत असे. पुढे चैत्र महिना संपून उन्हाळा लागल्यावर उन्हाळ्याची तीव्रताही वाढली. श्रीनारदेश्वराच्या मंदिरासमोर विशेष झाडी नसल्यामुळे तेथे दिवसा उन्हाचे चटके वसत असत.

श्रीस्वामीमहाराज ज्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले त्यावेळी श्री. विष्णुपंत सोमण हेच एकमेव दक्षिणी ब्राह्मण या ठिकाणी राहात असल्यामुळे त्यांच्याकडे ते माधुकरीची व इतर दोन घरी फळांची भिक्षा घेत असत. तीन घरी भिक्षा घेण्याचा नियम असल्यामुळे त्यांना अशी सोय करावी लागली. अशा प्रकारे श्री. विष्णुपंत सोमण यांच्या घरी जी भिक्षा मिळेल ती ग्रहण करावी आणि श्रीनारदेश्वराच्या मंदिराच्या मंडपात राहावे असा श्रीस्वामीमहाराजांचा सुरुवातीला क्रम चालू होता.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आहेत ही वार्ता लवकरच सर्वत्र पसरली व त्यांच्या दर्शनाकरिता भक्तमंडळींची ये जा सुरू झाली. त्यावेळी वैशाख महिन्यातील अत्यधिक ऊन असल्यामुळे श्रीनारदेश्वराच्या मंदिरा समोरच सर्व भक्तमंडळींनी मिळून येणाऱ्या जाणाऱ्या लोकांना बसण्याकरिता एक लहानसा मंडप बांधला. या सर्व सोयीमुळे सर्वांनाच श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगाचा लाभ होण्यास मदत झाली.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले आहेत असे कळल्यावर बडोद्याहून श्री. रामशास्त्री प्रकाशकर हे वैशाख शुद्ध ७-८ च्या सुमारास म्हणजे श्री. स्वामीमहाराजांच्या आगमनानंतर साधारणपणे पंधरा दिवसांनी तेथे आले. एके दिवशी श्रीरामशास्त्री यांच्या बरोबर बोलणे चालू असताना श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " यापुढे आता येथून आपले दुसरीकडे कोठेही

जाणे होणार नाही." श्रीस्वामीमहाराजांनी बोलता बोलता गोष्ट अगदी सहजतेने श्री. रामशास्त्रींना सांगितली; परंतु हे ऐकता श्री. रामशास्त्री खूपच विचारात पडले. श्रीस्वामीमहाराजांच्या वाक्यातून दोन अर्थ निघत असल्याचे श्री. रामशास्त्रींच्या लक्ष आले. पहिला अर्थ म्हणजे श्रीस्वामीमहाराज यापुढे येथेच काय वास्तव्य करतील असा होतो. परंतु ही गोष्ट असंभाव्य असल्या आपण केलेला हा अर्थ चुकीचा आहे असे त्यांचे त्यांनाच वाट दुसरा अर्थ म्हणजे श्रीस्वामीमहाराज आपली अवतारलीला सम करून निजधामास जाणार असा होतो. या अर्थाच्या विचारा श्री. रामशास्त्री प्रकाशकर यांच्या अंगावर रोमांच उभे राहि त्यांनी या अर्थाला मनात थारा दिला नाही; परंतु या कटुविचार श्री. रामशास्त्री अत्यंत अस्वस्थ झाले व शेवटी धैर्य धारण क त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, " प्रभो ! या आपण येथून दुसरीकडे कोठे जाणार नाही, म्हणजे नेमके होणार ?" श्री. रामशास्त्रींचा हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीम राजांनी त्यांना असे सांगितले की, " येथे आल्यानंतर यापुढे दुसरीकडे कोठेही जावयाचे नाही," अशी देवांनीच आज्ञा केल्या आम्ही आपणास सहज सांगितले. त्यामुळे देवांच्या इच्छेप्रम यापुढे येथेच कायम वास्तव्य होईल." इतके सांगून श्रीस्वामीम राज गप्प बसले. श्री. रामशास्त्रींनाही त्यानंतर यासंबंधी क विचारण्याचे व चर्चा करण्याचे धैर्य झाले नाही. श्रीस्वामीमहा देवांच्या इच्छेप्रमाणे यापुढे श्रीक्षेत्र गरुडेश्वरी राहणार आहेत ए स्थूलार्थ लक्षात घेऊन ते शांत राहिले.

श्री. रामशास्त्री प्रकाशकर यांना श्रीस्वामीमहाराजांच्या त्यागासंबंधीच्या वाक्याचा जो स्थूलार्थ प्रतीत झाला तोच व त

स्थूलार्थ महापुरुषांच्याजवळ राहणाऱ्या सेवकभक्तांना प्रतीत होत असावा; कारण ते महापुरुष आपल्या निजधाम गमनाचा पत्ता लागून साधक दु:खी कष्टी होऊ नये म्हणून स्वत:शी अभिन्न असलेल्या अनादिसान्त मायेचा पडदा त्याच्यावर टाकीत असतात, हे नितांत सत्य आहे.

"यापुढे आता येथून आपले दुसरीकडे कोठेही जाणे होणार नाही," या श्रीस्वामीमहाराजांच्या एका वाक्यामागे त्यांचे पवित्र शरीर आपल्या (श्रीनर्मदेच्या) उदरातच समाविष्ट व्हावे, इत्यादि सर्व भाव प्रेमविश्वाच्या अंतरंगात शिरले म्हणजे स्पष्ट होतात व श्रीमहाराजांच्या वाक्याचा परार्थ लक्षात येऊन मन स्तंभित होते.

अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर श्रीस्वामीमहाराजांचे दिवस चालले असतानाच एके दिवशी श्री. वासुदेवशास्त्री फणसे श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेसाठी येथे आले. ते रोज श्रीस्वामीमहाराजांसाठी भिक्षा मागून आणून ती त्यांना देत असत. श्रीस्वामीमहाराजही त्यांनी प्रेमाने व भक्तीने आणलेल्या भिक्षेचा मोठ्या आनंदाने स्वीकार करीत असत. श्री. वासुदेवशास्त्री भिक्षा मागून आणून आपल्या श्रीगुरुमाउलीला ती मोठ्या प्रेमाने देत असत. आपण भिक्षा मागून आणून श्रीगुरुमाउलीला जेवू घालण्याचा त्यांचा अपूर्व प्रेमभाव मोठा अलौकिक होता यात काहीच संशय नाही.

श्रीस्वामीमहाराज मधून मधून श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे राहणाऱ्या गुजराथी मंडळींकडून फळांची वगैरे भिक्षा घेत असत; कारण दक्षिणी ब्राह्मणांशिवाय इतर कोणत्याही ब्राह्मणाच्या हातची भिक्षा अर्थात् शिजविलेले अन्न घ्यावयाचे नाही असा त्यांचा नियम असल्यामुळे त्यांनी हा पर्याय स्वीकारला होता. अशा प्रकारे दिवस चालले असता हळूहळू एक एक म्हणता म्हणता बरीच मंडळी

श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जमा झाली. काही ब्राह्मण आपल्या कुटुंबी मंडळींसह येथे येऊन राहिल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांची तीं घरच्या भिक्षेची सोय झाली. श्रीस्वामीमहाराज भिक्षेच्या वेळी फ वऱ्याची भाकरी, भात, ताक आणि भेंडयाची किंवा सुरणा आळणी भाजी एवढेच पदार्थ घेत असत. एखाद्या प्रसंगी त्यांना ता व वरील पैकी एखादा पदार्थ मिळाला तरी चालत असे आणि कं कधी तर श्रीस्वामीमहाराज निव्वळ ताकावरच राहात अस श्रीस्वामीमहाराजांना अतिसाराचा व संग्रहणीचा जो वि जडलेला होता त्यामुळे त्यांना एवढेच पदार्थ चालत असत तेवढयाचेच सेवन ते करीत असत. असे असले; तरी एऱ्हवी श रोगग्रस्त नसतानाही श्रीस्वामीमहाराजांनी जिव्हालौल्यास अन्नाचे सेवन आयुष्यभरात कधीच केले नाही. श्रीमदाद्यशंक चार्यांनी म्हटल्याप्रमाणे " भिक्षौषधं भुज्यताम् । " अशीच त्यां भिक्षेकडे पाहण्याची दृष्टी होती, यात तिल:प्राय शंका नाही. भि ही शरीर जिवंत ठेवण्यासाठी व भूकरूपी व्याधी निवारण कर साठी आहे अशी त्यांची श्रीमदाद्यशंकराचार्यांप्रमाणे पक्की धार होती. या दृष्टीनेच श्रीमद् आद्यशंकराचार्यांनी ' साधनपंचक ' प्रकरण ग्रंथात असे म्हटले आहे की—

क्षुद्व्याधिश्च चिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यतां ।
स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात्प्राप्तेन संतुष्यताम् ।
शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथावाक्यं समुच्चार्यताम् ।
औदासीन्यमभीप्स्यतां जनकृपानैष्ठुर्यमुत्सृज्यताम् ॥४॥

आपल्या क्षुधारूपी म्हणजे भुकेच्या पीडेची चिकित्सा क त्यावर भिक्षान्नरूपी औषध घ्यावे. स्वादिष्ट अन्नाची याचना नये. दैवयोगाने जे मिळेल त्यावर संतुष्ट व्हावे. शीत,

इत्यादि सर्व द्वंद्वे सहन करावीत. जरूर नसता भाषण करू नये. उदासीन वृत्ती धारण करावी आणि कोणत्याही माणसावद्दल प्रेम किंवा द्वेष यांचा त्याग करावा.

या दृष्टीनेच श्रीस्वामीमहाराजांनी भिक्षेसंबंधी स्वकृत "श्रीदत्तमाहात्म्य" या ग्रंथात असे म्हटले आहे की–

**दिवसा एक वार आणून । देवा नैवेद्य करून ।**
**गोडी रुची न पाहून । औषधासमान जेवावें ।। ३४.१०१ ।।**
**प्राणधारणार्थ आहार । त्याची रुची स्वाद बरोबर ।**
**न पाहता सत्वर । करावा आहार विचक्षणें ।। १०३ ।।**
**सुविद्य अथवा अविद्य नर । सर्व रस जिंकी तर ।**
**तोचि जाणावा ईश्वर । हो का नर देहानें ।। ४७.६८ ।।**

श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील चातुर्मासाच्या सुरुवातीच्या काळातच एके दिवशी त्यांचे परमभक्त सेवक श्री. धोंडोपंत कोपरकर हे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी व सेवेसाठी सहकुटुंब येथे आले. "श्री. धोंडोपंत हे अमुक दिवशी इकडे येणार आहेत," असे भाकित श्रीस्वामीमहाराजांनी अगोदरच केले होते आणि अगदी त्या भाकिताप्रमाणेच ते नेमके त्या दिवशीच श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले. श्री. धोंडोपंतांनी घरून येताना आपल्यावरोवर श्रीस्वामीमहाराजांसाठी फणस पोळी, मोहाचे नारळ, फणसाचे वाळलेले गरे असे विविध पदार्थ आणलेले होते. येथे आल्यावर त्यांनी हे सर्व पदार्थ श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवून त्यांना साष्टांग नमस्कार केला. त्यावेळी तीव्रतम भक्त्युद्रेकाने त्यांच्या डोळ्यात अश्रू तरळू लागले. श्रीस्वामीमहाराजही त्यांचे प्रेम पाहून अत्यंत प्रसन्न झाले व त्यांनी आपल्यासाठी आणलेल्या पदार्थातील फणस-पोळी भिक्षेच्या वेळी घेण्यासाठी तेवढी ठेवून घेऊन बाकी सर्व

पदार्थ इतर मंडळींना वाटून टाकले.

त्यानंतर श्री. धोंडोपंत काही दिवस श्रीस्वामीमहाराजांच् सेवेसाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे राहिले. श्रीस्वामीमहाराज श्रीक्षे गरुडेश्वराला आल्यावर ज्या श्रीनारदेश्वराच्या मंदिरात राहात हो ती मंदिरातील जागा अपुरी आहे व बाहेरून येणाऱ्या-जाणाऱ् लोकाच्या निवाऱ्यासाठी मंदिरा समोर बांधलेल्या मंडपातीं जागाही अपुरी पडत असल्याचे पाहून श्री. धोंडोपंत कोपरकरां श्रीनारदेश्वराच्या मंदिरापासून पश्चिमेच्या बाजूला खाली श्रीनर्मदानदीच्या किनाऱ्याच्या जरा वरील अंगाला श्रीस्वामीमह राजांच्या निवासासाठी एक झोपडी बांधली. या झोपडीच् जागेवरच आज श्रीस्वामीमहाराजांचे समाधिमंदिर उभे आहे. झोपडीच्या अर्ध्या भागात श्रीस्वामीमहाराज वसत असत व त्या आन्हिक, पत्रव्यवहार, भिक्षान्न सेवन व रात्री समाधीत वसण्य साठी वापर करीत असत. या झोपडीच्या उरलेल्या अर्ध्या भाग सामान ठेवलेले असून तेथेच स्वयंपाक होत असे. या झोपडीचे ना "पर्णकुटी" असे ठेवले होते. या पर्णकुटीची वास्तुशांती वैशा शुद्ध एकादशीच्या दिवशी अगदी शास्त्रपूर्वक करण्यात आली. स या पर्णकुटीच्या पश्चिमेच्या बाजूला असलेल्या कडुलिंबाची प श्रीस्वामीमहाराजांनी शके १८३५ अर्थात् इ.स. १९१३ च्या चैत्र शु प्रतिपदेस प्रसाद म्हणून घेतल्याने तो पुढे गोड झाला. त्याची सा अद्यापपर्यंत तो कडुलिंब देत आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या हस् स्पर्शाने व सान्निध्याने त्याने आपला अंगभूत कडुपणा टाकून दि हेच खरे! ही एका कडू वृक्षाची हकीकत; तर मग श्रीस्वा महाराजांच्या सान्निध्यात आलेल्या व त्यांच्या कृपादृष्टीने पा झालेल्या जीवांची स्थिती काय झाली असेल ? ते जीव शिवच झा

यात काही शंकाच नाही. श्रीस्वामीमहाराज " देशिक " म्हणजे श्रीगुरू होते. या दृष्टीने श्रीगुरू कोणाला म्हणतात हे सांगताना " योगवासिष्ठ ", व " पंचदशी " या ग्रंथात असे म्हटले आहे की—

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ।। यो. वा. नि. प्र. पू.**
**।। १२८.६१ ।।**

**परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन ।**
**योजयती परे तत्त्वे स दीक्षाचार्यमूर्तिस्थः ।। पंचदशी ।।**

दर्शन, स्पर्श, शब्द किंवा केवळ कृपादृष्टी यांच्या योगाने जे शिष्याच्या देहात शांभवी तत्त्वाचा किंवा विद्येचा समावेश करतात व शिष्याची अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत करून जीवशिवैक्य करतात तेच खरे श्रीगुरू होत. ज्यावेळी शिष्याचा मूळ आवरणरूप मल हा परिपक्व होऊन गळून पडण्याच्या अवस्थेला येतो त्यावेळी श्रीसद्‌गुरू शक्तिपात करून शिष्याच्या मलादि आवरणाचा भेद करतात व त्याची परतत्त्वाशी गाठ घालून देतात. अशा प्रकारे शक्तिपाताने ज्ञानदान करणाऱ्या श्रीगुरूंना मूर्तिमंत दीक्षाचार्य असे म्हणतात.

वर ज्या कडुलिंबाच्या झाडाचे वर्णन केले आहे त्या झाडाखाली एक साधू राहात असत. त्यांना देवाच्या कोठीतून जे काही मिळत असे ते घेऊन ते मोठ्या समाधानाने व आनंदाने तेथे राहात होते. श्रीस्वामीमहाराजांच्या समाधि-कालपर्यंत ते तेथे राहिले. या श्रीसाधुमहाराजांनी कधीच कोणाकडेही कशाचीही याचना केली नाही. त्यामुळे त्यांच्या अयाचित वृत्तीची श्रीस्वामीमहाराज नेहमी प्रशंसा करीत असत. त्यांच्या या वृत्तीकडे पाहिले म्हणजे श्रीसंत तुकाराम महाराजांच्या अभंगात किंचितसा

वदल करून असे म्हणावेसे वाटते की–

काय उणें मज वासुदेवापायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळगती ॥ १
कोण पाहे सुखा नाशिवंताकडे । तृष्णेचीं बापुडें नव्हों आम्ही ॥ २
सर्व सुखें आम्ही केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उडविलीं ॥ ३
तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ । बसविली पेठ वैष्णवांची ॥ ४



तैसे नव्हों आम्ही वासुदेवाचे दास । यावें आणिकांस काकुळती ॥ १
स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥ २
अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ ३
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ४



श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास श्रीक्षेत्र गरुडश्वरा होणार असल्याचे कळल्यापासून रोज अधिकाधिक मंडळी ते येऊ लागली. वडोद्याहून तर खूपच मंडळी येऊ लागली. या स लोकांची भोजनाची व्यवस्था व्हावी म्हणून श्री. परशुरामभा कुबेर यांनी एक स्वतंत्र जागाच रसोड्याकरिता बांधली. त्यामु दररोजची ४००-५०० लोकांची जेवणाची उत्तम सोय हो लागली.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराज आल्याव सुरुवातीला लोकांची गर्दी नव्हती. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजां आत्मानात्मविचार-पूर्वभाग-अभ्यास-प्रकरण, आत्मानात्मविचार उत्तरभाग-चिंतनप्रकरण, चित्तसद्बोधनक्षत्रमाला आणि श्रीदत्तभाव सुधारसस्तोत्र या तीन प्रकरण ग्रंथांची रचना केली. जे लो श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाप्रमाणे वागत असत त्यांन

श्रीस्वामीमहाराज हे ग्रंथ प्रसाद म्हणून देत असत. श्रीदत्त-भावसुधारसस्तोत्राचा येथे दररोज एक पाठ होत असे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे ज्यावेळी अधिकाधिक भक्तमंडळी जमू लागली त्यावेळी आलेल्या मंडळींपैकी त्यांच्या त्यांच्या अधिकारा-प्रमाणे श्रीस्वामीमहाराज सकाळी श्रीगीताभाष्य, ब्रह्मसूत्रे, दशोप-निषदे, श्वेताश्वतर, कैवल्य, मौक्तिकादि उपनिषदे किंवा पंचदशी, शतश्लोकी इत्यादि वेदान्तपर ग्रंथ सांगत असत. कधी कधी एखाद्या भक्ताला श्रीस्वामीमहाराज स्वकृत "श्रीदत्तभावसुधारसस्तोत्रही" समजावून सांगत असत. या ग्रंथाप्रमाणेच निरनिराळे कितीतरी विषय श्रीस्वामीमहाराज संध्याकाळीही लोकांना समजावून सांगत असत. श्रीस्वामीमहाराजांची ही वृत्ती पाहिली म्हणजे श्रीसंत तुकाराममहाराजांच्या पुढील अभंगाचे स्मरण होऊन मन आनंदाने भरून येते. श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की—

**अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ १ ॥**
**मुंगीवरी भार गजाचें पालण । घालितां ते कोण कार्यसिद्धी ॥ २ ॥**
**तुका म्हणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं ते काढी पारधी तो ॥ ३ ॥**



अशा प्रकारे हा ज्ञानयज्ञ श्रीस्वामीमहाराजांनी आपला देह ठेवीपर्यंत अव्याहत चालविला. ज्ञानयज्ञ हे श्रीस्वामीमहाराजांच्या जीविताचे निजगूज होते. या यज्ञाला त्यांच्या जीवनात मूर्धन्य स्थान होते; याचे एकमेव कारण असे आहे की, श्रीमद् भगवद्गीतेच्या चवथ्या अध्यायात चोवीसाव्या श्लोकापासून एकतीसाव्या श्लोका-पर्यंत श्रीभगवंतांनी असे म्हटले आहे की, द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ, प्राणायामयज्ञ, कर्मयज्ञ, दैवयज्ञ, निग्रहयज्ञ, विचारयज्ञ,

मंत्रयज्ञ इत्यादि अनेक यज्ञ वेदाने बऱ्याच विस्ताराने चांगले व
करून सांगितलेले असले तरी "सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञा
परिसमाप्यते ।। ४.३३ ।। " म्हणजे हे पार्था ! सर्व यच्चयावत्
ज्ञानात समाप्त होतात अर्थात् ज्ञानाग्निशिवाय सर्व कर्मे सहज
नि:शेषपणे जाळण्याचे सामर्थ्य इतर कोणातही असत नाही. त्यामु
या ज्ञानयज्ञाचे माहात्म्य वर्णन करताना श्रीगोपाळकृष्णनाथां
श्रीमद् भगवद्गीतेत पुढे असे म्हटले आहे की—

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।। ४.३३ ।।
तद्विद्धि प्राणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्व दर्शिनः ।। ३४ ।।
यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथोमयि ।। ३५ ।।
अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि ।। ३६ ।।
यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ।। ३७ ।।
न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ।। ३८ ।।
श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ।। ३९ ।।

हे अर्जुना ! कल्पनान्तर्गत येणाऱ्या सर्व सांसारिक वस्तूंनी कि
साधनांनी सिद्ध होणाऱ्या यज्ञांपेक्षा ज्ञानरूप यज्ञ हा सर्व प्रका
श्रेष्ठ आहे; कारण हे पार्था ! सर्वं यच्चयावत् कर्मे ज्ञानात समा
होतात अर्थात् ज्ञानाग्नीमुळे सर्व कर्मे अशेषपणे जळून दग्ध होता

॥ ३३ ॥ याकरिता श्रोत्रिय म्हणजे सर्वशास्त्रज्ञाते व ब्रह्मनिष्ठ म्हणजे शक्तिपातसामर्थ्यसंपन्न अशा श्रीसद्‌गुरूंना साष्टांग नमस्कार करून; त्यांची सेवाशुश्रूषा करून व त्यांना निष्कपटभावाने बंध-मोक्षादिकांविषयी प्रश्न विचारून ते ज्ञान तू समजावून घे. ते तत्त्व जाणणारे ज्ञानी पुरुष तुला त्या ज्ञानाचा उपदेश करतील अर्थात् ते ज्ञान स्वसामर्थ्याने तुझ्या ठिकाणी संक्रमित करतील. ॥ ३४ ॥ ते ज्ञान प्राप्त झाल्यावर तू पुन्हा असा मोह पावणार नाहीस आणि हे अर्जुना ! त्या ज्ञानाच्या योगानेच तू सर्वव्यापी अनंत चेतनरूप होऊन आपल्या अंतर्गत समष्टी बुद्धीच्या आधारावर आब्रह्मस्तंभपर्यंतच्या सर्व भूतांना आपल्यामध्ये अर्थात् प्रत्यगात्म्यामध्ये पाहशील आणि त्यानंतर माझ्या ठिकाणी अर्थात् सच्चिदानंदस्वरूपी पूर्ण ऐक्य पावून सर्वकाही सच्चिदानंदमयही पाहशील. ॥ ३५ ॥ यदाकदाचित् जरी तू सगळ्या पाप्यांहूनही अधिक पापिष्ठ असलास तरी या ज्ञाननौकेने निःसंदेह पणे सर्व पापातून चांगल्या प्रकारे तरून जाशील. ॥ ३६ ॥ हे अर्जुना ! ज्याप्रमाणे प्रज्ज्वलित अग्नी लाकडांना जाळून भस्म करतो त्याचप्रमाणेच ज्ञानरूप अग्नी सर्व संचित व क्रियमाण कर्मे जाळून भस्मसात् करून टाकतो. ॥ ३७ ॥ या जगात ज्ञानासारखे पावन करणारे किंवा शुद्ध करणारे निःसंदेहपणे दुसरे काहीच नाही. ते आत्मज्ञान दीर्घकाळाने सिद्धयोगद्वारा उत्तम प्रकारे शुद्धान्तःकरण झालेला पवित्र पुरुष आपल्या अंतःकरणातच प्राप्त करून घेतो. ॥ ३८ ॥ श्रद्धाळू श्रीगुरूंची उपासना इत्यादि ज्ञानप्राप्तीच्या उपायां-मध्ये अत्यंत तत्पर असलेल्या व ज्याने आपली इंद्रिये विषयांपासून निवृत्त केली आहेत अशा पुरुषाला ते ज्ञान प्राप्त होते. ते ज्ञान मिळताक्षणीच त्या साधकाला भगवत्प्राप्तिरूप परमशांती

मिळते. ॥ ३९ ॥

सारांश, श्रीस्वामीमहाराजांनी श्रीनर्मदानदीच्या तीरावर जो ज्ञानयज्ञ श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे १४ महिने चालविला त्याचे एकमात्र कारण " तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे। मग विस्तार बहु प्रकटे। आत्मबोधाचा। ज्ञानेश्वरी ४.१८९ ॥ " अशी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेली स्थिती व फल आपल्या प्रेमळ भक्तांना प्राप्त व्हावे हेच होते, यात काहीच शंका नाही. श्रीस्वामी-महाराजांच्या प्रेमळ भक्तांना प्राप्त झालेल्या ज्ञानयज्ञाच्या अपूर्व फलाचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दातच वाचणे इष्ट ठरेल ते असे म्हणतात की–

तरी आत्मसुखाचिया गोडिया। विटे जो कां सकळ विषयां।
जयाच्या ठायीं इंद्रियां। मानु नाहीं ॥ ४.१८६ ॥
जो मनासीं चाड न सांगे। जो प्रकृतीचें केलें ने घे।
जो श्रद्धेचेनि संभोगें। सुखिया जाहला ॥ १८७ ॥
तयातेंचि गिंवसित। तें ज्ञान पावे निश्चित।
जयामाजि अचुंबित। शांति असे ॥ १८८ ॥
तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे।
मग विस्तार बहु प्रगटे। आत्मबोधाचा ॥ १८९ ॥
मग जेउती वास पाहिजे। तेउती शांतीची देखिजे।
तेथ आपपरु नेणिजे। निर्धारितां ॥ १९० ॥

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रोज सकाळी श्रीदत्तमंदिरातील पंच-धातूच्या श्रीदत्तमूर्तीवर लघुरुद्राभिषेक होत असे. ही पंचधातूची श्रीदत्तमूर्ती श्रीस्वामीमहाराजांना त्यांचे वडोद्याचे एक परमभक्त श्री. विठू सोनार यांनी दिली होती. सर्वसाधारणपणे सर्व श्रीदत्तात्रेयांच्या मूर्ती तीन मुखी असून त्यात मध्यभागी श्रीविष्णूचे

मुख असून उजव्या बाजूला श्रीब्रह्मदेवांचे व डाव्या बाजूला श्रीशंकरांचे मुख असते. परंतु या त्रिमुखी श्रीदत्तात्रेयांच्या मूर्तीचा विशेष असा आहे की, या मूर्तीच्या मध्यभागी श्रीशंकरांचे मुख असून उजव्या बाजूला श्रीब्रह्मदेवांचे व डाव्या बाजूला श्रीविष्णूंचे मुख आहे. त्याचप्रमाणे येथे श्रीसत्यदत्तपूजाही होत असत. पवमान स्वाहाकारही मधून-मधून होत असे.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वराला आल्यावर त्यांच्या सत्संगाचा व सेवेचा लाभ आपल्याला व्हावा म्हणून येथे त्यांची अनेक साधक भक्त मंडळी येऊन राहिली होती. हे सर्वजण अत्यंत सेवाभावाने, एकचित्ताने व मानापमान सोडून देऊन मिळेल ते काम करीत असत. काहीजण सोवळ्यात पाणी भरीत असत, काहीजण स्वयंपाकासाठी लाकडे जमवीत असत, काहीजण स्वयंपाक करीत असत, तर काहीजण पळसाची पाने तोडून आणून पत्रावळी लावीत असत. येथे स्वयंपाकाकरिता मोठमोठ्या कढया होत्या. त्यातच सर्वांचा स्वयंपाक होत असे. येथे पुढे पुढे लोकांची गर्दी होऊ लागल्यामुळे रोज तीन-चारशे पान होऊ लागले. श्रीस्वामीमहाराजांच्यापुढे जे पैसे येत असत त्यातूनच येथील जेवणाचा सर्व खर्च चालत असे. रोज भात, वरण, आमटी व पोळ्या होत असत व कधीतरी पक्वान्न होत असे. श्रीस्वामीमहाराज दररोज सकाळीच असे सांगत असत की, " आज अमुक ठिकाणाहून एवढी एवढी मंडळी येणार आहेत. त्यांच्यासाठी अशा प्रकारचा स्वयंपाक करावा. " श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे दररोज दुपारी बारा-एकच्या सुमारास तेवढीच मंडळी जेवावयास येत असत व आश्चर्याची गोष्ट म्हणजे तयार केलेला सर्व स्वयंपाक त्यांच्या आवडीचा असे. अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराज दररोज सांगत

असल्यामुळे येथे ठराविक माणसांचा स्वयंपाक होत असे व त्यामु स्वयंपाक वाया गेला किंवा अन्न फुकट गेले असे कधीही होत नं स्वयंपाकासाठी लागणारे सर्व जिन्नस श्री. छगन मास्तर तिल वाड्याहून आणीत असत.

माझे श्रीसद्गुरुनाथ श्रीसन्त वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज या काळात श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेसाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी ग होते. त्यांनी मला असे सांगितले होते की, "श्रीस्वामीमहाराज दररोज दुपारी रसोड्यात जाऊन स्वत: भाज्या चिरीत असत भाजी चिरत असताना तेथे स्वयंपाकाचे काम करणाऱ्या स्त्रियां एक एक पुराणातील कथा व त्यातील तत्त्वे समजावून सांगत अस अशा प्रकारे एक एक पुराण सांगता सांगता श्रीस्वामीमहाराजां त्या स्त्रियांना सर्व १८ पुराणे समजावून सांगितली. रसोड्यात का करणाऱ्या स्त्रियांना प्रवचनादि कार्यक्रमात भाग घेण्यास सवड मि नसल्यामुळे त्यांच्यासाठी श्रीस्वामीमहाराज अशा रीतीने स्वतंत्र पुराण सांगत असत. त्यावेळी इतरांना तेथे जाण्याची बंदी होत

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराज किती करु संपन्न होते याची कल्पना येते. अवतारी सत्पुरुषांची करुणा अ अत्यधिक विस्तारित असल्यामुळे त्यांचे अंत:करण किती विशा असते याचा प्रत्यय येतो. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी केले ग्रंथराज श्रीदासबोधातील पुढील वर्णन वाचले म्हणजे श्रीस्वा महाराजांच्या अंत:करणाच्या करुणासंपन्न विशालतेची प्र आल्याशिवाय राहणार नाही. श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज म्हणतात की–

**विरक्तें राखावें साधन। विरक्तें लावावें भजन।**
**विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान। प्रकटावें ॥ २९८॥**

विरक्तें भक्ती वाढवावी । विरक्तें शांती दाखवावी ।
विरक्तें यत्नें करावी । विरक्ती आपुली ॥ ९ ॥
विरक्तें सत्क्रिया प्रतिष्ठावी । विरक्तें निवृत्ती विस्तारावी ।
विरक्तें नैराश्यता धरावी । सदृढ जीवीं ॥ १० ॥
विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति अवलंबावी ।
विरक्तें क्षमा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥ ११ ॥
विरक्तें परमार्थ उजळावा । विरक्तें विचार शोधावा ।
विरक्तें सन्निध ठेवावा । सन्मार्ग सत्त्वगुण ॥ १२ ॥
विरक्तें भाविकें सांभाळावीं । विरक्तें प्रेमळ निववावीं ।
विरक्तें साबडीं नुपेक्षावीं । शरणागतें ॥ १३ ॥
विरक्तें असावे परमदक्ष । विरक्तें असावे अंतरसाक्ष ।
विरक्तें घोढावा कैपक्ष । परमार्थाचा ॥ १४ ॥
विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप धरावा ।
विरक्तें वक्तृत्वे उभारावा । मोडला परमार्थ ॥ १५ ॥
विरक्तें विमळ ज्ञान बोलावें । विरक्तें वैराग्य स्तवीत जावें ।
विरक्तें निश्चयाचें करावें । समाधान ॥ १६ ॥
पर्वें करावीं अचाटें । चालवावी भक्तांची थाटें ।
नाना वैभवें कचाटें । उपासनामार्ग ॥ १७ ॥
हरिकीर्तनें करावीं । निरूपणें माजवावीं ।
भक्तिमार्गें लाजवावीं । निंदक दुर्जनें ॥ १८ ॥
बहुतांस करावे परोपकार । भलेपणाचा जीर्णोद्धार ।
पुण्यमार्गाचा विस्तार । बळेंचि करावा ॥ १९ ॥
विरक्तें शास्त्रें धांडोळावीं । विरक्तें मतें विभांडावीं ।
विरक्तें मुमुक्षें लावावीं । शुद्धमार्गीं ॥ ३६ ॥
विरक्तें शुद्धमार्ग सांगावा । विरक्तें संशय छेदावा ।

विरक्तें आपला म्हणावा । विश्वजन ।। ३७ ।।
विरक्तें निंदक वंदावे । विरक्तें साधक बोधावे ।
विरक्तें बद्ध चेववावे । मुमुक्षु निरूपणें ।। ३८ ।।

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे दुपारी श्रीदत्ताला नैवेद्य व वैश्वदेव झा की, सर्वांचे जेवण होत असे. या जेवणाच्या वेळी मानापम अगोदर व मागाहून असा प्रकार कधीही होत नसे. येथे जस अधिकाधिक लोक येऊ लागले तसतशा अधिकाधिक श्रीसत्यदत्ता पूजा होऊ लागल्या. या श्रीसत्यदत्ताच्या पूजेसाठी सव्वा मण गुळाचा सांजा करण्याची प्रथा सुरू झाली व ती अखेरपर्यंत च होती

श्रीस्वामीमहाराजांचे सायंकाळचे पुराण किंवा प्रवचन झाले सर्व ब्राह्मण मंडळी सायंसंध्येसाठी श्रीनर्मदानदीवर जात अ त्यानंतर येथे रोज रात्रीच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांच्या समो भजन होत असे. हे भजन रात्री १-१।। वाजेपर्यंत चाले. या भज साठी श्रीस्वामीमहाराज अत्यंत आवडीने वसत असत. हे भ संपल्यानंतर रात्री १-१।। वाजता सर्वांना हरवऱ्याच्या कि मुगाच्या डाळीची पोटभर उसळ, द्रोणभरून सांजा किंवा सा तुपातला शिरा आणि फळे मिळत असत. श्रीस्वामीमहाराजां दर्शनाला येणारे भक्तगण फळफळावळांच्या खूप करंड्या रोज घेऊन येत असत; परंतु श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे ढुंकून पाहात नसल्यामुळे ही सर्व फळफळावळे रात्रीच्या वेळी सर्वां प्रसाद म्हणून वाटण्यात येत असत.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास होणा असल्याचे वृत्त समजल्यानंतर त्यांच्या दिव्य संगतीत व सहवास जीवनमुक्ती सुखाची प्राप्ती व लाभ करून घेण्यासाठी शृंगेरीहू

श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज व नीलूर मठातून श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराज तेथे आले होते. या दोघांनीही श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आपला चातुर्मास केला. श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांचा व श्रीस्वामीमहाराजांचा परिचय पूर्वीच झाला होता. (पाहा-श्रीथोरलेस्वामीमहाराज चरित्र खंड ३ रा पृ. ३१३ ते ३१७) त्यावेळी श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली होती की, "आपणासारख्या जगद्वंद्य महापुरुषांबरोबर एक चातुर्मास करण्याची इच्छा आहे. त्यामुळे आपल्या दिव्य सत्संगाचा लाभ होईल. तरी आमची ही इच्छा पूर्ण करावी अशी प्रार्थना आहे." त्यांची ही प्रार्थना ऐकून त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले होते की, "पुढे श्रीनर्मदानदीच्या तीरावर श्रीक्षेत्र गरुडेश्वरी चातुर्मास होणार आहे. तरी त्यावेळी आपण तेथे येण्याचे करावे." श्रीस्वामीमहाराजांनी श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांना दिलेल्या शब्दाप्रमाणे येथे योग आला. या योगामुळे त्यांना अत्यंत आनंद झाला. पुढे येथे श्रीसन्त गुळवणीमहाराज हे ही श्रीस्वामीमहाराजांच्या चरणसेवेसाठी येथे आले असताना त्यांचा व श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांचा परिचय झाला. त्या संबंधीची हकीकत पुढे आली आहे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संग सुखासाठी आलेले दुसरे श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज हे अध्यात्मातील एक थोर अधिकारी पुरुष होते. मात्र त्यांचा व श्रीस्वामीमहाराजांचा पूर्व परिचय नव्हता. परंतु शृंगेरीपीठाचे श्रीशंकराचार्य समाधिस्थ झाल्यामुळे श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज तेथे न थांबता श्रीस्वामीमहाराजांच्या आध्यात्मिक सहवासप्राप्तीसाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी

आले होते. ज्यावेळी श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज येथे आले त्याचवेळी ग्वाल्हेरचे श्री. बळवंतराव भागवतही श्रीस्वामीमहाराजांच्या चरणसेवेसाठी व सर्वसंगत्यागासाठी येथे आले. बळवंतराव भागवत श्रीक्षेत्र गोकर्ण येथे नोकरी करीत होते. त्या बळवंतराव यांना सर्वजण गोकर्णबुवा असे म्हणत असत. गोकर्णबुवांनी ज्यावेळी आपली संन्यास घेण्याची इच्छा श्रीस्वामीमहाराजांच्याचरणी व्यक्त केली त्यावेळी श्रीमहाराजांनी " अहरेव विरजेत अहरेव प्रव्रजेत् " या शास्त्रवचनाला अनुसरून बळवंतराव यांच्या ठिकाणी तीव्र वैराग्य उत्पन्न झालेले असल्याने ते संन्यासग्रहणास योग्य आहेत हे जाणून श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज यांच्याकडून त्यांना संन्यास व दंड देवविला. संन्यासग्रहणानंतर श्री. बळवंतराव भागवत यांचे नाव बदलून " श्रीप्रद्युम्नानंदतीर्थस्वामी " असे ठेवले होते.

श्रीस्वामीमहाराजांनी ज्यांना स्वत: संन्यास दीक्षा दिली ते श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज हे एकमेवाद्वितीय होते. मात्र त्यांच्या थोर थोर शिष्यांना श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीयोगानंदसरस्वतीस्वामीमहाराज ऊर्फ श्रीगांडामहाराज यांना व उपरोक्त श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीप्रद्युम्नानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांना दुसऱ्याकडून संन्यास देवविला. या दृष्टीने संन्याश्रमाबद्दल श्रीस्वामीमहाराजांचे मत काय होते व शास्त्राने त्याबद्दल काय म्हटले आहे हे आपण लक्षात घेणे आवश्यक आहे. श्रीस्वामीमहाराज " श्रीगुरुचरितम् " अथवा " द्विसाहस्री " या ग्रंथात श्रीपादश्रीवल्लभ तीव्र वैराग्याने घरातून निघून जाताना आपल्या आईवडिलांना संन्यासाश्रमाचे माहात्म्य सांगताना असे म्हणाल्याचे सांगतात की, वाजसनेय शाखासूत्र

सांगते की, " एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छंतः प्रव्रजंत्येतद्ध स्म वै पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयंते किं प्रजया करिष्यामो येषां नोयमात्माय लोक, " इति " ते ह स्म पुत्रेषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरंति, " इति ॥५.२३॥ " अंतःकरणात जेव्हा तीव्रतर वैराग्य उत्पन्न होईल तेव्हाच तत्काळ संन्यास ग्रहण करून गृहत्याग करावा. मात्र तत्पूर्वी विवाह झालेला नसावा.

या दृष्टीने श्रीस्वामीमहाराजांनी ' द्विसाहस्री " या ग्रंथात व त्यावरील स्वकृत टीकेत असे म्हटले आहे की–

" विद्वानांचे मत असे आहे की, पापभीरू लोकांना या भयंकर (उग्र) अशा कलियुगात संन्यासदीक्षाग्रहण मार्गानेच आत्मकल्याण साधणे (मिळविणे) अतिशय सुलभ आहे. तसेंच ईशभक्तिमान लोकांना अध्यात्मपरमानंदाचा लाभ करवून देण्याविषयी आपणच योग्य मार्गदर्शक आहात. हे भगवन् श्रीनरहरी गुरुदेवा ! आपल्याशिवाय इतरांस ही गोष्ट जमणार नाही. याप्रमाणे काशीतील ज्ञानी पंडितांचे म्हणणे मान्य (स्वीकृत) करून श्रीनरहरीगुरूंनी श्रीकृष्णसरस्वतीस्वामीमहाराज नामक एका वृद्ध संन्याशांकडून संन्यासदीक्षा घेतली. तदनंतर संन्याशी श्रीनरहरीगुरू हे श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज या नावाने प्रसिद्धीस आले. श्रीकृष्णसरस्वती हे पुष्कळ काळापासूनचे वृद्ध व सदाचारी संन्याशी होते. सूत्र (यज्ञोपवीत) शिखा (शेंडी) यांचे विसर्जन केल्यामुळे श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज अत्यंत शोभिवंत दिसू लागले. पुत्रेषणा, लोकेषणा, दारेषणा, इत्यादि एषणात्रयांचा व सर्व वासनांचा त्यांनी त्याग केलेला होता. तसेच ते जितेंद्रिय होते. त्यांनी

...४

सर्व विषय स्वाधीन करून ठेवलेले होते. अखिल संकल्पांचा त्या केला होता. अहंममता सोडली होती. सुखदुःखादि द्वंद्वांचा त्या केला होता. तदनंतर जगद्गुरू श्रीगुरुनरसिंहसरस्वतीस्वामी महाराजांनी संन्यासाची कशी काय पद्धती आहे याबद्दल यो त्या संबंधित माहितीचा मुमुक्षुसाधकांना योग्य तो उपदेश केल तो असा की, " प्रथम सर्व प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावे. तदनं विरजा होम करावा. तदनंतर गायत्री देवतारूपात प्रवेश क सर्व एषणांचा म्हणजे कामनांचा त्याग करावा. संन्यासदी घेतल्यानंतर मानव लोकांपासून ब्रह्मलोकांपर्यंत मिळणारे वरेवा सर्व भोग (कुत्र्याच्या वमनाप्रमाणे) मानावेत व टाकून द्याव शिखा व सूत्रांचा त्याग करावा. कौपीन (लंगोटी) परि करावी. वैणवदण्ड स्वीकारावा. तसेच स्वशरीरोपभोगार्थ म्ह शरीरसंरणार्थ आवश्यक व अत्यंत जरूर त्या वस्तूंचा उप घ्यावा. लोकव्यवहार व लोकोपकार यांना बाधा येईल अ कोणतीच गोष्ट करू नये. परिस्थितीनुरूप तात्कालिक साधनां परिग्रह स्वीकारण्यास हरकत नाही. सर्वत्र अनासक्तीनेच राह अशा प्रकारच्या दंडी संन्याशाने स्वगुरूची सेवा एकनिष्ठ करावी. कारण संन्याशांचे मुख्य प्रकार दोन आहेत. १) विद्वत्सं २) विविदिषासंन्यास. क्रमांक दोनच्या संन्याशाने आप श्रीगुरूंची सेवा जरूर केली पाहिजे असे शास्त्रकारांचे मत अ स्वगुरूकडून तत्त्वज्ञानाचा उपदेश घ्यावा आणि अभ्यास व नि करून आत्मसाक्षात्कार संपादन करावा. तदनंतर श्रीगु उपदेश केलेल्या चार वेदवाक्यांचा अर्थासह सतत अभ्यास करा आणि वैदिक तत्त्वज्ञानाचा अनुभूतिसाक्षात्कार संपादन करा " प्रज्ञानंब्रह्म " हे ऋग्वेदाचे वाक्य आहे " अहंब्रह्मास्मि "

यजुर्वेदाचे वाक्य आहे. "तत्त्वमसि" हे वाक्य सामवेदाचे आहे. "अयमात्मा ब्रह्म" हे वाक्य अथर्ववेदाचे आहे. या चार वेदवाक्यांनी अगोदर ब्रह्माची लक्षणे सांगून, "आत्मा वा इद्मग्र आसीत्" स ईक्षत "तस्य त्रय आवसथास्त्रयः स्वप्नाः आयमावसथोयमावसथोयमावसथ इति" या श्रुतिवचनात वर्णन केल्याप्रमाणे दैनंदिन व्यवहार, नेत्र, कंठ, हृदय इत्यादि प्राणिशरीरस्थाने, देहांतरव्यवहारांची व्यवस्था, पितृशरीर, मातृशरीर, स्वशरीर इत्यादि प्रपंचजाताचे (प्रपंचासह सर्व समूहाचे) अध्यारोपापवादाने चांगला निरास करून ज्ञानसाधनवैराग्यादि निर्माण होण्यासाठी व तसेच गर्भवासादि दुःखाची तीव्रता दाखवून देऊन या चार वेदवाक्यांनी शुद्ध ब्रह्माचा उपदेश केला आहे. तसेच अनेक श्रुतिवाक्यांनीही ह्या औपनिषदतत्त्वज्ञानाचा उपदेश करून ज्ञानबोध सांगितला आहे. तसेच श्रीविद्यारण्यांनीही मुमुक्षुसाधकांच्यासाठी याप्रमाणे चार वेदवाक्यांचा स्पष्टार्थबोध आपल्या भाष्यात केला आहे. तो असा :– ।। श्लोक ।। येने क्षते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च ।। स्वाद्वस्वाद विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितम् ।। १ ।। चतुर्मुखेंद्र देवेषुमनुष्याश्वगवादिषु ।। चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्ममय्यपि ।। २ ।। (१) (इ. ऋ. वा.) पाहणे, ऐकणे, वास घेणे, (हुंगणे), गोड व कडू हे समजून घेणे व इतर सर्व व्यवहार चालविणे इत्यादि गोष्टी ज्याच्या योगाने होतात तेच प्रज्ञान माझ्या ठिकाणी आहे. असाच थोडक्यात सारांश आहे. ।। श्लोक ।। परिपूर्णः परात्मास्मिन्देहेविद्याधिकारिणि ।। बुद्धेःसाक्षितयास्थित्वा स्फुरन्नह मितीर्यंते ।।१।। स्वतः पूर्णः परात्मात्र ब्रह्म शब्देन वर्णितः ।। अस्मीत्यैक्य परामर्शस्तेन ब्रह्मभवाम्यहम् ।।२।। याचा थोडक्यात सारांश असा, ज्ञानाधिकारी व्यक्तीच्या देहात

बुद्धीच्या साक्षिरूपाने राहून 'अहं' असे जे स्फुरण होते, ते आ
(स्वतः पूर्ण परमात्मा) ब्रह्म या शब्दाने येथे घेतला अ
जीवशिवांचे ऐक्य अस्मी या शब्दाने सांगितले आहे. (इ.य.श्रु.वा.
।।श्लोक।। एकमेव द्वितीयं सन्नामरूपविवर्जितम् ।। सृष्टेः पुराधुना
स्यतादृत्वंतदितीर्यंते ।।१।। श्रोतुर्देहेंद्रियातम् वस्त्वत्रत्वंपदेरितम्
एकताग्राह्य तेऽसीतितदैक्यमनुभूयताम् ।।२।। हे पूर्णब्रह्म ऐकमेव
द्वितीयच आहे. ते नाम व रूपविवर्जित आहे. ते पूर्वी जसे हो
तसेच सध्या आहे. त्यात कोणत्याच प्रकारचा वदल झालेला नाही
ऐकणाऱ्याच्या देहेंद्रियापासून ते अगदी निराळे व स्वतंत्र अ
आहे. हीच वस्तुस्थिती 'त्वं' या पदाने सांगितलेली आहे. अ
या शब्दाने दोहोंचे ऐक्य सांगितले असून, साधकांनी त्या
अनुभव घ्यावा, असा सारांश आहे. (इ. सा. श्रु. वा. ३)।।श्लो
स्वप्रकाशपरोक्षत्व मयमित्युक्तितोमतं ।। अहंकारादि देहान्तात्प्र
गात्मतिगीयते ।। १ ।। दृश्यमानस्य सर्वस्यजगतस्तत्वमीर्यते
ब्रह्मशब्देन तद्ब्रह्म स्वप्रकाशात्मरूपकम् ।।२।। शास्त्रात सांगितले
युक्तिवादाप्रमाणे (स्वप्रकाशापरोक्ष) अनुभूती मिळते. त्या
स्थूल, सूक्ष्म, देहात सर्वत्र प्रत्यगात्माच भरलेला आहे असा अनु
येतो. याच प्रमाणे दृश्यमान सर्व जगताचे खरे स्वरूप क
(ब्रह्म) शब्दाने (स्वप्रकाशात्मरूप) ब्रह्म आहे असे वर्णन
आहे. असा वरील वचनतात्पर्यार्थ आहे. (इ. आ. वे. श्रु.
येणेप्रमाणे साधकांनी चारी वेदवचनांवरून महावाक्यार्थ
समजावून घ्यावा आणि अहंब्रह्मास्मि असा अनुभव मिळवावा अ
सर्व श्रुतींचे तात्पर्य आहे. मात्र साधकांनी कोणत्याही परिस्थिती
जितेंद्रियपणे राहून जागृत व सावध राहिले पाहिजे. त्या
निःसंदिग्धपणें ब्रह्मापरोक्षज्ञान होईल. हे ज्ञान मननादिक्रमा

होणार आहे. या प्रमाणे सर्व गोष्टींचा सार्थ अभ्यास करून पंचीकरणाची चांगली माहिती करून घ्यावी. शुद्ध व पवित्रपणा ठेवावा, साधक-वाधक धर्माचा सखोल विचार करावा, वाह्यांतर शुद्धी चांगली ठेवावी. याप्रमाणे दैवी संपत्तीने युक्त झालेला व योगपट्टीने (योगसामर्थ्याने) परिपूर्ण झालेला संन्याशी मोक्षफळ मिळवण्यास योग्य होतो. तदनंतर त्याला उत्तरायण व दक्षिणायन गतीचे योग्य ज्ञान मिळते व धारणाभ्यासानें तो परात्मदृष्टी होतो व जीवनमुक्त होतो. सर्वेंद्रियाचा प्रत्याहार करून (निवृत्त करून) नाभीच्या म्हणजे बेंबीच्या ठिकाणी चित्ताचे स्थिरीकरण करणे यालाच योगशास्त्रात धारणा (विषयांपासून इंद्रियांची परावृत्ती) असे म्हणतात. तदनंतर साधक अविद्याकाम कर्मापासून सुलभतेने मुक्त होतो. संन्याश्रम हा किती महत्त्वाचा आहे या संबंधीचे "संन्यासगीतेतील" पुढील विवेचन उपरोक्त दृष्टीने अत्यन्त वाचनीय व अभ्यासनीय आहे. संन्यासगीताकार असे म्हणतात की—

देव, ऋषी तसेच पितर यांचा आदर वाढेल अशा प्रकारचे कार्य करणे योग्य होय. भगवन्महिमा आणि भगवद्प्रेम वृद्धिगत होईल अशा प्रकारचा यत्न त्यांनी स्वतः व इतरांकडून करवावा. ज्ञानभिलाषाने कर्म, उपासना आणि ज्ञान अथवा भक्तीच्या ठिकाणी जे रत आहेत अशा अधिकाऱ्यांचा त्यांनी बुद्धिभेद करू नये; तर उलट अशा लोकांवद्दल सहानुभूती दाखवून त्यांना आपापल्या धर्मानुसार वागण्यास सांगितल्याने त्यांचा अधिकार वाढेल. हे महर्षीहो ! आता मी निवृत्तिमार्गावलंबी संन्याशाचे साधन सांगतो. संन्याशांनी आपापल्या अधिकारानुसार निष्काम कर्माचा अभ्यास करावा आणि परमश्रद्धायुक्त अंतःकरणाने उपासना करावी. दररोज मोक्षशास्त्रांच्या—उपनिषदांच्या अभ्यासाने त्यांनी आपले ज्ञान वाढवावे;

आणि तद्नुसार आचरणही करावे. तपोवृद्ध व ज्ञानवृद्ध यांचे त्याचप्रमाणे देवतांचे पूजन–रामकृष्णादिकांच्या मूर्तींच्या पूजेच्या ठिकाणी आदर, तसेच देवमूर्तींच्या पीठाचा आदर त्यांनी ठेवला पाहिजे. द्विजांनी एक क्षणभरही अनाश्रमी राहू नये. कारण अनाश्रमी राहिल्याने ते पतित होतात, याबद्दल मुळीच संशय नाही. गृहस्थाश्रमात असताना जर वैराग्य प्राप्त होईल अगर गृहस्थधर्म पालन करण्यास असमर्थ असेल तर त्याने शास्त्रोक्त रीतीने–विधिपूर्वक आश्रमांतर केले पाहिजे. ॥ ६.६९–७८ ॥

(१ द्विजांनी एक दिवसही आश्रमरहित–अनाश्रमी राहू नये. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ अगर संन्यास यांपैकी कोणत्याही आश्रमात न राहिल्यास द्विज प्रायश्चित्तास योग्य होतो. तसेच अनाश्रमी द्विजाने आचरलेल्या जप–यज्ञ–दानादि क्रिया निष्फळ होतात असा श्रुति–स्मृतींचा सिद्धांत आहे.

**अनाश्रमी व तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः ।**
**आश्रमेण विना तिष्ठन्प्रायश्चित्तीयते हि सः ॥** दक्ष १-१[...]

दुसऱ्या आश्रमाचा स्वीकार करून, अग्निहोत्रादिकांचे अनुष्ठान, जितेन्द्रिय, भिक्षा व बलीने परिश्रांत होऊन, शेवटी जो संन्यास ग्रहण करतो त्याचा देह पडल्यावर त्याची अवश्य आध्यात्मिक उन्नती होते. अग्नींच्या ठिकाणी आत्मभावना करून ब्राह्मणाने संन्यासी व्हावे. योगाभ्यासरत, शांत आणि ब्रह्मविद्येत सतत अनु[...] संधान ठेऊन, ज्यावेळी मनात सर्व वस्तूंविषयी वैराग्य उत्पन्न होईल तेव्हाच संन्यासी होण्याची इच्छा करावी. याविरुद्ध वर्तन झाल्यास तो पतित होतो. प्राजपत्येष्ठि अथवा आग्नेयी–इष्टि करून, इंद्रिय निग्रह आणि वासनेचा क्षय करून, ब्रह्माश्रमाचा–संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. (७९–८३)

**विवरण :–** संन्यासाश्रमाचा अधिकार ब्राह्मणांनाच (विशेषत:) असल्याचे सांगून ७९ ते ८३ श्लोकात योगीश्वर संन्यासग्रहणाचा काल सांगतात. "न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ॥ ज्ञानप्रसारेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमान: ॥" (मुंडकोपनिषद्) ते आत्मस्वरूप–रूपशून्य असल्यामुळे कोणालाही त्याचे चक्षुरिंद्रियाने ग्रहण करता येत नाही. शब्दाने सांगता येण्यासारखे नसल्यामुळे वाणीनेही ते ग्राह्य होत नाही. इतर इंद्रियांनीही त्याचे ग्रहण करता येत नाही. तप सर्व प्राप्तीचे साधन असले तरी त्या तपाच्या योगानेही त्याचे ग्रहण करवत नाही तसेच ज्याचे महत्त्व अत्यंत प्रसिद्ध आहे अशा वैदिक अग्निहोत्रादि कर्मानेही तें ग्रहण केले जात नाही; तर ज्ञानप्रसादाने ज्याचे अंत:करण शुद्ध झाले आले आहे असा साधक ब्रह्म पाहण्यास योग्य होतो आणि ज्याअर्थी असा प्रकार आहे त्याअर्थी सत्यादिसाधनसंपन्न व ज्याने आपल्या सर्व इंद्रियांचा उपसंहार केला आहे, असा साधक एकाग्रमनाने चिंतन करू लागला असता त्या सर्व अवयवभेदरहित आत्म्यास पाहतो. मन मोक्षरूप फलाच्या ठिकाणी स्थिर करण्यास सर्व परिग्रहाचा त्याग अत्यंत आवश्यक आहे. मन फार चंचल असल्यामुळे ते कोठेही एका ठिकाणी स्थिर राहत नाही. स्त्री–पुत्र–धनादि प्रपंच मिथ्या आहे; विषयोपभोगाने प्राप्त होणारे सुख हे खरे चिरकालिक सुख नव्हे, असे मनाला पटत असूनही ते त्यांच्यावद्दल निस्तृष्ण होत नाही. अंत:करणातील अनंत जन्मातील संस्कारानुरूप मनुष्याची प्रवृत्ती होत असते. व्यवहारासक्ती ही फार जुनी जडलेली सवय आहे. तिचे पाश तोडून परमहिताकरिता आपले मन मोक्षमार्गात लावणारा धीर पुरुष सहस्रात कोणी एखादाच असतो. विषयोपभोगात जितके सुख आहे त्याहून सहस्रपट त्यांचा त्याग

करण्याने प्राप्त होत असते. आत्मस्वरूपाच्या ठिकाणी विश्रांती प्राप्त होण्यास " वैराग्य " हे मुख्य द्वार आहे. " न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्वमानशुः " अशी श्रुती आहे.

**त्याग एव हि सर्वेषां मोक्षसाधनमुत्तमम् ।**
**त्यजतैव हि तज्ज्ञेय त्यक्तुः प्रत्यक्परं पदम् ।।**

" मोक्षसाधनाचे सर्वोत्कृष्ट साधन सर्व लोकांच्या बाबतीत त्याग हेच आहे. संन्याशाला परम पदाचा साक्षात्कार होतो ही गोष्ट जे त्यागी आहेत त्यांच्याच अनुभवास येते. " परमपदाच्या प्राप्तीचे सर्वोत्कृष्ट साधन त्याग अर्थात् वैराग्य हेच असल्यामुळे मुमुक्षूने सर्व परिग्रहाचा त्याग करून संन्यस्त व्हावे."

**यदा मनसि वैराग्यं जायते सर्ववस्तुषु ।**
**तदेव संन्यसेद्विद्वानन्यथा पतितो भवेत् ।। सौरपुराण.**

" सर्व वस्तूंविषयी अंतःकरणामध्ये ज्या वेळेला वैराग्य वाटेल त्याच वेळेला विद्वान् मनुष्याने संन्यासाची दीक्षा घ्यावी. एरवी तो पतित होईल. " त्याचप्रमाणे " एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति । " त्याच आत्मलोकाची इच्छा करणारे मुमुक्षू संन्यास घेतात. इत्यादि वचनांवरून त्याग हेच मोक्षाचे साधन ठरते; आणि अशा रीतीने ज्या मुमुक्षूला तीव्र वैराग्य उत्पन्न झाले आहे त्यांनी तावडतोब संन्यास घ्यावा."

**आगारादभिनिष्क्रान्तः पवित्रोपचितो मुनिः ।**
**समुपोदेषु कामेषु निरपेक्षः परिव्रजेत् ।।मनु ६–४१।।**

" गृहातून निघून गेलेला, दंड, कमंडलू इत्यादि पवित्र पदार्थांनी युक्त असलेला, मौन धारण करणारा व अगदी जवळ आलेल्या उत्तम मिष्टान्नभोजनादि कामाविषयी निःस्पृह असलेला जो अधिकारी तोच खरा संन्यास करण्यास समर्थ होय. "

ब्रह्मचर्य संपवून गृहस्थ व तदनंतर वानप्रस्थ व संन्यास या प्रमाणे आश्रम समुच्चयाचा स्वीकार करून संन्यासग्रहणास आवश्यक असलेली सामुग्री तयार होताच द्विजांनी आयुष्याच्या चवथ्या भागात संन्यास घ्यावा असेही शास्त्र म्हणते.

वनवासात्परिश्रान्तः प्रव्रजेद्विधिपूर्वकम् ।
व्याध्याविष्टो विरक्तो वा ब्रह्मवित्संन्यसेद्विजः ॥
संन्यसेद्ब्रह्मचर्येण संन्यसेद्वा गृहादपि ।
वनाद्वा संन्यसेद्विद्वानातुरो वाऽथ दुःखितः ॥ अंगिरा० ॥

वानप्रस्थाश्रम पूर्ण केल्यानंतर द्विजांनी विधिपूर्वक संन्यास करावा. ब्रह्म जाणू इच्छिणाऱ्या द्विजाने व्याधियुक्त असून किंवा वैरागी असून संन्यास घ्यावा, ब्रह्मचर्य आश्रमातून संन्यास घ्यावा, गृहस्थाश्रमातून संन्यास घ्यावा, वानप्रस्थाश्रमातून संन्यास घ्यावा. किंवा व्याधिग्रस्त झालेला असताना किंवा अति दुःखी झाला असता संन्यास घ्यावा. संन्यासग्रहणाच्या कालासंबंधी श्रुती म्हणते—

ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेत् । गृही भूत्वा वनी भवेत् । वनी भूत्वा प्रव्रजेत् । यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा । अथ पुनरव्रती वा व्रती वा स्नातको वास्नातको वोत्सन्नाग्निरग्निको वा यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत् ॥ जाबालोपनिषद् ॥

विरक्तिरहित पुरुषाने ब्रह्मचर्याश्रम संपवून स्नातक व्हावे. (विद्यास्नातक, व्रतस्नातक व विद्याव्रतस्नातक असे स्नातकांचे तीन प्रकार आहेत. वेद संपूर्ण करून व्रतसमाप्ती न करिता जो गुरुकुलातून परत येतो तो विद्यास्नातक; व्रत संपूर्ण करून वेद न संपविता जो परत फिरतो तो व्रतस्नातक व दोनही संपवून जो परत येतो तो विद्याव्रतस्नातक होय.) पण त्या ब्रह्मचर्याश्रमातच जर प्रेम असेल तर

५...

मरेपर्यंत त्याच आश्रमात नैष्ठिक ब्रह्मचारी होऊन गुरुकुलात गुरु-अग्नि-शुश्रूषापरायण होऊन राहावे. पण प्रेम नसेल तर समावर्तन विधीने त्या आश्रमाची समाप्ती करून यौवन काल प्राप्त झाला असता स्त्रीपरिग्रहरूप श्रौतस्मार्त सर्वकर्मानुष्ठानसंपादक, धर्म अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचे कारण, अशा गार्हस्थ्याचा स्वीकार करून गृहस्थ व्हावे. पण त्याचीही इच्छा निवृत्त झाल्यास त्या आश्रमापासून वनी व्हावे—वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करावा. वनी होऊन काही कालाने त्याचीही इच्छा निवृत्त झाल्यास चतुर्थाश्रमाचा-संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. हा चार आश्रमांचा अनुक्रम झाला. पण ज्याला दुसऱ्या आश्रमात जाण्याची इच्छा नसेल त्याने एकेकाच आश्रमात यावज्जीव राहावे. संन्यासाला सोडून बाकीच्या तीन आश्रमांचा अनुक्रमही नियत आहे. यालाच आश्रम-समुच्चय पक्ष म्हणतात. यांचा प्रतिलोम म्हणजे उलट क्रम केव्हाही होत नाही व तो शास्त्रविहितही नाही. अशा रीतीने आश्रमसमुच्चय पक्षाने संन्यासाचे विधान करून श्रुती दुसऱ्या विकल्प पक्षी म्हणते-संसाराची इच्छा नसल्यास ज्याने वेदांतासह स्वशाखेचे अध्ययन केले आहे, किंवा सर्व वेदान्ताचे—उपनिषदांचे अध्ययन केले आहे अशा विरक्ताने थोडावेळ आचरिलेल्या ब्रह्मचर्याश्रमासूनच संन्यास करावा किंवा गृहाश्रमातून-मग धर्मादि तीन पुरुषार्थ सिद्ध झाले असोत की नसोत किंवा वनाश्रमातून-त्याला विहित असलेल्या धर्मांचे अनुष्ठान झालेले नसले तरी संन्यास करावा. या शिवाय एखाद्या अनाश्रमी पुरुषास पूर्ण वैराग्य प्राप्त झाल्यास तो मासोपवास जप इत्यादि व्रतांनी युक्त असो अगर नसो त्यानेही वैराग्य-बलाने संन्यास करावा. त्याचप्रमाणे सर्व वेदांचे सांग अध्ययन करून स्नान कर्म केलेला स्नातक असो की केवल स्वशाखेचे

अध्ययन करून स्नान केलेला अस्नातक असो, त्यानेही वैराग्य प्राप्त होताच संन्यास करावा. गृहस्थांमध्येही काही अग्निस्वीकार केलेले असतात काही भार्यामरणादि निमित्ताने उत्सन्नाग्नी झालेले असतात व कित्येक भार्या असतानाही अग्नीचा परिग्रह न केलेले असतात, अशा सर्वांना वैराग्याच्या बलावर संन्यास करता येतो. ज्या दिवशी विरक्ती येईल त्याच दिवशी संन्यास करावा असेही श्रुतिविधान असल्यामुळे संन्यासी होण्यास वैराग्य उत्पन्न झाले असल्यास विविक्षित कालाची मर्यादा नाही.

संन्यास करणाऱ्या साग्निक गृहस्थाला उद्देशून एका इष्टीचे विधान श्रुतिस्मृतीतून केलेले आहे.

**प्राजापत्यां निरूप्येष्टि सर्ववेदसदक्षिणाम् ।**

**आत्मन्यग्नीन्समारोप्य ब्राह्मणः प्रव्रजेद् गृहात् ।।मनु ६-३८।।**

—ज्यामध्ये सर्वस्व दक्षिणा द्यावयाची असते अशा प्रजापति-देवतार्थ यजुर्वेदोपाख्यानात सांगितलेली प्राजापत्य इष्टी करून व आत्म्यामध्ये अग्नीचा समारोप करून ब्राह्मणाने चतुर्थाश्रमाचे अनुष्ठान करावे. जाबाल श्रुती म्हणते "तद्धैके प्राजापत्यामेवेष्टिं कुर्वन्ति । तदु तथा न कुर्यादाग्नेयीमेव कुर्यात् ।।" त्याविषयी खरोखर काही आचार्य प्रजापती जिची देवता आहे अशी प्राजापत्य इष्टीच करितात; पण त्यांनी जरी तसे करावयास सांगितले आहे तरी ते करू नये. तंर अग्निदेवताक इष्टीच करावी. अशा प्रकारे साग्निक गृहस्थाला आग्नेयी इष्टी सांगून निरग्नी गृहस्थानेही गावातून अग्नी आणून तीच-आग्नेयी इष्टीच करावी.

वैराग्य उत्पन्न होताच वरील प्रमाणे संन्यासाश्रम स्वीकारण्याची श्रुतिस्मृतीची अनुज्ञा पाहून कोणी "कुर्वन्नेवेह कर्माणि जिजी-विषेच्छतं समाः ।।" या लोकी अग्निहोत्रादि कर्मे करीतच शंभर

वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी; या श्रुतीचा आधार घेऊन कित्येक आक्षेप घेतात. पण यावज्जीव कर्मे करीत जिवंत राहावे ही श्रुती अविद्वानाला उद्देशून आहे, विद्वानाला नाही असे त्यांचे समाधान ब्रह्मसूत्रात-पुरुषार्थाधिकरणात " नाविशेषात् " या सूत्राने व्यासांनी केलेले आहे. विस्तारभयास्तव त्याची चर्चा करणे मोठ्या नाखुषीने आवरावे लागते.

संन्यासाश्रमाचे अधिकारी व काल या संबंधी विवेचन झाले. पण संन्यासी होण्यास अनधिकारी कोण या विषयी म्हटले आहे-

**आरूढपतितापत्यं कुनखी श्यावदन्तकः ।**
**क्षयक्षीणोंगविकलो न तु संन्यासमर्हति ।।**
**संप्रत्यवसितानां च महापातकिनां तथा ।**
**व्रात्यानामभिशस्तानां संन्यासं नैव कारयेत् ।।**
**व्रतयज्ञतपोदानहोमस्वाध्यायवर्जितम् ।**
**सत्यशौचाश्रमभ्रष्टं संन्यासं नैव कारयेत् ।।–यतिधर्मसंग्रह॥**

स्वाश्रमविहित कर्मापासून पतित झाल्याचे अपत्य, वाकडे तिकडी नखे असलेला, काळ्या दातांचा, क्षयाने विकल झाली आहेत इंद्रिये ज्याची असा, यांना संन्यासाचा अधिकार नाही. महापातकी, ज्याचा उपनयन संस्कार न झालेला असा व्रात्य, अभिशस्त-विषयासक्त मनुष्य. यांना संन्यासाश्रमाचा अधिकार नाही. तसेच जे व्रत, यज्ञ, तप, दान, होम, स्वाध्याय विवर्जित, सत्य, शौच व आश्रमविहीत कर्मं यापासून भ्रष्ट झालेले आहेत अशांना संन्यासाश्रमाचा अधिकार नाही.

**भावार्थ :–** सुग्रास अन्न किंवा कदन्न, दगड किंवा सोने यांचे ठिकाणी नेहमी समत्व बुद्धीने पाहाणाराच खरा संन्यासी होय. ज्यांचा आचार शुद्ध आहे अशा द्विजांकडचे अन्न लोभादिकांवा

त्याग करून कसलीही याचना न करिता जो सेवन करितो तोच खरा संन्यासी होय. मागितल्यावाचून पुढे येणारे पदार्थ मग ते गोड असोत अगर कडू असोत त्याची चिकित्सा न करिता जो सेवन करितो तोच खरा संन्यासी होय. ज्याची सर्वत्र समबुद्धी आहे, हिंसा, माया, क्रोध, अहंकार इत्यादिकांनी जोर हित असतो, तोच खरा संन्यासी समजावा. पूर्ण तपस्वी आणि ध्यान परायण अशा वानप्रस्थाश्रमी मनुष्यालाही संन्यासीच समजले पाहिजे. जो आत्म्याच्या ठिकाणी रत, नित्यतृप्त आणि दमसंपन्न तोच महामुनी योगी, भिक्षू म्हटला जातो. भिक्षावृत्ती, शास्त्राध्ययन, मनोनिग्रह, तप, ध्यान, उत्तम ज्ञान व विशेषत: वैराग्य हेच भिक्षूचे धर्म होत. भौतिक योगी, मोक्षयोगी व स्वत:च मूर्तिमंत योग होय असा अन्त्याश्रमी योगी असे तीन प्रकारचे योगी असतात. पहिल्याची प्रथम भावना, दुसऱ्याची अक्षर भावना व तिसऱ्याची पारमेश्वरी भावना होय. अन्त्याश्रमी, यतचित्त (यतनशील-चित्त आहे ज्याचें असा.) ऊर्ध्वरेता संन्यासी यतीचे ब्रह्मानंद असे परमपद होय; त्या ठिकाणाहून हे मुनी परत येत नाहीत. योग्यांच्या करता अमृत, व्योमाख्य, परमाक्षर, आनंदरूप आणि ईश्वरासंबंधी हेच स्थान आहे, त्या ठिकाणाहून मुक्त पुरुष परत येत नाहीत. (८४-९४.)

**भावार्थ :–** ज्ञानसंन्यासी, वेदसंन्यासी आणि कर्मसंन्यासी असे संन्याशांचे तीन प्रकार आहेत. जो सर्व संगरहित, निर्द्वन्द आणि निर्भय आहे त्याला ज्ञानसंन्यासी म्हणावा. तो आत्म्याच्या ठायी स्थिर असतो. जो जितेंद्रिय मुमुक्षू कोणापासून कसलीही अपेक्षा करीत नाही, नैराश्ययुक्त आणि सतत वेदाभ्यास करणारा तो वेदसंन्यासी होय. जो द्विज त्रिविध अग्नीशी आत्मस्वरूप होऊन, ब्रह्मार्पण परायण असतो अशा महायज्ञपरायण संन्याशाला

कर्मसंन्यासी समजावा. या तीनही प्रकारच्या संन्याशात ज्ञानी श्रेष्ठ होय. कारण त्याला कोणतेही कर्म करावयाचे नसते अथवा काही चिन्हांचीही अपेक्षा नसते. तो मरणाची वाट पाहात नाही, किंवा जगण्याची इच्छा धरीत नाही तर तो एखाद्या आज्ञाधारी सेवकाप्रमाणे कालाची मार्गप्रतीक्षा करीत असतो. त्याला काही शिकावयाचे नसते, बोलावयाचे नसते की, ऐकावयाचे नसते. असा ज्ञानपरायण योग्यास ब्रह्मत्वआत्मभाव प्राप्त होतो. (९५-१०१)

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे वैशाख महिन्यात बडोद्याच्या रामद्वारचे संन्यासी श्रीमधुसूदनसरस्वतीस्वामीमहाराज व इंदूरवरून श्री सखारामशास्त्री टिल्लू आले होते. याच सुमारास वैशाख महिन्यात श्रीगांडामहाराजऊर्फश्रीयोगानंदसरस्वतीस्वामीमहाराज श्रीस्वामी महाराजांच्या दर्शनास तीव्रतम ओढीने आपले बंधू श्रीकल्याणजी यांच्याबरोबर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले. ते ज्यावेळी आले त्यावेळीच त्यांची प्रकृती बरी नव्हती; परंतु काही दिवस श्रीगुरुचरणांच्या सान्निध्यात राहिल्यावर त्यांचे मन शांत झाले. मात्र त्यांची प्रकृती काही सुधारली नाही. त्यामुळे एके दिवशी श्रीस्वामीमहाराज श्रीगांडामहाराज यांना असे म्हणाले की, "तू आता भडोचला जा व तेथे राहून आपल्या वडिलांची सेवा कर. आम्हाला सोडून जावे असे तुला वाटत नाही हे आम्ही जाणतो; परंतु आमची अशी आज्ञा आहे की, तू वडिलांच्या सेवेतच श्रीदत्तात्रेयांना पाहा. जशी तू येथे राहून श्रीदत्तात्रेयांची सेवा केली तशीच आपल्या वडिलांची सेवा कर. श्रीदत्त व तुझे वडील एकरूप आहेत हे लक्षात घे. यावेळी तुला तुझ्या वडिलांच्या सेवेत राहणे अत्यावश्यक आहे. आमच्या सेवेसाठी येथे कितीतरी लोक आहेत. यापूर्वी ज्याप्रमाणे तू "मातृदेवो भव" या वेदाज्ञेचे उत्तमरीतीने व निष्ठापूर्वक प्रति

पालन केलेस त्याप्रमाणे यापुढे " पितृदेवो भव " याही वेदाज्ञेचे उत्तम प्रतिपालन कर. पिता, देव व गुरू या तिन्हींचे स्वरूप एकच आहे असे मनात बिंबवून तू पित्याची सेवा कर. मात्र एक गोष्ट अगदी कटाक्षाने अशी लक्षात ठेव की, तुझ्या वडिलांच्या मृत्यूनंतर तू आपल्या जन्मभूमीच्या भागात मुळीच राहू नकोस. नेहमी तीर्थाटन करीत राहा. अशा प्रकारे परिभ्रमण केल्यामुळे मोह कमी होत असतो. ज्यावेळी तू निर्मोही होशील त्यावेळी तू संन्यास घे. "

अशा प्रकारे उपदेश करून श्रीस्वामीमहाराजांनी श्रीगांडामहाराजांना भडोच येथे जावयाची आज्ञा केली. श्रीस्वामीमहाराजांचा हा उपदेश श्रीगांडामहाराजांनी अत्यंत शांतचित्ताने ऐकला; परंतु श्रीगुरुस्थान सोडताना त्यांचा जीव अगदी खालीवर होत होता. श्रीगांडामहाराज हे श्रीस्वामीमहाराजांच्या वात्सल्याचे अपूर्व असे प्रतिबिंब असल्यामुळे या आज्ञेमुळे त्यांच्या जीवाला कमालीची अस्वस्थता आली. श्रीगुरुदेव आपल्याला हा सर्व निर्वाणीचा संदेश देत आहेत असे त्यांना वाटले. श्रीगांडामहाराजांच्या अंतर्मनातून जरी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथून जावयाचे नसले तरी श्रीगुर्वाज्ञा ही वज्रलेपाप्रमाणे प्रमाण व शिरोधार्य असल्याने श्रीगांडामहाराजांनी अत्यंत प्रेमाने श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून कठोर अंतःकरण करून त्यांचा निरोप घेतला.

उपरोक्त सर्वच प्रसंग श्रीगांडामहाराजांनी स्वतःच श्रीगुरुमूर्तिचरित्र या ग्रंथात पुढीलप्रमाणे मोठ्या हृद्यपणे वर्णन केला आहे. तो वाचला म्हणजे मन भरून आल्याशिवाय राहात नाही. ते असे म्हणतात की–

**॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीदत्त समर्थ ॥**

**योगानंदासी भक्तजन ॥ विनविती भावें करूनी नमन ॥**

श्रीगुरुमूर्तींची कथा-पावन । पुढतीं आम्हां निरोपावी ॥ १ ॥
परिसुनी भक्तजनांची विनंती । योगानंद सांगे पुढतीं ॥
औषधी न सेवीं ऐशा रीतीं । स्वामी वदले जया दिनीं ॥ २ ॥
त्या दिनींच रात्री गांडासी म्हणत । बा रे तुझी प्रकृति अत्यंत ।
बिघडल्या पासुनी आज पर्यंत । बरोबर नाहीं जाहली ॥ ३ ॥
त्या करितां तूं या स्थानावर । राहिल्या पासुनी सत्वर ।
होसील रोगग्रस्त निर्धार । मग तुज साठी अन्य दुजें ॥ ४ ॥
सेवा करणार मनुष्य कोणी । पाहिजे बा रे पुनः दुजें या ठिकाणी
त्या करितां तू सत्वर जाऊनी । श्रीभृगुक्षेत्रा माजीं रहावे ॥ ५
श्रीगुरुमातेच्या मुखाब्जापासून । निघतां आज्ञारूपी हें वचन ।
तें ऐकतां गांडाबुवा त्वरा करून । प्रातःकालीं श्रीचरणकमलीं ॥ ६
करूनियां साष्टांग नमन । म्हणे आपुली आज्ञा शिरसावंद्य मानून
मीजातोगुरुचरणांबुजासोडून।परी आई विनंती दासाचीऐकावी॥ ७
हे गुरुमाउली तुम्हीं साचार । आपुल्या पुत्रासी सोडून जाणार
ऐसा प्रत्यक्ष दिसतसे प्रकार । पुढें कोण या अज्ञानी बालकासी ॥ ८
सांभाळील तें मला सांगावें । हे मायबापा आतां कोणा शरण जावें
श्रीदत्तप्रभूनें श्रीचे पदरीं बरवें । दासासी घातलें त्या वेळीं ॥ ९
सांगितलें कीं उद्यां जो कोणी । तव पदीं येऊनी घाली लोटांगणी
त्यासी सांभाळावें आज पासुनी । हे मम आज्ञा मान्य करावी ॥ १०
तो तुम्हांसी सोडून न राहणार । आज पासुनी शेवट पर्यंत साचार
तुमचें जें जें कार्य निर्धार । सर्व होईल त्याचे करें ॥ ११ ॥
दुसरे दिवशीं श्रीसन्निध आलों । त्या पासुनी त्रिताप विसरलों ।
पुनः मी दुःखसागरीं बुडालों । आतां कोण काढील बाहेर ॥ १२
हे माउली प्रारब्धप्रतिबंध निश्चित । जिकडे तिकडे धांव घेत ।
त्याचे बंधना माजीं सांपडतां त्वरित । निघतां न ये कोणाला ॥ १३

त्या वेळी दासासी सांभाळावें । अहंता ममते पासुनी मुक्त करावें ।
या शरीराकडून नित्य सेवेतें घ्यावें । हें मागतों मी आई जवळीं ।।१४।।
पुनः मातेच्या उदरा माजीं । न पाठवावें श्रीगुरुजी ।
नित्य ठेवूनियां काळजी । मला सदैव रक्षावें ।। १५ ।।
शेवटीं विदेहकैवल्य पद द्यावें । श्रीगुरुस्वरूपासी एक करावें ।
ही प्रार्थना ऐकूनी गुरुरावें । अभयवर दिला गांडासी ।। १६ ।।
हे बा वत्सा तुझ्या मागणी सम । श्रीदत्तात्रेय सर्वोत्तम ।
जो योगिजनांचा विश्रामधाम । तो पूर्ण करील अवश्य ।। १७ ।।
पुनः म्हणे गुरुमाउली गांडासी । मज जवळीं राहुनी दत्तसेवा केली जैसी ।
तेच स्वरूप समजून पिता—स्वामीसी । सेवा करूनी एकभावें ।।१८।।
त्यांचें ऋणा पासुनी मुक्त । व्हावें मुक्ती करितां त्वरित ।
त्यांचें मन न दुखवावें यत्किंचित् ।मग शेवटीं करूनी आराधना।।१९।।
पुढतीं तूं निज इच्छे सम करावें । संन्यासमार्गे सुपंथें जावें ।
सर्व मायिक संबंधा त्यजावें । निघुनी जावें दूर देशी ।। २० ।।
तुझे हृदया माजीं मी आहे । हें व्रत पूर्ण सांभाळुनी राहे ।
गुरुशिष्याचा जोवरी भेद पाहे । तोंवरी मुक्ति न मिळेल ।। २१ ।।
यास्तव शरीरभावा त्यजावें । आत्मभावानें एक व्हावें ।
ह्या माझ्या उपदेशा ध्यानीं ठेवावें । म्हणुनी श्रीगुरूनें प्रसाद दिला।।२२।।
तो भक्षण करुनी त्वरित । गांडाबुवा साष्टांग नमन करीत ।
आई गे बाळासी पहा म्हणत । श्रीभृगुक्षेत्रासी आले ।। २३ ।।

अशा रीतीनें श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्रीगांडामहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून निघून प्रथम तिलकवाड्यास आले. ते ज्या दिवशी येथे आले त्याच्या दुसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांच्या

६ . . .

एका दक्षिणी ब्राह्मण भक्ताच्या मुलाचा यज्ञोपवित संस्का अर्थात् मुंज होती. या मुंजीला श्रीस्वामीमहाराजांनी येऊन वटू आशीर्वाद द्यावा म्हणून आधल्या दिवशी तो ब्राह्मण श्रीक्षेत्र गरुडेश्वरं आला व अत्यंत अगत्यपूर्वक प्रार्थना करून श्रीस्वामीमहाराजां असे म्हणाला को, " प्रभो ! उद्या माझ्या मुलाची मुंज आहे. तं आपण मुंजीला अगत्य येऊन माझ्या मुलाला आशीर्वाद द्यावेत अ आपल्या चरणी प्रार्थना आहे." श्रीस्वामीमहाराजांनी आप भक्तावरील प्रेमाखातर तिळकवाड्याला मुजीला जाण्याची गो मान्य केली. मुंजीच्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र गरु श्वराहून निघून तिलकवाड्याला जाण्याच्या वेळी दंड घेण्यासा त्याला हात लावताच त्यांना विंचू चावल्यासारख्या यातना झाल त्यामुळे त्यांनी आपला हात झटकन् मागे घेतला. असे का घ याचे कारण काहीच लक्षात न आल्यामुळे श्रीस्वामीमहाराजां त्यानंतर पुन्हा दोनदा दंड घेण्यासाठी हात लावल्याबरोबर त्यां पूर्वी प्रमाणेच विंचू चावल्यासारख्या वेदना झाल्या. अशा प्र दोन तीन वेळा वेदना होण्याचे कारण काय असावे याचा वि केल्याबरोबर त्यांना आपण श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आल्या श्रीदत्तात्रेयांच्या " आता यापुढे येथून दुसरीकडे कोठेही जाव नाही," या आज्ञेचे स्मरण झाले. श्रीक्षेत्र गरुडेश्वराचा परि सोडून एक तसूभरसुद्धा दुसरीकडे जाणे श्रीदेवांना पसंत नसल्या त्यांनीच आपल्याला विंचू चावल्यासारख्या वेदना दिल्या य त्यांना खात्री पटली. हे सर्व लक्षात आल्यामुळे श्रीस्वामीमहाराजां मुंजीला जाण्याचा बेत रद्द केला व नंतर देवांची इच्छा नसल्या " आमचे तिलकवाड्यास येणे होणार नाही," असा नि पाठविला व आपले नित्याचे आन्हिक पुढे चालू केले.

श्रीदेवांनी श्रीस्वामीमहाराजांना तिलकवाड्याला मुंजीसाठी का जाऊ दिले नाही यासंबंधी ज्यावेळी विचार मनात येतात त्यावेळी देव-भक्तांच्या प्रेमाचे अलौकिक रहस्य यात दडलेले आहे याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या ब्रह्मदंडाला हात लावल्यावर त्यांना विंचू चावल्यासारख्या वेदना झाल्या त्यावेळी श्रीसंत नामदेवमहाराजांच्या शब्दात त्यांनी श्रीदेवांना असे विचारले असणार की, "समर्थपणें रंका का गांजितसां स्वामी। हें काये स्वधर्मीं मिळतसे ? ॥" परंतु श्रीस्वामीमहाराजांसारख्या महाभक्तांकडून श्रीनर्मदातीरी श्रीदेवांना महालीला करावयाची असल्यामुळे स्वरूपतः एकरूप असूनही माकडांच्या रूपाने श्रीरामाचे सेवक व गोपालांच्या रूपाने श्रीकृष्णांचे सेवक बनून ज्याप्रमाणे देव-भक्तांचा सेव्य-सेवक-भाव प्रकट झाला त्याप्रमाणेच हे चालले आहे याची जाणीव "कल्पाचे शेवटी तुम्हां आम्हां भेटी ॥" या शब्दांनी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदेवांना दिली असणार यात काहीच शंका नाही. सेव्य-सेवक-भावरूपाने प्रकट झालेला हा भक्तीचा जो अपूर्व कळस आहे त्याचेच अत्यंत लोकोत्तर असे वर्णन श्रीसंतनामदेवमहाराजांनी पुढील अभंगात केले आहे. ते असे म्हणतात की—

समर्थपणें रंका कां गांजितसां स्वामी ।
हें काये स्वधर्मीं मिळतसे ॥ १ ॥
आपुली करणी न विचारा मनीं ।
दुसरियास झणी बोल ठेवा ॥ २ ॥
निर्गुण निराकार होतेंती शून्यपणें ।
आम्हांसी असणें तेंचि ठायां ॥ ३ ॥
सुखें एकरूप होतों तुझे पोटीं ।

कासया हे सृष्टी वाढविली ।। ४ ।।
विकाराचें मूळ दिधलें हें शरीर ।
तेणें कष्टी थोर जालों आम्ही ।। ५ ।।
पाप पुण्य दोन्हीं लाविलीं सांगातें ।
म्हणऊनि सुखातें अंतरलों ।। ६ ।।
यमलोकीं वास रौरव यातना ।
तेणें नारायणा धाक थोर ।। ७ ।।
खातों जेवतों तें न लगेचि अंगीं ।
जालोंसें उद्वेगीं रात्रंदिवस ।। ८ ।।
ऐसे देह आम्हां कासया दिधले ।
काय मागितले आम्हीं तुम्हां ।। ९ ।।
सृष्टीपूर्वी पाप नव्हतें हरी ।
कासया श्रीहरी कष्टी केलें ।। १० ।।
वेदशास्त्रभय आम्हांसी लाविलें ।
तें तुम्हीं टाकिलें एकीकडे ।। ११ ।।
वेदशास्त्रवचन चुकल्या अवचिता ।
गोसावी जी होतां दंडावया ।। १२ ।।
मागां चुकलेती तें ठेवा एकिकडे ।
आतां तरी पुढें सांभाळावें ।। १३ ।।
एकरूप तुम्ही होतेती निर्गुणीं ।
तेथें आमुचे कोण्ही बोलों आलों ।। १४ ।।
निर्गुण सांडुनि व्हावें जी सगुण ।
ऐसें तुम्हां कोण बोलियेलें ।। १५ ।।
आपुलिये इच्छें ब्रह्मांडें रचिलीं ।
काय सांगितलीं जी आम्हीं तुम्हां ।। १६ ।।

लक्ष्मीचे विलास धरिले नाना वेष ।
हा काय उपदेश आम्ही केला ॥ १७ ॥
विश्व हें निर्मुनि जालेती गोसावी ।
हें काय सांगावी आम्ही केली ॥ १८ ॥
जे तुम्हां पाहिजे तें तुम्ही निर्मिलें ।
आपणासवें केलें कष्टी आम्हां ॥ १९ ॥
कल्पजन्मांतरी युगयुगांतरी ।
जवळी श्रीहरी होतों आम्हीं ॥ २० ॥
तुम्ही तेथें आम्ही आम्ही तेथें तुम्ही ।
विचारावें स्वामी पांडुरंगा ॥ २१ ॥
तुम्हां आम्हां कांहीं वेगळिक नाहीं ।
बोलोनियां काई दावूं आतां ॥ २२ ॥
आम्हांसि तुम्ही काय सोसिलें अधिक ।
ठकितसां लोक तैसें नव्हें ॥ २३ ॥
तुम्हांसी अवतार कोरडियें काष्टीं ।
तुमच्या नामें कष्टी दैत्यें केलें ॥ २४ ॥
तुम्हांसी मातेनें धाडियेलें वना ।
आमची विटंबना बहुत जाहली ॥ २५ ॥
वल्कलें वेष्टोनी जालेती तापसी ।
वेष आम्हां देसी मर्कटाचे ॥ २६ ॥
जवळीच असुनी हरविली कांता ।
आम्ही शुद्धिकरतां कष्टी जालों ॥ २७ ॥
तियेचे वियोगें शोक करा वनीं ।
वानरें होऊनि हिंडों आम्हीं ॥ २८ ॥
तुम्ही स्वामीपणें बैसा एके ठायीं ।

आम्ही शिळा डोईं वाहिलेल्या ॥ २९ ॥
लंकेपुढें आम्हीं वेचियेलें प्राण ।
तुम्ही ते दुरून बाण टाका ॥ ३० ॥
अयोध्येचें राज्यीं तुम्हां सिंहासन ।
आमचे कपाळीं हीन चुकेचि ना ॥ ३१ ॥
वस्त्रें अलंकार तुम्हां हस्ती घोडे ।
आम्ही ते उघडे पायीं चालों ॥ ३२ ॥
चाड सरलिया नाहीं आठवण ।
कांहो लक्षुमण दवंडिला ॥ ३३ ॥
लोक म्हणों तरी पाठीं सहोदर ।
जालेति निष्ठुर देवराया ॥ ३४ ॥
तुम्हां एकलेंनि न करावें गमन ।
सर्व अवघेजण आलों आम्ही ॥ ३५ ॥
कंसाभेणें तुम्ही राखियेल्या गाई ।
तेथें आम्ही काई नव्हतों देवा ॥ ३६ ॥
भोगा स्वामीपण राखितां गोधनें ।
ठकोनियां खाणें आमच्या रोटचा ॥ ३७ ॥
सर्पापोटीं आम्हीं घाबरलोसें विखें ।
तुम्ही आपुले सुखें वेगळेची ॥ ३८ ॥
खेळतां यमुनेडोहीं टाकियेली उडी ।
आम्ही थडी थडी रुदन करूं ॥ ३९ ॥
गोवर्धन गिरी आमुचिये शिरीं ।
तुम्ही नानापरि वेणु वाहा ॥ ४० ॥
आम्हां चोरूनी नेलें वर्षभरी ।
तुम्ही आपुले घरीं सुखी असा ॥ ४१ ॥

असो आतां चाड नाहीं येणेंवीण।
आमुचें निर्वाण पाहूं नका ।। ४२ ।।
आमुचे दिवस काय वायां गेले।
स्वामीया उगले राहा तुम्ही ।। ४३ ।।
कल्पाचे शेवटीं तुम्हां आम्हां भेटी।
तेथें पैं ह्या गोष्टी कळों येती ।। ४४ ।।
नामा म्हणे आम्ही पाईक फुकाचे।
धारक नामाचे दास तुझे ।। ४५ ।।

श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त श्री. सातवळेकर यांनी केलेल्या कथनाप्रमाणे उपरोक्त कथेत थोडासा बदल झालेला दृष्टीस पडतो. त्या लोकांच्या मताप्रमाणे श्रीस्वामीमहाराज आपल्या भक्ताच्या प्रेमाखातर त्याच्या मुलाच्या मुंजीसाठी ज्या दिवशी तिलकवाड्याला जावयास निघाले त्यादिवशी सकाळपासून त्यांच्या पोटामध्ये वेदना होऊ लागल्या. या वेदनांमुळे श्रीस्वामीमहाराजांना तिलकवाड्याला मुंजीला जावयास निघणे शक्य होत नव्हते. ज्यावेळी निघण्याची वेळ टळून जाऊ लागली त्यावेळी अकस्मात् त्यांच्या मनात असा विचार आला की, " अशा प्रकारे आजच पोटात वेदना होण्याचे काय कारण असावे ? " हा विचार चालू असताना अकस्मात् त्यांना श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर श्रीदेवांच्या "आता येथून पुढे श्रीक्षेत्र गरुडेश्वर सोडून कोठेही बाहेर जावयाचे नाही, " या आज्ञेचे स्मरण झाले. या आज्ञेचे स्मरण झाल्यावरोवर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदेवांची आज्ञा शिरोधार्य करून तिलकवाड्याला जाणे रद्द केले. श्रीस्वामीमहाराजांनी जाण्याचा बेत रद्द केल्यावरोवर त्यांच्या पोटातील वेदना थांबून गेल्या.

श्रीस्वामीमहाराजांना त्या दिवशी सकाळपासून पोटदुखीचा त्रास

होऊ लागल्याचे पाहून त्यांच्या आजाराची वातमी श्री. सखारामशास्त्री टिल्लू यांनी श्रीगांडामहाराज यांना तिलकवाड्याला कळविली. ही वातमी कळताच श्रीगांडामहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांसाठी लिंबाचे सरबत श्री. छगन मास्तर यांच्या सोबत पाठवून दिले. श्री. छगन मास्तर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर त्यांनी आपल्याबरोबर आणलेले सरबत श्रीस्वामीमहाराजांसमोर ठेवले व त्यांना नमस्कार करून ते तेथून परत तिलकवाड्याला जावयास निघाले. त्यावेळी श्री. सखारामशास्त्री टिल्लू श्रीस्वामीमहाराजांना ऐकू जाईल एवढ्या मोठ्याने श्री. छगन मास्तरांना असे म्हणाले की, " श्रीस्वामीमहाराजांची प्रकृती बिघडली आहे. तरी श्रीगांडामहाराजांना इकडे पाठवून द्या. " हे ऐकताक्षणीच श्रीस्वामीमहाराज अत्यंत रागाने असे म्हणाले की, " गांडा कालच तर तिलकवाड्याला गेला आहे. त्याला येथे परत कशाला बोलावता ? गांडासाठी मध्यस्थी करण्याचे तुम्हाला वकीलपत्र मिळाले आहे काय ? तुमचे सांगणे तो ऐकणार नाही आणि आम्हीही ऐकणार नाही. त्याने आज इकडे येणे हे आम्हाला पसंत नाही. "

श्रीस्वामीमहाराजांच्या रागाचे हे उग्र स्वरूप व त्यांच्या संतापाची ही तीव्रता पाहिल्यावरोबर श्री. सखारामशास्त्री टिल्लू अगदी घावरून गेले. त्यांनी त्याक्षणी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला व ते त्यांना असे म्हणाले की, " प्रभो ! क्षमा असावी. माझी चूक झाली. गांडाबुवांनी मला काहीसुद्धा सांगितले नव्हते. आपली प्रकृती वरी नसल्यामुळे मी आपण होऊनच हे धाष्टर्य केले. माझ्यामुळे आपल्याला जो त्रास झाला त्यावद्दल आपण मला उदार अंतःकरणाने क्षमा करावी. "

श्री. सखारामशास्त्री टिल्लू यांनी अशी प्रार्थना केली; त

श्रीस्वामीमहाराज त्यांना काही एक न म्हणता हा सर्व संवाद ऐकत उभे असलेल्या श्री. छगन मास्तरांकडे वळून असे म्हणाले की, "छगन मास्तर ! गांडाला माझा असा निरोप सांगा की, तू कोणतीही चिंता करू नकोस. तेथेच तिलकवाड्याला खुशाल राहा. कदाचित् आम्हाला येथे मरण आले तर आम्ही तुझा हिस्सा जरूर राखून ठेवू."

श्रीस्वामीमहाराजांनी श्री. छगन मास्तरांना दिलेला निरोप ऐकताच एकंदर सर्व विषयाला चमत्कारिक वळण लागलेले पाहून श्री. सखारामशास्त्र्यांना फारच वाईट वाटले. त्यामुळे ते श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाले की, "प्रभो ! आपण असा निरोप जर पाठविला तर श्रीगांडामहाराजांच्या हृदयाला नक्कीच यातना होतील. तरी आपण असा निरोप पाठवू नये अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे."

श्रीसखारामशास्त्री यांनी अशी प्रार्थना केली तरी श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "त्याला वाईट वाटले तर त्याला आमचा काही इलाज नाही. अशा प्रकारे त्याला वाईट वाटले तर त्याच्याशी आमचे काहीच कर्तव्य नाही." श्रीस्वामीमहाराजांनी असे उद्‌गार काढताच श्री. सखारामशास्त्री टिल्लू यांचे बोलणेच खुंटल्यामुळे ते गप्प बसले. श्रीस्वामीमहाराजांचे हे उद्‌गार म्हणजे भविष्यकाळातील जणूकाही भाकीतच आहे असे वाटून श्रीयुत सखारामशास्त्री दिङ्मूढ झाले.

हा सर्व प्रसंग श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीयोगानंदसरस्वतीस्वामीमहाराज ऊर्फ श्रीगांडामहाराज यांनी "श्रीमत् ब्रह्मीभूत परमहंस परिव्राजकाचार्य वासुदेवानंदसरस्वती

...७

( टेंब्ये ) स्वामींचेचरित्र " या ग्रंथात पुढील प्रमाणे वर्णन के
असून श्री. छगन मास्तरांबरोबर श्रीस्वामीमहाराजांनी जो
निरोप श्रीगांडामहाराजांना पाठविला होता त्यातील जे
त्यांनी प्रकट केले आहे ते अत्यंत अपूर्व व मननीय असून त्यांच्या
शब्दात नें पाहणे इष्ट ठरेल.

" या ठिकाणी (श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे) गांडा
श्रीगुरुमूर्तींच्या दर्शनासाठी आले होते. रात्रीचे भजन
आटोपल्यावर श्रीगुरुमूर्ती म्हणाले की, " गांडा ! दर्शन झाले

गांडाबुवा :– हो गुरुजी !

श्रीगुरुमूर्ती :– उपाधीत पडावयाचे आहे का ?

गांडाबुवा :– हे गुरुमहाराज ! मी आपल्याजवळ उ
वाढविण्यास आलो की सोडविण्यास आलो हे आपणाला मा
आहे. मला उपाधी नको म्हणून फिरत आहे.

श्रीगुरुमूर्ती :– उपाधीची गरज असेल तर तू येथें राहावे
ठिकाणी बसावे. मी समोरच्या लिंबाच्या झाडाखाली बसेन.

गांडाबुवा :– मी आपल्या हृदयात वसलेला असून इतके
जाण्याचे कारण काय ?

श्रीगुरुमूर्ती :– जर असे असेल तर तू येथून निघून जावे.

गांडाबुवा :– मी सकाळी जाईन.

श्रीगुरुमूर्ती :– मी सांगतो की, आताच गाडीत वसून आ
मंडळींबरोबर तिलकवाड्यास जा.

गांडाबुवा श्रीगुरुमूर्तींस साष्टांग नमस्कार करून जा
निघाले. तेव्हा इंदूरचे टिल्लूशास्त्री त्या ठिकाणी बसले हो
त्यांना असे म्हणाले, " तुम्ही महाराजांचे प्रिय असूनही आता
नघाला. आम्हासही जाण्याची आज्ञा झाली होती; परंतु

तसेच राहिलो."

गांडाबुवा :– शास्त्रीबुवा ! आमचा तर असा नियम आहे की, गुरुमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे अवश्य करावयाचे. त्यात बऱ्यावाईट परिणामाकडे लक्ष द्यावयाचे नाही. सद्‌गुरुमहाराजांचे वचन जर मी उल्लंघन करीन तर आजपर्यंत उपनिषदांचे भाष्य वगैरे श्रवण करविले, त्याचे फळ कसे मिळेल ? याकरिता मी आताच जाईन, असे बोलून निघाले ते रात्री तिलकवाड्यास आले. तिसरे दिवशी श्रीगुरुमूर्ती तिलकवाड्यास येणार होते. परंतु देवाची आज्ञा नसल्यामुळे जावयास तयार होताच त्यांच्या पोटात पोटशूळ उठला. ते पाहून टिल्लूशास्त्र्यांनी गांडाबुवास तिलकवाडा येथे पत्र पाठविले. तेव्हा गांडाबुवाने छगन मास्तरास पाठवून कळविले की, "काही कारणाने देवाने ही पोटशूळाची व्यथा उत्पन्न केली असावी. औषध वगैरे घेण्याबद्दल आग्रह न करता सोबत पाठविलेले ताक व लिंबाचे सरवत श्रीगुरुमूर्तीस द्यावे." मागाहून समजले की, गायकवाडांच्या राज्यात पाय ठेवण्यास त्यांना श्रीदत्तांची आज्ञा नाही. म्हणूनच हा पोटशूळ उत्पन्न झाला होता. त्यामुळे तिलकवाड्याला जाण्याचे रहित झाले.

छगनमास्तर श्रीगुरुमूर्तींची आज्ञा घेऊन परत जाण्यास निघाले. त्यावेळी टिल्लूशास्त्री जवळ होते. त्यांनी त्यास अत्याग्रहपूर्वक कळविले की, गांडाबुवास येथे पाठवून द्यावे. त्यावर श्रीगुरुमूर्ती म्हणाले, " गांडा आताच दर्शन करून गेला, तरी इतक्यात त्याला कशास बोलाविता ? " ते ऐकून शास्त्रीबुवांनी आग्रह केल्यावरून ते पुन्हा म्हणाले, " गांडा व मी यांच्या मध्ये तुम्ही बोलू नये. तो आहे व मी आहे तोपर्यंत तुमचे सांगणे ऐकणार नाही व मीही ऐकणार नाही. इतके असूनही मी आपणास विचारतो की, त्यांनी

तुम्हास शिफारस पत्र दिले आहे काय ? "

टिल्लूशास्त्री :– नाही. मी आपण होऊनच सांगत आहे.

नंतर श्रीगुरुमूर्ती छगनमास्तरास म्हणाले, " मी सांगेन ते शब्द तू गांडाला सांग. कोणतीही चिंता करू नकोस. तू तेथे सुखे राहा. कदाचित् मी मेलो तर तुझा हिस्सा लिहून ठेवीन. तो घे जावे; परंतु तूत येऊ नये."

टिल्लूशास्त्री :– स्वामीमहाराज ! आपणावर पूर्ण ठेवणारास असा निरोप पाठविल्याने त्यास बरे वाटणार न

श्रीगुरुमूर्ती :– गांडास वाईट वाटले तर वाटू दे. हे छगन ! निरोप शब्दशः गांडास कळव.

छगनमास्तर तेथून तिलकवाड्यास आले. त्यांनी श्रीगुरुमूर्ती निरोप गांडाबुवास सांगितला. तो ऐकून गांडाबुवा हसू लागले पाहून जवळच्या मंडळीस आश्चर्य वाटले. ते म्हणाले, " महाराज ह्या निरोपावरून आम्हास काही समजले नाही आणि आपणास आले, तरी याचे रहस्य काय ? हे आम्हा अज्ञानास कळविले पाहि

गांडाबुवा :– " ह्या निरोपात नारळासारखा स्वाद आहे. ज्याप्र नारळ बाहेरून निरुपयोगी दिसतो; परंतु त्याचे आत उत्तम अ असतो, त्याप्रमाणे श्रीगुरुवचनात उत्तम रहस्य आहे. अरे ! पुरुष षड्‌रिपूला स्वाधीन ठेवून स्वरूपानंदात आहेत, ज्यां अज्ञ जन वाटेल तसे वर्तन ठेवतात, तरीही जे रागवत नाही ज्यांना ह्या जगात कोणी शत्रू अगर मित्र नाहीत आणि आलेल्या पतितांस त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करून जे पावन कर असे सत्पुरुष आपल्या अनन्य भक्तांवर क्रोध करतील हे संभ तरी आहे काय ? तर मग श्रीसद्‌गुरु या दासावर का रागावतील बाबांनो ! ह्या निरोपाचा खरा अर्थ असा आहे की, तू स्वस्थ

आत्मानात्म विचार करून मन शांत कर. घाबरू नकोस. माझ्यात तुझा हिस्सा आहेच. तुझे शरीर माझ्या नजीक असो किंवा दूर असो, त्याची काळजी करू नको. तुझी सत्यभावना फलद्रूप होईल. बाबांनो! विचार करा की, ज्ञात्यास मरण कोठे आहे. अज्ञानाजवळ जे अज्ञान आहे तेच त्याचे मरण होय. श्रीगुरुमूर्ती पूर्ण ब्रह्म असून ते मृत्यूच्या मस्तकावर पाय देऊन वसले आहेत. माझ्याजवळ अज्ञान वसत असल्यामुळे मृत्यूही वास करीत आहे. याकरिता ही अभय-वचने पाठविली आहेत. मी जर श्रीसद्गुरूंजवळ राहिलो तर पुष्कळ लोकांची उपाधी प्राप्त होईल व त्या धांदलीत मला माझ्या स्वतःचा विचार करण्यास वेळ मिळणार नाही, यासाठीच हा निरोप पाठविला आहे." हे ऐकून सर्वांस आनंद झाला.

. . . . . .

उपरोक्त दोन कथांमधून वर्णन केल्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून तिलकवाड्याला न जाण्याचे वरवर दिसणारे कारण जरी स्थूल असले तरी त्याचे खरे कारण पुढीलप्रमाणे होते. श्रीस्वामीमहाराजांना श्रीदत्तांची अशी आज्ञा झाली होती की, "वेदोक्त प्रकरण झालेले असल्यामुळे आपण यापुढे गायकवाड्यांच्या राज्यात पाय ठेवू नये."

श्रीदेवांच्या या आज्ञेमुळेच श्रीस्वामीमहाराज तिलकवाड्याला गेले नाहीत. या दृष्टीने हे वेदोक्त प्रकरण काय आहे हे पाहिले म्हणजे यातील रहस्याचा आपल्याला उलगडा झाल्याशिवाय राहणार नाही. साहित्य सम्राट श्री. न. चिं. केळकर यांनी लोकमान्य टिळक यांचे चरित्र, खंड २, भाग २ मध्ये यासंबंधी असे लिहिले आहे की—

## वेदोक्त प्रकरण

ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद जोतिबा फुले यांच्याइतका त्यांच्याहून जुना असला तरी त्याला १९०१ सालापर्यंत प्र स्वरूप आले नव्हते आणि ते प्रकट स्वरूप सरळ रीतीने न विकृत रीतीने येण्याचे कारण त्या वादाला राजाश्रय मिळाला होय. हा वाद प्रथम वडोदे येथे वेदोक्त कर्माच्या वादातून पडला. सयाजीराव गायकवाड यांनी आपल्या सुशिक्षित दृष्टी ब्राह्मणेतरांनी वेदोक्त संस्कार का करून घेऊ नये असा प्रश्न का होता आणि त्यानंतर हा वाद कोल्हापुरास जाऊन भिडला. असा उपस्थित झाला की, मराठे हे क्षत्रिय होते म्हणून त्यांच्याक कर्मे ब्राह्मणांनी वेदोक्त केली पाहिजेत. वास्तविक पाहता मराठ्यां स्वतःच क्षत्रिय म्हणविणे व द्विजाप्रमाणेच आपली कर्मे वेदो करविणे यात काहीच वावगे नव्हते. मराठ्यांनी स्वतःस क्ष म्हणविल्याने ब्राह्मणांना वाईट वाटण्याचा अगर राग येण्या काहीच संभव नव्हता. कारण "आम्हाला वेदोक्ताचा अधि द्या" असे म्हणण्यात मराठ्यांनाही वेदप्रामाण्य आहे हे आपो गृहीतच धरले जात होते. वेदोक्त केल्याने क्षत्रिय व ब्राह्मण एक होणार होते असेही नाही; पण हा वाद सरळ रीतीने न चालण्या छत्रपती शाहूमहाराज व त्यांचे बंधू कागलकर हेच दुर्दै कारणीभूत झाले व अधिकाराची अगर सत्तेची अरेरावी त्यां थोडी कमी गाजवली असती तर वादाला इतके विकृत स्व आलेही नसते हे वडोद्याच्या सयाजीरावांच्या उदाहरणाव दिसतच होते. शाहूमहाराजांनी राजोपाध्ये यांना "तु राजवाड्यात येऊन वेदोक्त कृत्ये केलीच पाहिजेत," असा घातला. इतकेच नव्हे; तर कोल्हापूर येथील श्रीअंबाबाईचे देव

शिरून देवीस स्पर्श करू अशीही काही अधिकाऱ्यांनी धमकी घातली. मराठ्यांची ही मागणी न्याय्य अगर अन्याय्य कशीही असली; तरी आजपर्यंतच्या परंपरेच्या व वहिवाटीच्या सर्वस्वी विरुद्ध व निवळ दांडगाईची होती व वेदोक्ताच्या केवळ तात्त्विक वादापेक्षा या कृत्यानेंच कोल्हापुरामध्ये जास्त खळबळ उडाली. काही शिष्ट लोकांनी महाराजांकडे जाऊन या प्रसंगी योग्य धोरण ठेवण्याची विनवणी केली. पण छत्रपतींनी तर त्यांना अगदीच धुडकावून दिले. शेवटचा मार्ग राहिला तो रेसिडेंटकडे अर्ज करण्याचा. तोही लोकांनी करून पाहिला. पण परधर्मी साहेब या हिंदूधर्माच्या वादात काय निकाल देणार? त्याने "या बाबतीत सरकार लक्ष घालीत नाही" म्हणून कानावर हात ठेविले.

स्वत: शाहूमहाराजांना व त्यांच्या हस्तक सत्यशोधकी अधिकाऱ्यांना वर्णव्यवस्था मान्य नव्हती हे प्रसिद्ध आहे. पण सर्व जाती मोडून एकजात करावी असे तोंडाने म्हटले आणि इष्ट आहे असे प्रतिपादिले, तरी ते शक्य आहे की नाही हा प्रश्न उरतोच व आपले सर्व आयुष्य व राजसत्तेचे बळ खर्च करून जातिभेद मोडण्याची सामाजिक सुधारणा करण्याचा 'प्रयोग' छत्रपतींनी हौसेखातर करून पाहिला; पण त्याने विनाकारण जातीजातीतील तटे मात्र वाढले. हे करणे शहाणपणाचे नाही असे टिळकांचे म्हणणे होते. श्रीअंबाबाईचे देऊळ व त्याचे इनाम व उत्पन्न या सार्वजनिक स्वरूपाच्या गोष्टी आहेत. अशा वेळी परंपरा व वहिवाट हीच मुख्यत: रक्षण करणे हेच राजा या नात्याने करवीर सरकारचे काम होते असा टिळकांनी दोष दिला.

ता. २२ ऑक्टोबर १९०१ च्या केसरीत टिळकांनी या विषयावर अग्रलेख लिहिला. त्यात त्यांनी लिहिले की, "जातिभेद हा

हिंदू लोकांच्या अंगी अगदी खिळलेला आहे. हिंदू लोकांची जातिधर्मावरील आसक्ती इतकी दृढ आहे की, जातिभेदाचे संस्कार जळलेल्या दोरीत तिचा पीळ राहतो तद्वत् कायम राहतात व हिंदुस्थानातील जातींचा सत्रगोलंकार करणे हे इष्ट असले तरी शेकडो वर्षे पर्यंत ते शक्य नाही हे कबूल केले पाहिजे. शिवाजी महाराजांच्या काळीच या प्रश्नाचा एकवार निकाल झाला आहे. शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकप्रसंगी तर सगळ्या महाराष्ट्राचे त्यांचे वद्दल निरतिशय प्रेम व आदर असल्यामुळे या प्रश्नाचा निकाल झाला व जो शिवाजीने मान्य केला तो काकणभर मराठ्यांच्याच बाजूचा झाला असेल हे आम्ही सांगितले पाहिजे असे नाही. शिवाजीमहाराजांच्या वेळच्या मराठे लोकांच्या आजच्या वंशजांनी अशी काय थोर कृत्ये अगर पुरावा मिळविला आहे की त्यापेक्षा अधिक अधिकार हल्लीच्या लोकास देण्यास महाराष्ट्रीयांनी तयार व्हावे? सध्याच्या परतंत्र राज्यात एवढेच करावयाचे राहिले अशी त्यांची समजूत असल्यास गोष्ट निराळी! शिवाजीच्या वेळचा निर्णय आजच्या मराठ्यांनी का मान्य करू नये? सातारचे घराणे हेही शिवाजीमहाराजांचे वंशज. पण तेथे भोसले घराण्यात जी परंपरा लावून दिली व साताऱ्यास व कोल्हापुरास आजपर्यंत चालत आली ती अप्रमाण काय म्हणून मानावयाची? शिवाजी महाराजास राज्याभिषेक वेदोक्त मंत्राने झाला व तदंगभूत व्रतबंध तसाच करण्यात आला. पण त्यांच्या घरचे सर्व संस्कार "वेदोक्त" होत असत असा ऐतिहासिक पुरावा अद्याप कोठेही नाही. सातारच्या घराण्यात जी परंपरा आहे तीवरून पाहता भोसले कुळातील गृह्यसंस्कार पुराणोक्तच होत असत असे दिसून येते. असे जर आहे तर श्रीशिवाजीमहाराजांपेक्षा ज्यांची जातकुळी श्रेष्ठ नाही त्यांनी

वेदोक्ताचे खूळ माजवून राज्यातील लोकांच्या शांततेचा विनाकारण भंग करावा हे गैरशिस्त होय."

"वेदोक्त मंत्र संस्काराचे वेळी म्हटल्याने कोणत्याही जातीस अधिक श्रेष्ठपणा येतो किंवा संस्कार अधिक शास्त्रोक्त होतो अशी जर कोणाची समजूत असेल तर ती अगदी चुकीची आहे. कारण ब्राह्मण जातीत देखील स्त्रियांचे संस्कार व्रते, पूजा वगैरे पुराणोक्तच होतात. पण तेवढ्याकरिता ब्राह्मणांच्या सर्व स्त्रिया शूद्र जातीच्या आहेत असे कोणी समजत नाही. सोळासंस्कारात ज्या निरनिराळ्या क्रिया आहेत त्या चालविताना वेदोक्त मंत्र म्हणण्याची आवश्यकताच आहे असे नाही, व ब्राह्मण जातीतील संस्कार करते वेळी जे वेदोक्त मंत्र म्हणतात त्यांचाही विनियोग अर्थावरून न करता पुष्कळ वेळा शब्दसादृश्यावरूनच केलेला असतो. अशा विनियोगास लैंगिक विनियोग असे म्हणतात. व वैदिक मंत्रांचे अशा तऱ्हेचे विनियोग केल्यामुळे आज हजारो वर्षे वेदांचे रक्षण झाले, असा आमच्याकडील व पश्चिमेकडील विद्वानांचा सिद्धांत झाला आहे. गर्भाधानापासून अंत्येष्टीपर्यंत शास्त्ररीत्या संस्कार होणे हे जितके अवश्य तितकेच ते वैदिक मंत्राने झाले पाहिजेत हे अवश्य नाही, आणि वैदिक मंत्रानी संस्कार झाले म्हणजे मराठे व ब्राह्मण एक जातीचे होतील अशी जर कोणाची कल्पना असेल तर तीही निर्मूल आहे. ब्राह्मण जातीतील स्त्रियास वेदोक्त मंत्र म्हणण्याचा अधिकार नसताही त्या जातीने ब्राह्मण आहेत आणि मराठे लोकानी वेदोक्त मंत्र म्हटले तरी ते मराठेच राहतील हे लक्षात ठेवले पाहिजे. दुसरी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, मराठे लोकास आपण खरे क्षत्रिय असे जर वाटत

असेल तर आपले क्षात्रतेज व्यक्त करण्यास वेदोक्त मंत्राने श्राव करणे हा काही खरा मार्ग नव्हे. ज्या लोकांच्या पूर्वजांनी गे शतकात मुसलमानी राज्याची लाट मागे हटवून हिंदुध पुनरुज्जीवन केले ते जातीने अस्सल क्षत्रिय असोत वा नसोत त्यां योग्यता स्नानसंध्या करून धर्म राखणाऱ्या ब्राह्मणांपेक्षा कोणत्या रीतीने कमी आहे असे आम्ही मानीत नाही. हे मत आज आ नव्याने सांगतो असे नाही. विश्वगुणादर्शात कृशानूने महाराष्ट्रां ब्राह्मणास "उपनयनविवाहौ उत्सवैकप्रधानौ" म्हणजे लग्नमुंजी 'उत्सव' म्हणून करतात. शास्त्रोक्त म्हणून करीत नाहं असा दोष दिला असता "चमूनियमनेन वा जनपदाधिकारेण द्विजव्रज उपव्रजन् प्रभुपदं महाराष्ट्रजः ।। न वृत्तिमिह पालये धरासुराणां ततो । भवेद्यवनवेष्टितं भुवनमेतदब्राह्मणम् ।।" अ विश्वावसूने त्याचा परिहार केला आहे आणि हाच न्याय म लोकांसही पूर्णपणे लागू आहे. त्यांच्या घरच्या क्रिया वेदो झाल्याने त्याना विशेष महती प्राप्त होईल असे मानणे अ चुकीचे आहे. "क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः । क्षत्रस्य शब्दो भु रूढः ।" अशी क्षत्रिय शब्दाची कालिदासाने व्याख्या केली परंतु हल्लीचा काल असा आला आहे की, क्षत्रियाने देखील क्ष मलमपट्टी लावूनच आपले कर्तव्य उरकले पाहिजे. अशा स्थि आपले संस्कार वेदोक्त करण्यास झटण्यापेक्षा खऱ्या क्षात्रध उचित वर्तन ठेवणे हे खऱ्या क्षत्रियाचे किंबहुना ब्राह्मणां कर्तव्य आहे हे आम्ही सांगावयास नको. देशाला अनेक प्रका जी अनेक क्षते पडली आहेत ती भरून काढण्याची महाराष्ट्री मराठे व ब्राह्मण यांनी ईर्षा वाळगली पाहिजे. काही मराठे मंड हट्टाने जरी वेदोक्त क्रिया केली तरी सामाजिक किंवा राष्ट्रीयदृ

त्यापासून त्यास काही फायदा नाही. कारण हल्ली कित्येक युरोपिअन लोक जर वेदपठण करतात तर त्या प्रमाणेच वेदोक्त कर्म करणाऱ्या मराठ्यांची स्थिती होईल. यात काही भूषण नाही, बहुमान नाही आणि देशकार्यही नाही. महाराष्ट्रात मराठे लोकास, जो मान आहे तो त्यांच्या वाडवडिलांच्या शौर्यामुळे त्यास प्राप्त झालेला आहे व तशा प्रकारचे शौर्य, धाडस व देशाभिमान हे गुण जोपर्यंत त्यांच्यामध्यें जागृत राहतील तोपर्यंत त्यांचा मान कधीही कमी व्हावयाचा नाही. वेदोक्त कर्में करणारे ब्राह्मण पाणी भरतात आणि पुराणोक्त कर्म करणारे मराठे राजपदाचा अनुभव घेतात हे जर आम्ही डोळ्याने पाहात आहोत तर वेदोक्त मंत्रानीच आपले संस्कार झाले पाहिजेत असा मराठ्यांनी आग्रह धरणे चुकीचे नव्हे काय ? संस्काराच्या वेळी वैदिक मंत्र म्हणणे हे आज हजारो वर्षे चालत आलेल्या वहिवाटीने एका विशिष्ट जातीतील पुरुषाचे (स्त्रियांचे नव्हे) ' लक्षण ' झाले आहे. परंतु जाती जातीस जो काही मान आहे तो या लक्षणावर नसून त्या त्या ज्ञातीत कार्यकर्ते पुरुष ज्या प्रमाणावर निपजतात त्या प्रमाणावर आहे ही गोष्ट इतिहासावरून सिद्ध होत आहे. असे असता केवळ अज्ञानाने किंवा मत्सराने एका जातीने दुसऱ्या जातीच्या विशिष्ट लक्षणाचा अंगीकार करण्याचा प्रयत्न करावा व त्यास शाहाण्या माणसांनी उत्तेजन द्यावे हे बरोबर नाही.

हल्लीचा काळ व्यक्तिस्वातंत्र्याचा आहे. युरोपियन लोकही वेद वाचतात तर आम्हालाही वेदोक्ताचा अधिकार का नसावा हे म्हणणे सयुक्तिक दिसते. पण हल्लीचा प्रश्न वेदपठणाचा नाही. वेदोक्त संस्कार करण्याचा आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. कोणीही युरोपियनाचे ब्राह्मणांनी वेदोक्त संस्कार केलेले नाहीत व व्यक्ति-

स्वातंत्र्याचेच मत घेतले तर कोणाही ब्राह्मणास मराठ्याचे वेदोक्त संस्कार करावयास लावणे व तो न करील तर त्याचे इनाम जहागीर जप्त हा अन्यायच नव्हे तर जुलूम होईल. पूर्वीच्या धार्मिक वहिवाटीत कोणीही विनाकारण वळजवरी करून विघाड करू नये. महाराष्ट्रात इंग्रज सरकारचे राज्य झाल्यावर गावोगाव देशपांडेपणाची अगर जोशीपणाची वतने होती ती सरकारास जरूर नसताही त्यांच्याकडे चालविण्यात आली. धर्म संबंधी देणग्यांच्या वतनास हाही न्याय लागू आहे. मराठे संस्थानिकास पुराणोक्त कर्मे करणारे ब्राह्मण उपाध्ये नको असतील तर त्यांनी बोलावू नये. पण तेवढ्याकरिता सदर उपाध्ये जोपर्यंत ती वहिवाटी प्रमाणे करण्यास तयार आहेत तोपर्यंत त्यांचे वेतन बंद करिता यावयाचे नाही."

श्रीमंत राजोपाध्ये यांनी वेदोक्त संस्कार करण्याचे नाकारल्याने त्यांची इनाम गावे करवीर सरकारने जप्त केली. त्यावर राजोपाध्ये यानी मुंवई सरकारकडे अपील केले. पण सरकारने आम्ही या कामी हात घालू इच्छीत नाही असे उत्तर दिले. टिळकांनी लिहिले की "पूर्वजांनी दिलेली दाने परत घेण्याची दुर्बुद्धी संस्थानिकांना व्हावी हे दुर्दैव होय. महाराजांच्या घरी दुसरा कोणीही वेदोक्त कर्मे करू शकेल व ती त्यांनी खुशाल करवावी. पण त्याकरिता दान दिलेले गाव जप्त करण्याचे कारण नाही. दाने जप्त करता येऊ लागली तर संस्थानिकांची राज्येही इंग्रज सरकारला जप्त करण्याला काय हरकत? मुंवई सरकारचे काय गेले? ज्या कृत्यात हात घालणार नाही म्हणतात तेच वेकायदेशीर म्हणून उद्या वाटेल तेव्हा याचा आधार घेऊन सरकार संस्थानिकांच्या पंक्तीस वसेल! करवीर सरकारने इनामदारांचे हक्क बुडविले ही गोष्ट सरकारला उपयोगी

पडली तेव्हा ती त्यांनी महाराजांविरुद्ध काढलीच की नाही ? "

वेदोक्तासंबंधाने केसरीत लेख आले त्याने कित्येक मराठी संस्थानातून खळवळ झाली: प्रतिकूल टीका करणारी काही पत्रेही टिळकांकडे आली. त्यांना उत्तर देताना टिळकांनी पुढे लिहिले की, "प्रत्येक ज्ञातीने हिंदूधर्मशास्त्रत: आधार सापडतील त्या सर्वांवरहुकूम स्वत:ला अधिकार मागावे व घ्यावे. कोणत्या जातीला किती धार्मिक हक्क असावेत हा प्रश्न वेदोक्ताच्या वादात नाही. तर एखाद्या विशिष्ट जातीचा राजा असता त्याने आपल्या ज्ञातभाईच्या अभिमानाला वळी पडून पूर्वापार चालत आलेल्या धार्मिक किंवा सामाजिक पद्धतीत किती हात घालावा एवढाच प्रश्न आहे. शिवाजीमहाराजांच्या वेळी झालेला निर्णय आजच्या राजांनी का मान्य करू नये ? याचे उत्तर कोणी देत नाही. कोणाला वेदोक्त संस्कार करावयाचा असेल तो त्याने खुशाल करावा. पण त्याकरिता खाजगी इनामे जप्त करू नयेत. किंवा देवस्थानच्या वहिवाटीत हात घालू नये. राजाच्या ताब्यात अनेक जातीची प्रजा असते. त्या सर्वांशी राजाने ममतेने वागले पाहिजे. ब्रिटीश अमलात पुनर्विवाहाचा कायदा झाला, त्याचा उद्देश व्यक्तिमात्रापुरते स्वातंत्र्य देण्याचा होता. पण पुनर्विवाहित स्त्रियांना समाजाच्या इच्छेविरूद्ध सार्वजनिक देवळात किंवा उत्सवात घेण्याची सक्ती या कायद्याने किंवा सरकारने केलेली नाही. एखाद्या ज्ञातीला आपला धार्मिक व्यवहार बदलावयाचा झाल्यास तिने तो ज्ञातीच्या संमतीने खुशाल बदलावा. पण त्याकरिता दुसऱ्या ज्ञातीवर जुलूम करू नये किंवा शेकडो वर्षे चालत आलेल्या धार्मिक संस्थात केवळ राज्याधिकाराच्या जोरावर ढवळाढवळ करू नये. "

कोल्हापूरकर छत्रपतींनी श्रीमंत राजोपाध्ये यांचे पंचवीस तीस

हजारांचे इनामी उत्पन्न बुडविले. पण तेही असे खंबीर निघाले
उत्पन्न गेले तरी चिंता नाही; पण परंपरा सोडून मी काही कर
नाही. अशा निश्चयाने ते निर्वाणपदावर बसले. इकडे सरकार
व विलायतेत या जुलमाविरुद्ध अपील अर्ज झाले; पण त्याचा क
उपयोग झाला नाही. पुढे १९०५ च्या सुमारास हे प्रक
संकेश्वरच्या शंकराचार्यांकडे गेले तेव्हा स्वामींनी असा नि
दिला की, पूर्वीचे दाखले पाहता फक्त छत्रपतींच्या घरी वेदो
कर्मे करण्यास धर्मदृष्टया अडचण नाही. या निकालाला टिळकांन
आपली संमती दर्शविली. पण जगद्गुरूंनी मन मोठे करून वाद
निर्णय केला तसाच राजोपाध्ये यांची इनामे पूर्ववत् चालवून कर
छत्रपतींनीही करावा असे टिळकांनी सुचविले.

वेदोक्त प्रकरणामध्ये वादाच्या पद्धतीने वाद होण्यापेक्षा वखे
जास्त झाला व टिळकांनी म्हटल्याप्रमाणे छत्रपतींनी तटस्थ
स्वीकारून सत्तेचा उपयोग दांडगाईने केला नसता; तर वाद
इतके विकृत स्वरूप आले नसते. निदान वादाचा सर्व जरी नाही
तरी थोडाबहुत तरी निकाल उभयपक्षाच्या दाक्षिण्यबुद्धीने ला
असता. स्वत: छत्रपतीसरकारना क्षत्रिय म्हणावे की नाही हा प्र
नव्हता. ते कोणालाही मान्य होते व संकेश्वरच्या शंकराचार्य
दिलेला निकाल बरोबर होता असे टिळकांनीही पूर्वी म्हटलेच हो
त्याचप्रमाणे "सर्व मराठे हे क्षत्रिय आहेत की नाहीत" इत
पुरता मुद्दा असता तरीही ब्राह्मण वर्गाकडून मान्य होण्या
अडचण पडली नसती. कारण हिंदुधर्मपरिषदा भरविण्याला
व्यवस्थित स्वरूप आल्यानंतर अलीकडे नागपूरला भरले
परिषदेने तसा ठराव आपण होऊन पास केलाच की नाही? वाद
विकृत स्वरूप न येते तर हा निर्णय त्यावेळी का न मिळ

हिंदू समाजामध्ये फक्त ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ण आहेत असा आग्रह कोणी का धरतील ? निदान चार वर्ण आजही शिल्लक आहेत हे ब्राह्मणांनी मान्य करण्यात चातुर्वर्ण्याची काहीच हानी नव्हती. पण हिंदू वर्णव्यवस्थेत असलेली जातिभेदाची पद्धतीच महाराजांना नको होती ! व त्यांनी असे वेळोवेळी जाहीर रीतीने प्रतिपादलेही होते. चातुर्वर्ण्य मानणाऱ्या मराठ्यांना तरी महाराजांची ही गोष्ट कोठे मान्य होती व आहे ? व ही गोष्ट इष्ट असली तरी हजारो वर्षे रूढीने चालत आलेली असल्याने ती एकदम मोडणे शक्य नाही इतकेच टिळक म्हणत. "राजकीय बाबतीत जशी आम्ही कॉन्स्टिटयूशनल अथवा सनदशीर चळवळ करतो तशीच सामाजिक अगर धार्मिक बाबतीत शास्त्रोक्त चळवळ केली पाहिजे. संस्था किंवा शास्त्र याविरुद्ध एकदम बंड केल्यापासून काही फायदा नाही. लूथरने युरोपात धर्मक्रांती केली म्हणून आपल्या तर्फेचे मोठे मोठे उदाहरण सुधारक देत असतात. पण लूथर हा बायबलवर विश्वास ठेवणारा श्रद्धावान् ख्रिस्ती होता. आमच्या सुधारकांची तशी स्थिती नाही." भागवत धर्मातील चातुर्वर्ण्य मान्य असणारांनी वेदोक्ताचा अधिकार मागावा यात अर्थ आहे. पण वेदोक्ताचे निमित्त करून सवगोलंकार करू इच्छिणाऱ्यांचे हातून बखेड्याशिवाय दुसरे काहीच होऊ नये हे सरळच झाले. छत्रपती सरकारने स्थापलेल्या सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष भास्करराव जाधव यांनी तर चिरोल कमिशनपुढे साक्षीत सांगितले असे की, वेदोक्तामध्ये मला काही विशेष अर्थ दिसत नाही. केवळ ब्राह्मण विरुद्ध जातात म्हणून हक्क आम्ही मागतो. हिंदूनाच काय पण परधर्मीय मुसलमान ख्रिस्ती यांनाही हा अधिकार असावा असे माझे मत आहे !" यावर टिळकांचे वकील करंदीकर यांनी त्यांना प्रश्न विचारला

"मग तुमच्या मागणीप्रमाणे मुसलमान व ख्रिस्ती यांना ब्राह्मणांकडे वेदोक्ताचा अधिकार मागण्याची आवश्यकता वा असेल ? " जाधवांनी उत्तर दिले " त्यांच्याकडून तशी माग अद्याप आली नाही ! "

असो. सरतेशेवटी इतकेच सांगावयाचे की, कोल्हापुरा अधिकाऱ्यांच्या वर्तनामुळे या वादाचा सौजन्याने व पद्धत रीतीने त्या वेळी निकाल न झाला तरी " स्वत: टिळ व्यक्तिविषयक रीतीने कोल्हापुर सरकारविरूद्ध या वादात का लिहिले नाही. " अशी कबुली चिरोल साहेबांच्या पुस्त भाषांतरकार डोंगरे यांनीच चिरोल कमिशनपुढे दिली आहे.

या प्रकारानंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्री. सखारामशा टिल्लू यांनाही श्रीक्षेत्र गरुडेश्वर सोडून घरी जाण्यास सांगि श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्रीसखारामशास्त्री दिवसांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर सोडून घरी गेले. त्यामुळे श्रीस्वा महाराजांच्या अंतकाळी ते त्यांच्या जवळ नव्हते. श्रीसखारामशा टिल्लूंच्याप्रमाणे श्रीगांडामहाराज व श्रीसीतारामहारा श्रीस्वामीमहाराजांच्या समाधिकाळी त्यांच्या जवळ न याचे खरे कारण असे होते की, श्रीस्वामीमहाराजांच्या का अशी हकीकत आली की, " श्रीक्षेत्र चिखलदा इत्यादि ठि आपला मुक्काम असताना तेथे यज्ञ-स्वाकारादि बरेच स श्रीसीतारामहाराज व श्रीगांडामहाराज यांनी पुढाकार घेऊन व ते तडीस नेले. त्यामुळे त्यांना असा आभिमान झाला की, हे सर्व समारंभ आपल्या मुळेच साजरे होतात. एरवी अशा प्र समारंभ होणे शक्य नव्हते. " त्यामुळेच श्रीगांडामहाराज व सीतारामहाराज यांना श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र चिखलद

निघून जाण्यास सांगितले होते. त्यानंतर श्रीगांडामहाराज भडोचला जाऊन राहिले होते. पुढे श्रीस्वामीमहाराज चिखलद्याहून श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आले व हे क्षेत्र भडोचहून जवळ असल्यामुळे श्रीगांडामहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी तेथे आले होते; परंतु उपरोक्त कारणामुळे त्यांनी त्यांना रागावून श्रीक्षेत्र गरुडेश्वराहून निघून जाण्यास सांगितले. त्याचप्रमाणे श्रीसीताराम-महाराज यांना तर श्रीस्वामीमहाराजांनी पत्र लिहून असे कळविले होते की, "आपले वास्तव्य श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे असे पर्यंत येथे येण्याचे करू नये." त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या समाधिकाळी हे दोघेही त्यांच्याजवळ नव्हते.

ही सर्व हकीकत वाचली म्हणजे श्रीसंत नामदेवमहाराज यांनी संतसंगतीत कसे राहावे हे सांगून त्यांच्या चरणी जी प्रार्थना केली आहे ती पाहण्यासारखी आहे. ते असे म्हणतात की—

**वासनेविरहित होवोनि एकवट । असावें निकट संतसंगें ॥१॥**
**हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । करावें दास्यत्व हरिभक्तांचें ॥२॥**
**नामा म्हणे केशवा तरीच शरणांगत । नाहीं तरीं पतित म्हणा मातें ।३।**



**आकल्प आयुष्य व्हावें तया कुळां । माझिया सकळां हरिच्या दासा॥१॥**
**कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हे संत मंडळी सुखी असो ॥२॥**
**अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकांसी ॥**
**नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखी निधान पांडुरंग ॥४॥**

श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे सुरू झाल्याचे कळल्यावर अनेक लोक चांदोदहून तिलकवाड्यापर्यंत नावेने येऊ लागले. अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे लोकांची

...९

गर्दी वाढू लागली असताना त्या काळात पाऊसही अपार झाल्यामुळे श्रीनर्मदानदीचे पाणीही खूपच चढले. श्रीस्वामीमहाराज आपल्या किनाऱ्यावर चातुर्मास करणार याचा आनंद श्रीनर्मदामातेला झाला असावा. या आनंदाच्या भरात आपण श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलाला स्पर्श करून पुनित व्हावे असे तिला वाटल्यामुळे पाणी अधिकाधिक वर येऊ लागले. या वाढत्या पाण्यामुळे श्री गरुडेश्वरी आलेले सर्वच लोक अत्यंत चिताग्रस्त झाले; कारण पाण्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीला धोका निर्माण होण्याची शक्यता होती व त्याचप्रमाणे नावेतून येणाऱ्या भक्त मंडळींनाही नावेचा प्रवास अत्यंत असुरक्षित वाटू लागला.

श्रीनर्मदानदीचे पाणी उतरेल असे वाटल्यामुळे एक दोन दिवस भक्तलोक वाट पाहून थकल्यानंतर ते सर्वजण श्रीस्वामीमहाराजांकडे आले व त्यांनी त्यांच्या चरणी अशी प्रार्थना केली की, "प्रभो! श्रीनर्मदामातेचे पाणी दिवसेंदिवस वाढतच चालले आहे. तिचा काय विचार आहे हे आम्हा सारख्या अज्ञजनांच्या काहीच लक्षात येत नाही. आपल्यालाच तिच्या अंतर्हेतूची माहिती असणार! जर आपण तिची समजूत घातली तर हे सर्व संकट टळेल. तरी आपण तिला यापुढे अधिक वाढू नये म्हणून सांगावे अशी आम्हा सर्व लोकांची आपल्या चरणी प्रार्थना आहे."

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आलेल्या सर्व भक्त मंडळींनी केलेली प्रार्थना ऐकून श्रीस्वामीमहाराज आपला दंड घेऊन श्रीनर्मदेवर गेले व तिची प्रार्थना करताना असे म्हणाले की, "हे माते! आता आला तेवढा पूर पुरे झाला. तू याहून अधिक वरती आलीस तर तुझ्या सर्व भक्तांनाच त्रास होईल. तरी आता तू मागे जावेस अशी माझी तुझ्या चरणी प्रार्थना आहे." अशी प्रार्थना करून

श्रीस्वामीमहाराजांनी आपला दंड श्रीनर्मदाजलाला लावला. तो दंडस्पर्श झाल्याबरोबर श्रीनर्मदानदीचे पाणी ओसरू लागले.

श्रीस्वामीमहाराजांची ही कथा वाचली म्हणजे श्रीसंत नामदेवमहाराजांच्या पुढील अभंगांचे स्मरण होऊन त्यांच्याअपरंपार महिम्याने मन स्तिमित झाल्याशिवाय राहात नाही. या दृष्टीनेच श्रीसंत नामदेवमहाराज असे म्हणतात की–

**संतांचा महिमा कोण जाणे सीमा। सीणला हा ब्रह्मा बोलवेना ।।१।।**
**संतांची हे कळा पाहतां न कळे। खेळोनियां खेळ वेगळाची ।। २ ।।**
**संतांचिया पारा नेणें अवतारा। म्हणती याच्या पारा कोण जाणे।**
**नामा म्हणे धन्य धन्य भेट झाली। कल्पना निमाली संतांपायीं ।।४।।**



**जयाचेनि तीर्था आलें तीर्थपण। केली साठवण हृदयीं ती ।।१।।**
**नवल महिमा हरिदासां जीवीं। तीर्थें उपजवी त्यांचे कुसीं ।।२।।**
**वाराणसी प्राणी मरे अंतीं कोणी। तया चक्रपाणी नामें तारी ।।३।।**
**नामा म्हणे तीर्थें तया येती भेटी। वोळंगती दृष्टी त्रिभुवना ।।४।।**



श्री. धोंडोपंत कोपरकर हे श्रावण महिन्यात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे पुन्हा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला यावयास निघाले. ज्यावेळी ते निघाले त्यावेळी श्रीनर्मदानदीला फारच मोठा पूर आला होता. तशातच ज्या नावेने श्री. धोंडोपंत यावयास निघाले होते त्या नावेतच चांदोदपासून तिलकवाड्यास येण्याकरिता चाळीस-पन्नास मंडळी नावेत चढली. श्रीनर्मदानदीच्या पाण्याला असलेला जोर व नावेत झालेली गर्दी यामुळे नाव पाण्याच्या प्रवाहाविरुद्ध वर चढेना. उलट ती प्रवाहाबरोबर खालीखालीच जाऊ लागली.

त्यातच वरून पाऊस सतत कोसळत होता. त्यामुळे नावेतील सर्व मंडळी भिजून थंडीने कुडकुडू लागली. अशा स्थितीत नाव पुढे चढेना म्हणून नावाड्यांनी ती किनाऱ्याला लावण्याचा प्रयत्न केला; पण त्यांच्या प्रयत्नाला यश आले नाही व काही केल्या नाव किनाऱ्याला लागली नाही. शेवटी तर नाव उलथून बुडण्याची भीती निर्माण झाली.

या सर्व प्रकारामुळे नावेतील सर्व लोक अत्यंत घाबरून गेले. त्यामुळे या भीषण संकटाच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांचा धावा करणे हा एकमात्र उपाय आहे याची श्री. धोंडोपंतांना मनोमन जाणीव होऊन त्यांनी श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना करावयास सुरुवात केली. ते प्रार्थना करताना असे म्हणाले की, " प्रभो ! या नावेतील सर्व भक्त मंडळी आपल्या चरण दर्शनासाठी येत आहेत. आपण आपल्या अमोघ अशा कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम सामर्थ्याने व कृपाशीर्वादबलाने आम्हा सर्वांना आपल्या चरणकमलापाशी सुखरूप घेऊन चला. या स्थितीत आम्हा सर्व लोकांचे काही बरे वाईट झाले तर आपल्या शरणागतरक्षक या बिरुदावलीला कलंक लागेल. तरी आमच्या सर्व अपराधांची क्षमा करून आपण आमच्यावर कृपा करा." अशी प्रार्थना करून श्री. धोंडोपंत कोपरकर यांनी " परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज की जय." अशी धून सर्वांना सांगून श्रीस्वामीमहाराजांच्या नावाचा जयजयकार केला.

अशा प्रकारे प्रार्थना केल्यावर नावेतील सर्व लोकांनी " दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा, " हे भजन करावयास सुरुवात केली. त्या वेळी नावाडी नाव किनाऱ्याला लावण्याचा प्रयत्न करीत असताना त्यांच्या असे लक्षात आले की, नाव आपोआपच फार

परिश्रमाशिवाय सरळ वर जाऊ लागली आहे. हे पाहताच नावाड्यांनी नाव किनाऱ्याला लावण्याचा प्रयत्न सोडून दिला व ती सरळ चालविण्यास सुरुवात केली. त्यामुळे ती नाव लवकरच श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे येऊन पोहोचली.

श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आल्यावर नावेतील सर्व मंडळींनी व श्री. धोंडोपंत कोपरकर यांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातले. त्यांना पाहताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "नाव बुडते आहे असे समजल्यावरोवर देवाची प्रार्थना केली होती का ?" हा प्रश्न ऐकताच श्री. धोंडोपंत कोपरकर श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "नाव प्रवाहावरोवर वाहात खाली जाऊ लागताच आपली प्रार्थना करून आपल्या नावाचा जयघोष केल्यामुळे आजचा अपघात टळला." श्री. धोंडोपंत कोपरकर यांचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराज एकदम प्रसन्नपणे हसले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांसारखे संतस्वरूप देव भाविकांनी आर्तपणे प्रार्थना केल्यावर कसे पावतात हे सांगताना श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज "एकवीस समासी" या प्रकरण ग्रंथात असे म्हणतात की—

भगवंत भावाचा भुकेला । भावार्थ देखोनि भुलला ।
संकटीं पावे भाविकाला । रक्षीतसे ॥६.१०॥
जयांसी भगवंत आवडे । तयांचें देवास सांकडे ।
संसारदु:ख सकळ उडे । निजदासांचें ॥११॥
जें अंकित ईश्वराचे । तयांस सोहळे निजसुखाचे ।
धन्य तेचि दैवाचे । भाविक जन ॥१२॥
जैसा भाव जयापाशी । तैसा देव तयासी ।
जाणे भाव अंतरीचा । प्राणिमात्राचे ॥१३॥

जरी भाव असला मायिक । तरी देव होय महा ठक।
नवल तयाचें कौतुक । जैशासि तैसा ।।१४।।
जैसें जयाचें भजन । तैसेंचि दे समाधान ।
भाव होता किंचित न्यून । आपणही दुरावे ।।१५।।
दर्पणीं प्रतिबिंब दिसे । जैशासि तैसें भासे ।
तयाचें सूत्र असे । आपणापासी ।।१६।।
जैसें आपण करावें । तैसेंचि तेणें व्हावें ।
जरी डोळे भरूनि पाहावें । तरी तेंही टवकारे ।।१७।।
भ्रुकुटीसी घालुनियां गांठी । पाहतां क्रोधें तेंही उठी।
आपण हास्य करतां पोटीं । तेंही आनंदे ।।१८।।
जैसा भाव प्रतिबिंबला । तैसाचि देवही जाहला।
जो जैसा भजे तयाला । तैसाचि वोळे ।।१९।।
भावें परमार्थाचिया वाटा । वाहती भक्तीचिया पेठा।
भरला मोक्षाचा चोहटा । सज्जनसंगें ।।२०।।
भावें भजनीं जे लागले । ते ईश्वरीं पावन जाहले।
भावार्थबळें उद्धरिले । पूर्वज तेही ।।२१।।
आपण स्वयें तरले । जनांसीहि उपेगा आले ।
कीर्तिश्रवणें जाहलें । अभक्त भावार्थी ।।२२।।
धन्य तयांची जननी । जे लागले हरिभजनीं ।
तिहींच एक जन्म जनीं । सार्थक केला ।।२३।।
तयांची वर्णू काय थोरी । जयांचा भगवंत कैवारी।
कांसे लावूनि उतरी । पार दुःखाचे ।।२४।।
बहुता जन्मांचे शेवटीं । जेणे चुके आटाआटी ।
तो हा नरदेह भेटी । करी भगवंतीं ।।२५।।
म्हणोनि धन्य ते भाविक जन । जिही जोडिलें हरि-

अनंत जन्मांतरींचें पुण्य । फळासि आलें ॥२६॥
आयुष्य हें रत्नपेटी । माजीं भजनरत्नें गोमटीं ।
ईश्वरीं अर्पूनियां लुटी । आनंदाची करावी ॥ २७ ॥
हरिभक्त वैभवें कनिष्ठ । परी ते ब्रह्मादिकां वरिष्ठ ।
सदा सर्वदा संतुष्ट । नैराश्यबोधें ॥ २८ ॥
धरूनि ईश्वराची कास । केले ससांराचें नैराश्य ।
तया भाविका जगदीश । सबाह्य सांभाळी ॥ २९ ॥

श्रीक्षेत्र गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी सर्व धर्मांचे आणि सर्व वर्णांचे लोक येत असत. एकदा चर्मरोगाने पीडित झालेले काही मुसलमान लोक श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून आपल्या व्याधींवर येथे काही तरी औषध मिळेल म्हणून त्यांच्या दर्शनासाठी आले. श्रीस्वामीमहाराजांनी या लोकांना त्यांच्या रोगांवर औषध देऊन व तत्प्रीत्यर्थ कुरणातील काही मंत्रांचा जप करण्यास सांगून त्यांना वरे केले. यापूर्वी सुद्धा श्रीस्वामीमहाराजांनी काही मुसलमान भक्तांना कुरणातील मंत्र दिल्याचे सर्वांना माहीत आहेच.

श्रीस्वामीमहाराजांची कुराणादि धर्मग्रंथांतील मंत्रांच्याही ज्ञानाची ही अलौकिक उपस्थिती पाहिली म्हणजे " सूतसंहिता " व " योगशिखोपनिषद " यातील पुढील वचनांचे स्मरण होऊन श्रीस्वामीमहाराजांच्या आत्मस्वरूपाशी अभिन्न असलेली अनादि आत्मसत्तास्वरूप कुंडलिनीशक्ती अर्थात् सरस्वतीदेवीच त्यांच्या मुखातून संपूर्ण कृपाप्रसादयुक्त वाणीने बोलत असे हे लक्षात येऊन मन विस्मित झाल्याशिवाय राहात नाही. यासंबंधी शास्त्रकार असे म्हणतात की—

अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम् ॥
॥ सूत संहिता-ब्रह्मगीता-४.१२
य इमां वैखरीं शक्ति योगी स्वात्मनि पश्यति।
स वाक्सिद्धिमवाप्नोति सरस्वत्याः प्रसादतः ॥३.१
वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ॥ ११॥
(योगशिखोपनिष

याचा अर्थ असा आहे की, (सारस्वताचा स्रोत धडे शि कधीही उद्‌भूत होत नसतो. मात्र अनादि आत्मसत्तारूप स्वस्व भिन्न कुंडलिनीशक्ती ज्यावेळी प्रकाशित होते त्यावेळी) न शिक व न वाचलेली शास्त्रे स्वतःच प्रकट होतात. या शक्तिप्रकाशामु सरस्वती वेगवेगळ्या पदवाक्यादि रूपात प्रकट होते. जो योगी चित्‌शक्ती कुंडलिनीस्वरूप वैखरीशक्तीला तिच्या जागृत स्वतःत आत्मरूपाने म्हणजे तिच्या पररूपाने पाहतो म्ह सहस्रारात ती शिवाशी परारूपाने एकरूप आहे असे अनुभ त्याला या देवी सरस्वतीच्या कृपेने वाक्सिद्धी प्राप्त होते. शक्तीमुळेच महायोगी वेदशास्त्रपुराणांचा कर्ता होतो.

मुंबईच्या एका पारशी व्यापाऱ्यांचा मुलगा वाईट संगती बिघडून पैसे उधळू लागला. त्याच्या वडिलांनी त्याला खूप उप केला; पण तो ताळ्यावर येईना. सर्व प्रकारची दुर्व्यसने त्य लागल्यामुळे पुढे पुढे तो भ्रमिष्ट झाला व शेवटी सगळीकडे भ लागला. त्याला आपल्या देहाचीही शुद्धी राहिली नाही. त्या मुला आई-वडिलांनी मुलाला सुधारण्याचे पुष्कळ उपाय केले परंतु ते निष्फळ ठरले. अशा स्थितीत त्या पारशी गृहस्थांच्या काना श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आली. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपे

तरी आपल्या मुलाला बरे वाटून तो सुधारावा व मार्गी लागावा म्हणून ते पारशी गृहस्थ आपल्या मुलाला घेऊन श्रीक्षेत्र गरुडेश्वरी गेले.

श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर त्या पारशी गृहस्थांनी आपल्या मुलाची सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली. ती सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी एक यंत्र तयार करून त्या पारशी गृहस्थाकडे दिले व ते त्या मुलाच्या हातात बांधण्यास सांगितले.ते यंत्र त्या मुलाच्या हातात बांधल्यावर तो मुलगा हळूहळू सुधारला व सन्मार्गाला लागून पूर्ववत् आपला व्यापार करू लागला.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील मुक्कामात अनेक पारशी लोक श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले व त्यांनी आपले जीवन कृतार्थ केले. या काळातच वरील पारशी गृहस्थांप्रमाणे दुसरे एक पारशी गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. त्यांना पिशाच्च बाधा झाल्यामुळे अन्न वैरी झाले होते. त्यांना खूप भूक लागत असे; परंतु ते जेवावयास बसले की, ते पिशाच्च अन्नाचा घास त्यांच्या घशाखाली उतरू देत नसे. त्यामुळे त्या पारशी गृहस्थांनी आपल्या तोंडात घातलेला घास ओकून पडत असे. या सर्व प्रकारामुळे ते गृहस्थ भुकेने सतत व्याकूळ होत असत. अशा स्थितीत श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे एक हिंदू संन्यासी भूतबाधेवर इलाज करतात असे ऐकून ते पारशी गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. पहिल्या दिवशी गर्दीमुळे त्या पारशी गृहस्थांना आपली सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन करणे शक्य झाले नाही. मात्र त्या दिवशी प्रसादाचे सर्व जेवण ते निर्विघ्नपणे जेऊ शकले. नेहमीप्रमाणे घास घशात न अडकता आपण सुखेनैव जेऊ शकतो हे पाहून त्यांना परमानंद

...१०

झाला. त्या दिवशी त्यांची कित्येक दिवसांची भूक एकदम शां झाली. आता यापुढे श्रीस्वामीमहाराजांचे चरण सोडून घरी प जावयाचे नाही असा त्यांनी आनंदाच्या भरात निश्चय केला.

दुसऱ्या दिवशी ते पारशी गृहस्थ श्रीस्वामीमहाराजां दर्शनाला गेले असताना श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले " आपण का आलात ? आता दर्शन झाले ना ? आता येथे थांबलात ? आपल्या घरी परत जा. " श्रीस्वामीमहाराजांचे हे व त्यांची घरी परत जाण्याची आज्ञा ऐकताच ते पारशी गृह अत्यंत सद्गदीत अंतःकरणाने श्रीस्वामीमहाराजांना असे म्हण की, " प्रभो ! एक जिद मला सतत अत्यंत त्रास देत असतो. तो म अन्नाचा एक घासही खाऊ देत नाही. मी कित्येक दिवसांचा भुके आहे. यामुळे मी आपणास शरण आलो आहे. काल रोजी आप दर्शन घेऊन ज्यावेळी मी येथे प्रसाद घेण्यास वसलो त्यावेळी कित्येक दिवसांनी इतके पोटभर जेवू शकलो. यामुळे आता या आपण जेऊ शकू व जिवंत राहू अशी मला आशा उत्पन्न झा आहे. जर मी येथून परत गेलो तर उपासमारीने मृत्यूच्या दा सापडल्याशिवाय राहणार नाही. आपण मला देवासमान आहा आपल्याला सोडून जाऊन मी काय करू ? प्रभो ! आपण साक्षा परमेश्वरच आहात. आपण मला या दुःखातून मुक्त करा. कृ करून मला दूर लोटू नका. "

अशा प्रकारे प्रार्थना करून ते पारशी गृहस्थ श्रीस्वामीमहाराजां वारंवार नमस्कार करू लागले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्य पारशी गृहस्थांना असे म्हणाले की, " आपण काही परमेश्वर नाही या जगात परमेश्वर एकच आहे व तोच सर्वांवर कृपा करून त्यां रक्षण करीत असतो. याकरिता आपण त्या प्रभूचे चिंतन

नामस्मरण करीत जा. आता आपण आपल्या गावी परत जा. ”

श्रीस्वामीमहाराजांनी इतके सांगितले तरी ते पारशी गृहस्थ त्यांचे पाय सोडून आपल्या घरी जाण्यास तयार झाले नाहीत. “प्रभो ! आपण साक्षात् परमात्माच आहात ! आपणच आपल्या कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् शक्तीने माझी या दुर्धर संकटातून सुटका कराल अशी मला खात्री आहे. हे अघटित कार्य या भूतलावर आपणाशिवाय अन्य कोणीही करू शकणार नाही व तसे कोणाचे सामर्थ्यही नाही, याची मला पक्की खात्री आहे. तरी आपण माझ्यावर दया करा. ” अशी प्रार्थना ते सतत करीत राहिल्यामुळे त्यांचा निश्चय व भक्ती पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक यंत्र तयार करून दिले व ते दंडात बांधण्यास सांगितले. त्या पारशी गृहस्थांनी ते यंत्र दंडात बांधताच ते पिशाच्च बाधेतून कायमचे मुक्त झाले व आनंदाने घरी परत गेले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे जरी श्रीस्वामीमहाराजांनी पारशी गृहस्थांना देवाचे भजन–चिंतनादि करण्यास सांगून देवच सर्वांपेक्षा मोठा असल्याचे त्याच्या मनात बिंबविण्याचा प्रयत्न केला असला तरी त्या पारशी गृहस्थांच्या मनात “ म्हणोनि सद्गुरू पूर्णपण देवाहूनि अधिक कोटिगुणे ।। ” ही पक्की श्रद्धा बाणली होती. अशी श्रद्धा हीच शिष्याची व भक्ताची साधनसंपत्ती असल्याने श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज यांनी “ एकवीस समासी ” या प्रकरण ग्रंथात असे म्हटले आहे की–

जो संसारदुःखें दुखवला । जो त्रिविधतापें पोळला ।
तोचि अधिकारी जाहला । परमार्थासी ।। ५.३४ ।।
बहुत दुःख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे ।
संसारदुःखाचेनी गुणें । वैराग्य उपजे ।। ३५ ।।
जयासी संसाराचा त्रास । तयांसीच उपजे विश्वास ।

विश्वासबळें दृढ कास । धरिली सद्‌गुरूची ॥ ३६ ॥
अविश्वासें कास सोडिली । ऐशीं बहुतेकें भवीं बुडालीं।
नाना जलचरीं तोडिलीं । मध्येंचि सुखदुःखें ॥ ३७ ॥
या कारणें दृढ विश्वास । तो जाणावा सच्छिष्य ।
मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ॥ ३८ ॥
जो सद्‌गुरुवचनें निवाला । तो सायुज्यतेचा अंकिला।
संसारपांगें पांगिला । न वचे कदा ॥ ३९ ॥
सद्‌गुरूहूनि देव मोठा । जयासि वाटे तो शिष्य करंटा।
सुटला वैभवाचा फांटा । सामर्थ्यपिसें ॥ ४० ॥
सद्‌गुरुस्वरूप ते संत । देवांस मांडेल कल्पांत ।
तेथें कैंचें उरलें सामर्थ्य । हरिहरांचे ॥ ४१ ॥
म्हणोनि सद्‌गुरुसामर्थ्य अधिक । जेथें आटती ब्रह्मादिक।
अल्पबुद्धि मानव रंक । तयासी हें कळेना ॥ ४२ ॥
गुरुदेवांसी बरोबरी । करील तो शिष्य दुराचारी ।
भ्रांति बैसली अभ्यंतरी । सिद्धांत नेणवे ॥४३॥
देव मनुष्यीं भाविला । मंत्री देवपणासी आणिला ।
सद्‌गुरु न वचे कल्पिला । ईश्वराचेनी ॥४४॥
म्हणोनि सद्‌गुरु पूर्णपणें । देवाहूनि अधिक कोटिगुणें।
जयासी वर्णितां भांडणें । वेदशास्त्रां लागलीं ॥४५॥
असो सद्‌गुरुपदापुढें । दुजें कांहींच न चढे ।
देवसामर्थ्य तें केवढें । मायाजनित ॥४६॥
अहो सद्‌गुरुकृपा जयासी । सामर्थ्य न चलें तयापाशीं।
ज्ञानबळें वैभवासी । तृणतुल्य केलें ॥४७॥
सद्‌गुरुकृपेचेनि बळें । अपरोक्ष ज्ञानाचेनि उसाळें ।
मायेसहित ब्रह्मांड सगळें । दृष्टीस न ये ॥४८॥

ऐसें सच्छिष्याचें वैभव। सद्‌गुरुवचनीं दृढभाव।
तेणें गुणें देवराव। स्वयेंचि होय ॥४९॥
अंतरीं अनुतापें तापलें। तेणें अंतर शुद्ध जाहलें।
पुढें सद्‌गुरुवचनें निवाले। सच्छिष्य ऐसे ॥५०॥
लागतां सद्‌गुरुवचनपंथें। जाहलें ब्रह्मांड पालथें।
तरी ययाच्या शुद्ध भावार्थें। पालट न धरिजें ॥५१॥
शरण सद्‌गुरूसी गेले। सच्छिष्य ऐसे निवडले।
क्रिया पालटें जाहले। पावन ईश्वरीं ॥५२॥

भडोच येथील श्री. मणिभाई उमरेडकर यांचा श्री. गणपती या नावाचा एकुलता एक मुलगा भ्रमिष्ट झाला होता. त्याला श्री. मणिभाईंनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आणले. त्याने श्रीस्वामीमहाराजांकडे येऊन त्यांना साष्टांग नमस्कार घालताच श्रीस्वामीमहाराजांच्या अंतःकरणात अशी करुणा उत्पन्न झाली की, त्यांनी श्री. गणपतीकडे नुसत्या कृपा दृष्टीने पाहताच तो उत्तम वरा झाला.

श्रीस्वामीमहाराज श्री. विष्णुपंत सोमण यांच्याकडे भिक्षा घेत असत. सुरुवातीला ते एकच दक्षिणी ब्राह्मण येथें होते. त्यांचा मुलगा एकदा फार आजारी पडला. श्रीस्वामीमहाराजांना हे कळताच ते श्री. सोमण यांच्याकडे भिक्षेला गेले असता त्यांनी फक्त आपल्या कृपापूर्ण दृष्टीने त्याच्याकडे पाहताच तो रोगमुक्त झाला.

वरील दोन्ही गोष्टी वाचल्या म्हणजे श्री. गणपतीची व श्री. सोमण यांच्या मुलाची स्थिती श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केल्याप्रमाणे " संत भेटतां भवदुःख फिटलें॥ " या न्यायाने कल्याणप्रद झाली यात तिलःप्राय शंका नाही. संतांच्या भेटीने ऐहिक सुधारून परमार्थाची अर्थात् आत्मारामाची प्राप्ती होत

असते, हा महान् सिद्धान्त प्रस्थापित करीत असताना श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज आपल्या पुढील दोन अभंगांमध्ये असे म्हणतात की–

पूर्वजन्मीं सुकृतें थोर केलीं । तीं मज आजि फळासी आलीं ॥१॥
परमानंदु आजि मानसीं । भेटी जाली या संतांसी ॥२॥
मायबाप बंधु सखे सोयरे । यांते भेटावया मन न धरे ॥३॥
एक एका तीर्थाहूनि आगळें । तयामाजीं परब्रह्म सांवळें ॥४॥
निर्धनासी धनलाभु जाला । जैसा अचेतनीं प्राणु प्रगटला ॥५॥
वत्स विघडलियां धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मीनली ॥६॥
हें पियूषापरतें गोड वाटत । पंढरीरायाचे भक्त भेटत ॥७॥
बापरखुमादेविवर विठ्ठलें । संत भेटतां भवदुःख फिटले ॥८॥



आजी सोनियाचा दिनु । वर्षे अमृताचा घनु ॥१॥
हरि पाहिला रे हरि पाहिला रे । सबाह्याभ्यंतरी अवघा व्यापक मुरारी ॥धृ॥
दृढ विटे मन मुळीं । विराजीत वनमाळी ॥२॥
बरवा संतसमागमु । प्रगटला आत्मारामु ॥३॥
कृपासिंधु करुणाकरु । बापरखुमादेविवरु ॥४॥

भडोच येथे श्री. जमीयतराम नरभेराम या नावाचे एक भोळे ब्राह्मण राहात असत. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशी त्यांचे दर्शन घेण्याकरिता श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे यावयाला निघाले. तेथे नावेतून जाण्यासाठी ते चांदोद येथे आले असता एका ब्राह्मणाने त्यांच्या भोळेपणाचा फायदा घेऊन त्यांना बोलण्यात गुंतवून ठेवले व त्यांची श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जाण्याची

नाव चुकविली. आपण बोलण्यात गुंतल्यामुळे आपली नाव चुकली हे लक्षात आल्यावर श्री. जमीयतराम अत्यंत खिन्न झाले व त्या विमनस्क अवस्थेतच ते नदीवर आले. तेथे उभे राहून श्री. जमीयतराम यांनी श्रीस्वामीमहाराजांचे स्मरण करून त्यांना अत्यंत मनोभावाने नमस्कार केला. श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशी आपण ठरविल्याप्रमाणे आपल्याला श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन होणार नाही या तीव्र विचाराने त्यांचे अंतःकरण अगदी गलबलून गेले. श्री. जमीयतराम यांच्या सारख्या एका शुद्ध अंतःकरणाच्या भोळ्या भक्ताची ती तीव्र आर्तता श्रीक्षेत्र गरुडेश्वरी असलेल्या श्रीस्वामी-महाराजांच्या अंतःकरणाला जाऊन भिडली व ते तत्काळ दुसरे रूप घेऊन चांदोद येथे श्रीनर्मदानदीच्या किनाऱ्यावर प्रकट झाले. तेथे त्यांनी श्री. जमीयतराम यांना दर्शन दिले व त्यांची पूजा घेऊन त्यांना प्रसादही दिला. आपण श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशी एका यतिमहाराजांची पूजा केली व आपणास प्रसाद मिळाला या एकाच भावाने संतुष्ट होऊन ते भडोचला परत गेले; कारण त्यापूर्वी श्रीस्वामीमहाराजांना त्यांनी कधी पाहिलेच नसल्यामुळे त्यांना ओळखले नाही.

अशा रीतीने काही दिवस गेल्यावर एकं दिवशी त्यांनी आपल्या मित्राच्या घरी श्रीस्वामीमहाराजांचा फोटो पाहिल्यावर ते त्या मित्राला असे म्हणाले की, "या संन्यासी महाराजांची मी श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशी पाद्यपूजा केली होती व त्यांनी मला प्रसादही दिला होता. हे यतिश्रेष्ठ कोण आहेत ?" श्री. जमीयतराम यांचा हा प्रश्न ऐकताच त्यांचा मित्र त्यांना असे म्हणाला की, "अरे ! हे तर श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज आहेत ! सध्या त्यांचे वास्तव्य श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आहे." आपल्या मित्राचे

हे म्हणणे ऐकताच आपण श्रीगुरुपौर्णिमेला ज्यांची पाद्य पूजा के व ज्यांनी आपणास प्रेमाने प्रसाद दिला ते श्रीस्वामीमहाराज होत याची श्री. जमीयतराम यांना खात्री पटून त्यांच्या डोळ्य अश्रू उभे राहिले. पुढे लगेच श्री. जमीयतराम श्रीस्वामीमहाराज दर्शन घेण्यासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी गेले. तेथे श्रीस्वामीमहाराज प्रत्यक्ष पाहिल्यावरोवर व त्यांचे दर्शन झाल्यावरोबर त्यांना परमानंद झाला त्याचे वर्णन श्रीसंतनामदेवमहाराज या शब्दातच पुढीलप्रमाणे करावे लागेल. ते म्हणतात –

रविरश्मि धरोनि स्वर्गीं जाऊं येईल ।
परि साधुसंगतीचा पार न कळे न कळे ।। १ ।।
वैतरणी उतरोनि वैकुंठा जाऊं येईल ।
परि साधुसंगतीचा पार न कळे न कळे ।। २ ।।
स्वप्नींचा ठेवा साचहि होईल ।
परि साधुसंगतीचा पार न कळे न कळे ।। ३ ।।
माय बाप बंधू भगिनी मिळे योनी ।
परि साधुची मिळणी भाग्ययोगें ।। ४ ।।
तपें व्रतें दानें गोविंद पैं भेटे ।
परि साधु तंव न भेटे भाग्येंविण ।। ५ ।।
नामा म्हणे केशवा बरा साधुसंग ।
या वेगळा भवरोग न तुटे न तुटे ।। ६ ।।

* * *

एके दिवशी वडोदा येथील श्रीसिद्धनाथ मंदिराचे श्री. गणपतीबुवा हे आपल्या बरोबर बरीच मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले होते. श्री. गणपतीबुवा

श्रीस्वामीमहाराजांची अपार कीर्ती ऐकली होती. श्रीस्वामीमहाराज कातरखेड्याहून श्रीक्षेत्र गरुडेश्वराला येत असताना त्यांना सप्त चिरंजीवांमधील श्रीअश्वत्थाम्याचे दर्शन झाल्याचेही त्यांनी एकले होते. त्यामुळे यासंबंधीच आपण श्रीस्वामीमहाराजांना विचारावे असा हेतू मनात धरून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला. ते उठून वसता क्षणीच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आम्ही कातरखेड्याहून निघून इकडे श्रीक्षेत्र गरुडेश्वराला येत असताना वाटेत आम्हाला सप्त चिरंजीवांमधील अश्वत्थाम्याचे दर्शन झाले. त्याच्या बरोबर आमचा काही संभाषणाचाही योग आला." इतके बोलून श्रीस्वामीमहाराज गप्प बसले. त्याबरोबर श्री. गणपतीबुवा श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "प्रभो ! आपण अंतर्ज्ञानी आहात हे खरे आहे ! मी हाच प्रश्न मनात धरून आपल्याकडे आलो होतो. आपण माझ्या मनातील प्रश्न बरोबर ओळखून त्याला उत्तरही दिले." श्री. गणपतीबुवांनी हे सांगताच सर्व लोकांना अत्यंत आश्चर्य वाटले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे पातंजलयोगसूत्रातील पुढील सूत्रे लक्षात येऊन श्रीस्वामीमहाराज हे सर्वसिद्धिसंपन्न असे महायोगी होते याचा प्रत्यय आल्याशिवाय राहात नाही. महर्षी पतंजली योगसूत्रात असे म्हणतात की—

**प्रत्ययस्य परचित्तज्ञानम् ।। ३.१९ ।।**
**प्रवृत्त्यालोकन्यासात्सूक्ष्मव्यवहितवि प्रकृष्टज्ञानम् ।। २५ ।।**
**प्रातिभाद् वा सर्वम् ।। ३३।।**
**हृदये चित्तसंवित् ।। ३४ ।।**

याचा अर्थ असा आहे की, दुसऱ्याच्या चित्तावर संयम केला

...११

असता दुसऱ्याच्या मनात काय चालले आहे हे समजू शकते. ॥१
(ज्यावेळी योगी दुसऱ्याचा चेहरा किंवा नेत्र इत्यादि आकृती पा
त्याच्या चित्ताच्या वृत्तीत संयम करतो त्यावेळी योग्याला
माणसाच्या चित्तात काय चालले आहे याचे ज्ञान होते.) ज्योतिष्म
प्रवृत्तीच्या प्रकाशाच्या योगाने सूक्ष्म व्यवहित म्हणजे आच्छादि
व फार दूर असणाऱ्या वस्तूमध्ये संयम केल्याने सर्व वस्तूंचे ज्ञा
होते. ॥२५॥ (पातंजलयोगसूत्राच्या पहिल्या पादात "विशोका
ज्योतिष्मती ॥ १.३६ ॥" असे सूत्र आले असून त्याचा अर्थ अ
आहे की, अथवा ज्योतिष्मती या नावाची संविद्‌रूपप्रवृत्ती उत्प
झाली असता मनाची एकाग्रता होते. या व इतर उपायांनी एका
होणाऱ्या चित्ताला सर्ववस्तू कशा ग्राह्य होतात हे सांगता
"परमाणुपरममहत्त्वान्तोऽस्य वशीकारः ॥ १.४० ॥" असे सू
लिहिले आहे. याचा अर्थ असा आहे की, अशा उपायांनी स्थि
झालेल्या चित्ताला परमाणूपासून आरंभ करून ते परम मह
परिमाणापर्यंत सर्व वस्तू ग्राह्य होतात.) प्रतिमेच्या ठिकाणी चित्त
संयम केला असता त्यापासून जे प्रातिभज्ञान उत्पन्न होते त्या योगा
योगी सर्व जाणतो. (जो प्रकाश किंवा जे ज्ञान बाहेरच्या कोणत्या
निमित्ताशिवाय किंवा कारणाशिवाय स्वतःच आतून उत्पन्न होते
प्राप्त होते त्याला प्रातिभज्ञान म्हणजे Intutional Insig
असे म्हणतात.) हृदयकमलाच्या ठिकाणी संयम केला असता
दुसऱ्याच्या चित्ताचे वासनारहित ज्ञान होते.

हे सर्व विवेचन वाचले म्हणजे " अगा योगी जो म्हणिजे ।
देवांचा देवो जाणिजे । आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य
॥ ६.४८२ ॥" असे जे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत
म्हटले आहे त्याची प्रचीती घेऊन मन आनंदाने भरून

आपण श्रीस्वामीमहाराजांना ओळखू शकत नाही, आपण त्यांना सत्यस्वरूपात पाहू शकत नाही, आपण त्यांच्या अनंत आत्मस्वरूपापर्यंत पोहोचून त्यांच्या अलौकिक व लोकोत्तर कृपेचा, करुणेचा आणि आशीर्वादाचा प्रत्यय आपला अहंकार लीन करून व शरणागत होऊन घेऊ शकत नाही याचीच मनाला खंत वाटते. जर आपण त्यांच्या परमकोमलचरणी सर्व अहंकार व सर्व धर्माधर्म सोडून शरणागत झालो तर आपले जीवन ते एका क्षणात धन्य व कृतार्थ करतील यात तिल:प्राय शंका नाही. "श्रीस्वामीमहाराज आपण एका कृपाकटाक्षलेशाद्वारा आमचा उद्धार करा," एवढीच आपल्या चरणी प्रार्थना आहे !

श्री. चिंतामणराव गोळे हे एक प्रसिद्ध डॉक्टर वडोदे येथे राहात असत. त्यांची संतती वाचत नव्हती. मोठ्या मुलाच्या पाठीवर त्यांना तीन मुले झाली पण ती वाचली नाहीत. त्यानंतर त्यांना एक मुलगी झाली. ती वाचावी म्हणून श्री. गोळ्यांनी ती जन्माला आल्याबरोबर आपले स्नेही श्री. धोंडोपंत कोपरकर यांच्या पत्नीच्या ओटीत घातली. त्यामुळे तेवढेच एक अपत्य वाचले. त्यानन्तर श्री. चितामणराव यांना एक अपत्य झाले ; पण जन्मल्यापासूनच त्या मुलाला अपस्माराची बाधा होती. श्री. चितामणराव गोळे हे एक प्रख्यात व नावाजलेले डॉक्टर होते. त्यामुळे त्यांनी आपली सर्व डॉक्टरी विद्या पणाला लावून आपल्या एकुलत्या एक वाचलेल्या मुलावर इलाज केले आणि इतरही प्रख्यात डॉक्टरांकडून इलाज करविले; परंतु कोणत्याही इलाजाचा उपयोग झाला नाही व मुलाला बरे वाटले नाही. त्यामुळे त्या मुलाला इतर काही बाहेरची बाधा झाली असेल असे पाहून मांत्रिक तांत्रिक बोलावून आणून त्यांच्याकडूनही त्या मुलावर

इलाज करून पाहिले; पण ते सर्व निष्फळ झाले. इतके झाल्यावर श्री. धोडोपंत कोपरकर यांनी डॉ. श्री. चिंतामण गोळे यांना श्रीस्वामीमहाराजांचे नाव सुचविले व श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जाऊन श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन मुलासंबंधीची सर्व हकीकत त्यांच्या कानावर घालून त्याला वाचविण्यासंबंधी चरणी प्रार्थना करून अंगारा मागून घेऊन तो मुलाला लावण्यास सांगितले. पण डॉ. श्री. गोळे यांना श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जाण्यास वेळ न झाल्याने ते तसेच राहिले. तेवढ्यात श्री. धोंडोपंत कोपरकरच श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जाण्यास निघाले. त्यावेळी डॉ. श्री. गोळे यांनी श्री. धोडोपंतांनाच अशी विनंती केली की, " आपण श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जात आहात; तरी आपणच आमच्या चिरंजीवांच्या आजाराची हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन करून त्यांच्याकडून अंगारा घेऊन यावा. " श्री. कोपरकर यांनी डॉ. श्री. गोळे यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या मुलाची सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन केल्यावर त्यांनी अत्यंत प्रेमाने अंगारा मंत्रून दिला. तो अंगारा घेऊन श्री. घोंडोपंत कोपरकर बडोद्याला परत आले. त्यांनी तो त्या मुलाला लावताच त्या मुलाची सर्व व्याधी दूर होऊन तो पूर्णपणे बरा झाला.

आपला मुलगा श्रीस्वामीमहाराजांच्या अंगाऱ्याने बरा झाल्याचे पाहून डॉ. श्री. गोळे यांना श्रीसंततुकाराममहाराज यांच्या पुढील अभंगांची आठवण येऊन त्यांचे डोळे भरून आले आणि त्यांची किती स्तुती करावी असे त्यांना होऊन गेले. त्यामुळे श्रीसंततुकाराममहाराज यांच्या शब्दांत ते असे गाऊ लागले की—

तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं ॥ १ ॥
अवतार तुम्हा धराया कारण । उद्धरावें जन जड जीव ॥ २ ॥
वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसें तुम्ही जगीं संतजन ॥ ४ ॥



तृषाकाळी उदक भेटी । पडे मिठी आवडीची ॥ १ ॥
ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ २ ॥
मिष्टान्नाचा योग भुके । म्हणतां चुके पुरेसे ॥ ३ ॥
तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥



तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥ १ ॥
आतां माझे दंडवत । तुमच्या संतचरणांसी ॥ २ ॥
आवडी तें नीच (नित्य) नवी । झाली जीवीं वसतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बरवे झालें । घरा आलें बंदरींचें (द्वारकेचें) ॥ ४ ॥



एकदा एक वाई श्रीस्वामीमहाजांच्या दर्शनाला आल्या. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांपुढे नारळ ठेवून त्यांना नमस्कार केला. त्या गडवडीमध्ये त्यांच्या नाकातील नथ खाली पडली; पण त्यावेळी ते काही त्यांच्या लक्षात आले नाही. त्या प्रसादाचा नारळ व अंगारा घेऊन घरी आल्या. सायंकाळी त्या बाईंना एकाएकी आपल्या नथीची आठवण झाली. त्याबरोबर तिने आपल्या नथीची सगळीकडे शोधाशोध केली; पण तिची नथ कोठेच सापडली नाही. त्यामुळे ती अगदी घाबरून गेली. शेवटी ती श्रीस्वामीमहाराजांकडे परत

आली व त्यांना नमस्कार करून असे म्हणाली की, "हे प्रभो सकाळी मी आपल्या चरणदर्शनाला येथे आले असताना माझी न येथेच कोठेतरी गहाळ झाली असावी असे वाटते. ती अद्याप साप नाही. तरी आपण ती कोठे सापडेल याबद्दल प्रश्न तरी पा कसेही करून माझी नथ मला परत मिळवून द्या." तिची प्रार्थ ऐकताच श्रीस्वामीमहाराज तिला असे म्हणाले की, "आ आपणास सकाळी प्रसादाचा नारळ दिला होता. तो आपण फोड का ? जर फोडला नसेल तर फोडून पाहा म्हणजे आपणास आप हरविलेली नथ अवश्य मिळेल." श्रीस्वामीमहाराजांचे हे म्ह ऐकताच त्या बाई आपल्या घरी परत गेल्या व त्यांनी श्रीस्वा महाराजांनी दिलेला प्रसादाचा नारळ फोडला. त्याबरोबर नारळातून त्या बाईंची सकाळी हरवलेली नथ बाहेर पडली पाहताच त्या बाईंना कमालीचे आश्चर्य वाटले.

उपरोक्त कथेप्रमाणेच आणखी एक कथा आम्हाला गुरु श्री. रामचंद्रपंत तेंडूलकर यांचे चिरंजीव श्री. दत्तात्रेय राम तेंडुलकर यांच्याकडून समजली. सर्व साधकभक्तांना या क लाभ व्हावा म्हणून ही कथा येथे प्रस्तुत करीत आहोत. श्री. दत्ता तेंडुलकर हे सध्या मुंबईमध्ये चुनाभट्टी येथे राहतात. त्यांनी पुढीलप्रमाणे कथन केली. "माझे वडील श्री. रामचंद्रपंत श्रीस्वामीमहाराजांचे एकांतिक भक्त होते. ते मुंबईच्या पी. अँड. कंपनीच्या माझगाव डॉकमध्ये कामाला होते. (माझगाव डॉक स भारत सरकारच्या मालकीची गोदी आहे.) आमच्या वडिलांचे स्नेही श्री. बळवंतराव पगडबंद हे सुद्धा श्रीस्वामीमहाराजांचे भ होते. शके १८३५ मध्ये श्रीस्वामीमहाराज हे श्रीक्षेत्र गरुडेश्व आजारी आहेत असे समजल्यावर या मित्रद्वयांनी श्रीस्वा

महाराजांच्या दर्शनाला ठरविले. त्या दोघांची प्रवासाची सर्व तयारी झाली. पण ऐनवेळी आमच्या वडिलांचा इंग्रज साहेब त्यांना रजा देईना. त्यावेळी त्यांचे मित्र श्री. वळवंतराव हे एकटेच श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जावयास निघाले. त्यामुळे आमच्या वडिलांना अत्यंत वाईट वाटले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवण्यासाठी एक नारळ व पेढे श्री. वळवंतराव यांच्या हाती पाठवून दिले.

श्री. बळवंतराव श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे पोहोचल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व आमच्या वडिलांनी पाठविलेले श्रीफळ व पेढे श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवून ते त्यांना असे म्हणाले की, "हे श्रीफळ व पेढे माझे मित्र श्री. रामचंद्रपंत तेंडुलकर यांनी पाठविलेले असून त्यांची इच्छा असूनही त्यांच्या इंग्रज अधिकाऱ्याने रजा न दिल्यामुळे ते आपल्या दर्शनाला येऊ शकले नाहीत. तरी आपली त्यांच्यावर कृपा असावी." श्री. वळवंतराव पगडवंद यांचे हे म्हणणे ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "थोडावेळ वसा. ही गर्दी ओसरली की प्रसाद देऊ." यानन्तर श्रीस्वामीमहाराज दर्शनार्थी लोकांना प्रसाद देण्यात गुंतून गेले. थोड्या वेळाने ज्यावेळी गर्दी ओसरली त्यावेळी श्रीस्वामी-महाराज पर्णकुटीच्या आतील बाजूस गेले व एक लहानसे पुडके घेऊन वाहेर आले. ते पुडके श्री. बळवंतराव पगडबंद यांच्या हातात देत ते असे म्हणाले की, "श्री. रामचंद्रपंत तेंडुलकरांना हा प्रसाद नेऊन द्या," असे म्हणून त्यांनी हातात आणलेले पुडके श्री. वळवंतराव यांच्याकडे दिले. श्रीस्वामीमहाराजांनी श्रीरामचंद्रपंत तेंडुलकरांसाठी दिलेले ते पुडके हातात घेताना श्री. बळवंतराव यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही; कारण त्यांनी स्वतः जो नारळ श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवला होता तो श्रीस्वामी-

महाराजांनी श्री. वळवंतरावांना त्यांच्या नेहमीच्या प्रथेप्रमाणे प्र
दिला होता; मात्र श्री. रामचंद्रराव यांचा नारळ त्यांनी स्वतःप
ठेवून घेतला होता. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. रामचंद्रराव तेंडुल
यांना दिलेल्या पुडक्यात काय आहे हे पाहण्याचा श्री. बळवंतराव
अनावर मोह झाला होता; पण ते पुडके सोडण्याचे धैर्य मात्र त्यां
झाले नाही.

श्री. वळवंतराव मुंवईला परतल्यावर त्यांनी आमच्या वडिल
श्रीस्वामीमहाराजांनी पाठविलेला प्रसाद दिला व घडलेली ए
सर्व हकीकत त्यांना सांगितली. ही सर्व हकीकत ऐकताच आम
वडिलांचे डोळे पाणावले. त्यांनी थरथरत्या हातानेच श्री. वळवंत
यांनी दिलेले प्रसादाचे पुडके सोडले. त्यात फुलांच्या वाळले
पाकळ्यांमध्ये गुंडाळून ठेवलेल्या पंचपदी व योगतारावली या
पोथ्या श्रीस्वामीमहाराजांनी प्रसाद म्हणून पाठविल्या होत्या.
पोथ्या पाहताच आमच्या वडिलांच्या डोळ्यातून अश्रुधारा
लागल्या. त्याचक्षणी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शना
जाण्याचा निर्णय घेतला. रजा मिळो अगर न मिळो आणि नो
जावो अगर राहो; पण आपण श्रीस्वामीमहाराजांच्या चरणाप
जावयाचेच असा त्यांनी मनाशी पक्का निश्चय केला. त्यावे
आमची आई वाळंतरोगाने आजारी असल्याने मला व मा
धाकटी व लहान मेहुणी या दोघांना घेऊन त्यांनी दुसऱ्या दिव
श्रीक्षेत्र गरुडेश्वरची वाट धरली. आपण गावाला जातो कि
आपणास रजा हवी आहे या संबंधी त्यांनी ऑफीसला एक वो
चिठ्ठी लिहून सुद्धा कळविले नाही.

आमचे तीर्थरूप वडील आम्हाला घेऊन श्रीक्षेत्र गरुडेश्वरा
पोहोचले त्यावेळी दुपार टळून संध्याकाळ झाली होती. दि

मावळण्यापूर्वी स्नान, संध्या करून मगच आपण मुलांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जावे असा त्यांनी विचार केला. त्याप्रमाणे सर्व आटोपून ते श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला निघाले. तेथे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आलेल्या लोकांची खूपच गर्दी होती. दर्शन झाल्यावर मुलांच्या जेवणाची काय सोय करावी या विचारात आमचे वडील होते; कारण श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे संध्याकाळच्या प्रसादाची काहीच सोय नसे. दिवसभराच्या प्रवासाने व श्रमाने आम्हा मुलांचे चेहेरे भुकेने अगदी कोमेजून गेले होते. अशा स्थितीत श्रीनर्मदानदीत स्नान करून आमचे वडील आम्हाला घेऊन वर आले; एवढ्यात समोरून एक बाई येताना दिसल्या व त्या आम्हाला पाहून असे म्हणाल्या की, " मुंबईहून आलेली भक्तमंडळी आपणच आहात का ? " हा प्रश्न ऐकताच आमचे वडील अत्यंत आश्चर्यचकित झाले. आपल्याला ओळखणारी कोणी मंडळी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी असण्याची शक्यताच नसल्यामुळे ते विस्मयानेच त्या स्त्रीला असे म्हणाले की, " हो ! आम्ही मुंबईहून आलो आहोत. " हे उत्तर ऐकताच त्या बाई आम्हाला असे म्हणाल्या की, " चला तर ! श्रीस्वामीमहाराजांनी तुम्हाला प्रसाद घ्यावयाला बोलाविले आहे. "

त्या बाईंनी असे सांगताच आमचे वडील अगदी दिङ्मूढ होऊन गेले. आपण मुंबईहून येथे आल्याचे श्रीस्वामीमहाराजांना कोणी सांगितले हेच त्यांना कळेना. या अवस्थेत ते आम्हाला बरोबर घेऊन त्या स्त्रीच्या मागे चालू लागले. चालता चालता त्या बाई आमच्या वडिलांना असे म्हणाल्या की, " मी श्रीस्वामीमहाराजांच्या भंडाऱ्यात स्वयंपाक करण्याची सेवा करते. आज दुपारीच श्रीस्वामीमहाराजांनी

मला हाक मारून असे सांगितले होते की, " मुंबईहून संध्याकाळी एक भक्त येणार आहेत. त्यांच्या बरोबर दोन लहान मुलेही येत आहेत. त्यांच्यासाठी संध्याकाळी प्रसाद ठेवून द्या." श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे मी तिघा माणसांचा प्रसाद वाढून काढून ठेवला होता; परंतु ज्यावेळी संध्याकाळ टळू लागली त्यावेळी मी श्रीस्वामीमहाराजांकडे जाऊन असे विचारले की, "प्रभो आपण सकाळी आज्ञा केल्याप्रमाणे तिघा भक्तांचे अन्न वाढून काढून ठेवले आहे; परंतु अद्यापपर्यंत ती भक्तमंडळी काही इकडे आलेली दिसत नाहीत. तरी आता काय करावयाचे ? " श्रीस्वामीमहाराजांना मी असे सांगताच ते मला असे म्हणाले की, " ती भक्त मंडळी एवढ्यातच येथे येतील काळजी करू नका. त्यांचे अन्न दुसऱ्यांना देऊ नका." अशा रीतीने त्यांनी मला सांगितल्यावर थोड्याच वेळाने पुन्हा हाक मारून ते मला असे म्हणाले की, "मुंबईची भक्तमंडळी येथे आली असून ती नदीवर स्नानाला गेली आहेत. त्यांना येथे घेऊन या." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे मी तुम्हाला शोधीत येथे आले. तरी आता आपण प्रथम श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी जाऊ." त्या बाईंनी सांगितलेली ही सर्व हकीकत ऐकत असताना आमचे वडील अगदी भारावून गेले.

त्यानंतर आम्ही सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व भोजन प्रसादही घेतला. श्रीस्वामीमहाराजांनी आमच्या वडिलांची अगत्याने चौकशी केली व रात्री झोपण्याची सर्व व्यवस्थाही केली. दुसऱ्या दिवशी पुन्हा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा लाभ घेतल्यावर त्यांनी प्रसाद, नारळ इत्यादि देऊन कृपाशीर्वादपूर्वक निरोप दिला. आम्ही प्रसन्न मनाने मुंबईला परतलो. श्रीक्षेत्र गरुडेश्वर

परत आल्यावर आमचे वडील कामावर गेले नाहीत. त्यामुळे लवकरच अपेक्षेप्रमाणे त्यांना कामावरून दूर केल्याचे कंपनीचे पत्र आले. त्या पत्रामुळे आमच्या वडिलांना कसलेच दु:ख झाले नाही; कारण एक तर ते श्रीस्वामीमहाराजांच्या भक्तिभावात मग्न झाल्यामुळे त्यांना कसलेच भान नव्हते आणि दुसरे म्हणजे मालाडला त्यांच्या मालकीची थोडीशी जमीन असल्यामुळे उदर निर्वाहाचा कोणताच प्रश्न समोर नव्हता.अशा रीतीने ते श्रीस्वामीमहाराजांच्या नामस्मरणात व चिंतनात मग्न होऊन गेले असताना एक महिन्यानंतर त्यांना कंपनीकडून दुसरे पत्र आले. त्यात असे लिहिले होते की, " आत्तापर्यंतची आपली चाळीस दिवसांची गैरहजेरी हक्काची रजा म्हणून मंजूर केली आहे, तरी आपण तावडतोव कामावर रुजू व्हावे. " श्रीस्वामीमहाराजांच्या अपूर्व कृपेने पुन्हा नोकरी मिळाल्याने आमच्या वडिलांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. श्रीस्वामीमहाराजांचे कृपाछत्र आमच्या घराण्यावर असल्याचा प्रत्यय आजही आम्हाला वारंवार येत असतो. या कृपेचे वर्णन करावयाचे झाले तर श्रीस्वामीमहाराजांचे धाकटे बंधू व त्यांचे परमभक्त श्रीसीताराममहाराज यांच्या शब्दात असे करता येईल की–

सद्‌गुरु यावें। मम भजनीं सादर व्हावें ।। ध्रु० ।।
तव आगमनें विघ्नें पळती। कामादिक रिपु नष्टचि होती ।।
आशा तृष्णा मनिं बहु झुरती। कोठे जावें ।। मम० ।। १ ।।
भवविपिनींचा मार्ग भयंकर। क्षुरधारेपरि म्हणती कविवर।
सद्‌गुरु येऊनि धरिती जरी कर। अमरचि व्हावे ।। मम० ।। २ ।।
किती रे माझा अंत पहासी ।°मज दीनासी काय मागशी।
विश्वाचा तूं पालक असशी। मनिं समजावे ।। मम० ।। ३ ।।

माझा धांवा हा परिसोनी । दंडकमंडलु करिं घेवोनी ।
देशिक आले हो धांवोनी । आसन द्यावें ।। मम० ।। ४ ।।
हृत्पीठावरि गुरू बैसले । भजनीं प्रेमाचे पुर आले ।
सीतारामीं चित्त रंगलें । सात्विक भावें ।। मम० ।। ५ ।।

उपरोक्त कथेमध्ये श्री. रामचंद्रराव तेंडुलकर यांना जे पंच व योगतारावली असे दोन ग्रंथ भेट म्हणून पाठविले होते मोठा गहन, गंभीर अर्थ भरलेला आहे. या जगात अध्यात्म प्राप्ति किंवा आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचे दोनच मार्ग असून " लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ । ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ।।३.३।।" असा श्रीगोपाळकृष्णनाथमहाराजां त्याचा श्रीमद्भगवद्गीतेत उल्लेख केला आहे. याचा अर्थ आहे की, हे निष्पाप अर्जुना ! या लोकी ज्ञानयोगाने सांख्यां म्हणजे "मी ब्रह्म आहे, देह नाही," अशा प्रकारे मन चिंतन करणाऱ्यांचा अर्थात् मनोमार्गाने जाणाऱ्यांचा (मार्ग) आ कर्मयोगाने योग्यांचा म्हणजे सद्गुरुकृपेने जागृत होणाऱ्या आ शक्तीला शरणागत होऊन सुषुम्णामार्गाने जाणाऱ्यांचा (मार्ग) दोन प्रकारचे मार्ग किंवा निष्ठा म्हणजे साधनाच्या परि अवस्थेने प्राप्त करावयाची पराकाष्ठा मी पूर्वी सांगितली आहे

अशा प्रकारचे हे दोन्ही मार्ग एकच आहेत असा निर्वाळाही श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद्भगवद्गीतेमध्ये दिला आ यासंबंधी ते असे म्हणतात की, "यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगै गम्यते । एकं साख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ।।५.५।।" या अर्थ असा आहे की, जे परमधाम ज्ञानयोग्यांना मिळते तेच, सिद्धयोग साधकांनाही मिळते. याकरिता जो सांख्य म्हणजे वेदां व योग म्हणजे सिद्धयोग हे दोन्ही मार्ग एकच आहेत असे पाह

तोच यथार्थ पाहतो.

अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी श्री. रामचंद्रराव तेंडुलकर यांना वेदान्ताचे निरूपण करणारा साररूप असा श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य माधवारण्य कृत "पंचदशी" हा ग्रंथ व सिद्धयोगामुळे उत्पन्न होणाऱ्या अंतरंग अशा नादानुसंधानरूप साधनमार्गाचे साररूपाने कथन करणारा श्रीमद्आद्यशंकराचार्य विरचित "योगतारावली" हा ग्रंथ दिला. पंचदशी हा ग्रंथ खूपच विस्तृत असून तो जिज्ञासू साधक वाचकांनी मुळातूनच अवश्य वाचावा. मात्र योगतारावली हा ग्रंथ स्तोत्ररूप असा छोटा असल्याने तो सर्व साधक वाचकांकरिता येथे प्रस्तुत करीत आहे. त्याचा लाभ श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य प्रकाशात सर्वांनी घ्यावा.

## श्रीमद् आद्य शंकराचार्य विरचित

## – योगतारावली –

वन्दे गुरूणां चरणारविन्दे ।
संदर्शितस्वात्मसुखावबोधे ॥
जनस्य ये जाङ्गलिकायमाने ।
संसार–हालाहल–मोह–शान्त्यै ॥ १ ॥

अर्थ :– संसाररूपी हालाहल विषाने प्राप्त होणाऱ्या मूर्च्छेचा निरास करण्याकरिता जे अज्ञजनांना सिद्धयोग साधनरूपी औषध देऊन म्हणजे आपल्या ठिकाणच्या दिव्यशक्तीच्या संक्रमणाने शिष्याची अनादिनिद्रिस्त आत्मशक्ती अर्थात् कुंडलिनीशक्ती जागृत करून त्याची जन्मजन्मांतरामध्ये वहिर्मुखतेने संसारात रमण्याची रुजलेली जी विषरूप वृत्ती असते ती उतरविण्याचे अर्थात् ती

अंतर्मुख करणाऱ्या विषवैद्याचे कार्य करून जे अशा प्रकारे स्व स्वात्मसुखाच्या ज्ञानाचा मार्ग दाखवून देतात त्या श्रीगुरूंच्या चरणकमलांना मी वंदन करतो. ॥ १ ॥

**सदाशिवोक्तानि सपादलक्ष ।**
**लयावधानानि वसन्ति लोके ॥**
**नादानुसन्धानसमाधिमेकं ।**
**मन्यामहे मान्यतमं लयानाम् ॥ २ ॥**

**अर्थ :–** श्रीशंकरांनी मनाचा लय करून घेण्याची जी सव्वा लक्ष साधने सांगितली आहेत ती या जगतात प्रचलित आहेत. त्या सर्व साधनांनी प्राप्त होणाऱ्या लयापेक्षा अर्थात् समाधीपेक्षा सिद्धयोगान्तर्गत नादानुसंधानाने प्राप्त होणारा लय अर्थात् समाधि हीच आम्हाला अत्यन्त मान्य आहे असे आम्ही समजतो. ॥ २ ॥

**सरेचपूरैरनिलस्य कुम्भैः ।**
**सर्वासु नाडीषु विशोधितासु ॥**
**अनाहताख्यो बहुभिः प्रकारैः ।**
**अन्त प्रवर्तेत सदा निनादः ॥ ३ ॥**

**अर्थ :–** सिद्धयोग साधनात श्रीगुरुकृपेमुळे अर्थात् दीक्षेमुळे जागृत झाल्यामुळे अन्तःशक्ती कुंडलिनीच्या प्रक्षोभामुळे रेचक, पूरक व कुंभक या क्रिया वारंवार होत गेल्यामुळे शरीरातील सर्व नाड्या शुद्ध झाल्यावर "अनाहत" नावाचा नाद देहात अनेक प्रकारांनी उत्पन्न होतो. ॥ ३ ॥

**नादानुसंधान् नमोऽस्तु तुभ्यं ।**
**त्वां साधनं तत्त्वपदस्य जाने ॥**
**भवत्प्रसादात्पवनेन साकं ।**
**विलीयते विष्णुपदे मनो मे ॥ ४ ॥**

**अर्थ :–** हे नादानुसंधाना ! अर्थात् नादानुसंधानरूपी साधना ! तुला नमस्कार असो. तू तत्त्वपदाचे अर्थात् परब्रह्मप्राप्तीचे साधन आहेस हे मला माहीत आहे. तुझ्या कृपाप्रसादाने माझे मन प्राणवायूसह विष्णुपदी अर्थात् विश्वव्यापक असलेल्या ब्रह्मस्वरूपी लीन होत आहे. ।। ४ ।।

**जालन्धरोड्याणन–मूलबन्धान् ।**
**जल्पन्ति कण्ठोदरपायुमूलान् ।।**
**बन्धत्रयेऽस्मिन्परिचीयमाने ।**
**बन्धः कुतो दारुणकालपाशात् ।। ५ ।।**

**अर्थ :–** सिद्धयोगाचे साधन करताना जालंधरबंध, उड्डीयानबंध आणि मूलबंध असे हे तीन बंध क्रमशः कंठ, उदर आणि गुदस्थान यांच्या मुळाशी त्यांच्या आधारानेच होत असतात. या तीन बंधांचा अभ्यास स्वतंत्रपणे करीत असताना किंवा सिद्धयोगांतर्गत जागृत कुंडलिनी शक्तीमुळे ते आपोआप होत असताना अत्यंत भयंकर अशा कालपाशाचे बंधन योग्याला कोठून असणार ? अर्थात् या तीन बंधांचा स्वतंत्रपणे अभ्यास करणारा योगी किंवा जागृत आत्मशक्तीमुळे हे तीनही बंध साधनात आपोआप होणारा योगी भयंकर अशा कालपाशातून मुक्त होतो. ।। ५ ।।

(या श्लोकात १) जालंधर २) उड्डीयान व ३) मूळ या तीन बंधांचा उल्लेख आला आहे. त्यांची लक्षणे अशी आहेत. १) जालंधर बंध :– नाकावाटे वायू खेचून घेऊन पूरक केल्यानन्तर कुंभकाला सुरुवात करताना गळ्याच्या खालच्या बाजूला जो खळगा आहे त्याला शिंपी असे म्हणतात. तेथे हनुवटी दाबून धरणे. २) उड्डीयानबंध : – रेचक केल्यावर पोट पाठीला लागेपर्यंत ओढून धरणे. ३) मूलबंध :– गुदद्वार आत वरच्या बाजूला ओढून

धरणे अर्थात् अपानवायूची जी अधः अर्थात् खाली गती असते वर ऊर्ध्व करणे. या बंधाने प्राणापान एक होतात. असे झाले म्ह मूत्रपुरीष म्हणजे लघवी व शौच ही अल्प होतात. व कुंडलि शक्तीचे सुषुम्नेत चालन होते.)

ओड्याण–जालन्धर–मूलबन्धैः ।
उन्निद्रितायामुरगाङ्गनायाम् ।।
प्रत्यङ्मुखत्वात्प्रविशेन्सुषुम्नां ।
गमागमौ मुंचति गन्धवाहः ।। ६ ।।

**अर्थ** :– उड्डीयान बंध, जालंधरबंध आणि मूलबंध या ति बंधांच्या अभ्यासाने उरगांगना म्हणजे स्वाधिष्ठान चक्रा कर्णिकेवर खाली मुख करून प्रसुप्त असलेली सर्पाकार प्राणवा कुंडलिनीशक्ती ही जागृत झाली असता ती अंतर्मुख हो सुषुम्नानाडीत प्रवेश करू लागते.अशा प्रकारे प्राणवायू सुषुम्नाना प्रवेश करू लागला की, इडा आणि पिंगला यांच्या द्वारा शरीरा बाहेर जाणे आणि बाहेरून शरीरात प्रवेश करणे या दोन्ही क्रि तो सोडून देतो अर्थात् यामुळे श्वासोच्छ्वास क्रिया बंद होतात.।।६

उत्थापिताधार हुताशनोल्कैः ।
आकुंचनैः शश्वदपानवायोः ।।
सन्तापिताच्चन्द्रमसः पतन्तीं ।
पीयूषधारा पिबतीह धन्यः ।। ७ ।।

**अर्थ** :– सिद्धयोग साधन करताना त्रिबंधयुक्त प्राणायाम वारंवा झाल्यामुळे कोंडलेल्या अपानवायूचे आकुंचन होत असल्या मूलाधार चक्रातील वैश्वानर अग्नीच्या ज्वाळा वर उसळतात. अग्नीच्या ज्वालांनी मूर्धस्थानी ब्रह्मरंध्रात असलेले चंद्रमंडल संत होते. संतप्त झालेल्या चंद्रमंडलातून अमृताचा स्राव सुरू होतो. अ

रीतीने चंद्रमंडलातून स्रवणाऱ्या अमृतधारेचे जो प्राशन करतो तो खरोखरीच इहलोकी धन्य होय. ॥ ७ ॥

**बन्धत्रयाभ्यास – विपाकजातां ।**
**विवर्जितां रेचक – पूरकाभ्याम् ॥**
**विशोषयन्तीं विषय – प्रवाहं ।**
**विद्यां भजे केवल – कुम्भरूपाम् ॥ ८ ॥**

**अर्थ :–** सिद्धयोगान्तर्गत कुंडलिनीशक्तीच्या जागृतीमुळे आपोआप होणाऱ्या मूल, उड्डीयान व जालंधर या तीन बंधांमुळे किंवा या बंधांच्या स्वतंत्र अभ्यासाच्या परिपक्वतेमुळे उत्पन्न झालेल्या, रेचक व पूरक यांनी विरहित असलेल्या आणि विषयांचा प्रवाह शोषून घेणाऱ्या अशा या केवलकुंभकरूपी ब्रह्मविद्येचा आश्रय करून तिचीच मी उपासना किंवा अभ्यास करतो. ॥ ८ ॥

**अनाहते चेतसि सावधानैः ।**
**अभ्यासशूरैरनुभूयमाना ॥**
**संस्तम्भितश्वास मनःप्रचारा ।**
**सा जृंभते केवलकुंभकश्रीः ॥ ९ ॥**

**अर्थ :–** हृदयाकाशात अनाहत नाद उत्पन्न झाला असता त्या अनाहत नादाकडेच ज्या साधकाचे सर्व लक्ष लागून राहिले आहे अशा योगाभ्यास निष्णात अर्थात् सिद्धयोगाचा निरंतर साधनाभ्यास करणाऱ्या पुरुषांच्या अनुभवास येणारी आणि श्वासोच्छ्वास, प्राण व मन यांचे व्यापार बंद पाडणारी अशी ती केवलकुंभकरूपी संपत्ती प्रकट होते व त्याचे वैभव विजय पावते. ॥ ९ ॥

**सहस्रशः सन्तु हठेषु कुम्भाः ।**
**सम्भाव्यते केवलकुम्भ एव ॥**

कुम्भोत्तमे यत्र तु रेचपूरौ ।
प्राणस्य न प्राकृतवैकृत्याख्यौ ॥ १० ॥

अर्थ :– हठयोगात कुंभकाचे हजारो प्रकार सांगितलेले अ तरी त्या सर्व कुंभकात केवलकुंभकच अत्यंत श्रेष्ठ म्हणून म जातो. या सर्वश्रेष्ठ कुम्भकात प्राणवायूच्या प्राकृत अथवा वै स्वरूपाच्या पूरक आणि रेचक या क्रिया होत नसतात अ श्वासोच्छ्‌वासही होत नसतात. ॥ १० ॥

त्रिकूटनाम्नि स्तिमितेऽन्तरङ्गे ।
खे स्तम्भिते केवल कुम्भकेन ॥
प्राणानिलो भानुशशाङ्कनाड्यौ ।
विहाय सद्यो विलयं प्रयाति ॥११॥

अर्थ :– केवल कुम्भकामुळे त्रिकुट नावाच्या शांत–निवांत आकाशात म्हणजे मूर्धस्थानी असलेल्या सहस्रदलकमला अंतराकाशात मन स्थिर झाले असता प्राणवायू हा सूर्यनाडी चंद्रनाडी अर्थात् इडा व पिंगला या नाड्यांना सोडून सुषु ब्रह्मस्वरूपी लीन होतो. ॥ ११ ॥

प्रत्याहृतः केवलकुम्भकेन ।
प्रबुद्धकुण्डल्युपभुक्तशेषः ॥
प्राणः प्रतीचीनपथेन मन्दं ।
विलीयते विष्णुपदान्तराले ॥१२॥

अर्थ :– केवल कुंभकाच्या प्राथमिक प्रयत्नाने इतर मार्गा म्हणजे इडा–पिंगलेतून वाहणाऱ्या प्राणवायूला परावृत्त क सुषुम्नेमध्ये परत आणलेला आणि जागृत झालेल्या कुंडलिनीश सेवन करून शिल्लक राहिलेला प्राणवायू मूलाधारातील सुषु नाडीचे मुख मोकळे झालेले असल्यामुळे त्या मुखाने प्रवेश क

पश्चिममार्गाने हळूहळू विष्णुपदात ( विष्णू म्हणजे विश्वाला व्यापून असलेले व विश्वरूपाने नटलेले ब्रह्म आणि त्याचे पद म्हणजे स्वरूप किंवा चिदाकाश होय. ) म्हणजे चिदाकाशरूपी ब्रह्मस्वरूपात लीन होतो. ॥ १२ ॥

निरङ्कुशानां श्वसनोद्गमानां ।
निरोधनैः केवलकुम्भकाख्यैः ॥
उदेति सर्वेन्द्रियवृत्तिशून्यो ।
मरुल्लयः कोऽपि महामतीनाम् ॥१३॥

अर्थ :– बुद्धिमान् पुरुषाने सर्वश्रेष्ठ अशा केवलकुंभकाचा अभ्यास दीर्घकाल, निरंतर व सत्कारपूर्वक केला असता निरंकुशपणाने म्हणजे स्वैर संचाराने चाललेले श्वासोच्छ्वास निरुद्ध होतात व त्याच्या मनाच्या सर्व इंद्रियप्रवृत्ती अर्थात् विषयवासना नाहीशा होऊन एक अलौकिक व अवर्णनीय असा प्राणलय किंवा मनोलय उत्पन्न होतो. ॥ १३ ॥

न दृष्टिलक्ष्याणि न चित्तबन्धौ ।
न देशकालौ न च वायुरोधः ॥
न धारणाध्यान परिश्रमो वा ।
समेधमाने सति राजयोगे ॥१४॥

अर्थ :– साधकाच्या ठिकाणी केवलकुंभकाच्या अभ्यासाने जीव-शिवात्मक ऐक्यरूप किंवा तादात्मरूप राजयोग समेधमान म्हणजे उत्तम रीतीने, अविच्छिन्न व अखंडपणे वृद्धिंगत होऊ लागला की, साधक हा ध्येयतत्त्वाशी अभिन्न होतो, शिवस्वरूप किंवा ब्रह्मस्वरूप होतो. त्याला दृष्टीपुढे कोणत्याही लक्ष्याची म्हणजे मूर्तीसारख्या दृश्य स्वरूपाची किंवा त्राटकादि साधने करून दृष्टी स्थिर करण्याची गरज उरत नाही. अशा प्रकारे धारणा करून त्याला

चित्त कोठेही ध्येयवस्तूच्या ठिकाणी लावावे लागत नाही
चित्तवृत्तींना बंध घालावा लागत नाही. अशा साधकाचे
ब्रह्मस्वरूपी समरस झालेले असल्यामुळे त्याला विशिष्ट देश
पाहावा लागत नाही; कारण त्याला देशकाळाचे भान उरत
त्याला सर्व दिशा मंगलमय भासतात व सर्वचकाळ शुभ
वाटतो. त्याला प्राणायाम करून प्राणनिरोधन करण्याचे
चित्त एकाग्र करण्याचे परिश्रम करावे लागत नाहीत
ध्यानधारणा यांपैकी कसल्याही साधनांची आवश्यकता
नाही. ॥१४॥

अशेष–दृश्योज्झित–दृङ्मयानाम् ।
अवस्थितानामिह राजयोगे ॥
न जागरो नापि सुषुप्तिभावो ।
न जीवितं नो मरणं विचित्रम् ॥ १५ ॥

**अर्थ :–** अशा प्रकारे संपूर्ण दृश्य वस्तूंच्या संस्पर्शानिरहित
दृग्रूप म्हणजे साक्षिरूप अशा चिन्मयरूपाने राजयोगात
झालेल्या मेधावी योग्यास जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या
प्राप्त होत नाहीत. एवढेच नव्हे; तर त्यांना जीवन नाही व
नाही अशी अद्भुत अवस्था प्राप्त होते; हे केवढे आश्चर्य
॥ १५ ॥

अहं–ममत्वाद्यपहाय सर्वं ।
श्रीराजयोगे स्थिरमानसानाम् ॥
न द्रष्टृता नास्ति च दृश्यभावः ।
सा जृम्भते केवलसंविदेव ॥ १६ ॥

**अर्थ :–** मी आणि माझे आदि सर्व अज्ञानभाव आणि
झालेली पिंडब्रह्मांडाची म्हणजे प्रपंचाची उभारणी यांचा

त्याग झाल्यावर ज्यांचे मन महनीय अशा राजयोगात स्थिर झाले आहे. अशा पुरुषांना द्रष्टा व दृश्य हे भाव उरत नाहीत. अर्थात् दर्शनक्रियेचे कर्तृत्व किंवा दृश्याचे कर्मत्व उरत नाही म्हणजे या सर्व कक्षा विलय पावतात आणि मग तेथे केवळ ज्ञप्तिमात्र विज्ञानभाव स्वतेजाने प्रकाशित होतो. अर्थात् त्याच्या ठिकाणी केवळ ज्ञानच प्रकट होते. ॥ १६ ॥

**नेत्रे ययोन्मेष–निमेष–शून्ये ।**
**वायुर्यया वर्जित–रेच–पूरः ॥**
**मनश्च सङ्कल्प–विकल्प–शून्यं ।**
**मनोन्मनी सा मयि सन्निधत्ताम् ॥ १७ ॥**

अर्थ :– ज्या अवथेत नेत्रांची उघडझाप बंद होते, प्राणवायूचे श्वासोच्छ्वास बंद होतात व मन आपला चंचल स्वभाव सोडून पूर्णपणे संकल्पविकल्पशून्य होऊन निरुद्ध होते अर्थात् सर्व इंद्रिये निष्क्रीय वनतात ती अलौकिक मनोन्मनी अवस्था माझ्या ठिकाणी उत्तम रीतीने स्थिर होवो. ॥ १७ ॥

**चित्तेन्द्रियाणां चिरनिग्रहेण ।**
**श्वासप्रचारे शमिते यमीन्द्राः ॥**
**निवात–दीपा इव निश्चलाङ्गा ।**
**मनोन्मनीमग्नधियो भवन्ति ॥ १८ ॥**

अर्थ :– चित्त किंवा मन व इंद्रियांचा दीर्घकाल सतत निग्रह केल्यामुळे प्राणांचे नियमन होऊन श्वासोच्छ्वास बंद झालेले व आपले मन जिंकलेले राजयोगी महापुरुष निर्वातस्थली ठेवलेल्या दीपज्योतीप्रमाणे स्थिर होऊन ते मनोन्मनी अवस्थेत मग्न होऊन जात असल्यामुळे त्यांना कशाचेही भान राहात नाही. ॥ १८ ॥

उन्मन्यवस्थाधिगमाय विद्वन् ।
उपायमेकं तव निर्दिशामः ॥
पश्यन्नुदासीनतया प्रपंचं ।
सङ्कल्पमुन्मूल्य सावधानः ॥ १९ ॥

अर्थ :– हे शहाण्या पुरुषा ! हे विद्वान् शिष्या ! नेहमी स राहून उदासीन दृष्टीने अर्थात् अनासक्तपणे प्रपंचाकडे पाहू चित्तातील सर्व संकल्प उपटून टाक. ही उन्मनी अवस्था प्रा करून घेण्याचा हाच एक मात्र उपाय आहे असे आम्ही तु सांगतो. ॥ १९ ॥

प्रसह्य सङ्कल्प–परंपराणां ।
सम्भेदने सन्तत–सावधानम् ॥
आलम्बनाशादपचीयमानं ।
शनैः शनैः शान्तिमुपैति चेतः ॥ २० ॥

अर्थ :– हे प्रिय शिष्या ! दीर्घकाल निरंतर अगणित यत्न कर चित्तातील असंख्य वासना संकल्प मालिका चिरडून टाक. तसेच स संकल्पांचे आश्रयस्थान असलेल्या चित्तातील सर्व आकांक्षा व काम यांच्या बीजांचा नाश कर आणि हे कामना संकल्प पुनःपुन्हा उद्भ नयेत यासाठी अखंड जागरूकता ठेव. यामुळेच चित्ताला हळूह अक्षय शांती प्राप्त होते. (हे सर्व सिद्ध होण्याकरिता सिद्धयो साधकाला अभ्यासकाळात यमनियमांचे पालन करणे, सिद्धयो साधन करताना आसने, प्राणायाम, बंध, मुद्रादि क्रिया मोकळेपणा होऊ देऊन जागृत कुंडलिनी शक्तीच्या विकासाला व तत्स्वर प्राणवायूला सुषुम्णेतील प्रवेशाला वाव देणे, त्यामुळे उत्पन्न होणा अनाहत नादाचे अनुसंधान करणे व त्यामुळे प्राप्त होणा केवलकुम्भकात मनाचा लय होऊ देणे हाच शांतीचा राजमा

आहे.) ॥ २० ॥

निश्वासलोपैर्निभृतै: शरीरै: ।
नेत्राम्बुजैरर्धनिमीलितैश्च ॥
आविर्भवन्तीममनस्कमुद्राम् ।
आलोकयामो मुनिपुंगवानाम् ॥ २१ ॥

अर्थ :– श्वसनक्रियेचा व्यापार पूर्ण थांबला आहे, त्यामुळे शरीर निश्चल झाले आहे किंवा स्थिर राहिले आहे व नेत्र अर्धोन्मिलित आहेत अशा लक्षणांनी प्रकट होणारी अमनस्क नामक मुद्रा किंवा ज्ञानसमाधी मुनिश्रेष्ठांच्या ठिकाणी प्रकटलेली आम्ही पाहात आहोत. ॥ २१ ॥

अमी यमीन्द्रा: सहजामनस्कात् ।
अहं ममत्वे शिथिलायमाने ॥
मनोऽतिगं मारुतवृत्ति–शून्यम् ।
गच्छन्ति भावं गगनावशेषम् ॥ २२ ॥

अर्थ :– हे इंद्रियसंयम करण्यात श्रेष्ठ असलेले योगी सहज अशा अमनस्क मुद्रेने किंवा या स्थितीच्या योगाने मी आणि माझे या भावना गळून पडल्यावर मनाच्या कक्षेच्या अतीत असणाऱ्या आणि जेथे पोहोचल्यावर मारुत म्हणजे कुंडलिनीशक्ती गतिशून्य होते त्या सहस्रारातील सामरस्यावस्थेच्या अवर्णनीय अशा स्थितीला प्राप्त होतात. ॥ २२ ॥

निवर्तयन्तीं निखिलेन्द्रियाणि ।
प्रवर्तयन्तीं परमात्मयोगम् ॥
संविन्मयीं तां सहजामनस्कां ।
कदा गमिष्यामि गतान्यभाव: ॥ २३ ॥

**अर्थ** :– मनासह सर्व इंद्रियांना आपापल्या विषयांपासून निवृ करणारी अर्थात् इंद्रियांना निर्विषय करणारी, परमतत्त्वाच्या अर्था परमात्म्याच्या प्राप्तीकडे प्रवृत्त करणारी, इतर सर्व भाव जं नाहीसे झाले आहेत अशी इंद्रियातीत केवळ चेतनयुक्त ज्ञानस्वरू असणारी आणि सर्व भावांचा, वृत्तींचा, कल्पनांचा अभाव असणा अशी अमनस्क सहजज्ञानसमाधिवस्था मला कधी प्राप्त होईल ॥ २३ ॥

प्रत्यग्विमर्शातिशयेन पुंसाम् ।
प्राचीनगंधेषु पलायितेषु ॥
प्रादुर्भवेत्काचिदजाड्यनिद्रा ।
प्रपंचचिन्तां परिवर्जयन्ती ॥ २४ ॥

**अर्थ** :– आत्मविषयक सूक्ष्म विचारांच्या पराकाष्ठेमुळे कि अखंड आत्मचिंतनाने अर्थात् आत्मशक्ती कुंडलिनीच्या सुषुम्नेमधी अखंड चालनामुळे व धारणेमुळे म्हणजे बुद्धी पूर्णपणे आत्माभिमु झाल्यामुळे पूर्वीचे म्हणजे जन्मजन्मांतरींचे सर्व संस्कार निःशेष ना पावल्यावर एखाद्याच भाग्यवंताच्या ठिकाणी प्रपंचचिंता न करणारी चिन्मयनिद्रा किंवा अजाड्यनिद्रा प्रकट होते. ॥ २४ ॥

विच्छिन्न–संकल्प–विकल्प–मूले ।
निःशेष–निर्मूलित–कर्म–जाले ॥
निरन्तराभ्यासनितान्तभद्रा ।
सा जृम्भते योगिनि योगनिद्रा ॥ २५ ॥

**अर्थ** :– सिद्धयोगाच्या दीर्घकाल, निरंतर व सत्काराने केलेल्या साधनाभ्यासामुळे उत्पन्न झालेल्या ज्ञान व वैराग्य यांमुळे संकल्प विकल्पाची बीजे मुळापासून तुटून गेल्यामुळे व प्रारब्ध, क्रियमाण आणि संचित या रूपाने असणारे सर्व कर्मजाल किंवा कर्मांचा सा

पूर्णपणे निर्मूल व दग्ध केल्यावर अत्यंत मंगल व कल्याणप्रद असणारी अलौकिक योग अर्थात् चिन्मयनिद्रा ही योग्याच्या ठिकाणी अध्यात्म परिपूर्तीचे द्योतक म्हणून स्वयंतेजाने आविर्भूत होते.॥२५॥

**विश्रान्तिमासाद्य तुरीयतल्पे ।**
**विश्वाद्यवस्थात्रितयोपरिस्थे ॥**
**संविन्मयीं कामपि सर्वकालं ।**
**निद्रां सखे निर्विश निर्विकल्पाम् ॥ २६ ॥**

अर्थ :– हे प्रिय मित्रा ! आत्म्याच्या विश्व, तैजस व प्राज्ञ ही नावे प्राप्त झालेल्या जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांच्या पलीकडे असलेल्या तुरीयावस्थेच्या अर्थात् चवथ्या अवस्थेच्या पलंगावर विश्रांती घेऊन तू त्या अनिर्वचनीय, अवर्णनीय व सर्व विकल्प शून्य अशा चिन्मय निद्रेत प्रवेश कर. ॥ २६ ॥

**प्रकाशमाने परमात्मभानौ ।**
**नश्यत्यविद्या–तिमिरे समस्ते ॥**
**अहो बुधा निर्मल–दृष्टयोऽपि ।**
**किंचिन्न पश्यन्ति जगत्समग्रम् ॥ २७ ॥**

अर्थ :– ( त्या तुरीय अवस्थेच्या प्रत्ययानंतर ) आत्मस्वरूपाचा सर्वश्रेष्ठ सूर्य उदित होऊन पूर्णज्ञानसूर्याचा सर्वत्र प्रकाश पसरल्यावर योगी साधकाच्या जीवनातून सर्व अविद्यारूपी अज्ञानांधकार निःशेष नष्ट होतो. त्यामुळे या ज्ञानीजनांची दृष्टी निर्मल होऊन अखिल दृश्य विश्व त्यांना मुळीच दिसत नसल्याचा त्या महाज्ञानी पुरुषांना महान् अनुभव येतो. ॥ २७ ॥

**सिद्धि तथाविध–मनो–विलयां समाधौ ।**
**श्रीशैल–शृङ्ग–कुहरेषु–कदोपलप्स्ये ॥**

गात्रं यदा मम लताः परिवेष्टयन्ति ।
कर्णे यदा विरचयन्ति खगाश्च नीडान् ॥ २८ ॥

अर्थ :– श्रीशैल पर्वतावरील गुहेमध्ये म्हणजे सहस्राराम सहस्रदल कमलात उपरोक्त प्रकारे वर्णिलेली चिरस्थायी मनोल्म किंवा सामरस्याची परिपूर्ती होऊन निर्विकल्प समाधी मला के वरे प्राप्त होईल ? या स्थितीत राहिल्यावर लता म्हणजे वेली म शरीर केव्हा वेष्टून टाकतील आणि कर्णपुटात पक्षीगण केव्हा घ करतील ? ॥ २८ ॥

विचरतु मतिरेषा निर्विकल्पे समाधौ ।
कुचकलशयुगे वा कृष्णसारेक्षणानाम् ॥
चरतु जडमते वा सज्जनानां मते वा ।
मतिकृत गुणदोषा मां विभुं न स्पृशन्ति ॥ २९ ॥

अर्थ :– माझी ही बुद्धी निर्विकल्प समाधीमध्ये स्थिर राहो अ मृगांगनेप्रमाणे विलोलदृष्टी असलेल्या तरुण स्त्रियांच्या कुच युगलावर संचार करो. ती सज्जनांच्या किंवा विद्वानांच्या विचा सहमत होवो किंवा मूढ जडवाद्यांच्या मताकडे जावो. बुद्धी गुणदोषांचा माझ्याशी काहीही संबंध नाही ; कारण बुद्धी ही भू आहे, तर मी भूमातीत आहे. मी सर्वातीत, निर्गुण, निरा निर्विकार, सर्वव्यापी व परिपूर्ण परब्रह्मस्वरूप आहे. ॥ २९ ॥

इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीगोविन्दभगवत् पादशिष्यस्य श्रीमच्छंकरभगवतः कृतौ योगतारावलिः समाप्ता

श्रीस्वामीमहाराजांच्या येथे स्वयंपाक करणाऱ्या ज्या स्त्रीच उल्लेख आलेला आहे त्या स्त्रीची हकीकतही अशीच वाचनीय त्या बाईंचे नाव सौ. सखूबाई असे होते. त्या वडोद्यातील एक ब्राह्मण कुटुंबातील होत्या. त्या अधूनमधून श्री... पाहून

गरुडेश्वराला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी जात असत. अशाच रीतीने एकदा त्या श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेल्या असता त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून त्यांच्या समोर एक श्रीफल ठेवले व कंबरेचा वटवा काढून त्यातून एक अधेलीचे नाणे काढून ते दक्षिणा म्हणून त्यांच्यासमोर ठेवले. ते नाणे ठेवताच त्यांच्या असे लक्षात आले की, आपण श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवलेली दक्षिणा ही अधेली नसून ते अधेलीच्या आकाराचे सोन्याचे नाणे आहे. (त्या दिवसांमध्ये अशी सोन्याची नाणी वडोदे संस्थानात चलनात होती.) श्रीस्वामीमहाराजांपुढे आपण ठेवलेले सोन्याचे नाणे पाहून सौ. सखूबाईंच्या मनात विकल्प निर्माण झाला; पण त्यासंबंधी काही एक न बोलता त्या प्रसादासाठी आपली ओंजळ पसरून श्रीस्वामीमहाराजांपुढे उभ्या राहिल्या. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी प्रसादाचा नारळ त्यांना दिला व ते त्यांना असे म्हणाले की, "घरी गेल्यावर नारळ फोडून सर्वांनी प्रसाद घ्या." पुढे सौ. सखूबाई यथावकाश वडोद्याला आपल्या घरी परत आल्या. त्यांनी दुसऱ्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी प्रसादासाठी दिलेला नारळ फोडताच त्यातून तत्काळ श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवलेली ती सोन्याची गिन्नी बाहेर पडली. ते सोन्याचे नाणे अशा प्रकारे परत मिळताच सौ. सखूबाई काय समजावयाचे ते समजल्या. त्याच दिवशी त्यांनी आपले कपडे पिशवीत भरले व श्रीस्वामीमहाराजांच्या चरणसेवेसाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वराची वाट धरली.

श्रीस्वामीमहाराजांचे आपल्या सर्व भक्तमंडळीवर अत्यंत प्रेम असे; परंतु सर्व लोकांच्या देखत ते उघडपणे दर्शवीत नसत आणि ज्यावेळी इतर लोक दर्शनासाठीं येतील त्यावेळी अंतरंग भक्त-मंडळींनी आपला श्रीस्वामीमहाराजांशी काही परिचयच नाही असे

वागले व राहिले पाहिजे अशी त्यांची अपेक्षा असे. त्यामुळे बाहे भक्तमंडळी आली की, ते अंतरंग भक्तमंडळींशी बोलत नसत; ज्यावेळी एकांत मिळे त्यावेळी ते आपल्या अंतरंग भक्तमंड इतक्या प्रेमाने, आपुलकीने व अगदी जवळच्या नातेवाईकां नात्याने बोलत असत की, त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या प्रे ही अंतरंग भक्तमंडळी अगदी भारावून जात असत. मात्र हे त्या भक्तालाच कळत असे. इतरांना त्याचा मागमूस लागत न अशा रीतीनं ही श्रीस्वामीमहाराजांची वागण्याची, बोलण्याचं चालण्याची रीत होती.

श्रीस्वामीमहाराजांना श्री.गोपाळराव राजाध्यक्ष यांच्या बद्द असेच अत्यंत पुत्रवत प्रेम व आपुलकी वाटत असे. श्रीस्वामीम राजांनीच त्यांना कीर्तन करावयास शिकविले होते, हे मागे (खं पृष्ठ २७५ मध्ये) सांगितलेच आहे. अशा रीतीने श्रीस्वामीमहा व श्री. गोपाळबुवा राजाध्यक्ष यांचे पितापुत्रवत प्रेम असल्या श्री. गोपाळबुवा संधी मिळेल तेव्हा श्रीस्वामीमहाराजांचा चातु जेथे चालू असेल तेथे त्यांच्या दर्शनाला जात असत. ज्या दि श्री. गोपाळबुवा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले त्या श्रीस्वामीमहाराजांचे त्यांच्याकडे लक्ष न गेल्याने त्यांनी गोपाळबुवांची काहीच चौकशी केली नाही. जर श्रीस्वामीम राजांचे आपल्याकडे लक्ष गेले असते तर त्यांनी "काय आलास? ठीक आहे ना?" इत्यादि प्रश्न विचारून चौकशी असती व मोठ्या प्रेमाने बोलणे केले असते इत्यादि विचार गोपाळबुवांच्या मनात आले. मात्र "ज्या अर्थी श्रीस्वामीमहा आपल्याशी बोलले नाहीत त्याअर्थी त्यांची आपल्यावरील कृपा तर झाली नाही ना? श्रीस्वामीमहाराज आपल्याबरोबर

तर तोडू इच्छित नाहीत ना ?" इत्यादि प्रश्न श्री. गोपाळबुवांच्या मनात उत्पन्न होऊन त्यांना कमालीचे तीव्र दु:ख झाले. अशा रीतीने तो सबंध दिवस श्री. गोपाळबुवांनी मोठ्या जड व दु:खित अंत:करणाने व्यतीत केला.

श्रीस्वामीमहाराजांना आपल्या भक्तांच्या व्यथा शेकडोशे मैलांवरूनही कळत असत. अशा स्थितीत हा प्रसंग तर त्यांच्या सन्निध्यात घडला होता. श्री. स्वामीमहाराजांना श्रीगोपाळबुवांच्या अंत:करणातील विचार त्या रात्रीच कळले. त्यामुळे दुसऱ्या दिवशी सकाळी आन्हीक झाल्यावर श्रीस्वामीमहाराज स्वत:च श्रीगोपाळबुवांकडे गेले आणि अगदी आस्थेने त्यांना असे म्हणाले की, "केव्हा आलास ? सर्व ठीक आहे ना ? घरचे सर्व ठीक आहे ना ?" इत्यादी प्रकारे श्रीस्वामीमहाराज त्यांची कितीतरी वेळ अत्यंत आपुलकीने एखाद्या घरच्या माणसासारखी चौकशी करीत बसले. एकीकडे श्री. गोपाळबुवा श्रीस्वामीमहाराजांना उत्तरे देत होते; परंतु श्रीस्वामीमहाराज स्वत:हून आपली चौकशी करण्यासाठी आले व ते आपल्याला विसरले नाहीत, या एकाच विचाराच्या परमानंदाने ते इतके भारावून गेले होते की, त्यांची आधल्या दिवशीची उदासीनता व दु:ख कोठल्या कोठे पार पळून गेले. त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

अशा रोमांचित स्थितीत व अश्रू भरलेल्या नेत्रांनीच श्री. गोपाळबुवांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला व ते अत्यंत नम्रपणे व भारावलेल्या शब्दांनी असे म्हणाले की, "प्रभो ! मी कालच आलो. आपणाकडे येऊन नमस्कारही करून आलो होतो; परंतु लोकांच्या गडबडीमध्ये आपण मला पाहिले नसावे." त्यांनी इतके सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवसापासून त्यांना रात्री

भजन करण्यास सांगितले. या आज्ञेमुळे श्री. गोपाळबुवा यां खूप आनंद झाला. श्रीस्वामीमहाराजांनी केलेल्या चौकशी व त्यांनी केलेल्या आज्ञेमुळे श्री. गोपाळबुवा यांना बा ब्रह्मावर्तामधील शके १८२४ इ. स. १९०२ चे दिवस आठव कारण श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना तेथेच मोठ्या प्रेमाने क करावयाला शिकविले होते.

श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञा केल्याप्रमाणे त्या दि श्री. गोपाळबुवांनी तेथे भजन केले. त्यांनी श्रीस्वामीमहारा नाव गुंफून भजन म्हटले; पण श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना भजनात आपले नाव घेऊन भजन म्हणू नये असे सुचविले. श्री. गोपाळबुवा श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेत दहा दिवस रा त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी एके दिवशी त्यांना असे विचा की, "सध्या तुझा मुक्काम कोठे असतो? तेथे काय करतो हे प्रश्न ऐकताच श्री.गोपाळबुवा श्रीस्वामीमहाराजांना असे म्ह की, "हल्ली माझा मुक्काम कृष्णातीरी असून तेथे मी भजन करीत असतो." श्रीगोपाळबुवांचे हे उत्तर ऐक श्रीस्वामीमहाराजांना खूप संतोष झाला व ते त्यांना असे म्ह की, "एकांतस्थळी राहूनच श्रीदत्तात्रयांचे भजन केले पाहि तेच निर्वाणीचे साधन आहे. ज्याला एकांत मानवला तोच पुरुष होय. याकरिताच श्रीकृष्णांनी उद्धवाला आपल्या पादु देऊन श्रीक्षेत्र बद्रीकाश्रमी पाठविले होते. तूही एकांता श्रीकृष्णाकाठी राहून भजन कर म्हणजे या जन्मीच मुक्ती अधिकारी होशील."

श्रीस्वामीमहाराजांचे हे उपदेशामृत ऐकून श्री. गोपाळबुवां परम संतोष झाला. ते दुसऱ्या दिवशी श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून

येथे काही लोकांना भजन शिकविण्यासाठी निघून गेले. श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून निघताना इतकी गडबड झाली की, श्रीस्वामीमहाराजांचा शेवटचा निरोप घ्यावयाचा, त्यांना नमस्कार करावयाचा व त्यांच्याकडून प्रसाद घ्यावयाचा या सर्वच गोष्टी राहून गेल्या. त्यामुळे श्री. गोपाळबुवा राजाध्यक्ष दोन तीन दिवसांनीच भडोचवरून काही गुजराथी भक्तांबरोबर पुन्हा श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले.

श्री. गोपाळबुवा श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करावयास गेले त्यावेळी त्यांच्याकडे न पाहिल्यासारखे करून श्रीस्वामीमहाराज जरा मोठ्यानेच असे म्हणाले की, "गोपाळबुवा सांगितल्याशिवायच निघून गेला. आमच्यावर रागावला तर नाही ना?" श्रीस्वामीमहाराजांच्या या शब्दात किती आपुलकी व प्रेम होते ते फक्त एक श्री. गोपाळबुवांनाच कळले. ते पुढे होऊन श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "आपल्याला सांगितल्याशियाय गेल्यामुळेच मी पुन्हा आपल्या दर्शनासाठी परत आलो." श्री. गोपाळबुवांचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी मंदस्मित केले व त्यांनी साष्टांग नमस्कार घातल्यावर त्यांना प्रसाद नारळ देऊन प्रेमपूर्ण निरोपाने त्यांची पाठवणी केली.

श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील भक्त व श्रीक्षेत्र माणगावच्या देवस्थानची सर्व व्यवस्था पाहणारे त्यांचे जणू काही उजवे हात असलेले श्री. रामभाऊ सवनीस यांचे चिरंजीव श्री. अमृतराव हे वडोदा संस्थानामध्ये न्यायाधीशाच्या जागेवर होते. त्यांचे पूर्वीचे नाव श्री. गजानन असे होते. पुढे ते सवनीस कुळातीलच श्री. पुरुषोत्तम सवनीस यांना दत्तक गेल्यामुळे त्यांचे दत्तक नाव श्री. अमृतराव पुरुषोत्तमराव सवनीस असे झाले होते. श्री. अमृतराव हे श्रीस्वामी

महाराजांचे परमभक्त होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आहे, असे समजल्यावर ते तत्काळ त्यांच्या दर्शनासाठी तेथे आले.

श्री. अमृतराव श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी त्यांच्या झोपडीत गेले असता श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना दर्शन देण्यास नकार दिला; कारण त्यांच्या डोक्यावर केस वाढले होते. त्यांना श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एका भक्तसेवकातर्फे असे कळविले की, "डोक्यावरचे केस काढून शिखा ठेवून या म्हणजे दर्शन होईल." श्रीस्वामीमहाराजांचा हा निरोप ऐकताच श्री. अमृतरावांनी तत्काळ क्षौर करून मस्तकावर शिखा धारण केली व आपल्या मंडळींना व मुलाबाळांना घेऊन ते श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले. त्या दिवशी दर्शनादि व प्रसादादि सर्व कार्यक्रम आटोपल्यावर त्यांच्या असे लक्षात आले की, श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे राहण्याची चांगली सोय नाही. त्यामुळे दुसऱ्या दिवशी परत जावे असे त्यांनी ठरविले व त्याप्रमाणे त्या दिवशी रात्री श्रीस्वामीमहाराजांची संमतीही मिळविली.

आधल्या दिवशी ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी श्री. सवनीस आपल्या सर्व मंडळींसह वडोद्याला परत जाण्यास निघाले असताना त्यांच्या मनात असे आले की, जाताना आपण श्रीस्वामीमहाराजांचे पुन्हा एकदा चरण दर्शन व प्रसाद घेऊन निघावे. परंतु आपली इच्छा कितीही तीव्र असली तरी ही गोष्ट घडणे शक्य होणार नाही याची जाणीव त्यांना लगेच झाली; कारण त्यावेळी श्रीनारदेश्वराच्या मंदिरात नेहमीप्रमाणे भाष्यपाठ चालू होता. अशा प्रकारे भाष्यपाठ चालू असताना कोणालाही तेथे जाण्याची अनुज्ञा नव्हती; मग दर्शन, संभाषणादि होणे

फार दूरची गोष्ट होती.

श्री. अमृतरावांचे मन अशा रीतीने दर्शनाला उत्सुक असले तरी ते शक्य होणार नसल्यामुळे व निघण्याचीही वेळ झाल्यामुळे शेवटी ते आपल्या घरातील सर्व मंडळींसह अत्यंत खिन्न मनाने नावेत बसावयास गेले. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन व प्रसाद न घेताच आपण परत जात आहोत याचे श्री. अमृतरावांना जितके वाईट वाटत होते त्याच्या शतपट त्यांच्या सौ. मंडळींना खेद होत होता. अशा मनस्थितीत ते दोघे पतिपत्नी नौकेत बसली व तेथूनच त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलांना नमस्कार करून अशी प्रार्थना केली की, " प्रभो ! आपल्या परमकृपेने पुन्हा आपल्या चरण दर्शनाचा व प्रसादप्राप्तीचा योग येवो. "

अशा प्रकारे उभयतांनी मनोमन प्रार्थना केली असता व नौका सुटण्याची वेळ आली असता श्रीस्वामीमहाराजांकडून एक सेवकभक्त तीर्थप्रसाद घेऊन आला व तो श्री. अमृतराव यांना असे म्हणाला की, " भाष्यपाठ सुरू असताना श्रीस्वामीमहाराजांना एकदम आपली आठवण झाली. त्यामुळे त्यांनी हा तीर्थ-प्रसाद आपणाकरिता पाठविला आहे. तरी आपण हा प्रसाद, अंगारा घ्या व मग निघा. " श्रीस्वामीमहाराजांनी पाठविलेला तो प्रसाद व अंगारा श्री. अमृतरावांनी मस्तकावर धारण केला. त्यावेळी त्यांना व त्यांच्या सौ. मंडळींना गहिवरून येऊन त्यांचे अंतःकरण व डोळे भरून आले. त्यावेळी त्यांना श्रीसंत तुकाराममहाराजांच्या अभंगाची आठवण येऊन ते अधिकच सद्गदित झाले. कारण श्रीसंत तुकाराममहाराजांनी या दृष्टीनेच असे म्हटले आहे की–

... १५

पाहें प्रसादाची वाट । द्यावें धुवोनियां ताट ॥१॥
शेष घेऊनी जाईन । तुमचें झालिया भोजन ॥२॥
झालो एकसवा । तुम्हां आडूनियां देवा ॥
तुका म्हणे चित्त । करूनी राहिलो निश्चित ॥४॥

याचा अर्थ असा आहे की, देवा ! मी तुमच्या प्रसादाची वा
पाहत आहे. आपण आपले भोजन झाल्यावर जेवणाचे ताटच धु
द्या. असे झाले म्हणजे तुमच्या भोजनाचा शेष प्रसाद म्हणून म
मिळेल. तो घेऊन मी जाईन, हे देवा ! आता शेष प्रसाद म
मिळाला आहे. मी आता तुमच्या समोरून एका बाजूला झा
आहे. श्रीसंत तुकाराम महाराज असे म्हणतात की, मी आ
आपले स्वतःचे चित्त चितारहित करून शांतपणे राहिलो आ

उपरोक्त कथेमध्ये श्री. अमृतराव सबनीसांचा उल्लेख आ
आहे. त्यांना श्रीस्वामीमहाराजांनी डोक्यावरील केस उतरवि
शिवाय जे दर्शन दिले नव्हते ते जितके शास्त्राज्ञेचे परिप
होण्याकरिता होते तितकेच ते व श्री. सबनीस कुटुंबिया
श्रीस्वामीमहाराजांचे जे प्रेम व जो लोभ होता त्याचेच निद
होते. श्री. रामभाऊ सबनीसांच्या पुण्याईनेच त्यांचे चिरं
श्री. अमृतराव यांना श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेचा लाभ झा
होता. पुढे कालौघात श्री. अमृतराव सबनीस श्रीस्वामीमहाराजां
दर्शनासाठी पुन्हा एकदा श्रीक्षेत्र गरुडेश्वरी गेले होते. त्यां
त्यांच्याबरोबर पुष्कळ मंडळी होती. त्यातच त्यांचा नोक
त्यांच्याबरोबर होता. यावेळी श्री. अमृतराव काही दिवस श्री
गरुडेश्वरी श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेसाठी व त्यांच्या सत्
लाभासाठी मुद्दाम आग्रहपूर्वक राहिले. श्री. अमृतराव यांना
जेवणानंतर नाक निवाची सवय होती. सर्वांची सवय

कोकणात राहणाऱ्या मंडळींना असते. असे असले; तरी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे दूधदुभते नसल्यामुळे ताक मिळण्याची मोठी पंचाईत पडत असे. मात्र पर्णकुटीमध्ये श्रीस्वामीमहाराजांसाठी ताक बनविले जात असे किंवा ताकाची काहीतरी सोय करण्यात येत असे अगर बहुतांशी श्री. छगन मास्तरांची मंडळी तिलकवाड्याहून ताक तयार करून ते मधल्या वाटेने पायात काही एक न घालता डोक्यावर मातीचे मडके ठेवून त्यातून घेऊन येत असत.

एके दिवशी श्री. अमृतराव यांच्याकडे ताक नसल्यामुळे त्यांनी आपल्या नोकराला श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीतून ताक मागून आणावयास सांगितले; परंतु त्याला त्या दिवशी काही महत्त्वाच्या कामासाठी तिलकवाड्याला जावयाचे असल्यामुळे तो त्या गडबडीत ताक आणावयाचे विसरून गेला. त्यामुळे त्या दिवशी श्री. अमृतरावांना नेहमीप्रमाणे भोजनानंतर ताक प्यावयास मिळाले नाही. त्यानन्तर रोजच्याप्रमाणे श्री. अमृतराव जेवणानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीत येऊन बसले. ते बसताक्षणीच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " तुम्हाला आज नेहमीप्रमाणे ताक प्यावयास मिळाले नाही ना ? ते पाहिजे आहे ना ? " असे म्हणून श्री. अमृतराव यांच्या उत्तराची वाट न पाहता त्यांनी त्यांना पावशेर ताक पिण्यास दिले.

अशाच रीतीने पुढे पुन्हा एके दिवशी श्री. अमृरावांनी आपल्या सौ. वहिनींना श्रीस्वामीमहाराजांकडून ताक मागून आणण्यास सांगितले. ज्यावेळी श्री. अमृतराव यांच्या वहिनी ताक मागण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांकडे गेल्या त्यावेळी त्यांच्या दर्शन घेण्याच्या आनंदामध्ये त्या त्यांना ताक मागावयाचे विसरून गेल्या. ज्यावेळी त्या दर्शन घेऊन परत आल्या त्यावेळी श्री. अमृतराव

जेवावयास वसले होते. त्यामुळे आपल्या वहिनींना दरवाज्या पाहताच श्री. अमृतरावांनी त्यांना "ताक आणले का?" म्हणू विचारले. त्यावेळी त्या श्री. अमृतराव यांना असे म्हणाल्या "श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेता घेता माझे मन हरपून गेले मला इतका अपरिमित आनंद झाला की, त्या नादात मी श्रीस्वामी महाराजांना ताक मागावयाचे विसरून गेले." श्री. अमृतराव त्यांचे हे म्हणणे ऐकत असतानाच श्रीस्वामीमहाराजांकडून माणूस ताक घेऊन आला व तो त्यांना असे म्हणाला की, "श्रीस्वामीमहाराजांकडून आलो असून त्यांनी मला असे सांगू आपल्याकडे पाठविले आहे की, श्री. अमृतराव जेवावयास बसले आहेत. त्यांना हे ताकाचे मडके नेऊन दे." इतके सांगून माणसाने ते मडके तेथे ठेवले व तो निघून गेला. श्रीस्वामीमहाराजांची दिव्य दृष्टी व प्रेम पाहून श्री. अमृतराव अगदी भारावून गेले. त्यांच्या डोळ्यात पाणी तरळू लागले.

वरील दोन्ही कथा वाचल्या म्हणजे श्रीस्वामीमहाराजांचे आपल्या भक्तांवरील अलौकिक प्रेम पाहून श्रीसंत तुकाराम महाराजांच्या पुढील अभंगांचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही.

लेंकुराचें हित । जाणे (वाहे) माउलीचें चित्त ॥ १ ॥
ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभाविण प्रीती ॥ २ ॥
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें । तुम्हां संतांवरी ओझें ॥ ४ ॥

* * *

करावा संकोच चित्ताचि भोंवता । होय तें बहुतां सुख कीजे ॥
देवाची पूजा हें भूताचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥

**रुसावे फुगावें आपुलियावरी । उरला तो हरी सकळही ॥ ३ ॥**
**तुका म्हणे संतपण याचि नांवें । जरी होय जीव सकळांचा ॥४॥**



श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रोज रात्री दहा ते एक-दीड वाजेपर्यंत भजन होत असे. भजन संपल्यावर तेथे जमलेल्या सर्व मंडळींना प्रसाद वाटला जात असे. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रात्री भोजनाची व्यवस्था नसल्यामुळे सर्वांना चांगल्या तुपाचा शिरा, हरभऱ्याच्या किंवा मुगाच्या डाळीची उसळ, सांजा, फळे इत्यादि सर्व पोटभर खाण्यास मिळत असे. एके दिवशी रात्री श्री. अमृतराव सबनीस श्रीस्वामीमहाराजांच्या शेजारीच भजन ऐकण्यास बसले होते. भजन संपल्यावर एका भक्ताने प्रसाद वाटण्यास सुरुवात केली. त्या भक्ताच्या हातात प्रसादाचे जे भांडे होते ते लहान होते व त्या ठिकाणी तर तीन चारशे मंडळी भजनासाठी जमली होती. ही वास्तविक स्थिती लक्षात येताच श्री. अमृतराव सबनीस यांच्या मनात अशी शंका आली की, "एवढ्या छोट्याशा भांड्यातील प्रसाद इतक्या सर्व लोकांना कसा पुरेल ?" अशा स्थितीत तो सेवक-भक्त प्रसाद वाटण्याचे काम करीतच होता. सर्व लोकांना प्रसाद वाटून झाल्यावर त्या सेवक-भक्ताने ते प्रसादाचे भांडे श्रीस्वामीमहाराजांच्या समोर आणून ठेवले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्या भक्तसेवकाला असे म्हणाले की, "त्याचे झाकण काढ पाहू, त्यात किती प्रसाद शिल्लक राहिला आहे ? आत बसलेल्या बायकांना अद्याप प्रसाद वाटावयाचा राहिला आहे." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच त्या सेवक–भक्ताने प्रसादाच्या भांड्यावरील झाकण काढून किती प्रसाद शिल्लक राहिला ते

श्रीस्वामीमहाराजांना दाखविले. श्री. अमृतराव सवनीस शेजारी बसलेले असल्यामुळे त्यांनीही त्या भांड्याकडे पाहिले.त्यावेळी त्यां ते प्रसादाचे भांडे अर्धे-अधिक भरलेले आहे असे दिसून आले पाहताच श्रीस्वामीमहाराजांकडे रिद्धी-सिद्धी पाणी भरीत असल्या श्री. अमृतरावांच्या लक्षात आले व श्रीस्वामीमहाराजांचे अ सामर्थ्य पाहून ते दिङ्मूढ झाले. श्रीस्वामीमहाराज मानव देहधा साक्षात् ईश्वर आहेत ही दृढ भावना होऊन आपण साक्षात् प्रभू सान्निध्यात आहोत या जाणिवेने त्यांना स्वत:चीच अत्यंत धन्य वाटली.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रावण कृष्ण अष्टमीला श्रीकृष्ण जयंती उत्सव मोठ्या थाटाने करावयाचा असे श्रीस्वामीमहाराजांनी सर्वां सांगितले. हा उत्सव पर्णकुटीच्या म्हणजे सध्या जेथे श्रीस्वामी महाराजांचे समाधिमंदिर आहे त्याच्या वरच्या भागात म्ह हल्लीच्या श्रीदत्तमंदिराच्या जागेत करण्याचे निश्चित करून त जागेत असलेले बरेच दगड वगैरे काढून ती जागा साफ करण्या काम सुरू झाले. साफसफाई करणारे लोक अगदी थोडे असून उ साजरा होण्याचा दिवस उजाडला तरी एकंदर कामाची गती आहे असे पाहून अष्टमीच्या दिवशी श्रीस्वामीमहाराज स्वत: तेथे जाऊन साफसफाईचे काम करू लागले. श्रीस्वामीमहारा स्वत:च जागासाफ करू लागल्याचे पाहून बाकीची मंडळीही जम व त्यांनी सर्वांनी मिळून जागा साफ केली.

त्या जागी रात्री बैठकी टाकून तेथे दोन किटसनचे दिवे म्ह गॅसच्या दोन वत्त्या लावण्यात आल्या. त्या जागी पूर्वी असले कधीच लागले नव्हते; त्यामुळे आसपासच्या लोकांना त्याचे कुतूहल वाटत होते. रात्री उत्सव सुरू होण्यापूर्वी श्रीस्वामीमहारा

तेथे येऊन वसले व श्री. गोपाळबुवा राजाध्यक्ष यांचे कीर्तन झाले. त्यानन्तर नेहमीप्रमाणे भजनास सुरुवात झाली. थोड्या वेळाने श्रीनर्मदेच्या पलीकडील किनाऱ्यावर पाऊस पडू लागल्याचे दिसू लागले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ श्री. सवनीस वसले होते. ते त्यांना असे म्हणाले की, "प्रभो ! भजन अगदी रंगात आले आहे. यावेळी जर पाऊस आला तर सर्वच मंडळींचा बेरंग होईल. तरी आता मोठी पंचाईतच येईल." श्री. सवनीस यांचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी आकाशाकडे पाहिले व ते त्यांना असे म्हणाले की, "पावसाची धास्ती नको. तो काही भजनाचा बेरंग करणार नाही. आपले भजन चालू द्या." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगितल्यावर भजनाला आणखीनच रंग भरला.

त्यानंतर भजन संपवून सर्व मंडळी पर्णकुटीत आली आणि कृष्णजन्म झाला. त्यावेळी पाळण्याची दोरी ओढताच पाऊस गर्जना करून पडू लागला. तेव्हा श्रीस्वामीमहाराज श्री. सवनीस यांना असे म्हणाले की, "सवनीस हा घ्या मघाचा पाऊस !" श्रीस्वामीमहाराजांचे हे अद्भुत सामर्थ्य व लीला पाहून श्री. सवनीस आश्चर्यचकित झाले.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास चालू असताना एकदा एक वृद्ध व अशक्त ब्राह्मण गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. त्यांना सतत ताप येत असल्यामुळे ते अशक्त झाले होते. ते काही दिवस श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहून चांगले बरे झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांची परवानगी घेऊन घरी जाण्यास निघाले. त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार दंडवत प्रणाम करून त्यांची परत

निघण्याविषयी आज्ञा मागितली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्हाला खूप लांब जावयाचे आहे; तुमच्या प्रवासाचा पल्ला खूप दूरचा आहे, तरी यासाठी पाथेय म्हणून थोडे साबुदाणे बरोबर घेऊन जा." श्रीस्वामीमहाराज असे म्हणताच ते ब्राह्मणगृहस्थ त्यांना असे म्हणाले की, "आज सकाळपासून मी साबुदाणे शोधतो आहे; परंतु ते अजूनपर्यंत मला मिळाले नाहीत." त्यांचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "येथे सवनीस आहेत. ते तुम्हाला साबुदाणे देतील."

श्रीस्वामीमहाराजांनी ज्यावेळी त्या ब्राह्मणगृहस्थांना हे सांगितले त्यावेळी श्री. सबनीस हे वाहेरच वसले होते. त्यांनी हे शब्द वाहेरून ऐकल्यावरोवर ते मोठ्या विचारात पडले व त्यांना अशी चिंता उत्पन्न झाली की, "आता या गृहस्थांना साबुदाणे कोठून द्यावेत? येथे तर साबुदाणे नाहीत आणि श्रीस्वामीमहाराजांची इच्छा तर यांना साबुदाणे देण्याची आहे. मग ती कशी पूर्ण व्हावी?" असे विचार श्री. सबनीस यांच्या मनात येऊन ते काळजीत पडले असतानाच श्रीक्षेत्र गरुडेश्वर तालुक्याचे अव्वल कारकून श्री. सबनीस यांना भेटण्यास आले व बोलता बोलता त्यांना असे म्हणाले की, "या कुग्रामात श्रीस्वामीमहाराजांचे वास्तव्य झाल्यापासून आमच्या घरी आम्हाला सर्व प्रकारचे जिन्नस अगदी भरपूर प्रमाणात मिळू लागले असून सर्व जिनसांची समृद्धी झाली आहे. आत्ताच एका मुंबईच्या गृहस्थाने परत जाताना आमच्याकडे साबुदाणे ठेवून दिले आहेत." हे ऐकताच श्री. सबनीस यांना आश्चर्य वाटले. त्यांनी एकंदर सर्व हकीकत त्या अव्वल कारकुनांना सांगून त्यांच्या घरून साबुदाणे आणवून त्या ब्राह्मण गृहस्थांना दिले. ते साबुदाणे घेऊन ते ब्राह्मण गृहस्थ निघून गेल्यावर श्री. अनंतराव सवनीस श्रीस्वामी

महाराजांना असे म्हणाले की, "प्रभो! अव्वल कारकुनाकडून साबुदाणे आणून आपण सांगितल्याप्रमाणे ते त्या ब्राह्मण गृहस्थांना दिले." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज श्री. सवनीस यांना असे म्हणाले की, "शाबास सवनीस! एका ब्राह्मणाची अडचण दूर करून त्यांच्या प्रवासाची सोय केली हे फारच उत्तम केलेत!"

श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील वास्तव्याच्या काळात उपरोक्त कथेप्रमाणेच साबुदाण्यासंबंधी आणखी एक कथा घडून आली. श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील एक बाई श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्या होत्या. काही दिवस तेथे राहून श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगाचा लाभ घेतल्यावर ज्यावेळी त्या परत जाण्यास निघाल्या त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांकडे येऊन त्यांना असे म्हणाल्या की, "प्रभो! आता मी परत वाडीला जाते. मला वाटेत उपयोगी पडावेत म्हणून चार आण्यांचे साबुदाणे हवे आहेत." ज्यावेळी त्या बाई श्रीस्वामीमहाराजांकडे साबुदाणे मागत होत्या त्याचवेळी वडोद्याला जाऊन परत आलेले श्री. अमृतराव सबनीस श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले होते. त्यांनी वडोद्यांहून येताना साबुदाणे आणले होते. हे श्रीस्वामीमहाराजांना माहीत नव्हते. असे असले; तरी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "मागील वेळी तुम्ही एका वृद्ध व गरीब ब्राह्मणाला साबुदाणे देऊन त्यांची गरज भागविलीत व अडचण दूर केलीत त्याप्रमाणे या खेपेस या बाईंचीही अडचण दूर करा." श्रीस्वामीमहाराजांचे हे शब्द ऐकताच श्री. अमृतराव यांनी वडोद्याहून बरोबर घेताना आणलेली आपल्या जवळील साबुदाण्याची पिशवी तत्काळ श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवली व त्यांना साष्टांग

नमस्कार घातला. त्यानंतर त्यांनी त्या पिशवीतील साबुदाणे काढून श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या त्या बाईंना दिले.

श्रीस्वामीमहाराजांचे श्री. अमृतराव सवनीसांवर अत्यंत प्रेम होते, हे त्यांच्यावर वारंवार झालेल्या कृपेमुळे दिसून येते. श्री. अमृतराव सवनीस हे खरोखरच अत्यंत भाग्यवान् व साधेसुधे गृहस्थ होते. त्यांना योग, मंत्र, तंत्र, असल्या गोष्टी माहीत नव्हत्या. एकमात्र श्रीस्वामीमहाराजांची केवळ ईश्वर भावाने भक्ती करणे एवढेच त्यांना ठाऊक होते. एकदा श्री. अमृतराव अगदी पहाटे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी त्यांच्या पर्णकुटीत गेले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज जागेच असून पर्णकुटीचे दार उघडेच होते. पण जवळपास कोणीसुद्धा नव्हते. आपण आत जाऊन श्रीस्वामीमहाराजांच्या एकांताचा भंग करावा की नाही, या विचारात श्री. अमृतराव गुंतले असता आतूनच श्रीस्वामीमहाराजांचे त्यांच्याकडे लक्ष गेल्याबरोबर त्यांनी त्यांना हाक मारून आत बोलाविले व आपल्याजवळ बसावयास सांगितले. त्यावेळी पर्णकुटीत कोणीच नव्हते. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक आसन आणि श्वासोच्छ्वासावर एका विशिष्ट रीतीने प्राणायाम करावयास शिकविले व त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्री.अमृतरावांना आसन घालून आपल्या समक्ष श्वासोच्छ्वासावर प्राणायाम करावयास सांगितले. त्याप्रमाणे साधनाभ्यास सुरू करताच श्री. अमृतराव यांचा अल्पावधीतच मनोलय झाला. या अवस्थेत श्री. अमृतराव काकड आरती होईपर्यंत बसून राहिले होते. मात्र ज्यावेळी काकड आरतीची वेळ झाली त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. अमृतराव यांना त्या अवस्थेतून जागे करून देहभानावर आणले. त्याच दिवशी सायंकाळी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. अमृतराव

सबनीसांना सकाळी त्यांना शिकविलेल्या प्राणायामाचा विधी लिहून दिला व त्याचा दररोज अभ्यास करण्यास सांगितले. जी साधना श्रीस्वामीमहाराजांकडून मिळविण्यासाठी अनेकांना कित्येक दिवस वाट पहावी लागत असे ती अपूर्व साधना श्री. अमृतरावांना न मागताच मिळाली.

श्री. अमृतराव यांना जो प्राणायाम श्रीस्वामीमहाराजांनी शिकविला त्याचे वर्णन महर्षी श्रीपतंजलींनी योगसूत्रातील साधनपादात "तस्मिन् सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेद: प्राणायाम: ॥२.४९॥" या सूत्रात केले असून त्याचा अर्थ आसन सिद्ध झाल्यावर या श्वासप्रश्वासांच्या गतीच्या विच्छेदाला म्हणजे श्वास व प्रश्वास या दोन्ही गती थांवणे म्हणजे त्यांची गती न चालणे अर्थात् केवळ कुंभक होणे याला प्राणायाम असे म्हणतात, असा आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी श्री. अमृतराव सबनीस यांना जे प्राणायाम साधन एकांतात सांगितले होते ते साधन अजपाजपविधी या नावाने प्रसिद्ध असून अत्यंत प्राचीन काळापासून भारत वर्षात चालत आलेले आहे, अशी सांप्रदायिकांची भावना आहे. भारतवर्षात प्राचीनकाळी जेव्हा "हंस" हा एकच वर्ण होता त्यावेळी या अजपाजपद्वाराच अर्थात् "सोऽहं" म्हणजे तो परमात्माच मी आहे अर्थात् "अहं ब्रह्मास्मि म्हणजे मी ब्रह्मच आहे" याप्रमाणे अहंग्रहोपासनेपासून सुरवात करून शेवटी "सर्वं खल्विदं ब्रह्म म्हणजे खरोखर सर्व काही ब्रह्मच आहे," या विराड् भावनेत समाप्ती करीत असत. यालाच विश्वात्मक व विश्वातीत उपासना असे म्हणतात.

श्वसन करणाऱ्या प्राणिमात्राच्या ठिकाणी हा अजपाजप जन्माच्या क्षणापासून मरणाच्या क्षणापर्यंत अखंडपणे; पण न

कळत चाललेला असतां. या विधीला अनुसरून त्याचा संकल्पपूर्वक उच्चार केला आणि असा क्रम नित्यनियमाने प्रत्यही ठेवला म्हणजे हा जप जाणिवेच्या कक्षेंत येऊन त्याचे सहजपणाने अनुसंधान राहू लागते. दीर्घकाळ असा क्रम चालविल्यास मनाशी या जपाचे इतके तादात्म्य होते की, रिकाम्या असलेल्या कोणत्याही क्षणी या जपावर मन तत्काळ एकाग्र होते आणि महर्षी श्रीपतंजलींनी योगसूत्रात "तज्जपस्तदर्थभावनम् ।। समाधिपाद २८ ।।" या समाधिपादात लिहिलेल्या सूत्राप्रमाणे अभ्यास सहजपणे घडू लागतो. याचा अर्थ असा आहे की, "प्रणवाचा जप तसेच त्याच्या अर्थाचे चिंतन करणे हे ईश्वर प्रणिधान म्हणजे ईश्वरभक्ती होय. या सूत्राचा महर्षी श्रीव्यासांनी आपल्या भाष्यात अर्थ स्पष्ट करताता असे म्हटले आहे की, प्रणवाचा (अर्थात् येथे "सोऽहंचा) जप व तद्वाच्य जो ईश्वर त्याचे वरचेवर चित्तात चिंतन याप्रमाणे प्रणवाचा जप करणाऱ्या व प्रणवाच्या अर्थाचे वारंवार ध्यान करणाऱ्या योग्याचे अंतःकरण एकाग्र होते. याविषयी विष्णुपुराणात असे म्हटले आहे की, "स्वाध्यायाद्योगमासीत योगात्स्वाध्यायमामनेत् । स्वाध्याययोग-संपत्त्या परमात्मा प्रकाशते ।। " याचा अर्थ असा आहे की, वेद अथवा "ॐ" अथवा "सोऽहं" याचा जप व अर्थाची भावना करून योगाभ्यास करावा आणि समाधिस्त होऊन प्रणवजप व त्याच्या अर्थाचे भावन म्हणजे चिंतन करावे. अशा या स्वाध्यायाच्या व योगाच्या बलाने ईश्वराचा साक्षात्कार होतो.

अशा प्रकारे उपासना केली असता त्याचे फळ काय मिळते हे सांगताना पुढील सूत्रात असे म्हटले आहे की, "ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तराभावश्च ।। २९ ।।" याचा अर्थ असा आहे की, "त्या ईश्वरभक्तीने आत्म्याचा साक्षात्कार होतो व सर्व

विघ्ने दूर होतात. महर्षी श्रीव्यासांनी यासंबंधी भाष्यात असे म्हटले आहे की, "पूर्वी सांगितलेल्या प्रकारे ईश्वराची भक्ती केली असता त्या ईश्वरभक्तीने योगात होणाऱ्या व्याधी इत्यादिक विघ्ने होत नाहीत आणि साधक योग्याला आपल्या जिवाच्या खऱ्या स्वरूपाचा साक्षात्कार होतो. त्यावेळी जसा ईश्वर हा चैतन्ययुक्त पापपुण्य विवर्जित, दुःखरहित, केवळ ज्ञानस्वरूप व उपद्रवरहित असा आहे तसेच आपणही बुद्धिवृत्तीचे साक्षी पुरुष आहोत असा निश्चय होतो.

या अभ्यासाने चित्तात प्रसुप्तावस्थेत असलेले अनंत जन्मातील पापसंस्कार धुऊन जातात. चित्त स्वच्छ, शांत आणि प्रसन्न होऊन शारीरिक व्याधी व मानसिक आधी यांची पीडा दूर होते. "सोऽहं" हा जप करीत असताना ज्यावेळी कालांतराने त्यातील "स" कार व "ह" कार हे गळून पडतात त्यावेळी ॐकाराचा जप किंवा ध्यान अगदी अनायासाने होते.

प्रत्येक साधक-योग्याने सूर्योदयापूर्वी उठून पुढीलप्रमाणे या "सोऽहं" जपाचे साधन करावे. त्यामुळे या मंत्राच्या विनियोगात म्हटल्याप्रमाणे अशेष अघनाशाचा म्हणजे पापनाशाचा क्रम चालू झाल्याची प्रचीती येते.

रोज सकाळ-संध्याकाळ घोंगडीच्या किंवा ब्लॅंकेटच्या आसनावर पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे मुख करून डोळे मिटून वसावे व त्यानंतर श्वासप्रच्छ्वासाबरोबर "सोऽहं" या महामंत्राचा पुढीलप्रमाणे जप करावा. प्रथम श्वास आत घेतांना "सो" असे श्वासावरोवरच एकदा मनातल्या मनात म्हणावे व श्वास वाहेर सोडताना "हं" असे प्रच्छ्वासावरोवर एकदा मनातल्या मनात म्हणावे. अशा रीतीने "सोऽहं" या महामंत्राचा जप करावा.

"सोऽहं" हा "अहंब्रह्मास्मि", "अयमात्माब्रह्म" "तत्त्वमसि"

व "प्रज्ञानंब्रह्म" या चार महावाक्यातील साररूप महा असून त्याचा श्वासप्रच्छ्वासावरोवर आपणास होईल तितका जप करावा. अशा प्रकारे जप करताना मध्येच श्वासप्रच्छ्वास थां किंवा कोंडले गेले आणि प्राण घुसमटल्यासारखे झाले तरी घाव नये व जप बंद पडला तरी पडू द्यावा. मन जाग्यावर आल्या पुन्हा वरील प्रकारे जप चालू ठेवावा. जप करताना जप बंद हो जीवशिवात्मैक्य अर्थात् सामरस्यावस्था प्राप्त होणे हाच याप्र अजपाजप साधना करण्याचा एक मात्र हेतू आहे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वरच्या या मुक्कामात एके दिवशी एक बा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले. श्रीस्वामीमहाराज सर्वा उपासना देतात हे पाहून आपणही एखादा मंत्र श्रीस्वामीमहारा कडून घ्यावा व उपासना करावी अशी त्या वाईंना इच्छा झाली त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "प्रभो! आपण सर्वा मंत्रजप देऊन उपासना सांगता आहात. तरी मलाही आ मंत्रजप अनुग्रह देऊन कृतार्थ करावे." त्या बाईंचे हे म्हणणे ऐक श्रीस्वामीमहाराज विनोदाने त्यांना असे म्हणाले की, "तुम्हा काही मंत्रोपदेश देऊन उपासना सांगणे योग्य होणार नाही; का तुम्ही जप करीत असताना तुमचे यजमान घरी आले तर त्यां जागेवरून न उठता तुम्ही त्यांना तेथूनच असे सांगाल "चुलीवर सर्व अन्न तयार करून ठेवले आहे तेवढे तुम्ही वा घ्या." श्रीस्वामीमहाराज त्या बाईंना असे सांगत असताना वाईंचे यजमान तेथे मागेच उभे होते. ते त्यावेळी श्रीस्वामीम राजांना असे म्हणाले की, "महाराज ! आपण म्हणता ते अ वरोवर आहे. ही मला नेहमी असाच त्रास देते." हे सर्व चा असताना तेथे शेजारीच उभ्या असलेल्या श्री. अमृतराव सवनीसां

पाहात श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " अमृतराव तुम्ही न्यायाधीश आहात. तुमच्या न्यायालयात असेच जावज़्ब्राव होतात का ? येथे पाहा. नुसता जवान्यांना जोर चढला आहे. " एवढे बोलून श्रीस्वामीमहाराज गप्प बसले. श्रीस्वामीमहाराज उगीच कोणाही अनधिकारी व्यक्तीला उपदेश देत नव्हते, हेच खरे आहे.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी त्या स्त्रीला मंत्रोपदेश न देण्याचे खरे कारण काय असावे याच्या अंतरंगात प्रवेश केला म्हणजे त्यांना मान्य असलेला श्रीगुरुचरित्रातांतर्गत स्त्रीधर्म अर्थात् पतिव्रताधर्मच मान्य असल्याने त्यांच्या "स्त्रीशिक्षा" या ग्रंथावरून स्पष्ट होते. श्रीगुरुचरित्रातील पुढील ओव्यांवरून हा दृष्टिकोन कसा स्पष्ट होतो हे पाहणे व त्याप्रमाणे स्त्रियांनी वागणे नितांत आवश्यक आहे, हाच स्त्रियांच्या दृष्टीने त्यांचा संदेश आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही काही वावगे आहे असे म्हणता येणार नाही. श्रीगुरुचरित्रात स्त्रीचा हा पतिव्रताधर्म सांगताना श्रीसरस्वतीगंगाधर असे म्हणतात की—

**पतिव्रतेचें आचरण । सांगे गुरु विस्तारोन ।**
**पुरुष जेवितां प्रसाद जाण । मुख्य भोजन स्त्रियेसी ॥ ३१.३२ ॥**
**आणीक सेवा करणें । पुरुष देखोनी उभें राहणें ॥**
**आज्ञेविण बैसों नेणें । अवज्ञा न करणें पतीची ॥ ३३ ॥**
**दिवस अखंड सेवा करणें । अतिथिपूजनीं साह्य होणें ।**
**पतिनिरोपावीण कोठें न जाणे । दान धर्म न करावा ॥ ३४ ॥**
**पतीची सेवा निरंतरीं । मनीं भाविजे हाचि हरी ।**
**शयनकाळीं प्रेमें रात्रीं । सेवा करी भक्तीसी ॥ ३५ ॥**
**पति निद्रिस्त झाल्यावरी । आपण शयन कीजे नारी ।**
**चोळी तानवडें ठेवोनि दुरी । पुरुषासीं स्पर्शावें ॥ ३६ ॥**

स्पर्शे चोळी पुरुषासी । हानि होत आयुष्यासी ।
घेऊं नये नांव पुरुषासी । आयुष्य उणें होतसे ।। ३७ ।।
जागृत न होतां पति ऐका । पूर्वीं उठावें सतीनें देखा ।
करणें संमार्जन ऐका । गृहकृत्य मंगळ ।। ३८ ।।
स्नान करूनि त्वरित । पूजुनि घ्यावें पतितीर्थ ।
चरणीं मस्तक ठेवोनि यथार्थ । शिवसमान भावावें ।। ३९ ।।
असतां गृहीं पुरुष । शृंगार करणें सर्व हर्ष ।
ग्रामा गेलिया पुरुष । शृंगार आपण करूं नये ।। ४० ।।
पति निष्ठुर बोले जरी । आपण कोप न कदां करी ।
क्षमा म्हणोनि चरण धरी । मनीं प्रीति मानुनी ।। ४१ ।।
पति येतां बाहेरूनी । सामोरी जाय ते क्षणीं ।
सकळ कामें त्यजूनी । संमुख जाय पतिव्रता ।। ४२ ।।
काय निरोप म्हणूनि । पुसावें सती वंदोनी ।
जें वसे पतीच्या मनीं । त्याचपरीं रहाटावें ।। ४३ ।।
पतिव्रतेचें ऐसें लक्षण । सांगेन ऐका देवगण ।
बहिर्द्वारीं जातां जाण । अनेक दोष परियेसा ।। ४४ ।।
बहिर्द्वारीं जाणें जरी । पाहूं नये नरनारी ।
सर्वेचि परतावें लवकरी । आपुले गृही असावें ।। ४५ ।।
जरी पाहे बहिर्द्वारीं । उलूकयोनी जन्मे नारी ।
याच प्रकारें निर्धारीं । पातिव्रत्य लोपामुद्रेचें ।। ४६ ।।
लोपामुद्रा पतिव्रता । बाहेर नयेचि सर्वथा ।
प्रात:काळ जों होतां । संमार्जन करीतसे ।। ४७ ।।
देव उपकरणें उजळोनी । गंधाक्षतादि करूनी ।
पुष्प वाती पंचवर्णी । रंगमाळा देवांसी ।। ४८ ।।
अनुष्ठानास घरांत येता । साहित्य करी सर्व तत्त्वतां ।

धरोनी पतीच्या चित्ता । पतीसवें रहाटे ती ॥ ४९ ॥
पुरुषाचें उच्छिष्ट भोजन । मनोभावें करणें आपण ।
नसतां पुरुष घरीं जाण । घ्यावा अतिथिधेनुप्रसाद ॥ ५० ॥
अतिथीस घालावें अन्न । अथवा धेनूतें पूजोन ।
करी सगुण भोजन । ते सत्य पतिव्रता ॥ ५१ ॥
गृह निर्मळ निरंतर करी । निरोपावेगळा धर्म न करी ।
व्रतोपास येणें परी । निरोपावेगळें न करीच ॥ ५२ ॥
उत्साह होतां नगरांत । कधीं न पाहे निश्चित ।
तीर्थयात्रा विवाहार्थ । कधींही न जाय ॥ ५३ ॥
पुरुष असता घरीं । दुश्चित नसावी नारी ।
पुरुष दुश्चित असला जरी । आपण संतोषी नसावें ॥ ५४ ॥
रजस्वला झालिया देखा । बोलों नये मौन निका ।
नायकावे वेद निका । मुख पुरुषा दाखवूं नये ॥ ५५ ॥
ऐसें चारी दिवसांवरी । आचरावें तिये नारी ।
शुद्ध होतां ते अवसरी । पुरुषमुख विलोकिजे ॥ ५६ ॥
जरी नसे पुरुष भवनीं । त्याचें स्मरण करावें मनीं ।
सूर्यमंडळ पाहोनि । घरांत जावें पतिव्रतें ॥ ५७ ॥
पुरुष आयुष्यवर्धनार्थ । कुंकुम लावावें मुख्यार्थ ।
सेंदूर काजळ कंठसूत्र । फणी माथा असावी ॥ ५८ ॥
तांबूल घ्यावें सुवासिनी । असावी तिचे माथां वेणी ।
करीं कंकणीं तोडर चरणीं । पुरुषासमीप येणेंपरी ॥ ५९ ॥
न करी इष्टत्व शेजारणीशीं । रजकस्त्री कुंटिणीसी ।
जैनस्त्री द्रव्यहीनेंसी । इष्टत्व करिता हानि होय ॥ ६० ॥
पुरुष निंदक स्त्रियेसी । न बोलावें तियेसी ।

बोलता दोष घडे तिसीं । पातिव्रत्य भंगे जाण ।। ६१ ।।
सासू श्वशूर नणंद बहिणी । दीर भावांतें त्यजूनी ।
राहतां वेगळेपणीं । श्वानजन्म पावेल ।। ६२ ।।
आंग धुवों नये नग्नपणें । उखळ मुसळीं न बैसणें ।
पायीं विरवल्यावीण जाणे । फिरूं नये पतिव्रतें ।। ६३ ।।
जातें उंबऱ्यावरी देखा । बैसों नये वडिलांसन्मुखा ।
पतिव्रता लक्षण ऐका । येणेंपरी असावें ।। ६४ ।।
पतिसवें विवाद । करितां पावे महाखेद ।
पति अंतःकरणीं उद्वेग । आपण कदां करूं नये ।। ६५ ।।
जरी असे अभाग्य पुरुष । नपुंसक असे देख ।
असे व्याधिष्ट अविवेक । तरी देवासमान मानावा ।। ६६ ।।
तैसा पुरुष असेल जरी । तोचि मानावा श्रीहरी ।
त्याचे बोलणीं रहाटे तरी । परमेश्वरा प्रिय होय ।। ६७ ।।
पतीचे मनीं जी आवडी । तैसींच ल्यावीं लेणीं लुगडीं ।
पति दुश्चित असतां घडीं । आपण शृंगार करूं नये ।। ६८ ।।
सोपस्कार पाहिजे जरी । न सांगावें आपण नारीं ।
असतां कन्यापुत्र जरी । तयांमुखीं सांगवावें ।। ६९ ।।
जरी नसेल जवळी कोणीं । वस्तूची दाखवावी खूण ।
अमुक पाहिजे म्हणून । निर्धार करोनि न सांगिजे ।। ७० ।।
जितुकें मिळालें पतीसी । संतुष्ट असावें मानसीं ।
समर्थ पाहोनी कांक्षेसी । पतिनिंदा करूं नये ।। ७१ ।।
तीर्थयात्रे जाती लोक । न मानावें तें कौतुक ।
पुरुषाचें पादोदक । तेंचि तीर्थ मानावें ।। ७२ ।।
भागीरथीसमान । पतिचरणांचें तीर्थ जाण ।
पतिपूजा करून । त्रयमूर्ती मानावा ।। ७३ ।।

व्रत करणें असेल मनीं । तें पुरुषा करावें पुसोनी ।
आत्मबुद्धी करितां कोणी । पतिआयुष्य उणें होय ॥ ७४ ॥
आणीक जाय नरकाप्रती । पतीस घेवोनी सांगाती ।
ऐसें बोलती वेदश्रुती । बृहस्पती सांगतसे ॥ ७५ ॥
पतीस क्रोधें उत्तर देती । श्वानयोनीं जन्म होती ।
जंबुक होवोनी भुंकती । ग्रामासंनिध येऊन ॥ ७६ ॥
नित्यनेम करूनि नारी । पुरुष उच्छिष्ट भोजन करी ।
पाद प्रक्षालोनी निर्धारीं । घेवोनि तीर्थ जेवावें ॥ ७७ ॥
पति प्रत्यक्ष शंकर । ऐसें मानावें निरंतर ।
पावे तीच वैकुंठनगर । पूर्ण होती मनोरथ ॥ ७८ ॥
जावों नये वनभोजनासी । अथवा शेजारीच्या गृहासी ।
इष्ट सोयरे म्हणोनि हर्षीं । प्रतिदिनीं न जावें ॥ ७९ ॥
आपुला पुरुष जरी दुर्बळ किती । समर्थाची न करावी संगती ।
पती असतां अनाचार रीती । आपण निंदा करूं नये ॥ ८० ॥
कैसा तरी असो पती । आपण करावी त्याची स्तुती ।
तोचि म्हणावा लक्ष्मीपती । एकभावें करोनियां ॥ ८१ ॥
सासू श्वशुर पुरुषांपुढें । नेटें बोलों नये गाढें ।
हासों नये त्यापुढें । पति आयुष्य उणें होय ॥ ८२ ॥
सासू श्वशूरां त्यजून । वेगळे असूं म्हणेल जी कोण ।
ऋक्षयोनींत जन्मोन । अरण्यांत हिंडेल ॥ ८३ ॥
पुरुष कोपें मारी जरी । मनीं म्हणे हा मरो नारी ।
जन्म पावेल योनिव्याघ्री । महाघोर अरण्यांत ॥ ८४ ॥
परपुरुषांतें नयनीं पाहे । उपजतां वरडोळी होय ।
पुरुषा वंचुनि विशेष खाय । ग्रामसूकर होय ती ॥ ८५ ॥
तोही जन्म सोडोनि । उपजे वाघुळाचे योनीं ।

आपुली विष्ठा भक्षूनी। वृक्षावरी लोंबते ॥ ८६ ॥
पतिसंमुख निष्ठुर वचनीं। उत्तर देती कोपोनी।
उपजे मुकी होऊनी। सप्त जन्म दरिद्री ॥ ८७ ॥
पुरुष दुजी पत्नी करी। तिसीं आपण वैर धरी।
सप्तजन्म शरीरीं। दुर्भाग्यता होतसे ॥ ८८ ॥
पुरुषावरि दुसरिया। दृष्टी ज्या करिती आवडिया।
पतिता घरी जन्म पावोनियां। दु:खें सदां दरिद्र भोगिती ॥८९॥
पुरुष येता बाहेरुनि। संमुख जाय भामिनी।
उदकें पाय प्रक्षालुनि। विंझणा वारी श्रमहर ॥ ९० ॥
पादसेवन भक्तीसी। मृदुवाक्य बोलिजे पतीसी।
पुरुष होतां संतोषी। त्रिमूर्तीही संतोषती ॥ ९१ ॥
काय देती मातापिता। नेदी इष्टवर्ग दुहिता।
इहपराची जोडी देता। पुरुष नारीचा देव जाणा ॥ ९२ ॥
गुरुदेव तीर्थें समस्तीं। गुरु जाणावा आपुला पती।
ऐसा निश्चय ज्यांच्या चित्तीं। पतिव्रता त्याची जाणा ॥९३॥



श्री. अमृतराव सवनीस यांच्या पत्नींच्या मनामधून श्रीस्वामीमहाराजांकडून उपदेश घ्यावा असे होते; परंतु श्रीस्वामी-महाराज आपल्या यजमानांची अनुज्ञा घेतल्याशिवाय स्त्रियांना उपदेश देत नाहीत, याची जाणीव असल्यामुळे श्री. अमृतरावांच्या मंडळींनी अनुग्रहासंबंधी त्यांची संमती घेतली व एके दिवशी त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, " प्रभो ! आपल्याकडून मंत्रानुग्रह होऊन या जडजीवाचा उद्धार व्हावा म्हणून आपल्या चरणी प्रार्थना आहे." श्री. अमृतराव यांच्या मंडळींची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की

"आपण आपल्या यजमानांची परवानगी घेतली आहे काय ?" हा अपेक्षित प्रश्न ऐकताच त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "प्रभो ! आपणाकडून अनुग्रह घेण्यासंबंधी ह्यांची परवानगी घेऊन ठेवली आहे."

श्रीस्वामीमहाराजांशी इतके बोलणे झाल्यावर श्री. अमृतराव यांच्या पत्नी घरी परत आल्या. त्यानंतर थोड्याच वेळात श्री. अमृतराव सवनीस श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले असता श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या सौ. मंडळींनी व्यक्त केलेली इच्छा त्यांच्या कानावर घातली. श्रीस्वामीमहाराजांचे हे म्हणणे ऐकताच श्री. अमृतराव त्यांना असे म्हणाले की, "प्रभो ! आमच्या मंडळींना उपदेश देऊन आपण तिचे जीवन धन्य व कृतार्थ करावे अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे. यासंबंधी तिने माझी परवानगी घेतली आहे." श्री. अमृतराव यांचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या जवळ शिल्लक असलेले स्त्रीधर्मनिरूपणाचे पुस्तक श्री. अमृतराव यांच्याकडे देऊन ते त्यांच्या मंडळींना देण्यास सांगितले.

दुसऱ्या दिवशी श्री. अमृतराव यांच्या सौ. मंडळी सकाळीच श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आल्या. त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "काल पाठविलेले पुस्तक मिळाले का ?" सौ. सवनीस यांनी पुस्तक मिळाल्याचे सांगताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "त्या पुस्तकात लिहिलेल्या स्त्रीधर्माप्रमाणे वागून पतीच्या सेवेत रत असावे." इतके सूचक बोलून श्रीस्वामीमहाराजांनी अत्यंत दयार्द्र अंतःकरणाने त्यांना एका कागदावर मंत्र लिहून देऊन तो कसा व किती करावयाचा हे सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांनी सौ. सवनीस यांना जी स्त्रीधर्म पालनाची आज्ञा केली तिचे सार त्यांनी स्वतःच लिहिलेल्या "स्त्रीशिक्षा". या ग्रंथातील पुढील फटक्यात आले असून तो सर्वच स्त्रीवाचकांना, साधकांना व भक्तांना अत्यंत वाचनीय व मननीय असा आहे. त्या फटक्यात श्रीस्वामीमहाराज असे म्हणतात की–

॥ फटका ॥

कामाधीन होउन हीन कुलशीलाला बुडवुं नको ॥
कवटाळुनिया नश्वर काया वैर कुणाशीं करूं नको ॥
होतां लाभहि जातां प्राणहि कधींहि खोटें बोलुं नको ॥
ऋजुता धरुनि मन सावरुनि श्रीदत्ताला विसरू नको ॥ चाल॥
निजधर्माला दवडुं नको ॥ सत्याला कधि सोडुं नको ॥
उगिच कुटाळक्या करोनि टाळ्या पिटोनि काळा दवडुं नको ॥१॥
हलकट बुद्धी करुनि कुणाशी लावालावी करूं नको ॥
तूं कोणाची कवडी सुद्धां कधींहि चोरुन घेउं नको ॥
देहीं खोटा धरूनि ताठा परापमाना करूं नको ॥
सुकृत आपुलें दुष्कृत केलें दुसऱ्यानें तरि वदूं नको ॥ चाल॥
लोकांवरि उगि रुसूं नको ॥ लोकांत खद्खदां हंसूं नको ॥
राहें स्वजनी सरळ वागुनी कलह कुणाशी लावुं नको ॥ २॥
कोण कुणाचें कसें बोलुं द्या तें कानावर धरूं नको ॥
शेजारगृहीं जाउनि तूंहि उगीच वटवट करूं नको ॥
थाप ऐकुनी वेडी होउनि दुर्जनसंगति धरूं नको ॥
स्वजना वंचुनि शिनार करुनी स्वतः व्यापार मांडुं नको ॥ चाल॥
थाटमाट तूं दावुं नको ॥ तं कुडि भलथापु देउं नको ॥

बाळीबुगडी उत्तम लुगडीं घ्याया फुगडी घालुं नको ॥ ३ ॥
दो दिवसाची लक्ष्मी साची जाणुनि धनमद करूं नको ॥
विपत्ति येतां आवरि चित्ता उगीच धडपड करूं नको ॥
कोणी कैसा बोलो सहसा जबाब तडफड देऊं नको ॥
दवडुनियां यश कधींहि अपयश लोकां माजी पसरूं नको ॥ चाल ॥
मर्यादेला टाळुं नको ॥ आचारा कंटाळुं नको ॥
आलिया भोगा होउनि सादर बोल कुणावर ठेवुं नको ॥ ४ ॥
व्याहि जांवया खुषी कराया कोणाचें ऋण काढुं नको ॥
चिंतुनि शर्मा करितां धर्मा मागें पुढती पाहुं नको ॥
पतिआज्ञेविण धर्माचरण स्वेच्छेनें तूं करूं नको ॥
कोणी करितां व्रतदानादिक मधींच आड तूं येउं नको ॥ चाल ॥
ह्या उपदेशा दवडुं नको ॥ दत्ताज्ञेनें वासुदेव हे कथि
यातें उल्लंघुं नको ॥५॥

इति स्त्रीशिक्षायाः प्रथमं प्रकरणम् ॥

* * *

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील मुक्कामातील एका एकादशीला नेहमीप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांना उपोषण होते. दुसऱ्या दिवशी द्वादशीला भिक्षा आणून पारणे करण्याकरिता ते बसले असताना एका सुवासिनीने श्रीस्वामीमहाराजांच्या पत्रावळीवर चटकन् एक लिंबाची फोड वाढली. त्याक्षणी श्रीस्वामीमहाराज घास घ्याव-याचा टाकून तसेच उठून उभे राहिले व ते सर्वांनाच उद्देशून असे म्हणाले की, "या मुलीला संन्याशाचे नियम माहीत नाहीत असे दिसते. त्यामुळे असे झाले. असो."

त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी हात, पाय व मुख धुऊन आचमन केले व ते आपल्या आसनावर येऊन बसले. इतक्यात

श्रीक्षेत्र गरुडेश्वरी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आलेले भक्त त्यांच्याजवळ आले व त्यांनी तेथे येऊन त्यांना नमस्कार करून आपापल्या इच्छा, हेतू व मनोगते सांगण्यास सुरुवात केली. काहींनी आपल्या मनातील शंका विचारण्यास सुरुवात केली. अशा रीतीने तेथे आलेल्या मंडळींची प्रश्नोत्तरे सुरू झाली. त्यावेळी सतत दोन दिवस उपवास घडला तरी श्रीस्वामीमहाराजांच्या चर्येत व मुद्रेत फरक पडला नाही. इतकेच नव्हे; तर त्यांच्या कार्यातही उपवासामुळे क्षीणता येऊन काही चलबिचल दिसलं नाही. मग त्राग्याचे कोणते तरी चिन्ह असणे ही फार दूरची गोष्ट होती.

अशा रीतीने हे कार्य चालले असताना श्रीस्वामीमहाराजांना थकवा येऊ नये व तकवा वाटावा म्हणून श्री. अमृतराव सवनीस आदि जवळच्या प्रेमी भक्तमंडळींनी खूप आग्रह केल्यावर त्यांनी आपल्याजवळील एक लाकडी पेलाभर ताक घेतले.

श्रीस्वामीमहाराजांचा स्वधर्मशास्त्रपालनाचा हा आदर्श पाहिला की, मन अगदी स्तिमित होते. या स्वधर्माची महती सांगताना श्रीमद्‌भगवद्‌गीतेत श्रीगोपालकृष्णनाथांनी असे म्हटले आहे की–

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥३.३५॥**

याचा अर्थ असा आहे की, उत्तम प्रकारे आचरलेल्या सर्व गुणसंपन्न अशा परधर्माहून गुणरहित असला तरी स्वधर्म अतिउत्तम किंवा कल्याणकारकच होय. स्वधर्मात मरण पावणे हे कल्याणप्रद किंवा श्रेयस्कर आहे; कारण दुसऱ्या वर्णाचा किंवा आश्रमाचा धर्म नरकादि भय देणारा आहे.

याचा भावार्थ प्रकट करताना श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानेश्वरीत" असे म्हटले आहे की–

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहाला ।
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखैं ॥ ३.२१९ ॥
येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा ।
परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥
सांन्ने शूद्र घरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं ।
ती द्विजें केंवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥ २२१ ॥
हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केवीं इच्छिजे ।
अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२२ ॥
तरी लोकांची धवळारें । देखोनियां मनोहरें ।
असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ? ॥ २२३ ॥
हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली ।
तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी ॥ २२४ ॥
तेवीं आवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु ।
तऱ्ही स्वधर्मुचि सुरवाडु । परत्रींचा ॥ २२५ ॥
हां गा साकार आणि दूध । हें गौल्य कीर प्रसिद्ध ।
परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ? ॥ २२६ ॥
ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते अळुकीचि उरेल ।
जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥ २२७ ॥
म्हणौनि आणिकांसी जे विहित । आणि आपणपेयां अनुचित ।
तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥ २२८ ॥
या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता ।
तोहि निका वर उभयतां । दिसत असे ॥ २२९ ॥

...१८

याचा अर्थ असा आहे की, अरे अर्जुना ! असे पाहा की आपला स्वत:चा धर्म जरी आचरण्यास कठीण असला तरी त्याचेच आचरण करणे चांगले होय. आपल्या आचारापेक्षा दुसऱ्याचा आचारधर्म खरोखर दिसण्यात जरी चांगला दिसला, तरी आचरण करणारांनी आपल्या वेदविहित असलेल्या धर्मांचेच आचरण केले पाहिजे. अरे ! ब्राह्मण जरी दरिद्री असला तरी त्याने शूद्राच्या घरची उत्तम पक्वान्ने कशी सेवन करावीत हे सांग वरे ? त्याने असे हे अनुचित कर्म कसे करावे ? आणि जी गोष्ट प्राप्त करून घेण्यास योग्य नाही, तिची इच्छा कशी करावी ? अथवा जरी इच्छेप्रमाणे तसे विषय प्राप्त झाले तरी ते त्याने घ्यावेत का ? या प्रश्नांचा तू विचार कर. जरी श्रीमंत लोकांचे मोठेमोठे सुंदर व प्रशस्त वाडे पाहून गरीबाने आपल्या असलेल्या गवती झोपड्या कशा मोडून टाकाव्यात ? हे असो. जरी आपली धर्मपत्नी कुरूप असली तरी तिचाच उपभोग घेणे हेच योग्य होय. त्याचप्रमाणे वाटेल तेवढा कठीण आणि आचरण्यास दुर्घट असा स्वधर्म असला, तरी तोच परलोकातील सुख देणारा आहे. असे पाहा की, साखर आणि दूध हे दोन पदार्थ गोड आहेत ही गोष्ट सर्वांना माहीत आहे; पण ज्यांना जंत झाले आहेत त्यांना ते पदार्थ कुपथ्यकारक व वाईट परिणाम करणारे ठरत असल्यामुळे त्यांनी ते कसे सेवन करावेत ? अर्जुना ! असे असताही जर रोग्याने ते सेवन केले तर त्याचा तो हटवादीपणाच ठरणार नाही का ? याकरिता आपापल्या हिताचा विचार करून पाहिले तर जे दुसऱ्यांना उचित असून आपल्याला मात्र अनुचित असेल; तर त्याचे आचरण स्वहितदृष्ट्या कोणीही करू नये. एवढेच नव्हे, तर स्वधर्माचे आचरण करीत असताना जर आपले प्राण जाऊ

जीवित खर्ची पडले तरीही तो धर्म इहपर अशा दोन्ही लोकी खरोखर श्रेष्ठ असाच मानला जातो.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे चातुर्मास चालू असताना एके दिवशी बडोदा येथील श्री. विठ्ठलराव सोनार यांनी पंचधातूची एक श्रीदत्तमूर्ती तयार करून आणली व ती त्याने श्रीस्वामीमहाराजांना अर्पण केली. या श्रीदत्तमूर्तीची चल प्राणप्रतिष्ठा श्री. रामचंद्रशास्त्री प्रकाशकर यांनी चार ब्राह्मणांसह एकाध्वर विधीने आश्विन शुद्ध ९ रोजी श्री. धोंडोपंत कोपरकर यांच्या हस्ते करविली. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीतील एका लहानशा सिंहासनावर ती मूर्ती ठेवण्यात आली व वाडीप्रमाणेच त्या श्रीदत्तमूर्तीची त्रिकालपूजा, आरती वगैरे सुरू केली. अशा प्रकारे श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेली सर्व भक्तमंडळी त्या मूर्तीची भक्तिभावाने पूजा-अर्चा करीत असली तरी त्या श्रीदत्तमूर्तीचा यथाविधी संस्कार झाला नव्हता. अशाप्रकारे श्रीदत्तमूर्तीचा संस्कार व्हावा अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा असल्यामुळे श्रीदेवांच्या सांगण्यावरून त्यांनी स्वतः त्या श्रीदत्तमूर्तीची अर्चा केली. या श्रीदत्तमूर्तीपुढे येणारे सर्व द्रव्य श्रीक्षेत्र माणगावप्रमाणेच श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे पाठविले जात असे. या श्रीदत्तमूर्तीची पूजा श्रीस्वामीमहाराजही करीत असत.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तमूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाल्यावरही तिची अर्चा व संस्कार का केला याचे उत्तर म. म. पं. श्री. पांडुरंगशास्त्री गोस्वामी यांनी श्रीदत्तोपासनाकल्पद्रुम, प्रथम खंड या पुस्तकातील "अर्चावतार" या प्रकरणात जे विवेचन केले आहे त्यात सापडते. हे सर्वच विवेचन या दृष्टीने वाचनीय व मननीय असल्याने येथे देत आहे.

## – अर्चावतार –

परमेश्वराच्या बहुविध अवतारांमध्ये अर्चावतार हाही एक अवताराचा प्रकार पाहावयास सापडतो. अनंतकोटी ब्रह्माण्डनायक ही ज्याची स्वतःसिद्ध पदवी आहे तो परमात्मा "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थं" असल्यामुळे त्याचे सर्वनियन्तृत्व अर्थात् सर्वनियामकत्व, सर्वेश्वरत्व, सर्वसत्ताधिष्ठातृत्व, सर्वज्ञत्व, सर्वप्रकाशकत्व इत्यादि धर्म स्वाभाविकच आहेत व ते सर्वमान्यही आहेत. असे असले तरी "अहं भक्तपराधीनः" मी भक्तांच्या अधीन आहे असे भगवंतांनी स्वमुखानेच स्वतःचे भक्तपराधीनत्व निःसंदिग्धपणे मान्य केलेले आहे. भक्तश्रेष्ठ राजा अंबरीष याच्या संरक्षणासाठी नियुक्त केलेले सुदर्शनचक्र ज्यावेळी दुर्वास ऋषींच्या पाठीमागे लागले त्यावेळी भयभीत झालेले दुर्वासमुनी सुदर्शनचक्राचे अधिपती भगवान् श्रीविष्णू यांनाच शरण गेले; पण श्रीहरींनी त्यांना स्पष्टच सांगितले की, "माझा भक्त अंबरीष राजा यालाच तुम्ही शरण जा. त्याची इच्छा असेल तर तोच तुम्हाला या संकटातून सोडवील. मी तरी स्वतंत्र कोठे आहे? मीही भक्तांच्याच अधीन आहे !" अखेर दुर्वास ऋषींना राजा अंबरीषालाच शरण जावे लागले ! अंबरीषानेच त्यांची त्या संकटातून सुटका केली. हिरण्यकशिपूने देवांचा व मानवांचा अनन्वित छळ केला. सर्व देव परमेश्वराला शरण गेले; पण परमेश्वराने सांगितले की, "तो जेव्हा माझा अनन्यभक्त असलेल्या प्रल्हादाचा छळ करील त्यावेळी तो ब्रह्मदेवाने दिलेल्या वरांनी कितीही जरी वरिष्ठ असला तरी मी त्याचा नाश करीन. तोपर्यंत थांबा." केवढी ही परमेश्वराची भक्तपराधीनता प्रतीतीला येत आहे ! केवढे हे भक्तवात्सल्याचे प्रतिबिंब भगवंतांच्या

विचारात आपल्याला पाहावयास सापडत आहे! तात्पर्य, भक्तांनी पूजेकरिता संकल्पिलेली अथवा स्वीकारलेली अर्चामूर्ती ही काष्ठमय असो, मृण्मय असो, पाषाणमय असो अथवा ती तांबे, चांदी, सोने इत्यादि धातूंची वनविलेली असो, त्या अचेतन मूर्तीमध्ये पूजेच्या वेळी अथवा भक्ताची इच्छा असेल त्यावेळी इष्टदेवतेच्या चिच्छक्तीचा आविर्भाव होतो व ती मूर्ती हसू लागते, बोलू लागते, खेळू लागते व जेवूही लागते, असा अनेक भक्तांचा अनुभव आहे. भक्तवत्सल भगवान् श्रीदत्तात्रेय हे आंबेजोगाई येथील देवघरात दिगंबरानुचर श्रीदासोपंत यांच्यावरोवर खेळत असत. भगवान् रामचंद्र प्रभू हे संत श्रीगोस्वामी तुलसीदासजी यांच्याबरोबर बोलत असत. संत मीरावाई यांच्यावरोवर त्यांची आराध्यदेवता श्रीगोपालकृष्ण हे तर नाचत असत. अद्यापिही या देवभक्तांची जोडी वाराणसी येथील मीरावाईच्या श्रीकृष्ण मंदिरात रंगभरी एकादशीच्या (फा. शु।। ११) दिवशी नाचत असल्याची साक्ष रात्री सभामंडपात उधळलेल्या गुलालावर उमटलेल्या पावलांच्या रूपाने दुसऱ्या दिवशी सकाळी मंडप उघडल्यावरोवर पाहावयास सापडते, असे वाराणसी येथील लोक सांगतात. ब्रह्मनाळ येथील ब्रह्मीभूत श्रीआनंदमूर्ती यांची समाधी, पूजा झाल्यानंतर केल्या जाणाऱ्या मंगलारतीच्या वेळी डोलत असल्याचे असंख्य भक्तजनांनी अनेक वेळा पाहिले आहे. अद्यापिही ही प्रतीती येत असल्याचे कळते. पंढरीच्या पांडुरंगाची पूजा झाल्यानंतर देवाने नैवेद्य भक्षण करावा असा संत श्रीनामदेव यांनी आग्रह धरला! पाषाणमय मूर्ती, ती नैवेद्य काय भक्षण करणार? लोक कुतूहलबुद्धीने पाहात होते. अखेर श्रीनामदेवांनी सत्याग्रहच सुरू केला. शेवटी देव त्या अर्चामूर्तीमध्ये अवतरले व

त्यांनी श्रीनामदेवाला बरोवर घेऊन नैवेद्य भक्षण केला! हे न
श्रीनामदेवांनीच स्वमुखाने वर्णिलेले आहे. तो प्रसंग असा–

श्रीनामदेवांचे वडील श्रीदामाजीपंत हे वाजाराच्या व
वडीने कापड घेऊन परगावी गेले. जाताना त्यांनी पूजा-नैवेद्य व
नाम्याच्या हातून करवून घ्यावयाचे घरात सांगितले. आईच्या
आज्ञेने श्रीनामदेव पूजासामग्री व नैवेद्य घेऊन पांडुरंगाच्या
मंदिरात आले. पूजा केली. नेवेद्य पुढे ठेवला. ती पाषाणाची मूर्ती
हालेना व बोलेना. पाहीना व खाईना ! तेव्हा श्रीनामदेव म्हणाले–

**केशवा माधवा गोविंदा गोपाळा। जेवी तू कृपाळा पांडुरंगा ॥ १ ॥**
**अच्युता वामना दशरथनन्दना। जेवी तूं गा कृष्णा पांडुरंगा ॥ २ ॥**
**कृष्णा विष्णु हरी, मधुसूदन मुरारी। जेवी तूं नरहरी पांडुरंगा ॥ ३ ॥**
**ऐसी ग्लानी करितां विठ्ठल पावला। नैविद्य जेविला नामयाचा ॥ ४ ॥**
**हाटाचे तातडी दामुशेटी गेला। नैवेद्य पाठविला नाम्या हातीं ॥ १ ॥**
**ऊठ लवकरी जेवी झडकरी। माता माझी घरी वाट पाहे ॥ २ ॥**
**नेणता म्हणोनी कारे जेवीनासी। आपुल्या प्राणांशी करीन घात ॥ ३ ॥**
**देईन धडक फोडीन मस्तक। आपुल्या प्राणांचा करीन घात ॥ ४ ॥**
**पाषाणाचीं मूर्ति कांपे थरथरा। जेवी भरभरा नाम्यासंगे ॥ ५ ॥**

सुमारे चार वर्षांचे वय असेल. वडिलांच्या अनुपस्थितीत
आद्य श्रीशंकराचार्य यांनी कालटी गावी श्रीललिताम्बा महात्रि-
पुरसुंदरी देवीची पूजा केली. शर्करामिश्रित वाटीभर दूध देवीपुढे
नैवेद्य म्हणून ठेवले. आता ती पाषाणमय जड मूर्ती दूध का
पिणार ? शेवटी आचार्यांनी हट्ट धरला व रडावयास आरंभ
केला ! अखेर जगज्जननीला त्या अर्चामूर्तीमध्ये अवतीर्ण होऊन
ते दूध प्यावे लागले ! सर्वच दूध देवीने घेतलेले पाहून "मला
शिल्लक का ठेविले नाही ? " म्हणून पुन्हा रडावयास आरंभ

केला ! तेव्हा देवीने आचार्यांना आपल्या अंकावर घेतले व स्तन्य पाजून तृप्त केले ! " तव स्तन्यं मन्ये " या सौंदर्यलहरी स्तोत्रातील पंचाहत्तराव्या श्लोकात आचार्यांनी देवीने आपल्याला मुखात स्तन देऊन दूध पाजल्याचे स्पष्टच मान्य केले आहे.

दक्षिण देशामध्ये अप्पर, सुन्दरम्, माणिक्कवाचकर आणि ज्ञानसंचंदर असे चार मोठे अधिकारी शिवभक्त होऊन गेले. पाषाणमय जड मूर्तीमध्ये प्रकट होऊन श्रीपार्वतीदेवीने त्यांनाही स्वकीय स्तन्यपानाने ज्ञानी केले. पुढे ते मोठे कवी झाले. हा इतिहास त्या प्रदेशात प्रसिद्ध आहे. परिव्राजक सम्राट श्रीवासुदेवानंदसरस्वती यांनी श्रीदत्तात्रेयांच्या दोन मूर्ती घडविल्या. त्यातील एका मूर्तीची स्थापना हिंगोली या गावी झाली व दुसरी मूर्ती ठेविल्या ठिकाणाहून गुप्त झाली व वडणेरा येथे ब्रह्मीभूत श्रीसीताराम महाराज ( श्री. वासुदेवानंदस्वामींचे धाकटे बंधू) यांच्या समाधिस्थानी प्रकट झाली व तेथेच त्या मूर्तीची स्थापना करण्यात आली.

बीड येथील वै. श्री. आबा कासार यांच्या वयोवृद्ध वडिलांनी पंढरपुराहून श्रीरुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ती बीडला आणल्या. मंदिर बांधून त्यांची स्थापना करण्याचा विचार चालला. स्वप्न पडले. मला तू सख्याहरिबुवांच्या मठात नेऊन ठेव. ते गृहस्थ श्रीसख्याहरिबुवांना भेटले व स्वप्नात झालेल्या दृष्टांताप्रमाणे श्रीरुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ती आपल्या मठात आणून ठेवतो म्हणाले. तेव्हा प्रस्तुत ग्रंथलेखकाचे पणजोबा श्रीसख्याहरिबुवा यांना म्हणाले, " अहो ! मी श्रीएकनाथ संप्रदायाचा अनुग्रह घेऊन " श्रीगुरुदेव दत्तात्रेय जनार्दन श्रीएकनाथ " असा सवाल टाकतो व कोरडी भिक्षा मागतो. त्यातच मठाचा श्रीरामनवरात्र

महोत्सव, नित्य धार्मिक कृत्ये व ब्रह्मीभूत श्री जीवानंद स्वामी महाराज यांची पुण्यतिथी साजरी करतो. अखेरपर्यंत एवढे निभले म्हणजे पुरे. त्यात आणखी नवी भर कशाला ? ते कासारमहाराज आपल्या घरी निघून गेले. दुसऱ्या दिवशी सख्याहरिबुवा रामाचे दर्शन घेण्याकरिता दार उघडीत आहे तोच त्यांना त्या रुक्मिणी पांडुरंगाच्या मूर्ती श्रीरामापुढे उभ्या असलेल्या दिसल्या !

कलकत्त्याची देवी श्रीकालीमाता ही तर स्वामी श्रीरामकृष्ण परमहंस यांच्यावरोबर बोलत असे व त्यांनी अर्पण केलेला नैवेद्यही सेवन करीत असे हे त्यांच्या चरित्रात प्रसिद्धच आहे. ह्या त्या जडमूर्तीतील चैतन्याचा प्रवेश अर्चावतारच मानला जातो. ही सर्व अर्चावतारांचीच उदाहरणे होत.

अशा रीतीने मूर्तीची प्राणप्रतिष्ठा, अर्चा व संस्कारपूर्वक जी पूजा केली जाते तिच्यामध्ये एक रहस्य दडलेले असते. हे रहस्य उलगडताना " वैदिक विज्ञान और भारतीय संस्कृति " या ग्रंथात म. म. पं. श्री. गिरिधर शर्मा चतुर्वेदी हे " भक्ति और उपासना " या प्रकरणात असे म्हणतात की, " भारतीय संस्कृतीत भक्ती आणि उपासना यांना अत्यंत प्राधान्य आहे. मनुष्य आपल्या कल्याणाचे साधन म्हणूनच या दोन्ही गोष्टींचा आश्रय घेत असतो. आम्ही मागेच असे सांगितले आहे की, कोणत्याही ईश्वररूपात आपल्या चित्ताला स्थिर करणे याचेच नाव उपासना असे आहे आणि हे लक्षात घेतले पाहिजे की, चित्ताची स्थिरता बलपूर्वक होत नाही; तर ते चित्त प्रेमानेच स्थिर होते. त्या ईश्वरप्रेमाला भक्ती असे म्हणतात. उपासना आणि भक्ती यांमध्ये जन्य जनक म्हणजे उत्पादन व उत्पादनकारणाचा संबंध आहे. उपासनेमध्ये अधिकाधिक प्रवृत्तीचा जोर असतो. भक्ती आणि उपासना यांमुळे लौकिक

आणि पारलौकिक असे दोन्ही प्रकारचे लाभ होतात. ईश्वराकडे मन लावून त्याच्या शक्तीचा अंश आपल्या मनामध्ये अधिकाधिक प्रमाणात ग्रहण केला असता लौकिक लाभही होऊ शकतो. ईश्वराकडे मन लागून जगताबद्दल किंवा संसाराबद्दल विरक्ती प्राप्त करून घेऊन आपला जीवभाव दूर करणे, ईश्वरसत्तेमध्ये आपल्याला लीन करणे आणि परमानन्दरूप मोक्षप्राप्ती करणे हाच खरा मुख्य लाभ आहे. जर भगवत्प्रेम प्राप्त झाले तर मनुष्याची सांसारिक उन्नतीची वासना आपली आपण आपोआपच दूर होते. याकरिता भक्तीचे विशेष महत्त्व आहे. (पृ. २२६)

भक्ती आणि उपासना यांची सफलता व्हावी म्हणून भारतीय संस्कृतीत अवतारवाद आणि मूर्तिपूजा यांना अत्यंत महत्त्वाचे स्थान दिले आहे. ईश्वराच्या मूर्ती अधिकारानुसार अनेक प्रकारच्या असतात. ईश्वरानेच भारतात अशी तत्त्वे उत्पन्न केली आहेत की, जी ईश्वराकडेच पूर्णपणे ध्यान देणारी आहेत. गण्डकी नदीमध्ये एका विशेष प्रकारचे दगडाचे तुकडे निघतात. . . ते वरून श्यामवर्णाचे दिसतात; मात्र त्याच्या आत सोने असते. वेदविज्ञानाच्या निरूपणात हिरण्यगर्भाचे स्वरूप सांगताना असे म्हटले आहे की, त्याच्या मध्यभागी सूर्याचा प्रकाश असून त्याला चारही बाजूने परमेष्ठी मंडलाच्या श्यामवर्ण सोमाने घेरलेले असते. या हिरण्यगर्भाचीच शाळिग्रामाची शिळा ही पूर्ण प्रतिकृती असून ती भारताच्याच एका प्रदेशात मिळते. शाळिग्राम ही ईश्वराची पूर्ण प्रतिकृती असल्यामुळे त्यात ईश्वरभावाने तत्काळ मन लागू शकते. यामुळेच ब्राह्मणलोक शाळिग्रामाची विशेषत्वाने उपासना करतात. अशा प्रकारे केलेली उपासना ही नुसती शिलेची उपासना नसून

. . . १९

तिच्या द्वारा साधक परमेश्वराचीच उपासना करीत असतो. तो परमेश्वराकडेच मन लावीत असतो. शिवाची उपासनाही श्रीनर्मदेश्वराच्या रूपाने केली जाते. श्रीनर्मदानदीत वाणाच्या रूपात असलेले शिलाखण्ड मिळतात. हे वाण मध्ये फुगीर व गोलाकार असून ते दोन्ही बाजूला निमुळते होत गेलेले असतात. एका सूर्याचा प्रकाश जेथपर्यंन्त पसरतो तेथपर्यन्त एक ब्रह्मांड असते. परन्तु सूर्याचे भ्रमण होते असे मानणाऱ्यांच्या मतानेच पृथ्वी आणि सूर्याच्या संबंधात परिवर्तन होत राहिल्यामुळे अनेक वृत्त एकत्र मिळून ते प्रलंबाकार होतात. हेच श्रीनर्मदानदीत मिळणाऱ्या श्रीनर्मदेश्वररूपाने असणाऱ्या वाणाचे स्वरूप आहे. उपरोक्त विष्णु-शिव यांच्या दोन उपासनांशिवाय भिन्न-भिन्न प्रकारच्या ईश्वराच्या मूर्ती तयार करून त्यांची उपासना करणे ही गोष्ट भारतीय संस्कृतीत सुप्रसिद्ध आहे. खरे पाहता पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांचे अधिष्ठान मानून पंचदेवांच्या रूपाने परमेश्वराची उपासना करणे ही गोष्ट भारतात प्रचलित असली तरी त्यामध्ये विष्णू, शिव आणि शक्तीच्या उपासनांचाच विशेष-रूपाने प्रचार आहे. श्रीगणेशाची पूजा सर्व कार्यांच्या सुरुवातीला केली जाते; कारण की, ते भूमितत्त्वाचे अधिष्ठाते आणि प्रतिष्ठा-प्राणाच्या रूपात असतात. श्रीगणेशाच्या पूजनाशिवाय कोणत्याच कार्याची सुरुवात होत नाही व ते प्रतिष्ठितही होत नाही. त्याचप्रमाणे दिवसाच्या तिन्ही संधिकालात सर्व ब्राह्मण लोक सूर्याची उपासना करतात. यामुळे स्वतंत्रपणे या दोघांच्या उपासनेचा प्रचार कमीच आहे.

(श्रीदत्तात्रेयांच्या मूर्तीत ब्रह्मा, विष्णू व महेश या तिघांची शिरे एकत्रित झालेली आहेत.) यावरून हे सिद्ध होते की, ब्रह्मा,

विष्णू व शिव हे एकच आहेत. एकच अक्षर पुरुष या तीन रूपात असून हे एकाच शक्तीचे तीन व्यापार आहेत. हा केवळ दृष्टीमात्राचा भेद आहे. एकाच बिन्दूवर (किंवा मूर्तीत) तीनही शक्ती राहतात किंवा कार्यपरत्वे ही शक्ती कधी कधी भिन्न भिन्न स्थानेही ग्रहण करते. मनुष्यरूपी चेतन प्राण्यात विशेष करून शक्तीच्या स्थानांचा भेद दृष्टीस पटतो. तेथे प्रतिष्ठा-बल (विष्णू) मध्यात राहून गति-बल (शिव) आणि आगति–बल (ब्रह्मा) दोन्ही बाजूला राहतात. याचा अर्थच असा आहे की, मनुष्य शरीरामध्ये हृदयकमलात ब्रह्म्याचे, नाभिकमलात विष्णूचे आणि मस्तकात शिवाचे स्थान मानले आहे. मनुष्य शरीर पार्थिव आहे. पृथ्वीपासून जे प्राण मानव शरीरात येतात ते खालपासूनच येतात. याकरिता आदान शक्तीचा अधिष्ठाता असलेल्या विष्णूचे स्थान नाभीत आहे असे कथन केले आहे आणि उत्क्रमण याच्या विपरीत होते, हे सिद्धच असल्यामुळे श्रीमहेश्वराचे स्थान शिरोभागात मानले जाते. संपूर्ण शरीराचा पाया किंवा आश्रय हृदयच आहे. हृदयात एक प्रकारची तिळाच्या बिंदूसारखी ज्योती असते असे याज्ञवल्क्यस्मृती इत्यादि ग्रंथात सांगितले आहे. तेथूनच सर्व शरीराला चेतना मिळते. त्यामुळे हृदय हे ब्रह्मदेवाचे स्थान आहे. संध्योपासनेत या स्थानांमध्येच या तीन देवतांचे ध्यान केले जाते.

(श्रीदत्तमूर्तीतील श्रीब्रह्मदेवाचा महिमा काय आहे हे यावरून स्पष्ट होते. आता श्रीविष्णू व श्रीशिवाचा महिमा पाहू.)

भगवान् श्रीविष्णूची उपासना दोन प्रकारची आहे. ती चतुर्भुज लक्ष्मीसहित नारायणाच्या रूपात आणि राम, कृष्ण इत्यादि अवतारांच्या रूपात केली जाते. भगवान् श्रीविष्णूच्या मूर्तीचे विवरण श्रीविष्णुपुराणात असे आले आहे. त्यात श्रीविष्णूची

आयुधे व आभूषणे इत्यादि सर्वांवर जगतत्त्वांच्या दृष्टीने विवेचन करीत जगताच्या आलम्बनाच्या दृष्टीने अव्यय पुरुषाच्या रूपान त्याची उपासना स्पष्ट केली आहे. श्रीविष्णुपुराणात हे स्पष्ट केले आहे की, भगवान् श्रीविष्णूच्या हृदयावर जो कौस्तुभमणी आहे तो निर्गुण व निर्लेप जीवात्म्याची प्रतिकृती आहे. भगवान् श्रीविष्णू त्या माणिरूपाने जीवात्म्यांचेच धारण करीत असतात. त्याच्या वक्षःस्थळावर श्रीवत्स चिन्ह असून त्यावर अनंत शेषनाग आपल्या फण्याने अखंड छाया धरीत असतो. हे प्रकृतीचे रूप आहे. त्याच्या हातातील गदा बुद्धिरूप आहे. ज्या प्रकारे गदा सर्व स्थूल पदार्थांना तोडून टाकते त्याप्रमाणे बुद्धीही सर्व काही तोडून साधकाच्या आतमध्ये प्रविष्ट होते. हीच दोघांमधील समानता आहे. शंख आणि धनुष्य हे इंद्रिय आणि भूतांना उत्पन्न करणाऱ्या सात्त्विक आणि राजस अहंकाराची प्रतिकृती आहेत. त्याच्या हातात जे सुदर्शन चक्र आहे ते सर्व जीवांच्या मनाचे रूप आहे. हे सुदर्शन चक्र मनाप्रमाणेच अत्यंत वेगवान असून नेहमीच गति-मान असते. या आयुधांवरून हे स्पष्ट होते की, सर्व प्राणीमात्रांची बुद्धी, इंद्रिये आणि पंचमहाभूतांचा आधार भगवान्च आहे. त्याच्या प्रेरणेनेच सर्व जीवांचे मन, बुद्धी इत्यादी कामे करीत असतात. भगवंताच्या गळ्यात जी अनेक रूपांची वैजयंतीमाळा आहे ती पंचमहाभूतांची माळा आहे असे समजले पाहिजे. त्याच्या भात्यात जे बाण भरलेले आहेत ते सर्व प्राण्यांच्या ज्ञानेंद्रियांचे व कर्मेंद्रियांचे रूप आहे. भगवंताच्या हातात जे नंदक नावाचे खड्ग आहे ते प्रदीप्त ज्ञानाचे स्वरूप असून अविद्यारूप कोषाने झाकलेले असते. याचा अर्थ असा आहे की, विद्या आणि अविद्या ह्या दोन्ही भगवंताच्या शक्ती असून त्या त्याच्याच हातात राहतात. अशा

प्रकारे सर्व आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक तत्त्वे धारण करणारा भगवान् श्रीविष्णू हा अव्ययपुरुष आहे. जरी अक्षर पुरुषाच्या कलेत श्रीविष्णू आहे असे कथन केले जात असले तरी श्रीविष्णू अक्षरात अभिव्याप्त असून त्याचेही आलंवन अव्यय-पुरुष आहे. याकरिता अक्षराच्या द्वाराच अव्ययपुरुषाची उपासना केली जाते. सारांश, हे त्रिमूर्ती श्रीदत्तात्रेयांच्यामधील प्रमुख असलेल्या श्रीविष्णूचे वर्णन आहे.

आता श्रीशिवाचे किंवा श्रीरुद्राचे रूप काय आहे ते पाहू. अंतरिक्षातील वायूलाच श्रीरुद्र असे म्हणतात. तो श्रीरुद्रच श्रीशिवाचा अवतार किंवा गुण असे मानले जाते आणि त्याच्या रूपातच श्रीशिवाची उपासना केली जाते. ही रूद्र रूपातील शिवोपासना आहे. श्रीरुद्र हे नाव वायूचे आहे, परंतु वायू दोन प्रकारचा आहे. त्यातील एक अग्नीशी संबद्ध अग्निप्रधान असून दुसरा सोमप्रधान आहे. अग्निप्रधान वायू भुवः असून तो आपल्या या अंतरिक्षात राहतो आणि सोमप्रधान वायू सूर्यमंडलाच्या वर परमेष्ठी मंडलाच्या जनः तपः लोकात राहतो. अंतरिक्षाचा वायू अग्निसंबंधामुळे उपद्रव देणारा किंवा रोग उत्पन्न करणारा आहे. त्याला रौद्र वायू असे म्हणतात. मात्र परमेष्ठीमंडलाचा सोम-प्रधान वायू शांतिप्रद असल्यामुळे त्याला साम्वसदाशिव असे म्हणतात. या कारणामुळेच ऐतरेय ब्राह्मणामध्ये अग्नीलाच रुद्र असे म्हटले आहे. "अग्निर्वा रुद्रः तस्य द्वैतन्वौ घोरान्या च शिवान्या च।" याचा अर्थ असा की, रुद्र हा वायुरूप आहे आणि अग्निरूपही आहे. हे अग्नी आणि वायू भौतिक अग्निवायू नसून प्राणरूप आहेत. यांच्यामध्ये उत्पत्ती व उत्पत्ती करणारा असा परस्पर जन्यजनक भाव आहे. यामुळे ब्राह्मण ग्रंथात कोठे कोठे

अग्नीला वायू उत्पन्न करणारा म्हणून संबोधिले आहे तर कोठे कोठे वायूपासून अग्नी उत्पन्न होतो असे कथन केले आहे. भौतिक अग्नी हा दोन्ही प्राणांच्या संमिश्रणाने अर्थात् अग्निवायूच्या संयोगाने उत्पन्न होतो. यामुळे रुद्राला "कृशानुरेता" असे म्हटले जाते. अर्थात् कृशानु म्हणजे अग्नी हा रुद्राचे रेत किंवा वीर्य आहे. हा रुद्रप्राण सर्व त्रिलोकात व्याप्त असतो. हा शुभ आणि अशुभ अशी दोन्ही प्रकारची फले उत्पन्न करतो. याकरिता ब्राह्मण-श्रुतीने असे म्हटले आहे की, रुद्र हे नाव अग्नीच्या घोर व शिव या दोन्ही रूपांचे आहे. पुढे सूर्याच्या वर असलेल्या जन आणि तप लोकांचा वायू नेहमीच कल्याणकारक असतो. याकरिता त्याला सदाशिव असे म्हणतात. तो सोमप्रधान आहे आणि स्थूल अवस्थेत सोम म्हणजे जल होय. जलाचे नाव वैदिक भाषेत अंबा असे आहे. याकरिता सोमप्रधान वायू सांब सदाशिव अर्थात् अंबेच्यावरोवर सदाशिव अशा रूपात वर्णिला जातो. यातील घोररूप रुद्राला श्रुतीमध्ये अशी प्रार्थना केलेली आहे की, "आपण आमचे आणि आमच्या कुटुंबाचे रक्षण करावे. आपण आपल्या धनुष्याचे बाण आमच्यावर चालवू नयेत. आपण धनुष्याची प्रत्यंचा खाली उतरवा. आपण मूजवान पर्वताच्या पलीकडून आमच्याकडे यावे."

हे शिवाचे क्षररूप झाले. आता अक्षररूप पाहू. शिवाचे "विश्व" हेच रूप आहे. ईश्वर जगताची रचना करून त्यात प्रविष्ट होतो. अशा प्रकारे जगतात प्रविष्ट होणाऱ्या या ईश्वराच्या रूपाला "विश्वचर" रूप असे म्हटले जाते. हेच रूप सर्व जगताचा नियन्ता असून व्यवहारात न्याय दर्शनात किंवा उपासनाशास्त्रात याच नियन्त्याला ईश्वर असे म्हणतात. ईश्वराच्या या रूपाची व्याप्ती

संपूर्ण ब्रह्मांडात आहे. तोच समष्टी ब्रह्मांडात आणि प्रत्येक व्यष्टी पदार्थात व्यापक रूपाने विराजमान आहे आणि ब्रह्मांडाच्या बाहेरही व्याप्त राहून तो ब्रह्मांडाला आपल्या उदरात साठवून ठेवीत असतो. हे जे बाहेर राहणारे रूप आहे त्याला विश्वातीत रूप असे म्हणतात या दृष्टीनेच श्वेताश्वतर उपनिषदात असे म्हटले आहे की–

**सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ।**
**सर्वव्यापी स भगवांस्तस्मात्सर्वगतः शिवः ॥ ३.११ ॥**
**एको देवः सर्वभूतेषु गूढः । सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः । साक्षी चेताः केवलो निर्गुणश्च ॥ ६.११ ॥**

याचा अर्थ असा आहे की, सर्वांचे मुख, सर्वांचे मस्तक, सर्वांची मान, सर्व प्राण्यांच्या बुद्धीच्या ठिकाणी राहिलेला व सर्व व्यापणारा असा तो भगवान् आहे. यामुळे तो सर्वत्र स्थिर व कल्याणकारक आहे. ॥ ३.११ ॥ एक देव सर्व भूतांमध्ये गूढरूपाने आहे. तो सर्व व्यापणारा, तो सर्व भूतांचा अंतरात्मा, सर्व कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांच्या ठिकाणी अधिष्ठान असलेला, साक्षी, ज्ञाता केवळ आणि गुणरहित आहे. ॥ ६.११ ॥

सारांश, वरील सर्व विवेचनावरून श्रीदत्तात्रेयांच्या मूर्तीत एकरूपानेवास करणाऱ्या श्रीब्रह्मा, श्रीविष्णू व श्रीशिव यांच्या अंतरंग स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाही. श्रीदत्तात्रेयांच्या मूर्तीचा व त्यांच्या अर्चेचा व संस्काराचा विषय अत्यंत गहन आहे, यात काहीच शंका नाही.

साध्वी अहिल्याबाई होळकर यांचे नाव आज सर्वांच्या मुखात आहे. या थोर व धार्मिक वृत्तीच्या महिलेने गेल्या शतकात

भारतातील प्रमुख तीर्थांच्या ठिकाणी नदीवर स्नानासाठी घाट बांधले, देवळात सुवर्ण कळस चढविले, ठिकठिकाणी पाणपोया घातल्या, धर्मशाळा बांधल्या आणि देवळातील मूर्तींच्या सेवेसाठी मोठमोठ्या रकमा देऊन ख़र्चाची सोय करून ठेवली. त्याचप्रमाणे होळकर घराण्यातील इंदूरच्या राणी सौ. इंदिराबाई होळकर यांचे नाव आज श्रीस्वामीमहाराजांच्या सर्व भक्तांच्या मुखात आहे; कारण विसाव्या शतकाच्या प्रथमार्धात या श्रीगुरुभक्त राणीने महासाध्वी श्रीमती अहिल्याबाई होळकर यांच्या प्रमाणेच श्रीस्वामी-महाराजांच्या स्मरणार्थ अनेक तीर्थांच्या ठिकाणी नदीवर घाट बांधले काही ठिकाणी श्रीदत्तात्रेयांची मंदिरे उभारली आणि श्रीक्षेत्र नरसोबावाडी सारख्या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांची मंदिरे बांधली. त्याचप्रमाणे ज्या ज्या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांचे चातुर्मास झाले त्या त्या ठिकाणी न्यास (ट्रस्ट) निर्माण करून मूळची चातुर्मासाची जागा पक्क्या विटांनी किंवा दगडांनी बांधून तेथे श्रीस्वामीमहाराजांच्या पादुका, फोटो ठेवून त्यांच्या पूजे-अर्चेची व्यवस्था करून ठेवली आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकी ॐकारेश्वर या स्थानापासून ९–१० मैलावर असलेल्या बढबाई–मोरटक्का या ठिकाणी झालेल्या चातुर्मासाचे ठिकाण एकदा पाहिले म्हणजे श्रीमंत सौ. इंदिराराणी होळकर यांच्या श्रीस्वामीमहाराजांवरील भक्तिप्रेमाची कल्पना आल्याशिवाय राहात नाही.

श्रीमंत सौ. इंदिराराणी होळकर यांचे माहेर मुंबईचे असून त्या श्री. अनंतराव रामकृष्णराव तालचेलकर यांच्या नात होत्या. शके १८३४ इ. स. १९१२ मध्ये त्यांच्या लग्नाचा साखरपुडा इंदूरचे महाराज श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर यांच्या बरोबर इंदूरला होऊन त्यांच्याशी सोयरीक जमली होती. हा साखरपुडा

झाल्यावर पुढे काही दिवसांनी श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर महाराज हे युरोपच्या सफरीला गेले. त्यामुळे साखरपुडा झाला; पण लग्नाची तिथी काही निश्चित ठरली नव्हती. अशा अनिश्चित स्थितीत दहा अकरा महिने निघून गेले तरी राजेसाहेब विलायतेहून परत येईनात. त्यामुळे श्री. अनंतराव तालचेरकर यांच्या घरात तो एका मोठ्या चिंतेचाच विषय झाला.. थोरामोठ्यांशी संबंध जोडलेले असल्यामुळे वधूपक्षाकडील कोणालाच यासंबंधी काहीही बोलता येत नव्हते. साखरपुडा झाला ही गोष्ट खरी होती; पण अशा अनिश्चिततेच्या अवस्थेत वाट तरी किती दिवस पाहावयाची असे घरातील प्रत्येक माणसाला वाटत होते. या सर्व गोष्टीमुळे मुलीच्या आईवडिलांची मनःस्थिती मोठी चमत्कारिक झाली. मुलीच्या मन:स्थितीबद्दल तर बोलावयास नको असे झाले होते. कु. इंदिरेने त्यावेळी केवढी मनोराज्ये रचली होती आणि केवढे संकल्प केले होते! ती सर्व स्वप्ने धुळीला मिळावयाची वेळ आली होती.

श्री. आनंदराव तालचेरकर यांचे सर्व कुटुंब हे श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीचे वारकरी असून श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामी-महाराज यांचे अनन्य भक्त होते. तेथे त्यांचे उपाध्याय श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी हे होते. त्यांच्याकडून श्री. आनंदराव यांनी व त्यांच्या कुटुंबिय मंडळींनी श्रीस्वामीमहाराजाची कीर्ती ऐकली होती. त्यामुळे श्री. आनंदराव यांच्या सूनबाई सौ. कृष्णाबाई यांनी आपल्या घरातील सर्व अनिश्चितता दूर व्हावी व कु. इंदिराबाईंचा विवाह लवकर व्हावा यासाठी तिची जन्मपत्रिका आपले पुरोहित श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांच्या मार्फत श्रीस्वामीमहाराजांकडे पाठविली व श्रीमंत सवाई तुकोजीराव

...२०

होळकर यांच्या बरोबर विवाह केव्हा होईल यासंबंधी विचारणा केली.

श्रीस्वामीमहाराजांनी ज्यावेळी कु. इंदिराबाईंची पत्रिका पाहिली त्यावेळी मुलीच्या पत्रिकेत राजयोग नसल्यामुळे त्यांनी श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांना असे लिहिले की, "आपण पाठविलेली पत्रिका मिळाली. त्यात राजयोग दिसत नाही." श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेले हे पत्र मिळताच श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी हे क्षणभर सुन्नच झाले. श्रीस्वामीमहाराजांचे शब्द म्हणजे ब्रह्मवाक्यच असते. त्यात कालत्रयीही बदल होणे शक्य नसते, हे त्यांना माहीत होते. अशा स्थितीत ठरलेला संबंध जुळून येणार नाही, हे निश्चित होते. असे असले; तरी श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांना श्रीस्वामीमहाराजांच्या कर्तुमकर्तु-मन्यथाकर्तुम् सामर्थ्याबद्दल पक्की खात्री होती. त्यामुळे त्यांनी श्री. आनंदराव तालचेरकरांशी पत्रव्यवहार करून श्रीस्वामी-महाराजांना पुन्हा पत्र पाठविले. हे पत्र श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या सर्वच पुजारी मंडळींची श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी जी अढळ श्रद्धा, निष्ठा व भक्ती होती त्याचेच द्योतक होते. श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांनी श्रीस्वामीमहाराजांना पाठविलेल्या पत्रात असे लिहिले होते की, "मुलीचे टिप्पण श्रीगुरुमहाराजांच्या हातात गेले म्हणजे हे लग्न होणारच अशी आमची आणि मुलीच्या नातलगांची भावना आहे. तरी यासंबंधी आपली कृपा व्हावी."

श्रीस्वामीमहाराजांच्या हातात श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांचे पत्र पडताच त्यांनी पुन्हा एकदा कु. इंदिराबाईंची जन्म-पत्रिका पाहिली. त्या पत्रिकेत पूर्वी श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांना कळविल्याप्रमाणे खरे पाहता राजयोग नव्हता; पण ...

पत्रिकेमध्ये एका धार्मिक, सात्त्विक व त्यांच्या चरणांवर नितांत निष्ठा असलेल्या एका कुमारिकेचे प्रतिबिंब त्यांना दिसले. तिच्या हातून मोठमोठी धर्मकार्ये होणार असे त्यांना दिसू लागले. यामुळे कु. इंदिराबाईंच्याबद्दल श्रीस्वामीमहाराजांच्या मनात करुणा उत्पन्न झाली. एकदा करुणा उत्पन्न झाल्यावर मग कृपा होण्यास किती वेळ लागणार ? राजाचा रंक आणि रंकाचा राव करण्याचे सामर्थ्य ज्यांच्या एका कृपाकटाक्षात होते व नुसत्या मनःसंकल्पाने जे हे घडवून आणू शकत होते त्यांना कु. इंदिराबाईंना राणी-सरकार करणे यात काहीच अशक्य नव्हते. श्रीस्वामीमहाराजांच्या या शक्तीची प्रचीती अनेकांनी अनेक प्रसंगी घेतली होती. श्रीस्वामीमहाराज कु. इंदिराबाईंची पत्रिका ज्यावेळी पाहात होते त्यावेळी त्यांना त्या टिप्पणामध्ये जी इंदिरा दिसत होती ती जणूकाही श्रीस्वामीमहाराजांना करुण स्वराने असे सांगत होती की, "आपल्या या लेकीचे मनोरथ वाया जाणार काय ? मुलीचा साखरपुडा होऊन लग्न न होणे म्हणजे बेअब्रू नव्हे काय ? ती तर कधीही भरून न येणारी हानी आहे ! समर्थांची कांता ज्याप्रमाणे कोरान्न मागत नाही त्याप्रमाणे आपल्यासारख्या समर्थांच्या समर्थाचीही मी मुलगी असल्यामुळे माझ्या पत्रिकेत राजयोग नसला तरी तो आपल्या केवळ कृपेमुळे येणार आहे. आपल्या कृपाकटाक्षाने माझ्या भाग्यात हा राजयोग येणार नाही का ? प्रभो ! आपण मनात आणले की, हा माझा विवाह होईल. तरी कृपा करा."

कु. इंदिराबाईंचा हा सर्व भाव मनातून जाणून श्रीस्वामी-महाराजांनी श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांना असे कळविले की, "मुलीकडून निष्काम शिवाराधना करून घ्यावी. त्याचप्रमाणे

पुढील मंत्राचा रोज सकाळी मुलीचे स्नान झाल्यावर तिच्याकडून १०८ वेळा जप करून घ्यावा. विटाळाच्या चार दिवसात तिला जप करू नये म्हणून सांगावे.

देवेन्द्राणि नमस्तुभ्यं देवेन्द्रप्रियभामिनी ।
विवाहं भाग्यमारोग्यं पुत्रलाभं च देहि मे ॥

मार्गशीर्ष मासात मुलीचे कार्य होईल. नारायण."

श्री. नारायण दत्तात्रेय पुजारी यांनी श्री. आनंदराव तालचेरकर यांना श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेले सर्व अनुष्ठान कळविले व ते कु. इंदिराबाईंकडून करवून घेतले. पुढे इंदूरचे महाराज श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर हे दोन-तीन महिन्यांतच परदेशातून येऊन मार्गशीर्ष शुद्ध नवमी सोमवार शके १८३५ अर्थात इ. स. १९१३ या दिवशी कु. इंदिराबाईबरोबर राजेसाहेबांनी द्वितीय विवाह केला. त्यानंतर त्यांचे नाव महाराणीसाहेब सौ. इंदिराबाई होळकर असे झाले.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहारांच्या कृपेने आपला विवाह घडून आल्यामुळे अखंड सौभाग्यवती वज्रचूडेमंडित महाराणीसाहेब सौ. इंदिराबाई होळकर सरकार यांच्या अंत:करणात श्रीस्वामीमहाराजांच्या बद्दल पितृवात्सल्य निर्माण झाले. त्यामुळेच त्यांनी पित्याच्या स्मृती जतन कराव्यात तशा श्रीस्वामीमहाराजांच्या स्मृती ठिकठिकाणी जतन करून ठेवल्या आहेत. त्यांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे नर्मदेवर घाट बांधला, श्रीक्षेत्र माणगाव येथील श्रीस्वामी महाराजांनी स्थापन केलेले श्रीदत्तमंदिर पूर्णपणे नव्याने बांधले, तेथील श्रीस्वामीमहाराजांच्या राहत्या झोपडीच्या चौथऱ्यावर दगडी चिरेबंदी वास्तू बांधली, विहीर बांधली व तिच्यावर पंप बसविला आणि देवस्थानच्या खर्चासाठी देणगी देऊन ठेवली. श्रीक्षेत्र कुरवपूर

श्रीक्षेत्र कारंजा, श्रीक्षेत्र वढराई इत्यादि ठिकाणी सुद्धा त्यांनी खर्चासाठी देणग्या देऊन श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी शुद्ध भावाने सेवा अर्पण केली आहे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे चातुर्मास चालू असताना एके दिवशी भजन आटोपल्यावर रात्रीच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांच्या पर्ण-कुटीमध्ये जेथे श्रीदत्तमूर्ती स्थापन केली होती त्याजागी एक साप निघाला. तो साप पाहताच श्रीस्वामीमहाराज सर्व लोकांना उद्देशून असे म्हणाले की, " आता येथे साप निघाला आहे. याकरिता आता तुम्ही सर्वजण बाहेर जाऊन झोपा; नाही तर तुमच्यापैकी कोणाला साप चावला तर मध्यरात्री आपणाला उठवून सर्पदंशावर उपाय करण्यास सांगाल." असे सांगितले तरी लोक श्रीस्वामीमहाराजांना एकट्याला झोपडीत सोडून देऊन आपण सर्वजण बाहेर झोपण्यास तयार नव्हते. उलट ते सर्वजण श्रीस्वामीमहाराजांनाच असे म्हणाले की, " प्रभो ! आपणही झोपडीत न झोपता बाहेरच झोपा म्हणजे सापाचे भय राहणार नाही. " अशा रीतीने लोक बाहेर झोपण्यास तयार नाहीत असे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्या सापावर तांदूळ मंत्रून टाकले व ते त्या सापाला उद्देशून असे म्हणाले की, " रात्री येथे सर्व लोक झोपणार आहेत; तरी तू कोणाच्याही दृष्टीस पडू नकोस. " अशा प्रकारे सापाला इतके सांगून त्याचा बंदोवस्त केल्यावर सर्वजण झोपडीतच निजले.

तो साप दुसऱ्या दिवशी पाच वाजेपर्यंत कोणालाही दिसला नाही; मात्र संध्याकाळी गीता प्रवचन चालू असताना तो साप प्रवचनाच्या जागेवर येऊन गडबड करू लागला. त्यावेळी श्रीस्वामी-महाराजांनी आपले प्रवचन थांबविले व ते आपल्या जागेवरून उठून त्या सापाजवळ जाऊन त्याला असे म्हणाले की, " अरे ! येथे

गीता प्रवचन चालू आहे. अशा वेळी या ठिकाणी तुझी गडबड नको तू येथून निघून जा." श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा ऐकताच तो साप सर्व मंडळींच्या मधून बाहेर निघून गेला. तो साप बाहेर जाताच सर्व लोक त्याला मारण्यासाठी धावले; परंतु श्रीस्वामीमहाराज त्या सर्व लोकांना उद्देशून असे म्हणाले की, "त्याला मारू नका. तुम्हाला वाटल्यास त्याला नर्मदेवर नेऊन सोडा." हे ऐकताच सर्व लोकांनी त्या सर्पाला धरून नर्मदाप्रवाहात सोडून दिले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांसारख्या अवतारी पुरुषाचे अंतःकरण सर्व प्राणीमात्रांविषयी किती कोमल होते याची कल्पना आल्याशिवाय राहणार नाही. श्रीसंततुकाराममहाराजांच्या पुढील अभंगांमधून श्रीस्वामीमहाराजांच्या या कनवाळू व कोमल अंतःकरणाचा प्रत्यय आल्याशिवाय राहात नाही.

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र ही न खाती सर्प तया ॥ १ ॥
विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ २ ॥
दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥
आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एकभाव ॥ ४ ॥
तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजे तें येणें अनुभवें ॥ ५ ॥

★ ★ ★

देवाची पूजा हें भूतांचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥ १ ॥
रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरि सकळही ॥ २ ॥
तुका म्हणे संतपण याचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ३ ॥

★ ★ ★

जेथें देखें तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ॥ १ ॥
रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ॥ २ ॥

जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ देव पाट जालें ॥ ३ ॥
सदा पर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ ४ ॥
अवघा आम्हां तूंच जालासी देवा । संसार हेवा काम धंदा ॥ ५ ॥
न लागे जाणे कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ ६ ॥
वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुति ॥ ७ ॥
भोजन सारूं ठायीं फल तांबूल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती ॥ ८ ॥
चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति ॥ ९ ॥
देखोनि दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥ १० ॥
झाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें ॥ ११ ॥
महाल मंदिरें माडद्या तनघरें । झोपड्या अवघीं देव देवाइलें ॥१२॥
ऐकें कानीं त्या हरिनामध्वनीं । नाना शब्द होत जाले ॥ १३ ॥
तुका म्हणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धाले ॥ १४ ॥

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील चातुर्मासात श्रीस्वामीमहाराजांपुढे जमणारे सर्व द्रव्य तेथेच एका डब्यात घालून ठेवण्यात येत असे. श्रीस्वामीमहाराज स्वतः द्रव्यास कधीच स्पर्श करीत नसत. तेथे येणाऱ्या जाणाऱ्या सर्व मंडळींची व्यवस्था पाहणारे श्री. रामभाऊ सवनीस या डब्यातील द्रव्य खर्च करून लागणारे सर्व सामन आणीत असत. एकदा धान्य पाठवून देणाऱ्या माणसास पैसे देऊन झाल्यावर त्या डब्यात तीनच रुपये शिल्लक राहिले. त्या दिवसात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे दररोज दोन–तीनशेपर्यंत मंडळी तरी जेवावयाला असत. एवढ्या लोकांचा जेवणाचा खर्च या तीन रुपायांमधून कसा होईल व हे सर्व कसे पार पडेल असे वाटून ही गोष्ट श्री. रामभाऊंनी श्रीस्वामीमहाराजांच्या नजरेला आणल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " रामभाऊ ! देवाच्या इच्छेने सर्व काही व्यवस्था होईल. काळजी कशाला करता ?

समजा पैसे नाहीच आले तर नर्मदेचे पाणी भरपूर आहे ना? श्रीस्वामीमहाराज असे म्हणताच श्री. रामभाऊ सवनीस स्तब्ध बसले; कारण या बोलण्यामुळे त्यांचे बोलणेच खुंटले होते.

यानंतर आठ-दहा दिवसांनंतर श्रीस्वामीमहाराजांनी श्री. रामभाऊ सवनीस यांना अकस्मात् असे सांगितले की, "सामान पुरविणाऱ्या माणसाला पैसे देऊन टाका." श्रीस्वामीमहाराजांचे हे म्हणणे ऐकताच श्री. रामभाऊ सबनीसांनी तो पैशाचा डबा उघडला असताना त्यांना सबंध डब्याभर सोन्याच्या गिन्या पसरलेल्या आहेत असे दिसून आले. ते पाहताच श्री. रामभाऊंच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाही. श्री. रामभाऊ सवनीसांना डब्यातील सोन्याच्या गिन्या पाहून जरी आश्चर्य वाटले होते, तरी त्याची खरी हकीकत अशी होती.

श्रीस्वामीमहाराजांचे श्री. अंबादास भाके म्हणून एक भक्त वऱ्हाडात राहात असत. श्रीस्वामीमहाराज आपल्या या एकांतिक भक्ताला "मालिक" असे संबोधून हाक मारीत असत. श्री. अंबादास यांची श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अनन्य निष्ठा, श्रद्धा व भक्ती होती. मागे श्रीस्वामीमहाराजांचा वऱ्हाड भागात संचार चालू असताना ते एकदा श्री. अंबादास यांच्या शेतातून चालत गेले. त्यामुळे ज्या शेतातून सर्वसाधारण व सामान्य पीक निघत असे तेच शेत खूप पिकून त्यातून त्यांना भरपूर उत्पन्न मिळू लागले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या पदस्पर्शानेच आपले भाग्य उजळले अशी श्री. अंबादास यांची दृढ भावना होऊन त्यांची व त्यांच्या सर्व मंडळींची त्यांच्याविषयी एकांतिक भक्ती उत्पन्न झाली. त्यानंतर श्रीअंबादास यांना श्रीस्वामीमहाराजांचा चातुर्मास श्रीक्षेत्र गरुडेश्वरी चालू असल्याचे कळल्यावर ते तेथे आले व त्यांनी आपल्या

उत्पन्नातील काही तरी वाटा श्रीगुरुचरणी अर्पण करणे हे आपले कर्तव्य आहे या भावनेने तीन हजार रुपयांच्या सोन्याच्या गिन्या श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे दक्षिणा म्हणून ठेवल्या. श्री. अंबादास यांची अपार श्रद्धा, निष्ठा व भक्ती पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न झाले व त्यांनी त्यांना एक विशेष प्रकारची साधना सांगताना असे म्हटले की, "मालिक! रोज कागदावर रामनाम लिहून ते कागद पिठात घालून मळावेत व त्यांच्या गोळ्या करून त्या गोळ्या माशांना घालाव्यात. या साधनाने सर्वात्मा संतुष्ट होईल." श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेली ही साधना श्री. अंबादास आयुष्यभर मोठ्या निष्ठेने व श्रद्धेने करीत असत. त्यामुळे "सर्वं खलु इदं ब्रह्म" या सर्वात्मभावाची प्राप्ती श्री. अंबादास यांना होऊन ते मुक्त झाले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी सांगितलेल्या न्यायाने "अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ।। ९.२२ ।।" हे घडत असते, यात काहीच शंका नाही. याचा अर्थ असा आहे की, परमदेव जो नारायण त्याच्याशी एकरूप होऊन जे लोक माझी सर्व प्रकारे उपासना करतात त्या सतत ध्यान करीत असलेल्या विरक्तांचा योगक्षेम मी वाहात असतो. श्रीस्वामीमहाराजांसारख्या महा-विरक्तांचा योगक्षेम प्रभू श्रीनारायण वाहात होता याची प्रचीती आपणास घ्यावयाची असेल व त्यातील अंतरंग रहस्य प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर श्रीसंततुकाराममहाराजांच्या पुढील अभंगांचा अत्यंत सूक्ष्मपणे अभ्यास करणे अत्यंत जरुरीचे आहे. ते म्हणतात—

...२१

देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥
देह देवाचे सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥ २ ॥
विश्वासी निर्धार । विस्तारला विश्वंभर ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावें । बळ एकचि जाणावे ॥ ४ ॥

★ ★ ★

सांडुनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥१॥
पाहूनियां झाडें वरबडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥२॥
वेंचुनियां चिंध्या भरूनिया धागा । गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥३॥
तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥४॥

★ ★ ★

धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ १ ॥
नेदी होऊं सीण । वाहूं चिंता दासांसी ॥ २ ॥
सुखें करावें कीर्तन । हर्षें गावे हरिचे गुण ॥ ३ ॥
वारी सुदर्शन । आपणचि कळिकाळ ॥ ४ ॥
जीव वेंची माता । बाळा जडभारी होतां ॥ ५ ॥
तो तों नव्हे दाता । प्राकृत यांसारिखा ॥ ६ ॥
हें तों माझ्या अनुभवें । अनुभवा आलें जीवें ॥ ७ ॥
तुका म्हणे सत्य व्हावें । आहाच नये कारण ॥ ८ ॥

★ ★ ★

हरीचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःख निवारिता नारायण ॥१॥
न लगे वाहाणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराव ॥ २ ॥
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ४ ॥

★ ★ ★

सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरीचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाल घडी आल्याविण ॥४॥



बैसौनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल अन्नवस्त्र दाता ॥ १ ॥
काय आम्हां करणें अधिक सांचुनि । देव झाला ऋणी पुरविता ॥२॥
दयाळ मायाळ जाणे कळवळा । शरणांगतां लळा राखों जाणे ॥३॥
नलगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा जैसी पुरवी त्याची ॥४॥
तुका म्हणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥ ५ ॥



श्रीस्वामीमहाराजांकडे येणाऱ्या भक्तांपैकी सर्वच भक्त लोक फक्त आपल्या प्रापंचिक अडचणीच घेऊन येत असत असे नाही. काही लोक खरोखरीच ज्ञानप्राप्तीच्या इच्छेनेच श्रीस्वामीमहाराजांकडे येत असत. वास्तविक पाहता आपल्याकडे येणाऱ्या सर्वच लोकांना भक्ती आणि ज्ञान यांचा उपदेश करून त्यांना आत्मसाक्षात्काराच्या मार्गावर नेऊन सोडावयाचे अशी श्रीस्वामीमहाराजांची धारणा होती. त्यामुळे संसारातील प्रापंचिक अडचणींना कंटाळून आलेल्या लोकांना त्यांच्या अडचणीतून दूर होण्याचा मार्ग दाखवून व त्यांच्या ऐहिक गरजा, अडचणी, दुःख, संकटे बाजूला करून श्रीस्वामीमहाराज त्यांना परमार्थाची वाट दाखवीत असत. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांकडे येणारे आर्त भक्त ज्यावेळी आपल्या सांसारिक अडचणीतून काही प्रमाणात मुक्त होत असत त्यावेळी ते आपोआपच भक्तीमार्गाकडे किंवा

उपासनेकडे वळत असत. श्रीस्वामीमहाराजांनी दत्तमाहात्म्य ग्रंथात " जडो कोणतीही भक्ती । तरी अनुक्रमें ती । पुढें होई पराभक्ती । हे युक्ति भगवंताची ॥ ४०.३ ॥ " असे म्हणून नवविधा भक्तीची प्रशंसा केली असली तरी ज्यांच्या हृदयात ज्ञानप्राप्तीच्या इच्छेचा उदय होऊन आत्मोन्नती करून घेण्याची इच्छा निर्माण झालेली असते असे साधक साधनेमध्ये एक पाऊल पुढे गेलेले असतात. त्यांना ईश्वराकडे वळविण्यासाठी कमी श्रम घ्यावे लागतात. काही जणांमध्ये तर तीव्र वैराग्य उत्पन्न होऊन मोक्ष प्राप्तीची इच्छा निर्माण झालेली असते. अशा लोकांसाठी तर फारच थोडे श्रम घ्यावे लागतात. त्यामुळे मदालसेचा पुत्र राजा श्रीअलर्क हा श्रीदत्तात्रेयांकडे ज्ञानप्राप्तीच्या इच्छेने गेला तेव्हा त्याला पाहून त्यांनी " हें मदालसागर्भरत्न । येथें यत्न न लगेची ॥ श्रीदत्तमाहात्म्य ॥३१.२८॥ " असे म्हटले आहे.

अशा रीतीचे जे लोक उन्नत असतात त्यांपैकीच एक गृहस्थ एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले व त्यांना साष्टांग दंडवत प्रणाम करून ते असे म्हणाले की " प्रभो ! माझ्या मनात संभ्रम निर्माण झाला आहे. आपण कृपा करून त्याची निवृत्ती करा. ज्ञान आणि भक्ती या दोन भिन्न भिन्न गोष्टी आहेत का या दोन्ही सापेक्ष गोष्टी आहेत ? ज्ञानामुळे भक्ती उत्पन्न होते का भक्तीमुळे ज्ञान प्राप्ती होते ?"

हे सर्व प्रश्न विचारून ज्यावेळी ते गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांपुढे स्वस्थ उभे राहिले त्यावेळी त्यांनी त्यांना एकदा आपादमस्तक न्याहाळले. त्यावेळी त्यांच्या हे एका क्षणात लक्षात आले की, ज्ञान प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनेच खरोखर हे गृहस्थ आपल्याकडे आले आहेत. हजार साधक-भक्तांमध्ये एखादाच असा भेटतो की, त्याच्या

ऐहिक गरजांपेक्षा पारमार्थिक गरजा या त्याच्या दृष्टीने अधिक महत्त्वाच्या असतात. त्यामुळे त्या माणसाच्या मनातील संशय-निवृत्ती करण्यासाठी श्रीस्वामीमहाराज त्याला मशागत केलेल्या शेताचा दृष्टांत देताना असे म्हणाले की, "शेतजमीन चांगल्या प्रकारे नांगरून तिची उत्तम मशागत केल्याशिवाय ज्याप्रमाणे त्या जमिनीत भरपूर व उत्कृष्ट पीक येत नाही त्याप्रमाणे माणसाच्या मनाचीही उत्तम मशागत करून त्याची योग्य जोपासना केल्याशिवाय त्याचे मन व बुद्धी सूक्ष्म व शुद्ध होत नाही आणि त्याला उच्च अध्यात्माची प्राप्तीही होत नाही. या दृष्टीने "स्ववर्णाश्रमोचित। फलाभिमानरहित। कर्में करितां सतत। शुद्धचित्त होय नर ।। श्रीदत्तमाहात्म्य ।।३२.१८।।" स्ववर्णाश्रमोचित। करितां कर्में ईश्वरार्पित। तेणें होय शुद्ध चित्त। मग हो सतत श्रवणरुची ।।२२।।" ईश्वरोद्देशें कर्म करितां। चित्ता ये शुद्धता ।।८.४०।।" हे लक्षात घेऊन आपापल्या वर्णाश्रमाला उचित अशी कर्में निष्काम बुद्धीने करून ती ब्रह्मार्पण केल्याने माणसामध्ये परमेश्वराबद्दल भक्ती उत्पन्न होते व नंतर त्याच्या मनामध्ये वैराग्य उत्पन्न होते. वैराग्यामुळे तीक्ष्ण झालेल्या बुद्धीमध्येच ज्ञानाचा उदय होतो. असा हा क्रम आहे.

सारांश, कधी कधी एखाद्या माणसामधील वैराग्य जागृत करावयाला सदुपदेशाची एक ठिणगीसुद्धा पुरेशी असते. श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाने त्या सद्गृहस्थांच्या चित्तामध्ये वैराग्य जागृत झाले व आपणास संन्यास द्यावा अशी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अत्यंत कळकळीने प्रार्थना केली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "आपली संन्यास घेण्याची इच्छा उत्तम आहे; परंतु संन्यास घेण्यासाठी चित्तामध्ये

नुसते वैराग्य उत्पन्न होऊन भागत नाही, तर ते चांगले वा
लागते.तसेच संन्यास घेण्यासाठी शरीररूपी क्षेत्र फारच उत्तम री
पवित्र झाले पाहिजे. याप्रमाणेच या युगात संन्यास धर्माचे पा
करणे हे अत्यंत दुर्घट असल्यामुळे " ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो
द्वेष्टी न कांक्षति । निर्द्वंद्वो हि महावाहो सुखं वन्धात्प्रमु
॥५.३॥ " म्हणजे हे अर्जुना ! जो कोणाचाही द्वेष करीत न
व कशाचीही इच्छा करीत नाही तो (निष्काम कर्मयोगी)
नेहमी संन्यासी आहे असे समजावे; कारण रागद्वेषादि द्वंद्वांपा
सुटलेला पुरुष सुखपूर्वक सर्व संसारबंधनातून मुक्त होतो.
भगवान् श्रीगोपाळकृष्णनाथांनी श्रीमद्भगवद्गीतेत सांगितल
प्रमाणे वागावे हेच उत्तम आहे. या दृष्टीनेच श्रीस्वामीमहाराजां
त्याला निष्काम बुद्धीने श्रीगायत्री पुरश्चरण करावयास सांगि
व त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे श्रीहरिनामाचा उपदेश केला.

श्रीस्वामीमहाराजांनी निष्काम कर्म म्हणजे स्ववर्णाश्रमोचि
कर्म व भक्ती म्हणजे श्रीसद्गुरूंनी दिलेली उपासना व साधन
तदंगभूत ज्ञान म्हणजे आत्मज्ञान प्राप्तीचा हा जो क्रम
गृहस्थांना सांगितला तो सर्वंच साधक-भक्त-वाचकांनी
ध्यानात ठेवला पाहिजे. या दृष्टीने श्रीसमर्थ रामदास स्वामी
महाराज यांच्या " पंचसमासी " या प्रकरण ग्रंथातील पु
ओव्या अत्यंत अभ्यासनीय व मननीय आहेत. ते असे म्हणत
की—

## - पंचसमासी -

## ॥ समास ३ ॥

॥ श्रीराम समर्थ ॥

मागिले अध्यायीं निरूपण । निरोपिलें आत्मज्ञान ।

तेंचि आतां दृढीकरण । केलें पाहिजे ॥ १ ॥
जें ब्रह्मादिका दुर्लभ । तें मानवांसी सुलभ ।
ऐसा हा अलभ्य लाभ । सद्गुरुवचनें ॥ २ ॥
परी हें बाणलें पाहिजे अंगीं । तरी होईजे धन्य जगीं ।
जेणें समाधान योगी । महानुभावां ॥ ३ ॥
हें समाधान उत्कट । अंगीं बाणतां संकट ।
कां जें प्रपंचासि निकट । संबंध आहे ॥ ४ ॥
बहुतां दिसांची भ्रांति । देहबुद्धीची संगति ।
आणि भगवंताची प्राप्ति । सांप्रत झाली ॥ ५ ॥
अनंत जन्मींचा काट (लेप) जडला । अभ्यासचि पडोन गेला ।
तो तितुकाही झाडिला । पाहिजे कीं ॥ ६ ॥
सकळ सृष्टीचा दंडक । लोभें व्यापक एकेक ।
तयामध्यें हा विवेक । आठवेल कैंचा ॥ ७ ॥
आपुला संसार करितां । जीव सर्वकाळ दुश्चिता ।
तेणें गुणें भगवंता । अंतर पडे ॥ ८ ॥
क्षणभरहि प्राण्यास । माया घेऊं नेदी उमस (विश्रांती)
मिथ्या लोभासाठीं आयुष्य । व्यर्थ गेलें ॥ ९ ॥
उपाय होतां दिसेना । प्रपंचीं गुंतली वासना ।
तेणें गुणें समाधाना । अंतर पडे ॥ १० ॥
अनंत जन्मीं अभ्यास । तोचि आता निजध्यास ।
लागला असे, जगदीश । केंवी जोडे ॥ ११ ॥
मळीण वस्त्र धुतां धुतां । तेणेंचि तें पावें शुद्धता ।
कैसा साधक तो भगवंता । साधनें पावे ॥ १२ ॥
साधनेंवीण ब्रह्मज्ञान । तेणें बुडे समाधान ।
अंगीं जडे देहाभिमान । वाचाळपणें ॥ १३ ॥

शब्दज्ञान हातां आलें । मी सिद्ध ऐसें कल्पिलें ।
बळेंचि धारिष्ट धरिलें । सिद्धपणाचें ॥ १४ ॥
तें धारिष्ट अंतीं उडे । प्राणी महासंशयीं पडे ।
शेखीं (शेवटी) जन्म मृत्यु घडे । भोगणें संशयें ॥ १५ ॥
म्हणोनि जाणते पुरुषीं । सांडूं नये साधनासी ।
भांडूं नये आपणासी । सिद्धपणें सर्वथा ॥ १६ ॥
जो सिद्धाचाहि सिद्ध । ज्ञानवैराग्य प्रसिद्ध ।
सामर्थ्य सिंधु अगाध । कैलासराणा ॥ १७ ॥
तो सिद्ध करी साधन । सर्वकाळ रामचिंतन ।
ध्यान धारणा अनुष्ठान । चुकों नेदी ॥ १८ ॥
ऐसे अपार महामती । झाले ते साधन करिती ।
तरी तेथें मानव किती । बापुडे किंकर ॥ १९ ॥
राज्यपदाचे गुणें । रासभारूढ (गाढवावर बसणे) होणें ।
हें लोकीं लाजिरवाणें । निपटचि (अत्यंत) झालें ॥ २० ॥
मी सिद्ध ऐसें कल्पुनी । नित्यनेम न धरी मनीं ।
तत्पर अशनशयनीं (भोजन व शयन यांमध्ये) । आत्महत्यारा २१
ज्ञानें भाव पालटला । देवाचा पाषाण झाला ।
ज्ञानें संत सज्जनाला । भौतिक भावी ॥ २२ ॥
जप कोणाचा करावा । नेम कोणाचा धरावा ।
सर्वात्मा भजावा । कोण सद्गुरु ॥ २३ ॥
स्वयें धर्म न करिती । पुढिला वेड लाविती ।
भेदला गेला नाहीं म्हणती । वाचाळ ज्ञानी ॥ २४ ॥
सहज सोडूनि उपाधि । तें तया नेमस्त बाधी ।
म्हणोनि भजनविधी । चुकों न द्यावा ॥ २५ ॥
बिढार नाहीं भक्तीचें । तेथें समाधान कैंचे ।

भिंतीवरील भस्माचें । झालेपण ॥ २६ ॥
भक्तीवीण जें ज्ञान । तेंचि सोलीव अज्ञान ।
तेणें कांहीं समाधान । होणार नाहीं ॥ २७ ॥
समाधानीं जो आगळा । तेथें भक्तीचा जिव्हाळा ।
जैसी ते गृहाची कळा । आंगण सांगे ॥ २८ ॥
भक्तीवीण देव जोडे । ऐसें कल्पांतीं न घडे ।
भक्तीकरितां साधक जडे । भगवंतीं ॥ २९ ॥
आतां भक्ति ते कैसी । दृढ व्हावया ज्ञानासी ।
हेंचि पुढिले समासीं । बोलिजेल ॥ ३० ॥



## ॥ समास ४ ॥

॥ श्रीराम समर्थ ॥
मागां बोलिलें निरूपण । केलें पाहिजे साधन ।
तया साधनाचें लक्षण । ऐसें असे ॥ १ ॥
व्हावया ज्ञानाची प्राप्ति । आधीं केली पाहिजे भक्ति ।
भक्ति घडलिया मुक्ति । पाठी लागे ॥ २ ॥
मोक्षभुवन अतिसुंदर । आनंदरूप मनोहर ।
तेथें जावया विचार । ऐक बापा ॥ ३ ॥
तेथें नऊ पायऱ्या उत्तम । ऐक पायरी प्रथम ।
जी चढतां तुटे श्रम । निःशेष जीवांचा ॥ ४ ॥
तें तूं जाण गा श्रवण । करावें नित्य निरूपण ।
तया निरूपणाची खूण । ऐसी असे ॥ ५ ॥
सज्जन आणि कृपाळू । ज्यास ज्ञान परिमळू ।

तया संगतीनें मळू । तुटे अज्ञानाचा ।। ६ ।।
अद्वैतचर्चा अखंड । जेथें नाहीं पाषांड ।
तये संगतीनें बंड । नुरे (उरत नाही) मीपणाचें ।। ७ ।।
श्रवण करावे ते ग्रंथ । जेथें बोलिला परमार्थ ।
शृंगार श्रवणीं अनर्थ । नेमस्त आहे ।। ८ ।।
म्हणोनि तें त्यजावें । जेथें नाना युक्ति लाघवें ।
भक्ति ज्ञान वैराग्य भावें । घ्यावें आदरें ।। ९ ।।
नाना कथा चमत्कार । नव रसिक अपार ।
तें त्यजूनिया सार । अद्वैत घ्यावें ।। १० ।।
श्रवण केल्याचें फळ । क्रिया पालटे तत्काळ ।
तेणें करिता प्रांजळ । आत्मज्ञान होय ।। ११ ।।
सगुण सर्वोत्तमाचें ध्यान । करावें गुणानुवादन ।
हरिकथानिरूपण । करीत जावें ।। १२ ।।
या नांव दुसरी भक्ति । ऐक तिसरीची स्थिति ।
सर्व काळ आदरें चित्तीं । नाम असावें ।। १३ ।।
चवथी पादसेवन । पांचवी असे अर्चन ।
सकळांचे करावें पूजन । विधीप्रमाणें ।। १४ ।।
सकळवंदन सहावी । दास्यत्व ही सातवी ।
आतां ऐका आठवी । भक्ति कैशी ।। १५ ।।
सखा देवचि मानावा । अखंड तोचि आठवावा ।
भार आभार घालावा । तयावरी ।। १६ ।।
नववी ते अद्वैत जाण । करावें आत्मनिवेदन ।
विचार घेतां अभिन्न । मुळींच आहे ।। १७ ।।
हें नवविध भजन । सायुज्यमुक्ति साधन ।
तेणें करितां शुद्ध ज्ञान । प्राण्यास होय ।। १८ ।।

शुद्ध ज्ञानाचे बळें। अंतरीं वैराग्य प्रबळे।
तेणें लिंगदेह मोकळें। होय वासनेसी ॥ १९ ॥

लागे स्वरूपानुसंधान। नाठवे देहाभिमान।
विश्रांतीतें देखे मन। तद्रूप होय ॥ २० ॥

आदिपुरुष एकला। नाहीं द्वैताचा गलबला।
संगत्यागें अवलंबिला। शुद्ध एकांत ॥ २१ ॥

तेथें मन पांगुळलें। आपणास विसरलें।
आपणास भुलोन गेलें। स्वरूपबोधें ॥ २२ ॥

मी कोण हें न कळे। अवघा आत्मा प्रबळे।
तेणें बळें मन मावळे। कर्पूरन्यायें ॥ २३ ॥

तेथें शब्द कुंठित झाला। अनुभव अनुभवीं निमाला।
आतां असो हा गलबला। कोणीं करावा ॥ २४ ॥

वाटे एकांतासी जावें। पुन: हे अनुभवावें।
उगें निवांत असावें। कल्पकोटी ॥ २५ ॥

नको वक्तृत्वउपाधि। पांगुळली स्वरूपीं बुद्धि।
लागली सहज समाधी। हेतुरहित ॥ २६ ॥

गुरु शिष्य एक झाले। अनुभवबोधीं बुडाले।
त्यांचे शुद्धीस जे गेले। तया तीच गति ॥ २७ ॥

तुटला संसारबंधू। आटोनि गेला भवसिंधू।
बुडाला बोधीं प्रबोधू। विवेकबळें ॥ २८ ॥

ज्ञानाग्नि प्रगट झाला। मायाकर्पूर जळाला।
विवेकें अविवेक ग्रासिला। तये ठायीं ॥ २९ ॥

झालें साधनाचें फळ। चुकलें जन्माचें मूळ।

निष्कलंक आणि निर्मळ। तोचि आत्मा ॥ ३० ॥
दृढ बाणली आत्मस्थिति। मिथ्यत्वें सुरडली वृत्ति।
सांगिजेल वर्तनगति। पुढील समासीं ॥ ३१ ॥



एके दिवशी एक आंग्लविद्याविभूषित गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांकडे आले व ते त्यांना असे म्हणाले की, " मी फार लांबून आलो आहे. मला वेदान्तासंबंधी काही शंका असल्यामुळे त्यांचे निरसन व्हावे म्हणून मी आपल्याकडे आलो आहे. " हा प्रश्न विचारत असताना त्या गृहस्थांच्या प्रत्येक शब्दामध्ये भरलेली आत्मप्रौढी व मनातील अहंकार प्रकट होत होता. वास्तविक पाहता सनातन वैदिक धर्माच्या परंपरेप्रमाणे जिज्ञासूने समित्पाणि होऊन म्हणजे अहंकारादि सर्व दोषांचा त्याग करून श्रीगुरुंकडे जावे व आपल्या अंतःकरणातील अज्ञानरूपी अंधकार नष्ट करण्याची त्यांना विनंती करावी, हाच खरा मार्ग आहे; परंतु यांपैकी कोणतेच लक्षण त्या गृहस्थांमध्ये दिसले नाही. त्यामुळे त्यांच्या प्रश्नाला उत्तर देताना श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आपण इतक्या लांबून इतके दूरवर येण्याचे तसदी कशाकरिता घेतली ? आपण बाहेरून अत्यंत सभ्य व आस्तिक दिसत असला तरी आपण अंतर्यामी पूर्णपणे नास्तिक आहात. तुमचे जानवे तुटलेले आहे हे सुद्धा तुम्हाला कळत नाही. अशा स्थितीत कसला वेदान्त आणि कसले शंका निवारण ! "

श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे सांगताच श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याची सत्यासत्यता पडताळून पाहण्यासाठी तत्काळ त्या गृहस्थांनी जेव्हा आपल्या अंगावरील कपडे काढून पाहिले तेव्हा त्या गृहस्थांना आपले जानवे दोन ठिकाणी तुटलेले

असे दृष्टीस पडले. हे पाहताच त्या गृहस्थांनी आपली चूक कबूल केली व श्रीस्वामीमहाराजांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली. अशा रीतीने त्यांचा अहंकार गळून पडल्याचे पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना अत्यंत प्रेमाने व कनवाळूपणे असे म्हणाले की, "आता आपण येथून जाऊन यथाविधी प्रायश्चित्त घ्या आणि धार्मिक आचरण पाळू लागा म्हणजे मगच वेदान्त जाणण्याची पात्रता आपल्या अंगी येईल. असे केल्यावर इकडे या म्हणजे आपल्या शंकांचे निरसन करू." अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी त्या गृहस्थांना प्रेमळपणे उपदेश करून प्रसाद दिला व परत जाण्यास सांगितले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांना स्वधर्माचरणाचे पालन किती कटाक्षाने करणे अपेक्षित होते, शास्त्र हेच प्रमाण आहे याची त्यांच्या लेखी किती महत्ता होती आणि "आचारः प्रभवो (प्रथमो) धर्मः।" ही वेदान्त प्राप्तीसाठी प्रत्येक साधकाची पायाभूत धारणा पक्की असली पाहिजे, अशी त्यांची जी पेक्षा होती तशीच अपेक्षा भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांची असल्यामुळे त्यांनी श्रीमद् भगवद्गीतेत असे म्हटले आहे की–

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्॥ १६.२३॥
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि॥ १६.२४॥

याचा अर्थ असा की, हे अर्जुना! जो शास्त्राचा म्हणजे वेदाचा विधी सोडून अर्थात् वेदविधीचा त्याग करून कामप्रेरित होऊन आपल्या इच्छेने वागतो त्याला सिद्धी मिळत नाही. अर्थात्

त्याला पुरूषार्थाची योग्यता प्राप्त होत नाही. त्याला या लोकी सुख प्राप्त होत नाही आणि परलोकी स्वर्ग व मोक्ष यातील एकाही उत्तम गतीला तो प्राप्त होत नाही. ॥२३॥ याकरिता कर्तव्य आणि अकर्तव्य यांचा निश्चय करण्यासंबंधी किंवा त्यांची व्यवस्था करण्याविषयी तुला शास्त्र हेच प्रमाण आहे, असे समजून या कर्माधिकारभूमीत शास्त्रविधानाने सांगितलेले कर्म, कर्तव्य व धर्म करणेच तुला योग्य आहे. ॥२४॥

याचा भावार्थ किंवा गुह्यार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीत असे म्हटले आहे की–

म्हणौनि कामाचेनि बळें। जो विषय सेवूं पाहे सळें।
तया विषयो ना स्वर्गु मिळे। ना उद्धरे तो ॥ १६.४५४॥
या कारणें पैं बापा। जया आथी आपुली कृपा।
तेणें वेदांचिया निरोपा। आन न कीजे ॥ ४५५ ॥
पतीचिया मता। अनुसरोनि पतिव्रता।
अनायासें आत्महिता। भेटेचि ते ॥ ४५६ ॥
नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना।
शिष्य आत्मभुवना–। माजीं पैसे ॥ ४५७ ॥
हें असो आपुला ठेवा। हाता आथी जरी यावा।
तरी आदरें जेवीं दिवा। पुढां कीजे ॥ ४५८ ॥
तैसा अशेषांही पुरुषार्थां। जो गोसावी हो म्हणे पार्था।
तेणें श्रुतिस्मृति माथां। बैसणें घापे ॥ ४५९ ॥
शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें।
जें घेववी तें न म्हणावें। विषही विरु ॥ ४६० ॥
ऐसिया वेदैकनिष्ठा। जालिया जरी सुभटा।
तरी कें आहे अनिष्टा। भेटणें गा ॥ ४६१ ॥

पैं अहितापासूनि काढिती। हित देऊनि वाढविती।
नाहीं गा श्रुतिपरौती। माउली जगा ॥ ४६२ ॥

श्रीस्वामीमहाराजांनी आपल्याकडे वेदान्ताबद्दल शंका विचारावयास आलेल्या गृहस्थांना वेदान्ताची प्राप्ती व्हावी म्हणूनच जशी वेदोक्त कर्माची महती सांगून त्याचा अंगिकार करण्यास सांगितले अगदी तशीच कर्माची महती श्रीमद् भागवतात महर्षी श्रीवेदव्यासांनी सांगून कर्माचा अंगिकार कटाक्षाने करावा म्हणून कथन करताना असे म्हटले आहे की—

कर्माकर्मविकर्मेति वेदवादो न लौकिकः।
वेदस्य चेश्वरात्मत्वात् तत्र मुह्यन्ति सूरयः ॥ ११.३.४३ ॥
परोक्षवादो वेदोऽयं बालानामनुशासनम्।
कर्ममोक्षाय कर्माणि विधत्ते ह्यगदं यथा ॥ ४४ ॥
नाचरेद् यस्तु वेदोक्तं स्वयमज्ञोऽजितेन्द्रियः।
विकर्मणा ह्यधर्मेण मृत्योर्मृत्युमुपैति सः ॥ ४५ ॥
वेदोक्तमेव कुर्वाणो निःसंगोऽर्पितमीश्वरे।
नैष्कर्म्यां लभते सिद्धिं रोचनार्था फलश्रुतिः ॥ ४६ ॥
य आशु हृदयग्रंथिं निर्जिहीर्षुः परात्मनः।
विधिनोपचरेद् देवं तंत्रोक्तेन च केशवम् ॥ ४७ ॥

याचा अर्थ असा आहे की, विहित कर्म, निषिद्ध कर्म व विकर्म (विहित कर्म न करणे) हा विषय लौकिक वचनांनी कळणारा नसून वेदवचनसाध्यच आहे. वेद हे अपौरुषेय म्हणजे ईश्वररूपच असल्याने कर्माचा निर्णय घेताना देवादिकांनासुद्धा मोह पडतो. ॥४३॥ लहान मुलांना ज्याप्रमाणे औषध घेण्याची प्रवृत्ती व्हावी म्हणून आमिष दाखवितात त्याप्रमाणे अज्ञानी मनुष्याला शिक्षण देण्याकरिताच वेद ईशस्वरूप बोधक असूनसुद्धा कर्ममार्गाचाच

उपदेश करतात. वस्तुतः वेद समूळ कर्माचा बंध तुटण्यासाठीच कर्मांचे अनुष्ठान प्रतिपादन करतात. ।।४४।। आपण स्वतः अज्ञानी आणि इंद्रियाधीन असूनही जो वेदात सांगितल्याप्रमाणे आचरण करीत नाही व अधर्माने विरुद्ध कर्माचे आचरण करतो तो वारंवार जन्म–मृत्यूच्या चक्रात सापडतो. ।।४५।। जो स्वतः आसक्ती सोडून वेदविहित कर्माचे आचरण करतो आणि ते कर्म ईश्वराला अर्पण करतो त्याला नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते. वेदामध्ये जी स्वर्गादिक फळे सांगितली आहेत ती सत्कर्माच्या केवळ गोडीसाठीच आहेत. ।।४६।। ज्यांना देहसंबंधाने प्राप्त झालेल्या जिवाच्या अंतःकरणातील आपला अहंकाररूपबंध तोडावयाचा आहे त्याने वैदिक आणि तांत्रिक विधीने केशवमाहात्म्याची पूजा करावी. ।।४७।।

उपरोक्त श्लोकांवर श्रीएकनाथमहाराजांनी "श्रीएकनाथी भागवतात" जी टीका लिहिली आहे त्यातील पुढील काही ओव्या अभ्यसनीय आहेत. श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की–

आम्ही जितेंद्रिय म्हणवित । म्हणोनि नाचरे जो वेदोक्त ।
त्यासी नातुडे गा परमार्थ । अति अनर्थ अंगीं वाजे ।।३.७७।।
जरी शास्त्रज्ञ ज्ञाता झाला । आणि वेदोक्ता विमुख ठेला ।
तरी तो जाणपणेंचि नागवला । जाण बुडाला दुःखार्णवी ।।७८।।
नाचरे जो वेदोक्त कर्म । त्यक्तकर्मे मानी निष्कर्म ।
त्यासी थोर पडला भ्रम । नाडला परम अभिमानें ।। ७८।।
जरी विषयो निग्रहिला । आणि वेदोक्ता जो दुरावला ।
तो निजघाता प्रवर्तला । स्वयें बुडाला नरकार्णवीं ।। ७८।।
वेद निजमूळ परमार्था । तें वेदोक्त नाचरितां ।

जें जें करणें नृपनाथा । तें तें तत्त्वतां अधःपातीं ॥ ७८३ ॥
डोळें देखणें तत्त्वतां । ते काढूनि पाहों जातां ।
न देखे आपुली डोळसता । मा इतर पदार्थ कोण देखे ॥७८४॥
तैसा नाचरोनि वेदार्थू । जो जो मानिला परमार्थू ।
तेणें आंवतूनियां अनर्थू । जाण निश्चितू आणिला घरा ॥७८५॥
तेणें आचार अनर्थपाटें । वाहावले जन्ममरणवाटे ।
तेथे नानायोनिगर्भसंकटें । सोसितां न सुटे कल्पांतीं ॥ ७८६ ॥
तेथ जन्मजन्मों जन्म न टके । मरमरों मरण न चुके ।
जें वेदविहित चुके । तें अतिदुःखें दुःखभोगू ॥ ७८७ ॥
'विकर्मणा ह्यधर्मेण' । हें मुळींचें पदनिरूपण ।
तेणें विकर्मामाजीं अधर्म पूर्ण । परि अकर्म तें जाण अधर्म नव्हे
ज्यासी लावितां न लागे कर्म । या नांव मुख्य निष्कर्म ।
निष्कर्मलक्षण हाचि धर्म । येणेंचि परम मुक्त साधू ॥ ७८९ ॥
ज्यासी शुद्ध आकळे अकर्म । तो तत्काळ होय निष्कर्म ।
अकर्माचें कळल्या वर्म । मुक्तता परम पायां लागे ॥ ७९० ॥
दासी स्वामीची आज्ञाधारी । कां राजमुद्रा प्रजांवरी ।
तैसी वेदाज्ञा जो शिरीं धरी । स्वधर्माचारी निष्काम ॥७९१॥
मी एकु कर्मकर्ता । ऐशी उठों नेदी अहंता ।
तें कर्मचि स्वभावतां । अर्पी श्रीअनंता ईश्वरातें ॥ ७९२ ॥
एवं ईश्वरीं जें अर्पे कर्म । तें कर्म होय निर्धर्म ।
याचि नांव परम । 'नैष्कर्म्य' निजसिद्धी ॥ ७९३ ॥
वेदें बोलिलें कर्मफळ । ज्याची वासना निष्काम निर्मळ ।
त्यासि वेदोक्त फळ प्रबळ । भोगावया केवळ स्वप्नीं न दिसे
ऐसें असतां कर्मफळ । वांछितां नाडिजे केवळ ।

जेवीं परिसु देऊनि सोज्ज्वळ । मागिजे पोफळ तांबूलासी ॥७९५॥
कर्मी निष्कामता नित्य फळ । तेथ फळाशा नाडले सकळ ।
चंदन सर्वांगीं सफळ । तेथ मागतां फळ नाडिजे स्वयें ॥७९६॥
हातीं आंतुडावया मासा । गळीं लाविजे अल्प आमिषा ।
तेवीं निष्काम करावया मानसा । वेदू फळाशा प्रलोभी ॥७९७॥
आमिष घालूनि मासे पाळी । कीं तद्योगें जळाबाहेर गाळी ।
तेवीं कर्म कर्मातें निर्दाळी । हे नेणिजे मुळीं फळकामीं ॥७९८॥
हो कां फळाचिये चाडे । स्वधर्म कर्मीं प्रवृत्ति घडे ।
तेणें नैष्कर्म्यसिद्धि आंतुडे । हें वेदांचें फुडें निजगुह्य ॥७९९॥
कर्म ब्रह्मत्वें सदा सफळ । फळ वांछी त्यातें निष्फळ ।
हें जाणोनि कर्म कुशळ । फळाशा समूळ छेदिती ॥ ८०० ॥
ऐसें आचरतां वैदिक कर्म । तेणें पाविजे नैष्कर्म्य
याहोनिया अतिसुगम । सांगेन वर्म तें एक ॥ ८०१ ॥

★ ★ ★

वैदिक अथवा तांत्रिक । गुरुमार्गें सिद्धिदायक ।
यालागीं गा आवश्यक । सद्‌गुरूसी देख शरण जावें ॥ ८०५ ॥
प्रवृत्तिनिवृत्तिकृत कार्या । अवश्य पाहिजे आचार्या ।
आपमतीं भजतां राया । अनेक अपायांमाजी पडे ॥ ८०६ ॥
भोयी (भूमि) पाय सिद्ध आहेती । भुयाळेंवीण ( वाटाड्या) वृथा भ्रमती।
तेवीं गुरुवीण जे जे करिती । ते ते अहंमतीं दृढ भ्रमले ॥८०७॥
गुरु ब्रह्म दोनी एक । ऐशिया भावना आवश्यक ।
सेवा करूनि भावपूर्वक । संतोषवूनि देख अनुग्रहो घ्यावा ॥८०८॥
तेथ निजाधिकारप्राप्तें । जे मूर्ति आवडेल आपणियातें ।
तेचि मंत्रविद्या तेथें । श्रद्धासंभरितें अंगीकारावी ॥ ८०९ ॥

तेव्हां गुरुमुखें मिश्र वोजा । पुरुषोत्तम महापूजा ।
शिकोनियां निजकाजा। भजावें अधोक्षजा शिक्षिता मतीं ॥८१०॥
तेचि भजती हातवटी । आगमोक्त निजपुष्टी ।
राया सांगोन गोमटी । सावधानदृष्टीं अवधारीं ॥ ८११ ॥
विध्युक्त करितां संध्यास्नान । तेथेंचि आहे ब्रह्मज्ञान ।
आचमनीं होय हरिरूप आपण । हें नेणोनि अज्ञानी आगमी भरती ॥ ८१२ ॥



श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे भाविक लोकांच्या करिता आत्मानात्मविचार व चित्तसद्बोधनक्षत्रमाला हे प्राकृत ग्रंथ तयार केले व ते छापूनही आणले गेले. जे लोक शास्त्राप्रमाणे आचरण ठेवीत असत व ज्यांची वेदान्त जाणण्याची तीव्र जिज्ञासा असे त्यांना श्रीस्वामीमहाराज हे ग्रंथ स्वहस्ताने देत असत. त्याचप्रमाणे श्रीदत्तभावसुधारसस्तोत्र म्हणून श्रीगुरुचरित्रातील सर्व कथा घेऊन केलेले स्तोत्रही श्रीस्वामीमहाराज सर्व जिज्ञासूंना व भक्तांना रोज म्हणण्यासाठी देत असत. याशिवाय नेहमीप्रमाणे पंचदशी, श्रीमद्भगवद्गीता, उपनिषदे इत्यादि वेदान्तपर ग्रंथ रोज सकाळी समजावून सांगण्याचे काम नेहमीप्रमाणे श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथेही चालू होते. मुमुक्षू व जिज्ञासू ब्राह्मण मंडळी सकाळीच स्नानसंध्यादि नित्यकर्म आटोपून श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून हे ग्रंथ ऐकण्यासाठी मोठ्या साक्षेपाने येत असत. हे सर्व ग्रंथ श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून ऐकताना त्या सर्वांच्या अंतःकरणात ज्ञानाचा दिव्य प्रकाश प्रकाशित होत असे. अशा प्रकारे श्रवण, मनन व निदिध्यास करून श्रीस्वामीमहाराजांच्या चरणा-

पाशी आलेले मुमुक्षूजन कृतार्थतेची वाटचाल करीत असत. शास्त्राच्या अर्थाचा साक्षात्कार संतमाहात्म्यांना झालेला असतो. त्यांनी शास्त्राचे मर्म जाणलेले असते; कारण शास्त्रामध्ये सांगितलेले तत्त्वज्ञान ते जगत असतात. त्यांचे जीवन हेच उपनिषद्‌भाष्य असते. श्रीमद्‌भगवद्‌गीताभाष्य असते. अशा विभूतींच्या मुखातून शास्त्रग्रंथ श्रवण केल्यावर या ग्रंथांचे मर्म श्रोत्यांच्या अंत:करणाचा भेद करून जाते.

एकदा सकाळचे प्रवचन चालू असतानाच नवसारीचा एक गुजराथी ब्राह्मण गृहस्थ आपल्या वीस–बावीस वर्षांच्या मुलीला बेशुद्ध स्थितीत घेऊन श्रीस्वामीमहाराजांकडे आले व तेथे मुलीला त्यांच्यासमोर झोपवून त्यांना साष्टांग नमस्कार घालून ते असे म्हणाले की, " प्रभो ! आज तीन दिवस झाले माझी ही मुलगी अशा रीतीने बेशुद्ध स्थितीत आहे. तिला कोणीतरी पछाडले आहे असे मला वाटते. तरी कृपा करून हिच्यावर दया करा, हिची या त्रासातून मुक्तता करा. " त्या गृहस्थांची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी आपले चालू असलेले प्रवचन बंद करून आपल्या कमंडलूतील पाणी तिच्या अंगावर टाकले. त्याबरोबर ती मुलगी उठून बसली व बोलू लागली. त्यावेळी तिच्या मुखातून तिला पछाडलेले पिशाच्च बोलत होते. त्यावेळी " तू कोण आहेस ? या मुलीला तू का धरले आहेस ? " वगैरे प्रश्न श्रीस्वामीमहाराजांनी त्या पिशाच्चाला विचारले. श्रीस्वामीमहाराजांच्या सर्व प्रश्नांना त्या पिशाच्चाने उत्तरे देताना आपण कोण आहोत व या मुलीला का धरले आहे याचे कारणही सांगितले. त्या पिशाच्चाने ज्या गोष्टी सांगितल्या त्या सर्व मुलीच्या वडिलांना पटल्या. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी

त्या मुलीच्या वडिलांना असे म्हणाले की, "तुम्ही या तुमच्या मुलीला चांगल्या मांत्रिकाकडे घेऊन जा." हे ऐकताच त्या गृहस्थांनी गयावया करून श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा अशी प्रार्थना केली की, "प्रभो ! हे काम आपणच करावे. आपली कीर्ती ऐकूनच मी आपल्या चरणांपाशी आलो आहे." त्या गृहस्थांचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "हे काम सोडून आपणास वरेच दिवस झाले आहेत. आता या कामाकरिता लागणारी तशी साधनेही आपल्या जवळ नाहीत. तुम्ही या मुलीला चांगल्या मांत्रिकाकडे घेऊन जा. तुम्हाला फारच लवकर चांगला मांत्रिक मिळेल. तोपर्यंत या मुलीला कोणतीही भीती राहणार नाही सध्या इतकी व्यवस्था केली आहे. पुढे मांत्रिक भेटल्यावर ही मुलगी चांगली वरी होईल." इतके सांगून श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलीला चांगले आयुरारोग्य प्राप्त होईल असा आशीर्वाद दिला. इतके सर्व झाल्यावर ते गृहस्थ आपल्या मुलीला घेऊन परत गेले."

वडोद्याच्या एका श्रीमंत कुटुंवातील एक मुलगा वरेच दिवस आजारी होता. एके दिवशी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे त्या मुलाची आई आपल्या आजारी मुलाला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आली. तिने आपल्या मुलाला आरोग्य प्राप्त व्हावे म्हणून श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी कळकळून प्रार्थना केली. त्यावेळी मोठ्या करुणेने श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाच्या आईला एक मंत्र दिला व त्याचा जप केला म्हणजे तुझा मुलगा वरा होईल असे तिला सांगितले. त्यानंतर त्या वाई आपल्या मुलाला घेऊन वडोद्याला परत गेल्या. घरी गेल्यावर काही दिवस श्रीस्वामीमहाराजांनी दिलेल्या मंत्राचा जप करून सुद्धा मुलाच्या

प्रकृतीमध्ये फरक पडेना म्हणून त्या बाईंनी आपल्या नोकराला श्रीस्वामीमहाराजांकडे पाठविले व सर्व हकीकत कळविली. ही सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईंच्या नोकराजवळ असा निरोप दिला की, "पूर्वी सांगितलेला जप करीत राहावे; पण जपासाठी रुद्राक्षाची माळ न घेता स्फटिकाची माळ घ्यावी. मुलाला बरे वाटेल. काळजी करू नये." त्या बाईंच्या नोकराने ज्यावेळी हा निरोप बडोद्याला येऊन त्यांना सांगितला त्यावेळी त्या बाई एकदम आश्चर्यचकित झाल्या; कारण आपण रुद्राक्षाच्या माळेवर जप करतो ही गोष्ट कोणा-लाच माहीत नसताना ती श्रीस्वामीमहाराजांना कशी कळली? श्रीस्वामीमहाराज सर्वज्ञ आहेत याची खात्री पटून त्यांच्या डोळ्यात त्यांच्या भक्तीने पाणी उभे राहिले. त्यानंतर श्रीस्वामी-महाराजांनी सांगितलेल्या मंत्राचा जप त्या बाईंनी स्फटिकाच्या माळेवर करावयाला सुरवात केल्यापासून त्यांच्या मुलाच्या प्रकृतीत सुधारणा होऊ लागून कालौघात तो मुलगा पूर्ण बरा झाला.

अशा रीतीने दिवस चालले असताना आश्विन वद्य द्वादशी आली. हा दिवस श्रीपादश्रीवल्लभ यांचा निजानंदगमनदिवस अर्थात् श्रीगुरुद्वादशी म्हणून श्रीदत्तसंप्रदायात साजरा केला जातो. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथेही यावेळी श्रीगुरुद्वादशीचा उत्सव फारच मोठ्या प्रमाणावर साजरा झाला. त्यावेळी श्रीदेवांना कितीतरी एकादशन्या व लघुरुद्र होऊन हजारो मंडळी जेवली. या उत्सवा-तील जेवण्याच्या वेळी त्यादिवशी श्रीस्वामीमहाराज स्वतः प्रत्येक पंक्तीत हिंडून सर्वांना "स्वस्थपणे जेवा, सावकाश होऊ द्या" असे सांगत असत. त्याचप्रमाणे सर्वांना भोजन दक्षिणा दिली

जात होती. या सर्व उत्सवाची सर्व व्यवस्था श्री. रामशास्त्री प्रकाशकर यांनी ठेवली होती. एखाद्या श्रीमंत माणसाकडूनही अशी व्यवस्था होणार नाही इतकी या उत्सवाची उत्तम, चोख व अपूर्व व्यवस्था केलेली होती आणि अत्यंत श्रीमंती थाटातच हा उत्सव साजरा झाला.

श्रीगुरुद्वादशीच्या दिवशी श्री. सवनीस यांनी थोड्या उशिरानेच श्रीदेवाला रुद्राची एकादशनी करावयास सांगितले. परंतु अगोदर सांगितलेले सर्व अभिषेक पूर्ण होऊन श्रीदत्तमूर्ती पुसून ठेवून त्याची गंधपुष्पादिकांनी पूजा झाल्यामुळे श्री. सवनीसांची एकादशनी झाली नाही. श्रीस्वामीमहाराजांना हे कळताच ते पुजाऱ्यांना असे म्हणाले की, "सवनीसांची एकादशनी आज जपरूप करा व उद्या त्यांना स्वत:ला वसवून जलाची एकादशनी करा." श्रीस्वामीमहाराजांनी केलेली ही व्यवस्था पाहून श्री. सवनीस हे मनोमन अत्यंत सुखावले.

या अगदी सामान्य दिसणाऱ्या गोष्टीतही श्रीस्वामीमहाराजांनी जातीने लक्ष घालून आपली इच्छा पूर्ण केली हे पाहून श्री. सवनीस यांचे अंत:करण अगदी भरून आले. त्यांचे डोळे पाणावले. श्रीसंत नामदेवमहाराजांनी "वहुत केले सुखी शरणागत।" असे म्हणून जो श्रीसंतकृपान्याय प्रकट केला तोच आपणास लागू आहे याची त्यांना मनोमन खात्री पटली. श्रीसंत नामदेवमहाराजांनी या दृष्टीनेच एका अभंगात असे म्हटले आहे की—

**बहुत जन्माशेवटीं तुजशीं जाली भेटी।**
**बहु मी हिंपुटी जालों थोर ॥ १ ॥**
**बहु कीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं।**
**बहुत केले सुखी शरणागत ॥ २ ॥**

बहुतां आसक्त बहुतां ओळगणा ।
बहुत विटंबना जाली माझी ।। ३ ।।
बहु फेरे पाहिले बहु दुःख साहिले ।
बहु चित्त वाहिलें दुर्भरची ।। ४ ।।
बहुत काळ गेले बहू अन्याय केले ।
बहु नाहीं जोडलें नाम तुझें ।। ५ ।।
नामा म्हणे केशवा एक उरली वासना ।
घ्यावी नारायणा चरणसेवा ।। ६ ।।



एके दिवशी सर्वांची जेवणे झाल्यावर गडी भांडी घासण्यासाठी श्रीनर्मदेवर गेला. त्यावेळी एक मोठे पातेले घासून झाल्यावर ते धूत असताना त्याच्या हातातून निसटले व ते प्रवाहावरोबर वाहात जाऊ लागले. स्वयंपाकाची भांडी मोजकीच असल्यामुळे "ते पातेले मिळाले नाही तर दुसऱ्या दिवशी स्वयंपाक कसा होणार ?" या विचाराने तो गडी धावतच श्रीस्वामीमहाराजांकडे आला व त्याने आपल्या हातून पातेले वाहून गेल्याची हकीकत त्यांच्या कानावर घातली. त्या गड्याने पातेले वाहत जा असल्याचे सांगताच श्रीस्वामीमहाराज तत्काळ आपल्या आसना वरून उठून श्रीनर्मदानदीतीरावर आले व तिची प्रार्थना करताना तिला असे म्हणाले की, "हे श्रीनर्मदामाते ! तुला हे पातेले घेऊन काय करावयाचे आहे ? येथे जमलेल्या सर्व बाळगोपाळांच्या जेवणाचा खोळंबा तू कशाला करशील ? आमची खात्री आहे की, ते पातेले तू आम्हाला परत आणून देशील." श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे श्रीनर्मदामातेची प्रार्थना

केल्यानंतर थोड्याच वेळात पात्रात वाहून जात असलेले पातेले लाटांच्या धक्क्यानेह ळूहळू श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलां-जवळ येऊ लागले. श्रीनर्मदामातेनेच ते पातेले परत आणून दिले होते यात काहीच शंका नाही.

वडोद्याच्या श्रीसिद्धनाथ गणेश मंदिराचे महंत श्री. गणपतीबुवा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला वारंवार येत असत. एका संकष्टी चतुर्थीला श्री. गणपतीबुवा श्रीक्षेत्र गरुडेश्वरला येऊन लगेच दुपारी घरी परत जाण्यास निघाले. ज्यावेळी ते घरी परत जाण्यासाठी परवानगी घेण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांकडे आले व त्यांना साष्टांग नमस्कार घालून त्यांनी त्यांची घरी जाण्यासाठी अनुज्ञा मागितली त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, “ तुम्ही रात्री संकष्टी सोडून मगच जा. आता दुपारी जाऊ नका. आत्ता गेलात तर फार हाल होतील. ” श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गणपतीबुवांना इतके सांगितले तरी घरी काही जरुरीचे काम असल्यामुळे काही न ऐकताच व संकष्टी चतुर्थी सोडण्याकरिता न थांबताच ते वडोद्याला जाण्यासाठी निघून गेले. श्री. गणपतीबुवा श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा डावलून निघाले खरे; पण मार्गामध्ये अनेक अडचणी आल्यामुळे त्यांना तिलकवाड्याला पोहोचावयास रात्रीचे दहा वाजले.

त्याच दिवशी श्री. अमृतराव सवनीस यांनाही वडोद्याला जावयाचे होते; पण श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे रात्री चंद्रोदयानंतर संकष्टी चतुर्थीचे पारणे करून मगच ते तेथून जाण्यास निघाले. ज्यावेळी श्री. अमृतराव तिलकवाड्याला

... २४

पोहोचले त्यावेळी श्री. गणपतीबुवा महंत आपल्या आ थोडयाच वेळापूर्वी तेथे पोहचल्याचे व ते स्वयंपाकासाठी सरप गोळा करीत असल्याचे त्यांना समजले. ज्यावेळी श्री. अमृतरावांची व श्री. गणपतीबुवा यांची भेट झाली त्यावेळी श्री. गणपतीबुवांनी श्री. अमृतरावांना श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे आपले हाल कसे झाले याचे सविस्तर वर्णन केले. हे ऐकताच श्री. अमृतराव श्री. गणपतीबुवा यांना असे म्हणाले की " आपणास श्रीस्वामीमहाराजांनी पारणे करून निघा, दुपारी जाऊ नका, हाल होतील असे सांगितले होते. पण आपण ते ऐकले नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या वचनाचा अवमान केल्याचेच हे फळ आहे, असे मला वाटते. त्यांचे शब्द अक्षरशः खरे होतात असा आम्हाला अनुभव आहे. यामुळे मी नेहमीच त्यांची आज्ञा अक्षरशः पाळण्याचा प्रयत्न करतो." असे बोलणे होऊन श्री. अमृतराव सवनीस जेवण उरकून आलेले असल्यामुळे तावडतोब वडोद्याला जाण्यास निघाले. ते जेव्हा श्रीनर्मदानदीवर आले त्यावेळी त्यांना पऱ्हई (होडी) मिळून ते चांदोदला येऊन दुसऱ्या दिवशी वडोद्याला पोहोचून कामावर हजरही झाले. परंतु श्री. गणपतीबुवा महंतांना वडोद्याला पोहोचण्यास तीन दिवस लागले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसमर्थ रामदासस्वामी महाराजांनी सांगितलेली सच्छिष्याची लक्षणे आपल्या ठिकाणी बाणविण्याची किती आवश्यकता आहे याची कल्पना साधक-भक्त-वाचकांना आल्याशिवाय राहणार नाही. श्रीसमर्थ रामदास-स्वामी "दासबोध" या ग्रंथात यासंबंधी असे म्हणतात की-

मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण।
अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य ॥५.३.१९॥

शिष्य पाहिजे निर्मळ। शिष्य पाहिजे आचारशीळ।
शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी ॥२०॥
शिष्य पाहिजे निष्ठावंत। शिष्य पाहिजे शुचिष्मंत।
शिष्य पाहिजे नेमस्त। सर्व प्रकारीं ॥२१॥
शिष्य पाहिजे साक्षेपी विशेष। शिष्य पाहिजे परम दक्ष।
शिष्य पाहिजे अलक्ष। लक्षी ऐसा ॥२२॥
शिष्य पाहिजे अति धीर। शिष्य पाहिजे अति उदार।
शिष्य पाहिजे अति तत्पर। परमार्थविषयीं ॥२३॥
शिष्य पाहिजे परोपकारी। शिष्य पाहिजे निर्मत्सरी।
शिष्य पाहिजे अर्थांतरीं। प्रवेशकर्ता ॥२४॥
शिष्य पाहिजे परमशुद्ध। शिष्य पाहिजे परम सावध।
शिष्य पाहिजे अगाध। उत्तम गुणांचा ॥२५॥
शिष्य पाहिजे प्रज्ञावंत। शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त।
शिष्य पाहिजे नीतिवंत। मर्यादेचा ॥२६॥
शिष्य पाहिजे युक्तिवंत। शिष्य पाहिजे बुद्धिवंत।
शिष्य पाहिजे संतासंत। विचार घेता ॥२७॥
शिष्य पाहिजे धारिष्टाचा। शिष्य असावा दृढ व्रताचा।
शिष्य पाहिजे उत्तम कुळींचा। पुण्यशील ॥२८॥
शिष्य असावा सात्त्विक। शिष्य असावा भजक।
शिष्य असावा साधक। साधनकर्ता ॥२९॥
शिष्य असावा विश्वासी। शिष्य असावा कायाक्लेशी।
शिष्य असावा परमार्थासी। वाढवूं जाणे ॥३०॥
शिष्य असावा स्वतंत्र। शिष्य असावा जगन्मित्र।
शिष्य असावा सत्पात्र। सर्व गुणें ॥३१॥
शिष्य असावा सद्विद्येचा। शिष्य असावा सद्भावाचा।

शिष्य असावा अंतरींचा । परमशुद्ध ॥३२॥
शिष्य नसावा अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी ।
शिष्य असावा संसारदु:खी । संतप्तदेही ॥३३॥
जो संसारदु:खें दुखावला । जो त्रिविधतापें पोळला ।
तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ॥३४॥
बहु दु:ख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे ।
संसार दु:खाचेनि गुणें । वैराग्य उपजे ॥३५॥
जयास संसाराचा त्रास । तयासीच उपजे विश्वास ।
विश्वासबळें दृढ कांस । धरिली सद्‌गुरूची ॥३६॥
अविश्वासें कास सोडली । ऐसीं बहुतेक भवीं बुडालीं ।
नाना जळचरीं तोडलीं । मध्येंचि सुखदु:खें ॥३७॥
याकारणें दृढ विश्वास । तोचि जाणा सच्छिष्य ।
मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ॥३८॥
जो सद्‌गुरुवचनें निवाला । तो सायुज्यतेचा आंखिला ।
संसारपांगें पांगिला । न वचे कदा ॥३९॥

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील चातुर्मास संपल्यावर श्रीदेवांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज तेथेच राहिले होते. श्रीदेवांच्या आज्ञेप्रमाणे यापुढील सर्व आयुष्य श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथेच राहावयाचे असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचा प्रवास संपुष्टात आला. त्यामुळे तेथील वास्तव्याच्या काळात आश्विनात यथाक्रम दिवाळी आली. यावेळी दिवाळीचा सोहळा पाच दिवस अत्यंत थाटात पार पडला. नरक चतुर्दशीच्या मुख्य दिवशी नदीतीरावर एका मोठ्या भांड्यात पाणी तापविले होते. त्या दिवशी सकाळी सर्व मंडळींना जोड्याने अभ्यंग स्नान घालावयास लावून श्रीस्वामीमहाराज तेथे थांबून हे कौतुक मोठ्या प्रेमाने पाहात उभे राहिले होते. त्यावेळी हें

जमलेल्या सर्व मंडळींची श्रीस्वामीमहाराजांना अत्तर लावून गरम पाण्याने स्नान घालण्याची इच्छा होती; परंतु त्यांना आंघोळीला गरमपाणी चालत नसल्यामुळे व त्याचा त्यांना त्रास होत असल्यामुळे सर्व लोकांनी अत्तराच्या कुप्या त्यांच्या चरणकमलावर ओतल्या व त्यांच्या सर्वांगाला अत्तर लावले. अशा प्रकारे सर्व लोकांनी व भक्तांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलांना व अंगाला स्पर्श करून सेवा करण्याची आपली हौस व कोड पुरवून घेतले. त्यानंतर त्या दिवशी सर्व मंडळी श्रीनारदेश्वराच्या दर्शनाला गेली. त्यावेळी तेथे आलेल्या पंधरा सुवासिनींच्या खणा-नारळाने ओट्या भरल्या व त्यांना लुगडी वगैरे देऊन श्रीनर्मदामातेचा प्रसाद दिला.

श्रीस्वामीमहाराजांनी दिवाळीला केलेली ही लीला पाहिली म्हणजे श्रीसंत नामदेवमहाराजांनी "संतोषाकारणें सज्जन जीवासी। साहाकारी होसी नारायणा॥" असे म्हणून देव-भक्तांच्या अंतरंग लीलेचे जे रहस्य प्रकट केले आहे त्याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. या दृष्टीने सर्व साधक-भक्त जर श्रीसंत नामदेवमहाराजांच्या पुढील अभंगाचे मनन करतील तर त्यांना या कथेतील रहस्य अल्पांशाने तरी ज्ञात होईल. श्रीसंत नामदेवमहाराज असे म्हणतात की—

**संतोषाकारणें सज्जन जीवासी। साहाकारी होसी नारायणा॥१॥**
**समान करिसी सर्वांभूतीं जाण। पतीतपावन भाक तुझी॥२॥**
**भक्तिभाव ज्यांचा भाग्यें आगळिया। होसी देवराया सर्वविध॥३॥**
**समर्थपणासी कोणा विचारावें। नामा म्हणे भावें कारण हा॥४॥**

अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांचा आपल्या भक्तांच्या सहवासात आनंदाने काळ जात असताना

मार्गशीर्ष महिना उजाडला. पौर्णिमा जवळ येत चालली. मग भक्तमंडळींनी श्रीदत्त जयंतीचा उत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा करण्याचे ठरविले आणि सर्वांनी ठरविल्याप्रमाणे मार्गशीर्ष पौर्णिमेला श्रीदत्त जयंतीचा उत्सव श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे अत्यंत भव्य प्रमाणावर साजरा करण्यात आला. त्यावेळी तेथे दोन-तीन हजार मंडळी जमली होती. त्यादिवशी रात्रभर भजनाचा व संकीर्तनाचा कार्यक्रम चालू होता. श्रीस्वामीमहाराज स्वतः सर्व कार्यक्रमांना उपस्थित राहिले होते. अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील श्रीदत्तजयंतीचा उत्सव व दुसऱ्या दिवशीचे पारणे मोठ्या थाटात पार पडले.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांच्या या मुक्कामाच्या काळात अनेक भक्तमंडळी त्यांच्या सहवासाचा व सत्संगतीचा लाभ व्हावा म्हणून तेथे राहिली होती. त्यांपैकी ज्यांना नोकरी धंद्याच्या निमित्ताने वारंवार आपल्या गावी जावे लागे ते सर्व लोक प्रमुख उत्सवांसाठी न चुकता श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे येऊन आपली सेवा रुजू करीत असत आणि त्या त्या आनंद सोहोळ्यात भाग घेत असत. अशा लोकांमध्ये श्री. अमृतराव सबनीस, श्री. धोंडोपंत कोपरकर वगैरे एकनिष्ठ भक्तांचा उल्लेख करावा लागेल. या लोकांना महिन्यामध्ये कितीही वेळा श्रीक्षेत्र गरुडेश्वराला जावे लागले तरी त्यांना कचेरीतून रजा वगैरे सवलती मिळण्यास अडचणी आल्या नाहीत. आपणास श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनास जावयाचे आहे तेव्हा आपल्या मार्गात कसल्याच अडचणी येणार नाहीत अशी त्यांची श्रद्धा होती.

वेदशास्त्रसंपन्न श्री. माधवराव परांजपे श्रीनर्मदा परिक्रमा करीत असताना श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आले. तेथे श्रीस्वामीमहा

राजांच्या दिव्य संगतीमध्ये त्यांनी तीन दिवस काढले. पुढील प्रदक्षिणेला निघण्यापूर्वी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचा निरोप घेतला. तेव्हा श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना प्रसाद म्हणून दोन शेर तांदूळ दिले. हे प्रसादाचे तांदूळ श्री. माधवरावांनी मोठ्या भक्तिभावाने आपल्या झोळीत वाळगले होते. जोपर्यंत हे प्रसादाचे तांदूळ त्यांच्या झोळीत होते तोपर्यन्त त्यांना अन्न सामुग्रीची कधीच ददात पडली नाही. उलट नेहमी समृद्धीच असे. एक वर्ष हे तांदूळ त्यांच्या झोळीत होते. त्यानंतर त्यांच्या सोवत्याने हे तांदूळ श्री. माधवराव यांच्या नकळत एक दिवस शिजवले. त्या दिवसापासून त्यांची अन्नाची ऋद्धिसिद्धी संपुष्टात आली.

श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणांना स्पर्श करण्याची संधी सहसा कोणाला मिळत नसे. सकाळी काकड आरती झाल्यावर सूर्योदयापर्यन्त ते पत्रोत्तरे लिहावयास बसत असत. त्यानंतर शौचविधीसाठी जात. त्यावेळी त्यांच्या श्रीचरणांना स्पर्श करण्याची संधी व श्रीचरणांवर मस्तक ठेवून नमस्कार करण्याचा लाभ घडला तर घडत असे. एरवी सबंध दिवस श्रीस्वामीमहाराज सोवळ्यात वसत असल्यामुळे ही संधी पुन्हा मिळत नसे. एक दिवस श्रीस्वामीमहाराज प्रातर्विधी आटोपून नदीवर स्नान करण्यासाठी निघाले. ते येण्यापूर्वीच काही मंडळी श्रीनर्मदेवर स्नानासाठी आली होती. त्यांच्यामध्ये एक गुजराथी वाई होत्या. त्यांनी पौषाच्या त्या कडक थंडीत गार वारा वाहात असताना कशाचीही तमा न वाळगता श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणांवर मस्तक ठेवून नमस्कार करण्यासाठी श्रीनर्मदानदीत सचैल स्नान केले व ओलेत्याने त्या वर आल्या. एवढ्यात श्रीस्वामीमहाराजही तेथे आले. त्यावेळी त्या वाई श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांवर

मस्तक ठेवून त्यांना भक्तिभावाने नमस्कार करणार इतक्यात श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " आमचे स्नान व्हावयाचे आहे." हे ऐकताच त्या बाई त्यांना असे म्हणाल्या की, " श्रीचरण नेहमीच स्नात असतात. या देहाला चारी धाम घडले. आता शेवटी या परमपवित्र श्रीचरणांच्या दर्शनाचा लाभ झाला. आता काही बाकी उरले नाही." इतके बोलून त्या भाविक बाईंनी श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणावर मस्तक ठेवून त्यांना नमस्कार केला व श्रीचरणांना अश्रूंनी अभिषेक केला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी हात उंच करून आशीर्वाद दे असा उपदेश केला की, " आता यापुढे स्वरूपी लीन असावे." या एका वाक्यानेच त्या बाईंचे जीवन धन्य व कृतकृत्य झाले.

एके दिवशी एक दक्षिणी बाई अहमदाबादहून चालत चालत श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्या. श्रीस्वामीमहाराजांसारख्या जगद्वंद्य देवसदृश महापुरुषांच्या दर्शनाला रिक्त हस्ताने जाऊ नये म्हणून घरी भिजलेले मूग होते त्यातीलच वाटीभर मूग त्यांनी त्यांना देण्यासाठी बरोबर आणले होते. अहमदाबाद ते श्रीक्षेत्र गरुडेश्वर हा दीर्घ प्रवास करावयाला त्या बाईंना काही दिवस लागल्यामुळे त्यांनी बरोबर आणलेल्या मुगांना मोड आले होते. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन नमस्कार केल्यावर त्या बाईंनी आपल्याबरोबर आणलेले ते मोड आलेले मूग त्यांच्यासमोर ठेवले. ज्यावेळी त्या बाईंनी ते मूग श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवले त्यावेळी अन्नपूर्णागृहात स्वयंपाकाचे काम करणाऱ्या एक बाई जवळच उभ्या होत्या. त्यांनी ते मोड आलेले मूग ज्यावेळी पाहिले त्यावेळी त्या एकदम थोरल्या त्यांना असे म्हणाल्या की, " काय हो बाई ! तुम्हाला एवढेसुद्धा

कळत नाही ? केवढे मोठाले मोड आले आहेत या मुगांना ! हे मूग स्वयंपाकाला चालणार नाहीत. आता हे काहीसुद्धा उपयोगाचे नाहीत." सर्वांसमक्ष रागाने बोललेले हे शब्द ऐकून त्या बाईंना फार वाईट वाटले. स्वयंपाकीण बाईंनी आपल्या वर्मावर बोट ठेवून मर्माघातच केला असे वाटून त्यांना जो खेद झाला त्याचे वर्णन करणेच शक्य नाही. ज्या बाईंनी मूग आणले होते त्या अहमदाबाद येथे एका श्रीमंत कुटुंबात स्वयंपाकाचेच काम करीत असत. आपण श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाच्या तळमळीने आलो व त्यांचे दर्शनही झाले; परंतु आपण दिलेला उपहार श्रीस्वामीमहाराजांना स्वीकारण्यास योग्य नाही या जाणिवेने त्यांना फार वाईट वाटले. त्या स्थितीतच त्या तेथे बसून राहिल्या.

श्रीस्वामीमहाराज आपल्या दर्शनाला येणाऱ्या प्रत्येक भक्ताचे मनोगत जाणत असत. आपल्यावरील आत्यंतिक श्रद्धेमुळेच आपल्या दर्शनासाठी आलेल्या बाईंनी अहमदाबाद ते श्रीक्षेत्र गरुडेश्वर हा लांबचा प्रवास पायी केला व आपल्यावर असलेल्या कमालीच्या भक्तीमुळेच त्यांनी मोठमोठे मोड आलेले मूगही काहीतरी उपहार म्हणून आपल्यापुढे ठेवले, हे सर्ववेत्त्या श्रीस्वामीमहाराजांना समजल्याशिवाय थोडेच राहणार ! श्रीस्वामीमहाराजांनी ते मोड आलेले मूग स्वत:जवळच ठेवून घेतले व दुपारी स्नानासाठी श्रीनर्मदानदीवर जाताना बरोबर घेतले. तेथे त्या मुगांचे मोड स्वत: धुऊन काढून परत आल्यावर ते एका भक्ताकडे दिले व ते त्या भक्ताला असे म्हणाले की, "आज रात्री या मुगांचा नैवेद्य श्रीदेवांना दाखवा." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यादिवशी त्या मुगांचा नैवेद्य श्रीदेवांना

दाखवून तो सर्वांना वाटण्यात आल्याचे पाहून त्या बाईंना अत्यानंद झाला. त्या सर्व प्रकाराने " श्रीस्वामीमहाराज गरिबांचे मनोगत जाणतात, गरिबांची भक्तीही त्यांच्या दरबारी रुजू होते, त्यांचे हृदय विशाल आहे, " इत्यादि विचारांनी त्या बाईंचे हृदय भरून आले व त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. अशा आनंदमय भावस्थितीत त्या मग्न असतानाच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना जवळ बोलावून घेतले व त्यांची विचारपूस केली. त्यावेळी आपण अहमदाबादेहून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी चालत चालत श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आलो, ही गोष्ट सर्वांसमक्ष सांगणे त्यांना भाग पडले. त्या बाईंची सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " तुमचा नैवेद्य श्रीदेवांना पावला. " हे शब्द ऐकताच त्या बाईंना गहिवर येऊन आपण धन्य व कृतकृत्य झालो असे वाटले.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसंत नामदेवमहाराजांनी देव कसे भक्तवत्सल असतात याचे जे वर्णन केले आहे त्याचे स्मरण होऊन श्रीसंतही तसेच भक्तवत्सल असतात याची प्रचीती येते. ते असे म्हणतात की–

देवा तूं जया होसी प्रसन्न । तया न लागे कर्मबंधन ।
निकें म्हणती सकळ जन । नीच लोक वंदिती ॥ १ ॥
तुझी दृष्टी कृपावंता । जयावरी पडे अनाथनाथा ।
तया न बाधी संसारव्यथा । सर्वस्व त्याचें हरिसी ॥ २ ॥
माती धरिल्या होय कनक । भोग भोगिती परम मूर्ख ।
नातळती महादोष । मुखीं नाम गर्जतां ॥ ३ ॥
धन्य धन्य ते संसारी । हो कां पुरुष अथवा नारी ।
दरिद्र नाहीं त्यांचें घरीं । तूं श्रीहरी सानुकूळ जालिया ॥ ४ ॥

ऋद्धि सिद्धी द्वारा बोळंगती । वैरी दास्यत्व करिती ।
विषें तें अमृत होती । तूं श्रीपति सानुकूळ जालिया ॥ ५ ॥
येथूनि नेसील परते । नामा म्हणे वैकुंठातें ।
लक्षा नये चहूं वेदां तें । नाना मतें धांडोळितां ॥ ६ ॥

श्रीस्वामीमहाराज ज्या काळात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे राहात होते, त्या काळात श्रीनर्मदानदीच्या पैलतीरावर खाली पश्चिमेकडे ८–१० मैल अंतरावर राजपिपळा नावाचे संस्थान होते. या संस्थानची राजधानी राजपिपळा येथेच असून त्या ठिकाणी एक सरकारी अधिकारी राहात असत. त्यांची पत्नी फार धार्मिक होती. बालपणी आई–वडिलांकडून साधुसंतांच्या गोष्टी ऐकल्यामुळे त्यांची वृत्ती अत्यधिक धार्मिक झाली होती. त्या बाईंचे यजमान जसे नास्तिक नव्हते तसे ते फारसे धार्मिक वृत्तीचेही नव्हते. आपले कुलधर्म कुलाचार योग्य प्रकारे पार पाडावयाचे एवढ्यावरच त्यांचा धार्मिकपणा मर्यादित होता. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे कोणीतरी महात्मा आले आहेत असे ज्यावेळी त्या बाईंना कळले त्यावेळी आपण त्यांच्या दर्शनाला जावे व त्यांची काहीतरी सेवा करावी अशी त्यांना तीव्र इच्छा झाली. परंतु आपले यजमान आपल्याला श्रीक्षेत्र गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजांसारख्या महात्म्यांच्या दर्शनाला घेऊन जाण्याची बिलकुल शक्यता नाही याची खात्री असल्यामुळे त्या बाईंनी आपल्या घराच्या परसामध्ये ज्या भाज्या व फुले निघत असत त्याच भाज्या व फुले श्रीस्वामीमहाराजांकडे पाठवून सेवा करण्याचे ठरविले.हा सेवेचा विचार त्या बाईंच्या मनात आल्यावर "सत्कामाः फलन्तु ते ॥" या न्यायाने त्यांना ही सेवा श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी कशी रुजू करावयाची हेही सुचले, म्हणून चांगल्या

कामना देवच पूर्ण करून घेत असतो. दररोज राजपिपळ्याहू पोष्टाची डाक घेऊन एक पोष्टमन श्रीक्षेत्र गरुडेश्वरला जा असे. त्याचा या सेवेसाठी उपयोग करून घ्यावयाचा या इच्छे एके दिवशी त्या बाईनी पोष्टमनला घरी बोलाविले व त्या त्या असे म्हणाल्या की, " तू दररोज पत्रांची डाक घेऊन गरुडेश्वर जातोस ना ? तर मग असे कर. तू दररोज गरुडेश्वरला जाण्यापू आमच्या घरी जेवावयास येत जा आणि जेवण झाल्यानं मी देईन ती फुले व भाज्या गरुडेश्वरी नेऊन तेथे जे संन्या महाराज आहेत त्यांच्या चरणी रुजू करीत जा. माझ्या या से तूही सहभागी हो. तुला हे जमेल का ? तुला हे मान्य आ का ? " त्या बाईंचे हे सर्व बोलणे ऐकल्यावर त्यांचे सर्व म्ह पोष्टमनने मोठ्या आनंदाने मान्य केले. या निमित्त श्रीस्वामीमहाराजांसारख्या महात्म्याच्या दर्शनाचा, सेवेचा तद्द्वारा कृपाप्रसादाचा आपणासही लाभ घडेल या विचाराने पोष्ट मनचे मन अगदी भारावून गेले. इतकी सर्व योजना तयार झाल्याव श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी भाज्या व फुले पाठवून त्यां सेवा करण्याची इच्छा ज्यावेळी त्या बाईंनी आपल्या यजमानांच्या कानावर घातली त्यावेळी त्यांनीही काही हरकत न घेता आप मंडळींच्या इच्छेला आनंदाने मान्यता दिली. आपली मंडळी ए महात्म्याची सेवा करीत आहेत तर ती त्यांना करू द्यावी या उ विचाराने त्यांनी मान्यता दिल्यामुळे त्या बाईंच्या घरातून थों गरुडेश्वरला देवांच्या पूजेसाठी रोज ताजी फुले व नैवेद्यास ताज्या भाज्या जाऊ लागल्या.

एक दिवस त्या बाई भीतभीत आपल्या यजमानांना अं म्हणाल्या की, " आपण गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजां

चरण दर्शनाला जाऊ या. " हे ऐकताच तें आपल्या सौ. मंडळींना असे म्हणाले की, "आपली कुलदेवता देवी असून आपल्या घराण्यात देवीचीच उपासना व कुलाचार आहेत आणि श्रीस्वामीमहाराज हे तर श्रीदत्तभक्त आहेत. आपण त्यांच्या दर्शनाला गेलो आणि त्यांनी जर आपल्याला श्रीदत्तभक्ती करावयास सांगितली तर ती आपण कशी करणार ? व कशी सांभाळणार ? मला तरी ते शक्य होणार नाही. याकरिता आपण श्रीस्वामी महाराजांच्या दर्शनालाच न गेलेले बरे !" आपल्या यजमानांच्या या उत्तराने त्या बाई हिरमुसल्या. अर्थात् त्या बाईंचे श्रीक्षेत्र गरुडेश्वरला जाणे रद्द झाले. मात्र असे झाले तरी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची त्यांची इच्छा दिवसेंदिवस तीव्र होऊ लागली. अशा स्थितीतही त्या बाईंची दररोजची फुलांची व भाज्यांची सेवा नियमितपणे व उत्तमरीतीने चालू होती.

कालौघात एके दिवशी त्या बाईंच्या यजमानांना सरकारी कामासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला जावे लागले. तेथील काम आटोपल्यावर आपण एवढ्याजवळ आलो आहोत तर श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जावे असा विचार करून ते भीतभीतच त्यांच्या दर्शनाला गेले. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेऊन ज्यावेळी ते तेथे बसले त्यावेळी बोलण्याच्या ओघात रोज फुले व भाज्या पाठविणाऱ्या बाईंचे हे यजमान आहेत हे श्रीस्वामीमहाराजांना ज्ञात झाले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःहून त्यांना आपल्याजवळ बसवून घेतले आणि "श्रीदेवी माहात्म्य" स्वतः समजावून सांगितले व पुढे त्यांना असे म्हणाले की, "आपल्या कुळात चालत आलेली देवीचीच उपासना आपण करीत असावे. त्यामुळेच आपले कल्याण होईल." श्रीस्वामीमहाराजांनी अशा

प्रकारे आपल्या कुलाचारात चालत आलेली व आपल्याला मनोनुकूल अशी श्रीदेवीची उपासना सांगितल्याने त्या गृहस्थांना कमालीचे आश्चर्य वाटले आणि त्यांच्या डोळ्यात आनंदाश्रू उभे राहिले. खरोखर श्रीस्वामीमहाराजांनी त्या गृहस्थांना काही एक न विचारता त्यांना पोषक अशी उपासना दिल्यामुळे त्यांच्या मनातील भीती आपोआप दूर झाली.

पुढे काही दिवसांनी ही उभयता पती–पत्नी ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेली त्यावेळी श्रीस्वामीमहाराज पुराण सांगत होते. त्यावेळी स्त्रीधर्माचे विवरण चालू होते. पुराण संपल्यावर श्रीस्वामीमहाराज सायं स्नानसंध्यादि आन्हिकासाठी श्रीनर्मदानदीवर जावयाला निघाले. त्यावेळी त्या बाईही त्यांच्या मागून जाऊ लागल्या. आपल्या मागून कोणीतरी येत आहे याची चाहूल लागताच श्रीस्वामीमहाराजांनी थांबून मागे वळून पाहिले. ज्याक्षणी श्रीस्वामीमहाराज मागे वळून थांबले त्याक्षणी त्या बाई धावत पुढे गेल्या व श्रीचरणांवर मस्तक ठेवून त्या म्हणाल्या की, " ह्यांना घेऊन येते." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज अत्यंत प्रेमाने त्यांना असे म्हणाले की, " ठीक आहे. आम्ही थांबतो." त्यानंतर श्रीस्वामीमहाराज त्या बाई आपल्या यजमानांना घेऊन येईपर्यंत तेथेच थांबले. त्या बाई आपल्या यजमानांना घेऊन आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांना श्रद्धाभक्तीपूर्वक सुगंधी अत्तर लावून श्रीचरणांवर मस्तक ठेवले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्या उभयतांना उद्देशून प्रसन्न मनाने असे म्हणाले की, "तुमची दररोजची फुलांची व भाजीची सेवा श्रीदेवांना पोहोचली. त्याचप्रमाणे दररोजचा अन्नाचा नैवेद्यही श्रीदेवांच्या ठिकाणी रुजू झाला." त्या बाई पोटच्या जंतू

घालीत होत्या त्याची ही पावतीच होती.

ही सर्व कथा वाचली म्हणजे नुसत्या सेवेने अर्थात् दास्य भक्तीने श्रीस्वामीमहाराजरूपी देव कसे प्रसन्न होतात व "समर्था जनीं घेतला भार माझा ॥१॥" असे श्रीसमर्थरामदासस्वामी-महाराजांनी करुणाष्टकात म्हटल्याप्रमाणे दासाची किंवा सेवकाची कशी भावना असते याची प्रचीती आल्याशिवाय राहात नाही. किंबहुना श्रीसमर्थांच्या शब्दात श्रीस्वामीमहाराजांची अशी प्रार्थना करता येईल की—

नसे भक्ति ना ध्यान ना ज्ञान कांहीं ।
नसे प्रेम हें राम विश्राम नाहीं ।
असा दीन अज्ञान मी दास तूझा ।
समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १ ॥
रघूनायका जन्म जन्मांतरींचा ।
अहंभाव छेदोनि टाकी दिनाचा ।
जनीं बोलती दास या राघवाचा ।
परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ २ ॥
रघूनायका दीन हातीं धरावें ।
अहंभाव छेदोनियां उद्धरावें ।
अगूणी तयालागिं गूणी करावें ।
समर्थें भवोसागरीं ऊतरावें ॥ ३ ॥
किती भार घालूं रघूनायकाला ।
मजकारणें शीण होईल त्याला ।
दिनानाथ हा संकटीं धाव घाली ।
तयाचेनि हें सर्व काया निवाली ॥ ४ ॥
मला कायसा राम कैवल्यदाता ।

तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ।
समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें ।
सदा सर्वदा नाम वाचें वदावें ॥ ५ ॥
दिनाचें उणें दीसता लाज कोणा ।
जनीं दास दीसे तुझा दैन्यवाणा ।
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी ।
तुझा दास पाहे सदा शीघ्र कोपी ॥ ६ ॥



श्रीक्षेत्र गरुडेश्वरच्या मुक्कामात एक श्री. शास्त्रीबुवा श्रीस्वामीमहाराजांजवळ वसून वेदान्त श्रवण करीत असत. संस्कृत भाषेवद्दल त्यांना फार अभिमान वाटत असे. त्यामुळे प्राकृत भाषेला ते अत्यंत कमी लेखीत असत. श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ प्राकृत भाषेत असल्यामुळे त्या ग्रंथावद्दल त्यांना थोडासुद्धा आदर वाटत नसे. श्रीक्षेत्र गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात व सत्संगतीत राहून ज्यावेळी अनेक ब्राह्मण भक्तमंडळी श्रीगुरुचरित्राची पारायणे करीत असताना ते पाहात असत त्यावेळी या गोष्टीचे श्री. शास्त्रीबुवांना फार नवल वाटत असे. पुढे श्रीस्वामीमहाराजांच्या महासमाधीनंतर हे श्री. शास्त्रीबुवा आपल्या घरी परत गेले. दोन वर्षांनंतर त्यांची पत्नी फारच आजारी पडली. श्री. शास्त्रीबुवांनी आपल्या सौ. मंडळींना नानातऱ्हेने औषधोपचार आणि मांत्रिक व तांत्रिक उपचारही केले; परंतु कोणत्याच उपचाराने त्यांना गुण येईना. त्यामुळे श्री. शास्त्रीबुवा हताश झाले होते. अशा स्थितीत त्यांनी शेवटी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी अनन्यभावाने आपल्या सौ. मंडळींना वरे वाटण्यासाठी उपाय सुचवावा म्हणून प्रार्थना केली. ज्या दिवशी त्यांनी

श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रार्थना केली त्याच दिवशी श्रीस्वामीमहाराज त्यांच्या स्वप्नात येऊन त्यांना असे म्हणाले की, "श्रीगुरुचरित्र हो काय आहे ? आम्ही उपनिषदे वाचणारे ! या साध्या प्राकृत ग्रंथात हो काय आहे ?" श्रीस्वामीमहाराज असे म्हणून ज्यावेळी मंदस्मित करीत स्वप्नातून अदृश्य झाले त्यावेळी श्री. शास्त्रीबुवांची निद्रा भंग पावली. ते उठून बसले व त्यांनी आपल्याला पडलेल्या स्वप्नाचा अर्थ लावून पाहिला. ज्याक्षणी श्रीस्वामीमहाराजांच्या वाक्यातील गूढार्थाचा प्रकाश त्यांच्या बुद्धीला ज्ञात झाला त्याक्षणी त्यांना आपली चूक कळून आली. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी आपली सौ. मंडळी वरी होण्याचा व संकटातून सुटण्याचा मार्ग आपणास दाखवून दिला अशी त्यांची खात्री झाली. त्यानंतर आपल्या शेजारी राहणाऱ्या लोकांना आपल्या पत्नीकडे लक्ष ठेवावयास सांगून त्यांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वराचा रस्ता धरला.

श्री. शास्त्रीबुवा मुखाने "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा।" असे भजन करीत श्रीक्षेत्र गरुडेश्वरला पोहोचले. तेथे गेल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीसमोर साष्टांग नमस्कार घालून त्यांनी अत्यंत शरणागतीपूर्वक त्यांची क्षमा मागून प्रार्थना केली व दुसऱ्याच दिवशी श्रीगुरुचरित्राच्या पोथीची पूजा करून सप्ताहाला प्रारंभ केला. दोन वर्षांपूर्वी श्री. शास्त्रीबुवांनी श्रीस्वामीमहाराजांच्या संगतीमध्ये बरेच दिवस काढलेले होते. खरे तर श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य संगतीचा अमृतस्पर्शच त्यांना झाला होता. त्यामुळे श्री. शास्त्रीबुवांना श्रीगुरुचरित्र वाचता–वाचता दिव्य आनंदाचा लाभ होऊ लागला. त्यांच्या सर्व वृत्ती श्रीगुरुमय होऊं लागल्या. त्यांच्या देहाची स्मृती

क्षणाक्षणाला नष्ट होऊ लागली. अशा अवस्थेतच श्री. शास्त्रीबुवांचा श्रीगुरुचरित्र सप्ताह संपला. ते सप्ताहाचा प्रसाद घेऊन घरी आले. त्यांची पत्नी घराच्या दारातच त्यांचे स्वागत करावयाला उभी होती.

उपरोक्त सर्व कथा सूक्ष्मपणे वाचली म्हणजे श्रीगुरुचरित्राचा अपरंपार महिमा लक्षात आल्याशिवाय राहणार नाही. हा महिमा वर्णन करताना श्रीगुरुचरित्रकार श्रीसरस्वती गंगाधर असे म्हणतात की–

**सिद्ध म्हणे नामधारकासी । हें गुरुचरित्र दिनीं निशीं ।**
**मनोभावें वाचनेसी । सकळ कामना पुरतील ।। ५०.२६१ ।।**
**श्रीगुरुचरित्र कामधेनु पूर्ण । सांगितलें तुज विस्तारोन ।**
**दु:ख दरिद्र गेलें पळोन । ऐसें जाणा निर्धार ।। ५१.६३ ।।**
**ऐसें श्रीगुरुचरित्र । श्रवणीं कीर्तनीं अतिपवित्र ।**
**सुखें नांदती पुत्रपौत्र । लक्ष्मीवंत होती जाण ।। ६४ ।।**
**धर्म अर्थ काम मोक्ष । तयासी लाभे प्रत्यक्ष ।**
**थोर आनंद उभयपक्ष । पुस्तक लिहितां सर्वसिद्धी ।। ६५ ।।**
**म्हणे सरस्वती गंगाधर । श्रीगुरुचरित्र मनोहर ।**
**ऐकतां पावती पैलपार । संसार सागर तरोनियां ।। ६७ ।।**
**श्रीगुरुचरित्र ऐकतां । लाभे सकळ परमार्था ।**
**या कारणें ऐंका म्हणोनी समस्तां । विनवीतसे नामधारक ।। ६८ ।।**
**अमृताची असे माथणी । स्वीकारितां भाविकजनीं ।**
**धर्मार्थकाममोक्षसाधनीं । हेंचि कथा ऐकावी ।। ६९ ।।**
**पुत्रपौत्रांची ज्यासी चाड । तयासी ही कथा असे गोड ।**
**राहे लक्ष्मी स्थिर अखंड । श्रवणमात्रें घरीं नांदे ।। ७० ।।**
**चतुर्विध पुरुषार्थ । लाधती श्रवणें परमार्थ ।**

श्रीनृसिंहसरस्वती गुरुनाथ । रक्षी त्यांचे वंशोवंशीं ।। ७१ ।।
म्हणे सरस्वती गंगाधर । श्रोतयांसी करी नमस्कार ।
कथा ऐका मनोहर । सकळाभीष्टें साधती ।। ७२ ।।
मुख्य भाव कारण । प्रेमें करितां श्रवण पठण ।
निजध्यास आणि मनन । प्रेमें करोनि साधिजे ।। ७३ ।।

नागपूर येथील एका भाग्यवान् ब्राह्मण गृहस्थांचीही हकीकत अशीच विस्मयकारक आहे. हे ब्राह्मण गृहस्थ एका यजमानांच्या घरी पुजारी होते. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून ते त्यांच्या दर्शनासाठी अत्यंत आतुर झाले होते; परंतु त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम कोठे आहे हे त्यांना ठाऊक नव्हते. एक दिवस हे ब्राह्मण गृहस्थ काही कामासाठी आपल्या घराच्या जवळील पोष्टात गेले असता तेथे एक पोष्टमन आपल्यासमोर घातलेल्या पत्रांच्या ढिगामधून एक-एक पत्र काढून घेऊन त्यावरील नावे व पत्ते मोठ्याने वाचून ती गाववार वेगळी काढीत होता. त्यातील एका पत्रावरील नाव व पत्ता वाचताना त्याने प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज, मु. पो. श्रीक्षेत्र गरुडेश्वर, राजपिपळा, स्टेट गुजरात असे मोठ्याने वाचले. ते या ब्राह्मण गृहस्थांनी ऐकल्यामुळे त्यांना अनायासेच श्रीस्वामीमहाराजांचा पत्ता मिळाला. जरी देवाच्या कृपेने पत्ता मिळाला तरी इतक्या लांब जाण्यासाठी आपणास पैसे व रजा कशी मिळणार या विवंचनेने ग्रस्त होऊनच ते गृहस्थ पोष्टातून घरी आले.

ते ब्राह्मण गृहस्थ दुसऱ्या दिवशी आपल्या यजमानांच्या घरी जाऊन नेहमी प्रमाणे देवपूजा करीत असताना एरव्ही देवघरात क्वचितच येणारे यजमान त्या दिवशी देवपूजा कशी करतात

चालली आहे हे पाहण्यासाठी देवघरात आले. आपले यजमान आज अकस्मात् येथे आले आहेत हे पाहून ते ब्राह्मण गृहस्थ पुजारी त्यांना असे म्हणाले की, " श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे साक्षात् श्रीदत्तात्रेयांनी श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामीमहाराज या नावाने यतिवेष धारण करून अवतार घेतला आहे. या अवतारी महात्म्यांचे दर्शन घ्यावे व त्यांच्या चरणकमलांची सेवा करून आपले जीवन धन्य व कृतार्थ करावे अशी माझी इच्छा आहे. जर आपण यासाठी काही दिवसांची रजा दिलीत तर माझ्यावर मोठे उपकार होतील." आपल्या पुजाऱ्यांनी केलेली ही प्रार्थना ऐकताच त्या यजमानांच्या अंतःकरणात श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने द्रव उत्पन्न होऊन त्यांनी त्यांना भरपूर रजा तर दिलीच आणि वर वाटखर्चाच्या पैशांची सोयही केली.

ते श्री. पुजारी गृहस्थ ज्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला जावयाला निघाले त्यावेळी श्रीदत्तजयंतीचा उत्सव जवळ आला होता. दरवर्षी श्रीदत्तजयंतीला श्रीगुरुचरित्राचा सप्ताह करण्याचा त्या पुजारी ब्राह्मण गृहस्थांचा परिपाठ होता. ज्यावेळी ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरला पोहोचले त्यावेळी मध्यान्हीची वेळ झाली होती व श्रीस्वामीमहाराज मध्यान्ह स्नानासाठी श्रीनर्मदा नदीवर चालले होते. त्या ब्राह्मण गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांना श्रीनर्मदा नदीवर जाताना पाहिले व ते त्यांच्या मागून गेले आणि अंगावरचे कपडे उतरवून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना चरणस्पर्शपूर्वक नमस्कार केला. श्रीस्वामीमहाराजांनी स्नान करताना त्यांना खुणेने बोलावून घेतले व श्रीनर्मदानदी ज्या अंगाने खाली वाहात होती त्या वाजूला स्नान करण्यास सांगितले. यामुळे त्या ब्राह्मण गृहस्थांना

अंगावरून आपोआपच श्रीस्वामीमहाराजांनी स्नान केलेले पाणी गेले. त्यामुळे त्यांना श्रीगंगास्नानाचा किंबहुना त्याहून पवित्र अशा जलाच्या स्नानाचा लाभ झाला.

त्या ब्राह्मण गृहस्थांचे स्नानादि नित्यकर्म आटोपल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन करून श्रीगुरुचरित्राच्या सप्ताहाला प्रारंभ केला. पहिल्या दिवशीचे वाचन संपत आले तशी त्यांना अशी आठवण झाली की, "दरवर्षी आपण भुईमुगावर किंवा ताकावर राहूनच सप्ताह करीत असतो. आता येथे यांपैकी एखाद्या वस्तूची सोय कशी होईल ?" अशा विचारात सप्ताहाच्या पहिल्या दिवसाचे वाचन संपल्यावर ते गृहस्थ त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करावयास गेले त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "शेजारच्या घरी जा. तेथे ताकाची सोय होईल." अशा रीतीने त्या गृहस्थांची ताकाची सोय झाली व त्यांचा श्रीगुरुचरित्राचा सप्ताह उत्तम रीतीने पार पडला. श्रीदत्तजयंतीही आनंदाने पार पडली. पारण्याच्या दिवशी श्रृंगेरी मठाचे श्रीशंकराचार्य श्रीस्वामीमहाराजांबरोबर भिक्षेसाठी निघाले. त्यावेळी त्या ब्राह्मण पुजारी गृहस्थांच्या मनात असा विचार आला की, "आपणास स्वयंपाक करता आला असता तर आपणही श्रीस्वामीमहाराजांना भिक्षा केली असती." इतका विचार त्या गृहस्थांच्या मनात येतो न येतो तोच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आपल्या जवळ बोलावून असे सांगितले की, "आपण दररोज जेथून ताक आणता तेथून ताक घेऊन या." या आज्ञेबरोबर त्या ब्राह्मण गृहस्थांनी शेजारून ताक आणून ते श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवले. ते पाहताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अहे ! ते ताक

आम्हाला भिक्षा म्हणून वाढा." त्यावरोवर त्या ब्राह्म गृहस्थांनी ते ताक श्रीस्वामीमहाराजांना भिक्षा म्हणून वाढले त्यावरोवर आपणास ताक कशाकरिता आणावयास सांगि याचा उलगडा होऊन त्या ब्राह्मण गृहस्थांना धन्य व कृता वाटले. श्रीस्वामीमहाराज भक्तांच्या मनातील सर्व इच्छा आपू त्या पूर्ण करतात, याची प्रचीती येऊन त्यांना कृतकृत्यता वाटल व "भक्ताचे हृदयींची जाणोनि अवस्था! आला शरणाग लोभापरू ॥' ही श्रीसंत नामदेवमहाराजांनी वर्णन केले अलौकिक अवस्था आपणास प्रत्यक्ष अनुभवावयास मिळाल म्हणून त्यांच्या डोळ्यात अश्रू तरळले. आपण लोहसमान अ श्रीस्वामीमहाराज आपल्यासारख्या लोखंडाचे सोने करणारे परी आहेत, या जाणिवेने त्यांचा ऊर भरून आला व ते श्रीसं नामदेवांचा अभंग आपल्या मनातल्या मनातच पुढीलप्रमाणे म्ह लागले.

पतित अनेक पावन तूं एक । जालासी सुरेख कवणाचेनी ॥१
पतित मी भला कीं पावन तूं भला। सांग बा विठ्ठला मायबापा॥२
परिसाचें महिमान कैसेंनीं वाढतें। निर्माण नसतें लोहो जरी॥३
कल्पतरूची कीर्ति कैसेंनी वाढते। जरि कल्पना नसती याचकासी॥४
प्रजेसी पोशिलें शोभती राजेश्वर। तैसा हा विचार तुम्हां आम्हां॥५
नामा म्हणे स्वामी नोव्हे ते आमुचे। तुज देवा कैंचें क्रियाकर्म॥६

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांचा मुक्का असताना वडोद्याहून पुष्कळ लोक त्यांच्या दर्शनासाठी येत अ या लोकांना चांदोदहून नावेतून यावे लागे. एक दिवस चांदोद वरीच मंडळी नावेमध्ये चढली. त्यामध्ये एक विकेशा विधवा होत्या. त्या एकट्याच असून त्यांच्या सोबत कोणी नव्हते. अ

स्थितीत नावेतील काही लोकांनी खोचक शब्दात त्यांची कुचेष्टा चालविली. त्या बाई बिचाऱ्या डोळे मिटून श्रीस्वामीमहाराजांचे नामस्मरण करू लागल्या. ती नौका श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे पोहोचली त्यावेळी रात्र झाली होती. नौकेतील सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर जेवणाची व्यवस्था काय करावयाची या विचारात सर्वजण असताना अन्नपूर्णागृहातून एक वृद्धा बाहेर आल्या आणि त्या आलेल्या सर्व लोकांना उद्देशून असे म्हणाल्या की, " रसोड्यात पुष्कळ अन्न शिल्लक आहे. सकाळपासून काम करून मी दमलेली असल्यामुळे आलेल्या मंडळींनी आपली व्यवस्था करून घेतली तर फार बरे होईल. आपणा सर्वांना त्रास होणार आहे हे खरे आहे; पण माझ्या वयापुढे व प्रकृतीपुढे माझा इलाज चालत नाही. " हे सर्व बोलणे ऐकताच आलेल्या सर्व मंडळींपैकी सर्वांच्या कुचेष्टेचा विषय झालेल्या त्या विधवाबाई उठल्या व केरकचरा काढून नदीवर स्नान करून येऊन त्यांनी सर्वांना पत्रावळी मांडून सोवळ्याने जेवावयास घातले व शेवटी सर्वांची उष्टीही काढली. त्यानंतर त्या सर्वांच्या मागून जेवल्या. ज्या ज्या लोकांनी त्यांची नावेत चेष्टा केली होती त्यांच्या मनाची अवस्था फारच विकट झाली; कारण श्रीस्वामीमहाराजांच्या चरणसेवेला आलेल्या भक्ताने सर्वांबरोबर कसे वागावे याचा वस्तुपाठच त्यांनी आपल्या कृतीने सर्व लोकांना दाखवून दिला होता.

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांच्या चरणसेवकांनी " पुण्य परउपकार " या श्रीसंत तुकाराममहाराजांनी सांगितलेल्या न्यायानेच वागले पाहिजे याची प्रतीती अंतःकरणात उमटल्याशिवाय राहात नाही. या दृष्टीने श्रीसंत तुकाराममहाराज

असे म्हणतात की–

पुण्य पर उपकार पाप ते परपीडा ।
आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म ।
आणिक हें वर्म नाहीं दुजे ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण ।
अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा संग तोचि स्वर्गवास ।
नर्क तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका म्हणे उघडें आहे हित घात ।
जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

एक विधवाबाई श्रीस्वामीमहाराजांच्या भक्त होत्या. त्या बाईंवर तीस–चाळीस माणसांचे कुटुंब चालविण्याची जबाबदारी होती. त्यांना पोटदुखीची व्यथा होती; पण पोटदुखीचे दुःख घेऊन कष्टी होऊन बसून राहण्यास त्यांना वेळ नव्हता. ज्यावेळी पोटदुखी सुरू होत असे त्यावेळी त्या बाई विडयातून तंबाखू खात असत. त्यामुळे त्यांना आराम वाटत असे. मात्र आपणास एकदा श्रीस्वामीमहाराजांचे प्रत्यक्ष दर्शन व्हावे, आपली पोटदुखी बरी व्हावी व आपले तंबाखूचे व्यसन सुटावे असे त्यांना वाटत असे. परंतु श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाण्याचा योग काही त्यांना येत नव्हता. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची तळमळ त्या बाईंना लागली असता एके दिवशी त्यांना स्वप्नातच श्रीस्वामीमहाराजांनी दर्शन दिलें. त्यावेळी स्वप्नातच त्या बाईंनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला व त्या त्यांना असें म्हणाल्या की, "प्रभो! मला आपण क्षमा करा. माझे पोट दुखत असल्यामुळे मी तंबाखू

घालून विडा खाते. तरी आपण माझी पोटदुखी वरी करा व माझी या तंबाखूच्या व्यसनातून मुक्तता करा." त्या बाईंची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आपण औषध म्हणून तंबाखू खात आहात. व्यसन म्हणून नाही. औषधाला दोष नाही." इतके म्हणून श्रीस्वामीमहाराज अदृश्य झाले. पुढे, श्रीगुरुपौर्णिमेला त्यांना श्रीस्वामीमहाराजांचे प्रत्यक्ष दर्शन झाले व त्यांची पोटदुखी नुसत्या दर्शनाने दूर होऊन तंबाखूही सुटली. कालौघात त्यांनी श्रीगुरुपौर्णिमेच्याच दिवशी देह ठेवला.

वरील सर्व कथा वाचली म्हणजे श्रीसंतांच्या दर्शनाने "पाप ताप दैन्य जाय उठाउठीं ।" असे जे श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटले आहे त्याची प्रचीती येऊन श्रीस्वामीमहाराजांच्या महिम्याच्या दर्शनाने मन पुलकित होते. जणूकाही श्रीस्वामी-महाराजांच्या अंगचाच हा अपार महिमा वर्णन करताना श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की—

पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । झालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥
ऐसें बळ नाहीं आणिकांचें अंगीं । तप तीर्थ जगीं दान व्रत ॥ २ ॥
चरणींचें रज वंदी शूळपाणि । नाचती कीर्तनी त्याचे माथां ॥ ३ ॥
भव तरावया उत्तम हें नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे मन झालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥ ५ ॥

* * *

सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥ १ ॥
म्हणउनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥ २ ॥

न करवे हालीचाली । निवारिली चिंता हे ॥ ३ ॥
तुका म्हणे निवे तनु । रजकणु लागतां ॥ ४ ॥

एक सुशिक्षित पदवीधर ब्राह्मण गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांचे भक्त होते. त्यांना एका संस्थानामध्ये मोठ्या पगाराची नोकरी होती. त्यांना रजा मिळाली की, ते श्रीस्वामीमहाराज जेथे असतील तेथे जाऊन त्यांच्या सेवेचा व दिव्य संगतीचा लाभ घेत असत. या गृहस्थांचे स्वदेशी व्रत घेतलेले एक मित्र होते. त्यांना स्वदेशीचे वेड लागलेले होते. ते मित्र आपल्या या ब्राह्मण गृहस्थ मित्रांबरोबर नेहमी स्वदेशी चळवळीबद्दल वादविवाद घालीत असत. आपल्या या पदवीधर मित्राची श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी फार भक्ती आहे हे या स्वदेशीव्रत धारण केलेल्या मित्राला माहीत होते. एके दिवशी स्वदेशीव्रतधारी मित्र आपल्या पदवीधर मित्राला असे म्हणाले की " तुमच्या श्रीस्वामीमहाराजांचे स्वदेशी बद्दल काय मत आहे ? त्यावेळी पदवीधर मित्र असे म्हणाले की " श्रीस्वामीमहाराजांबरोबर वादविवाद करण्याची माझी योग्यता नाही व असले काही प्रश्न विचारण्याचे विचारही माझ्या मनात कधी येत नाहीत. ते आज्ञा करतील त्याप्रमाणे आदरपूर्वक वागावयाचे एवढेच मला ठाऊक आहे. " हे ऐकल्यावर स्वदेशी व्रतधारी मित्र गप्प बसले.

अशा रीतीने काही दिवस गेल्यावर हे दोघे मित्र एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे गेले व त्यांना नमस्कार करून एका बाजूला बसले. तेवढ्यात बोलता बोलता श्रीस्वामीमहाराज जणूकाही स्वगतच पण मोठ्याने बोलत असे म्हणाले की, " लोक आमच्याजवळ येतात कशाला? आमच्याजवळ काय आहे ? ही एक लंगोटी फक्त आहे. आम

एक भक्त आपल्या शेतात कापूस पिकवितो. त्याची बायका–मुले कापूस पिंजून सूत काढतात व त्याचे वस्त्र तयार करून आम्हाला पाठवितात. आम्ही ते वापरतो." श्रीस्वामीमहाराजांच्या या स्वगत बोलण्याने ते स्वदेशव्रतधारी तरुण काय समजावयाचे ते समजले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी त्या स्वदेशव्रतधारी गृहस्थांना स्वदेश म्हणजे आपल्या आत्मस्वरूप प्राप्तीच्या देशाची अर्थात् सहस्राराची वाट धरण्याचा उपदेश केला व त्याचे साधनही सांगून त्यांना कृतकृत्य केले.

या प्रसंगानंतर पुढे काही महिन्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे हे पदवीधर भक्त सेवानिवृत्त झाले. "आतापर्यन्त आपण सरकारी नोकरी व कुटुंब पोषण एवढाच उद्योग केला. यापुढे तरी आपले उर्वरित आयुष्य परमार्थाकडे लावावे," या विचाराने व हेतूने ते श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगतीसाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला गेले. श्रीक्षेत्र गरुडेश्वरी गेल्यावर तेथे काही वस्त्रे व भांडी दान करावीत म्हणून त्यांनी त्या वस्तू आपल्यावरोबर घेतल्या. त्याचबरोबर श्रीस्वामीमहाराजांना अर्पण करण्यासाठी बरीचशी फळफळावळसुद्धा घेतली होती. श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आल्यावर त्या गृहस्थांनी आपण आणलेल्या सर्व वस्तू श्रीस्वामीमहाराजांसमोर ठेवल्या व ते हात जोडून अत्यंत नम्रपणे त्यांची प्रार्थना करताना त्यांना असे म्हणाले की, "प्रभो ! आतापर्यंत संसारातच सर्व आयुष्य वेचले. यापुढे आपल्या श्रीचरणांची सेवा करीत आयुष्य घालवावे अशी इच्छा आहे. तरी मला उपदेश देऊन अनुग्रहीत करावे अशी प्रार्थना आहे." त्यांची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज हसले व त्यांनी त्या पदवीधर भक्त गृहस्थांनी आणलेली काही वस्त्रे व भांडी सत्पात्री दान केली आणि काही

वस्त्रे व भांडी त्यावेळी तेथे उपस्थित नसलेल्या लोकांसाठी म्हणून बाजूला ठेवून दिली. त्याचप्रमाणे त्या गृहस्थांनी आणलेले सर्व फळफळावळ देवाला अर्पण करून ती प्रसाद म्हणून सर्वांना वाटून टाकली.

अशा प्रकारे फळांचे वाटप चालले असताना श्रीस्वामी-महाराजांनी त्या पदवीधर ब्राह्मण गृहस्थांच्या हातात त्यांतील प्रसादाची काही फळे दिली व ते त्यांना असे म्हणाले की, "पलीकडे तंबूमध्ये एक साहेब बसले आहेत. त्यांना हा प्रसाद नेऊन द्या." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे ते गृहस्थ तो प्रसाद घेऊन तेथून जवळच असलेल्या तंबूकडे जाण्यास निघाले. ज्यावेळी ते तंबूपाशी आले त्यावेळी त्या तंबूमधून एक गुजराथी गृहस्थ बाहेर आले. त्या दोघांनी एकमेकांना पाहताक्षणीच त्यांची एकमेकांना ओळख पटली. तरुणपणी ते दोघेही महाविद्यालयात एकत्र शिकत होते. त्यावेळी कॉलेजात असताना त्या दोघांमध्ये मतभेद होऊन त्यांचे परस्परांबद्दल गैरसमज झाले होते. या ठिकाणी एकमेकांनी परस्परांना अकस्मात् पाहिल्यामुळे दोघांनाही आश्चर्य वाटले. "तुम्ही येथे कसे ?" "तुम्ही येथे कसे ?" असे दोघांनीही एकमेकांना क्षेमकुशल विचारले. झाल्यावर निवृत्त पदवीधर गृहस्थांनी त्या गुजराथी गृहस्थांना असे सांगितले की, "येथे श्रीनर्मदेकाठी माझे श्रीगुरुमहाराज राहतात. त्यांनी तुमच्यासाठी हा प्रसाद पाठविला आहे." तो प्रसाद स्वीकारून ते गुजराथी गृहस्थ आपल्या मित्राला असे म्हणाले की, "येथे आल्यापासून मी असे पाहतो आहे की, या श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनासाठी लोकांची सारखी रीघ लागलेली असते. त्यांच्या दर्शनाला जाऊन त्यांच्याकडून प्रसाद घ्यावा असा

विचारच करीत होतो. आता कळले की, ते तुमचे गुरू आहेत. त्यांनी तर माझ्यासाठी आपणहून प्रसाद पाठविला आहे. आता विलंब न करता तुमच्याबरोबर त्यांच्या दर्शनासाठी येतो."

अशा रीतीने हे दोघे मित्र ज्यावेळी जोडीने श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला निघाले त्यावेळी दोघांनाही बरे वाटले. त्यावेळी दोघांचीही जुनी किल्मिषे पार धुऊन गेली. ज्यावेळी ते दोघे श्रीस्वामीमहाराजांसमोर गेले त्यावेळी ते त्या दोघांना उद्देशून असे म्हणाले की, "गुरू उपदेश मिळाला ना ?"

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी कृतिद्वारा जो उपदेश या उभयतांना दिला तो किती अमोलिक आहे याची जाणीव आपल्याला झाल्याशिवाय राहात नाही. श्रीस्वामीमहाराजांनी या उभयतांना जो उपदेश दिला तोच श्रीसंत तुकाराममहाराजांनी पुढील शब्दांमधून व्यक्त केला आहे. ते असे म्हणतात की—

मान अपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावे ।। १ ।।
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ।। २ ।।
शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ।। ३ ।।
आली उर्मी साहे । तुका म्हणे थोडें आहे ।। ४।।

★ ★ ★

निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ।। १ ।।
तरीच अंगिकार करिल नारायण । वडबड तो सीण येणेंविण ।।२।।
सोइरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारी ।। ३ ।।
तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय ।।४।।

★ ★ ★

शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंचि दुःख ।। १ ।।

म्हणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥ २ ॥
खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधि व्याधि ॥ ३ ॥
तुका म्हणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ॥ ४ ॥

मुंबईचे एक विद्वान् गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांचे भक्त होते. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा त्यांना वऱ्याच वेळा लाभ झाला होता. या गृहस्थांनी श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून शास्त्रांचे श्रवण केल्यामुळे त्यांना सनातन वैदिक धर्माचे रहस्य चांगल्या प्रकारे समजले होते. आपण स्वतःहून शास्त्राचे कितीही वाचन केले असले तरी आपणास हे रहस्य कधीसुद्धा समजले नसते अशी त्यांची पक्की खात्री झाली होती. आपणास जसा धर्मशास्त्र रहस्याचा लाभ झाला तसा तो इतरांना व्हावा व त्यातही हा लाभ पुरोहित वर्गाला व्हावा, कारण त्यांच्यामुळेच आज धर्म टिकून राहिला आहे, अशी त्यांची अत्यंत कळकळीची इच्छा होती. त्यांच्या घरची देवकार्ये करणारे एक वयोवृद्ध पुरोहित गृहस्थ मधूनमधून मुंबईला येत असत. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने धर्माचे रहस्य त्यांनाही समजावे व त्यांचा उद्धार व्हावा या इच्छेने त्यांच्या या यजमानांनी त्यांना असे सांगितले की, "आपण एकदा श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन अवश्य घ्या. त्यामुळे तुम्हाला धर्माचा लाभ होईल." आपल्या यजमानांचे हे म्हणणे ऐकताच ते पुरोहित त्यांना असे म्हणाले की, "अहो! ते संन्यासी आहेत. आम्ही संसारी आहोत. त्यांचे दर्शन चातुर्मासातच व्हावयाचे आणि ते तर आमच्या प्राप्तीचे दिवस असतात. त्यांच्या मागे कोणी धावावे ?" हे उत्तर ऐकून यजमान स्वस्थ बसले.

हे यजमान गृहस्थ शके १८३५ मध्ये श्रीदत्तजयंतीच्या उत्सवासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला जावयास निघाले. त्यांचे पुरोहित

त्यावेळी मुंबईमध्येच होते. त्यांनी आपल्या यजमानांबरोबर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जावयाचे ठरविले. यजमानांनीही त्यांना अत्यंत आनंदाने आपल्याबरोबर नेले. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला लोटलेली अफाट गर्दी पाहून ते पुरोहित चकित झाले. श्रीस्वामीमहाराजांची तपस्व्यासारखी राहणी, त्यांच्या अंगची प्रकाण्ड विद्वत्ता, त्यांची करुणासंपन्नता, लोकोद्धाराची तळमळ व समाजपुरुषासाठी देह झिजवण्याची वृत्ती पाहून त्या पुरोहितांना श्रीस्वामीमहाराजां-बद्दल आदर वाटू लागला. त्यामुळे त्यांना मनोमन असे वाटू लागले की, "यापूर्वीच आपण श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आलो असतो व त्यांच्या कृपाशीर्वादाचा लाभ प्राप्त करून घेतला असता तर बरे झाले असते." आपल्या मनातील हे विचार त्यांनी आपल्या यजमानांना बोलूनही दाखविले.

हे पुरोहित कोकणात राहणारे होते. ज्यावेळीं ते दुसऱ्यांदा श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले त्यावेळी येताना त्यांनी आपल्या एकुलत्या एक भगिनींना बरोबर आणले होते. ज्यावेळी पुरोहितांच्या भगिनी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आल्या व त्यांनी तेथील सर्व कार्यक्रम पाहिले त्यावेळी त्यांनी असा विचार केला की, "आपण बाई माणूस! वेदान्त वगैरे गोष्टी आपणास कशा समजणार? आपण श्रीस्वामीमहाराजांची काहीतरी सेवा करावी म्हणजे त्यामुळेच आपले जन्माचे सार्थक होईल." या विचारानुरोधानेच त्यांनी अन्नपूर्णा घरात स्वयंपाकाची सेवा मागून घेतली आणि तेथें आपल्या वाट्याला येणारे काम त्या अत्यंत आवडीने व श्रद्धेने करू लागल्या."

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे दररोजचा स्वयंपाक श्रीस्वामीमहाराज सांगत असत तेवढाच होत असे व तो सर्वांना पुरा पडत असे; पण

एक दिवस पुष्कळ स्वयंपाक शिल्लक राहिला. त्यावेळी पुरोहितांच्या भगिनींनी असा विचार केला की, " आज सर्वांची जेवणे झाली तरी पुष्कळच अन्न शिल्लक उरले आहे. तरी आता हे उरलेले अन्न वाटून टाकावे." त्यांच्या मनात असे विचार चालले असतानाच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना बोलावून असे सांगितले की, " पाच-पन्नास माणसे आता नावेने येणार आहेत. त्यांची जेवणे व्हावयाची आहेत.जो स्वयंपाक उरला आहे तो त्यांच्यासाठी तसाच ठेवून द्या."

श्रीस्वामीमहाराजांनी पुरोहितांच्या भगिनींना असे सांगून काही काळ गेल्यावर बऱ्याच उशिराने काही मंडळी खरोखरच श्रीक्षेत्र गरुडेश्वरला येऊन पोहोचली. ती सर्वच मंडळी सकाळपासून उपाशी होती. श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आल्यावर व श्रींचे दर्शन घेतल्यावर त्यांना लगेच पोटभर जेवण मिळाल्यामुळे किती आनंद झाला असेल याचे काही वर्णनच करता येणार नाही.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे चैत्र वद्य षष्ठी शके १८३५ म्हणजे इ. स १९१३ ला आले हे आपण सुरवातीलाच पाहिले आहे. त्यावेळी माझे श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीमान् वामनरावजी गुळवणीमहाराज यांनी त्यांना एक पत्र पाठवून असे लिहिले की, " चिखलद्याची वाट अत्यंत त्रासदायक असल्यामुळे तिकडे येऊ नये, " असे आपण मागील वर्षी कळविले होते. त्यामुळे आपल्या आज्ञेप्रमाणे तिकडे न येता श्रीक्षेत्र औदुंबर येथे जाऊन श्रीदत्तमालामंत्राचे अनुष्ठान पूर्ण केले. आता श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आपल्या चरणसेवेसाठी येण्याची तीव्र इच्छा आहे. तरी आपली अनुज्ञा असावी ही श्रीचरणी प्रार्थना आहे. " हे पत्र मिळताच श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या एकनिष्ठ

व एकांतिक भक्ताला पत्र लिहून असे कळविले की, " आमचा यापुढे श्रीक्षेत्र गरुडेश्वरीच मुक्काम राहणार आहे. तरी येथे येण्यास हरकत नाही." हे पत्र मिळताच श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वराला गेले. तेथे आल्यावर प्रथम ते दुसऱ्या एका झोपडीत राहात असत व रसोड्यात जेवत असत. परंतु आपण श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर त्यांच्या झोपडीतच राहावे व तेथेच राहणाऱ्या प. प. श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांच्याबरोबर जेवण करावे असे त्यांना वाटू लागले. आपला हा मनोदय त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी निवेदन केल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्याला तत्काळ अनुमती दिली. ही अनुमती मिळताच श्रीसद्गुरुनाथमहाराजांना अत्यंत आनंद झाला व ते त्यांच्या झोपडीत येऊन राहू लागले आणि प. प. श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांबरोबर भोजन करू लागले. प. प. श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांची व श्रीस्वामीमहाराजांची भेट शके १८३० म्हणजे इ. स. १९०८ ला मुक्त्याला येथील चातुर्मास संपवून पुढे ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीगोदावरीनदीच्या तीरातीराने संचार करीत राजमहेंद्रीच्या पुढील कोगूर या गावी आले त्यावेळी झाली होती. (खंड ३ पृ. ३१३) या श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराजांना रोज एक किलोचा भात लागत असे. त्यात श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे भोजन सहज होऊन जात असे.

श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या झोपडीत राहावयास आल्यापासून त्यांना श्रीसद्गुरुसेवेचा अलभ्य लाभ मिळू लागला. श्रीस्वामीमहाराज रात्री भजन झाल्यावर १-१॥ वाजता झोपडीत येऊन एका फळीवर आडवे पडत असत व सर्वजण झोपले

...२८

की, उठून समाधी लावून बसत असत. त्यानंतर ते ३।। वाज
पुन्हा त्याच फळीवर अर्धा–पाऊण तास विश्रांती घेत असत व ४-
४।। वाजता "श्रीगुरुदेवदत्त" असे म्हणून उठत असत. हे
शब्द कानावर येताच सर्व मंडळी भराभर उठत अस
श्रीस्वामीमहाराजांच्याबरोबर उठल्याचा आनंद त्यांना प्राप्त
झाला; तरी रात्री ते समाधी लावून बसतात व नंतर थोडावेळ पडू
आपल्याबरोबर उठल्यासारखे दाखवितात याची कोणालाच कल्पना
येत नसे. श्रीसद्गुरुनाथमहाराज सकाळी उठल्यावर त्यांना दा
घासण्यासाठी आंब्याच्या पाल्याचे दंतधावन व शौचाहून आल्याव
हात धुण्यासाठी माती देण्याची सेवा करीत असत. त्यानंतर
श्रीस्वामीमहाराज स्नानाला गेले की, ते संपूर्ण पर्णकुटी झाडून
साफ करीत असत व श्रीस्वामीमहाराजांची बसण्याची जागा शेणा
सारवून घेऊन त्यावर रांगोळी घालीत असत.

श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील श्रीनारदेश्वराच्या
मंदिरासमोरील अवघड जागेवरून उतरून एकटेच स्नानाला जा
असत. त्यामुळे त्यांच्याबरोबर सहसा कोणी स्नान करीत न
असे असले तरी श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांच्या
अनुज्ञेने एक–दोन वेळा त्या अवघड जागेवरून उतरून
श्रीस्वामीमहाराज जेथे स्नान करीत असत त्याच्या खालच्या अंगा
जाऊन श्रीनर्मदानदीचे स्नान केले होते व श्रीस्वामीमहाराजांच्या
अंगावरून आलेल्या पवित्र पाण्याच्या स्नानाने ते कृतार्थ झा
होते. मात्र श्रीसद्गुरुनाथमहाराज रोज सध्या जेथे घाट बांध
आहे तेथेच इतर भक्तमंडळींबरोबर स्नानाला जात अस
त्यावेळी तेथे आजच्यासारखा पक्का घाट नसून कच्चा घाट हो
श्रीस्वामीमहाराज स्नानसंध्यादि व दंडवंदनादि झाल्याव

श्रीनारदेश्वराच्या मंदिरात येत असत. त्यानंतर ते श्रीसद्गुरुनाथ-महाराजांना दशोपनिषदाचे पाठ देत असत. या उपनिषदांचे पाठ झाल्यावर पुढे त्यांनी श्वेताश्वतर, कैवल्य व मुक्तिक आदि उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रवृत्ती सांगितली. त्याचप्रमाणे वेदमूर्ती श्री. परशुराम भटजींकडून पवमानाची संथा घेण्यास सांगितले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना असेही सांगितले की, "पवमान पाठ झाले नाही तरी चालेल; पण ते पोथीवरून म्हणावे." त्याप्रमाणे ते पवमान नेहमी म्हणत असत. अशा रीतीने श्रीसद्गुरुनाथमहाराजांना श्रीस्वामीमहाराजांनी इ.स. १९०७ ते १९१४ पर्यंत त्यांची वेळोवेळी जेथे जेथे भेट झाली तेथे तेथे आपल्या संप्रदायाचा उपासनाक्रम सांगून तो पूर्ण करून घेतला. श्रीस्वामीमहाराजांचा हा उपासनाक्रम असा आहे—

**स्वशाखोपनिषत् गीता विष्णुनामसहस्रकम् ॥**
**श्रीरुद्रं पौरुषं सौरं जपेन्मुच्येत बन्धनात् ॥**

याचा अर्थ असा की, स्वतःच्या शाखेचे उपनिषत् (श्रीगुरुमहाराज ऋग्वेदी होते व त्यांच्या शाखेचे उपनिषत् ऐतरेय आहे.) श्रीमद्भगवद्गीता, श्रीविष्णुसहस्रनाम, श्रीरुद्र, श्रीपुरुषसूक्त व श्रीसौरसूक्त यांची नित्य उपासना करीत असावे. त्यामुळे मनुष्य सर्व बंधनातून मुक्त होतो." सर्व साधक गुरुबंधूंनी व श्रीस्वामीमहाराजांच्या चरणकमलाचा आश्रय घेणाऱ्यांनी या उपासना क्रमाप्रमाणे वाचनादि करून त्याप्रमाणे आचार ठेवणे आवश्यक आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना उपरोक्त कथन केल्याप्रमाणे जे कैवल्योपनिषत् सांगितले ते सर्व वेदान्ताचे सार असून साधकभक्तांना त्याचे चिंतन व मनन करता येऊन

आत्मस्वरूप होता यावे म्हणून ते येथे मूळ व अर्थासह उद्धृत करीत आहे.



## ॥ कैवल्योपनिषत् ॥

ॐभद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः। स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेमहि देवहितं यदायुः। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

॥ अथ प्रथमः खंडः ॥

अथाऽऽश्वलायनो भगवन्तं परमेष्ठिनमुपसमेत्योवाच-

अधीहि भगवन्ब्रह्मविद्यां वरिष्ठां
सदा सद्भिः सेव्यमानां निगूढाम् ॥
यथाऽचिरात्सर्वपापं व्यपोह्य
परात्परं पुरुषं याति विद्वान् ॥ १ ॥
तस्मै स होवाच पितामहश्च
श्रद्धाभक्तिध्यानयोगादवेहि ॥
न कर्मणा न प्रजया धनेन
त्यागेनैके अमृतत्वमानशुः ॥ २ ॥
परेण नाकं निहितं गुहायां
विभ्राजते यद्यतयो विशन्ति ॥
वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः
संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ॥
ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले

परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥ ३ ॥
विविक्तदेशे च सुखासनस्थः
शुचिः समग्रीवशिरःशरीरः ॥ ४ ॥
अत्याश्रमस्थः सकलेंद्रियाणि
निरुध्य भक्त्या स्वगुरुं प्रणम्य ॥
हृत्पुंडरीकं विरजं विशुद्धं
विचिन्त्य मध्ये विशदं विशोकम् ॥ ५ ॥
अचिंत्यमव्यक्तमनंतरूपं
शिवं प्रशान्तममृतं ब्रह्मयोनिम् ॥
तथादिमध्यांतविहीनमेकं
विभुं चिदानंदमरूपमद्भुतम् ॥ ६ ॥
उमासहायं परमेश्वरं प्रभुं
त्रिलोचनं नीलकंठं प्रशान्तम् ॥
ध्यात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिं
समस्तसाक्षिं तमसः परस्तात् ॥ ७ ॥
स ब्रह्मा स शिवः सेंद्रः सोऽक्षरः परमः स्वराट् ॥
स एव विष्णुः स प्राणः स कालोऽग्निः स चंद्रमाः ।८।
स एव सर्वं यद्भूतं यच्च भव्यं सनातनम् ॥
ज्ञात्वा तं मृत्युमत्येति नान्यः पंथा विमुक्तये ॥९॥
सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥
संपश्यन्ब्रह्म परमं याति नान्येन हेतुना ॥ १० ॥
आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ॥

ज्ञाननिर्मंथनाभ्यासात्पाशं दहति पंडितः ॥ ११॥
स एव मायापरिमोहितात्मा
शरीरमास्थाय करोति सर्वम् ॥
स्त्रियन्नपानादिविचित्रभोगैः
स एव जाग्रत्परितृप्तिमेति ॥ १२ ॥
स्वप्ने स जीवः सुखदुःखभोक्ता
स्वमायया कल्पितजीवलोके ॥
सुषुप्तिकाले सकले विलीने
तमोऽभिभूतः सुखरूपमेति ॥
पुनश्च जन्मांतरकर्मयोगा–
त्स एव जीवः स्वपिति प्रबुद्धः ॥ १३ ॥
पुरत्रये क्रीडति यश्च जीव–
स्ततस्तु जातं सकलं विचित्रम् ॥
आधारमानंदमखंडबोधं
यस्मिल्लयं याति पुरत्रयं च ॥ १४ ॥
एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ॥
खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥१५॥
यत्परं ब्रह्म सर्वात्मा विश्वस्यायतनं महत् ॥
सूक्ष्मात्सूक्ष्मतरं नित्यं तत्त्वमेव त्वमेव तत् ॥१६॥
जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादि प्रपंचं यत्प्रकाशते ॥
तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥१७॥
त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् ॥

तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः ॥१८॥
मय्येव सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितम् ॥
मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहम् ॥ १९ ॥
अणोरणीयानहमेव तद्वन्–
महानहं विश्वमहं विचित्रम् ॥
पुरातनोऽहं पुरुषोऽहमीशो
हिरण्मयोऽहं शिवरूपमस्मि ॥ २० ॥
अपाणिपादोऽहमचिंत्यशक्तिः
पश्याम्यचक्षुः स शृणोम्यकर्णः ॥
अहं विजानामि विविक्तरूपो
न चास्ति वेत्ता ममं चित्सदाऽहम् ॥
वेदैरनेकैरहमेव वेद्यो
वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ २१ ॥
न पुण्यपापे मम नास्ति नाशो
न जन्मदेहेंद्रियबुद्धिरस्ति ॥
न भूमिरापो न च वन्हिरस्ति
न चानिलो मेऽस्ति न चांबरं च ॥ २२ ॥
एवं विदित्वा परमात्मरूपं
गुहाशयं निष्कलमद्वितीयम् ॥
समस्तसाक्षिं सदसद्विहीनं
प्रयाति शुद्धं परमात्मरूपम् ॥ २३ ॥
॥ इति प्रथमः खंडः ॥
॥ अथ द्वितीयः खंडः ॥
यः शतरुद्रियमधीते सोऽग्निपूतो भवति सुरापानात्पूतो

भवति ब्रह्महत्यात्पूतो भवति कृत्याकृत्यात्पूतो भवति तस्मादविमुक्तमाश्रितो भवति अत्याश्रमी सर्वदा सकृद्वा जपेत् ॥ २४ ॥

अनेन ज्ञानमाप्नोति संसारार्णवनाशनम् ॥
तस्मादेवं विदित्वैनं कैवल्यं फलमश्नुते
कैवल्यं फलमश्नुते इति ॥ २५ ॥
॥ इति द्वितीयः खण्डः ॥
॥ इति अथर्ववेदीया कैवल्योपनिषत्समाप्ता ॥



# सार्थ कैवल्योपनिषद्

**अर्थ :–** हे परमात्मन् ! आपण आम्हा दोघा गुरुशिष्यांचे एकाच वेळी सर्व प्रकारे रक्षण करा. आम्हा दोघांचे आपण एकाच वेळी समुचितरूपाने पालनपोषण करा. आम्ही दोघे विद्यादिनिमित्त सामर्थ्य बरोबर संपादन करू. आम्हा दोघांनी अभ्यासलेली विद्या तेजपूर्ण होवो म्हणजे कोणाकडूनही आमचा विद्येत पराभव होऊ नये किंवा आमची विद्या अर्थज्ञानास योग्य असो आणि आम्ही दोघांनी परस्परांचा कधीही द्वेष करू नये म्हणजे आम्ही दोघे जीवनभर परस्परांवरील प्रेमसूत्राने एकत्रित बांधलेले राहू देत. हे परमात्मन् ! तिन्ही तापांची निवृत्ती होऊ देत.

महर्षी आश्वलायन भगवान् प्रजापती ब्रह्मदेवांकडे शिष्यभावाने विधिपूर्वक समिधा हातात घेऊन गेले आणि त्यांना अत्यंत नम्रतापूर्वक असे म्हणाले की, “ भगवन् ! ज्या साधनमार्गावरून संतजन सदैव चालत आले आहेत किंवा ज्या साधनमार्गाचे ते निरंतर सेवन करतात आणि ज्या साधनमार्गाच्या आश्रयाने

विद्वान् लोक आपले पूर्वकृत सर्व दोष व पापे नष्ट करून परब्रह्माची प्राप्ती करतात त्या ब्रह्मविद्या प्राप्तीचा अत्यंत गुप्त व श्रेष्ठ असा मार्ग आपण मला सांगा. ॥१॥ प्रजापती ब्रह्मदेवाने महर्षी आश्वलायन यांना अत्यंत गंभीरतापूर्वक असे उत्तर दिले की, "आश्वलायन ! त्या परमतत्त्वाची प्राप्ती करण्याकरता श्रद्धा, भक्ती, ध्यान आणि योग यांचा आश्रय घेणे भाग पडते. याकरिता तूही यांचा आश्रय घेऊन अर्थात् या साधनांच्या द्वारा परमतत्त्वाची अर्थात् अमृतत्त्वाची प्राप्ती करून घे. ॥२॥ त्या परमत्त्वाची प्राप्ती धन, संतान किंवा कर्म यांच्या द्वारा करता येत नाही किंवा होत नाही. मात्र ब्रह्मज्ञानी लोकांनी एकमात्र त्यागाच्या अर्थात् त्यागाच्या परमश्रेष्ठ मार्गाच्या अवलंबनानेच अमृतत्त्वाची प्राप्ती केली आहे. स्वर्गलोकांच्याही वरील गुहेत म्हणजे आज्ञाचक्राच्या वर प्रकाशित होणाऱ्या ब्रह्मलोकात यती व संयमशील योगीजनच प्रवेश करू शकतात. ॥३॥ ज्यांनी वेदान्ताच्या विशेष ज्ञानाने आणि श्रवण, मनन व निदिध्यासाच्या द्वारा परमतत्त्वाचा निश्चय केला आहे, ते शुद्ध अंतःकरणाचे योगीजन संन्यासयोगाच्या द्वारा ब्रह्मलोकामध्ये जाऊन कल्पाच्या अंती अमृतस्वरूप होऊन मुक्त होतात. ॥४॥ संन्यास आश्रमात असलेले योगीलोक स्नानादि करून शुद्ध झाल्यावर निर्जन अशा एकांत स्थानात सुखाने वसून मान, मस्तक आणि शरीर सरळ ठेवून, सर्व इंद्रियांचा निरोध करून आणि भक्तिपूर्वक आपल्या श्रीसद्गुरूंना प्रणाम करून आपल्या हृदयकमलामध्ये रजोगुणरहित व दुःखशोकातीत आत्मतत्त्वाचे विशदरूपाने चिंतन करतात. ॥५॥ अशा प्रकारे जो अचिन्त्य आहे, अव्यक्त व

अनंतस्वरूप आहे, कल्याणमय आहे, प्रशांत आहे, अमृत आहे, जो ब्रह्म अर्थात् निखिल ब्रह्मांडाचे मूळ कारण आहे, ज्याला आदि, मध्य व अंत नाही, जो एक अर्थात् अद्वितीय आहे, विभू व चिदानंद आहे, रूपरहित व अद्भुत आहे त्या उमासहित अर्थात् ब्रह्मविद्यारूप परमेश्वराचे, समस्त चराचर स्वामीचे, प्रशांतरूप त्रिलोचन, नीलकण्ठ महादेव अर्थात् परात्पर परब्रह्माचे, जो सर्व भूतमात्रांचे मूल कारण आहे, जो सर्वांचा साक्षी आहे आणि जो अविद्येच्या पलीकड असून अखंड प्रकाशमान आहे, त्याची मुनिलोक ध्यानाच्या द्वारा प्राप्ती करतात. ॥६–७॥

तोच (तेच परमतत्त्व) ब्रह्मा आहे. तेच शिव आहे. तोच इंद्र आहे. तोच अक्षर अर्थात् अविनाशी परमात्मा आहे. तोच विष्णू, काल, अग्नी व चंद्र आहे. ॥८॥ जे काही झालेले आहे आणि जे भविष्यात होणार आहे ते सर्व तोच आहे. त्या सनातन तत्त्वाला जाणल्यावर प्राणी मृत्यूच्या पलीकडे निघून जातो. या व्यतिरिक्त मुक्तीचा दुसरा कोणताही मार्ग नाही. ॥९॥ जो आत्म्याला सर्व भूतमात्रांमध्ये पाहतो आणि सर्व भूतमात्रांना आत्म्यामध्ये पाहतो तो परब्रह्माची प्राप्ती करतो. अशा प्रकारची ही प्राप्ती दुसऱ्या कोणत्याही उपायांनी होत नाही. ॥१०॥ ज्ञानी लोक आत्म्याला अर्थात् अंत:करणाला खालील अरणी आणि प्रणवाला वरची अरणी करून ज्ञानरूपी मंथनाच्या अभ्यासाच्या द्वारा सर्व पापांना किंवा दोषांना जाळून भस्म करतात व संसार बंधनापासून सुटतात अर्थात् ज्ञानाग्नीने समस्त संसारबंधने नाहीशी करतात. ॥११॥ तो मनुष्यप्राणी मायेला वश झाल्यामुळे अत्यंत मोहग्रस्त होऊन शरीरालाच आपले स्वरूप मानून सर्व प्रकारची कर्मे करीत असतो. तो मनुष्य जागृत अवस्थेमध्ये स्त्री, अन्न

पाणी आदि नाना प्रकारचे भोग भोगता भोगता तृप्ती प्राप्त करतो. ॥१२॥ तोच जीव स्वप्नावस्थेमध्ये आपल्या मायेने कल्पित केलेल्या जीवलोकात सुख-दुःखांचा भोक्ता बनतो आणि सुषुप्तीकाळात सर्व मायिक प्रपंच विलीन झाल्यावर तो तमोगुणाने अभिभूत अर्थात् जिंकला जाऊन सुखस्वरूपाला प्राप्त होतो. ॥१३॥ त्यानंतर पुन्हा जन्मजन्मांतरांच्या कर्मांच्या प्रेरणेने तो जीव सुषुप्तीतून स्वप्न जगतात उतरतो आणि त्यानंतर जागृत अवस्थेत येतो. अशा प्रकारे जीव स्थूल, सूक्ष्म व कारण शरीररूपी तीन पुरात क्रीडा करतो. त्यामुळेच हे सर्व प्रपंच वैचित्र्य अर्थात् मायिक प्रपंचाची सृष्टी उत्पन्न होते. ॥१४.१/२॥

ज्यावेळी स्थूल, सूक्ष्म व कारण या तिन्ही शरीरांचा लय होतो त्यावेळी सर्व जीव मायिक प्रपंचापासून निवृत्त होऊन अखंड आनंदाचा अनुभव घेतात; कारण या समस्त प्रपंचाचा आधार आनंदस्वरूप बोधच आहे. या (परमतत्त्वापासून किंवा बोधापासूनच) मन आणि सर्व इंद्रिये उत्पन्न होतात. आकाश, वायू, अग्नी, जल आणि सर्व विश्वाला धारण करणारी पृथ्वी उत्पन्न होते. जे परब्रह्म सर्व भूतमात्रांचा आत्मा आहे, जे समस्त कार्यकारणस्वरूप विश्वाचा महान् आधार आहे, जे सूक्ष्माहून सूक्ष्म आहे आणि जे अविनाशी आहे म्हणजे ज्याचा कधीही नाश होत नाही ते परब्रह्म तत्त्वच तू आहेस, अगदी निश्चित ते तू आहेस. ॥ १६ ॥ ज्यावेळी जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती आदि तिन्ही अवस्थांमध्ये जो मायिक प्रपंच भासमान होत असतो तो ब्रह्मस्वरूप असून ते ब्रह्मच मी आहे, हे जाणल्याने जीव सर्व प्रकारच्या बंधनांपासून मुक्त होतो. ॥ १७ ॥ तीन धाम म्हणजे जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्तीमध्ये जे काही भोक्ता, भोग्य व भोगाच्या रूपाने आहे त्या सर्वांहून विलक्षण साक्षी व

चिन्मात्रस्वरूप असलेला सदाशिव मीच आहे. ॥ १८ ॥ ज्या माझ्यातच सर्व काही उत्पन्न झाले आहे, ज्या माझ्यातच सर्व काही प्रतिष्ठित आहे व ज्या माझ्यातच सर्वकाही लय पावते ते अद्वय ब्रह्मस्वरूप मीच आहे. ॥ १९ ॥

मी अणूहूनही अणू आहे आणि मोठ्याहूनही मोठा आहे. हे विचित्र विश्व किंवा अद्भुत् संसार माझेच स्वरूप आहे. मी पुरातन पुरुष आहे. मी ईश्वर आहे. मी हिरण्मय पुरुष ब्रह्मा आहे. मी शिवस्वरूप आहे. ॥२०॥ ते हस्तपाद विहीन व अचिन्त्यशक्तियुक्त परब्रह्मच मी आहे. मी नेत्रांच्याशिवाय पाहू शकतो व कानांशिवाय ऐकू शकतो. मी बुद्धिशिवाय सर्वकाही जाणू शकतो. मला जाणणारा कोणीही नाही. मी सदासर्वदा चैतन्यस्वरूप आहे. ॥ २१ ॥ संपूर्ण वेद माझेच ज्ञान करून देत असतात. मीच वेदान्ताचा कर्ता आहे. मीच वेदवेत्ताही म्हणजे वेद जाणणारा आहे. ॥ २२ ॥ मला पाप पुण्य स्पर्श करू शकत नाहीत. माझा कधीही नाश होत नाही आणि माझा कधी जन्मही होत नाही. मी शरीर, मन, बुद्धी आणि इंद्रिय-रहित आहे. माझा भूमी, जल, अग्नी, वायू व आकाश यांच्याशी काहीही संबंध असत नाही. ॥ २३ ॥ जो अशा प्रकारे बुद्धीच्या गुहेत अर्थात् बुद्धी पलीकडे असलेले माझे निष्कल म्हणजे अवयवहीन अद्वितीय, सत्य व असत्याच्या पलीकडे असलेले व सर्वांचे साक्षी असे माझे परमात्मस्वरूप जाणतो तो त्या शुद्ध अशा परमात्म-स्वरूपाला प्राप्त होतो. ॥ २४ ॥ जो शतरुद्रीयाचा पाठ करतो तो अग्नी, वायू व आत्म्याप्रमाणे पवित्र होतो. त्याची दारू पिण्याच्या दोषापासून सुटका होते. तो ब्रह्महत्येच्या दोषापासून मुक्त होतो. तो सुवर्णचोरीच्या पापापासून मुक्त होतो. त्याचा शुभाशुभ कर्मांपासून उद्धार होतो. तो भगवान् श्रीसदाशिवाच्या कृपेला अधिकारी

होऊन अविमुक्त स्वरूप होतो. याकरिता जे जीव आश्रमधर्मापलीकडे गेले आहेत अर्थात् ज्यांची संसार वासनांपासून सुटका होऊन ज्यांचे उत्थान झाले आहे त्या परमहंसांनी सदासर्वदा अथवा कमीत कमी एकवेळा तरी या कैवल्य उपनिषदाचा पाठ अवश्य केला पाहिजे. ॥२५॥ त्यामुळे त्यांना संसारसागर पार करण्याचे व संसारचक्रातून सुटण्याचे ज्ञान प्राप्त होते अर्थात् या कैवल्योपनिषदाच्या पाठामुळे ज्ञान प्राप्त होऊन साधकजीव संसारसागरातून पार होतात व संसारचक्रातून सुटतात. अशा रीतीने उपरोक्त प्रकारे ज्ञान प्राप्त होऊन साधकजीव कैवल्यरूप मुक्ती प्राप्त करतात. ते कैवल्यपद प्राप्ती करतात. ॥ २६ ॥

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी सर्व वेदान्ताभ्यास श्रीसद्गुरु-नाथमहाराजांकडून करवून घेतला. या वेदान्ताच्या अभ्यासाबरोवर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्याकडून विविध प्रकारची सेवाही करून घेतली आणि " सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥ " याची प्रचीती आणून दिली. श्रीस्वामीमहाराजांचे दुपारी भोजन झाले की, त्यांची सेवा घडावी म्हणून सुरवातीला तेथे रसोड्यात काम करणाऱ्या बायकांपैकी कोणीतरी त्यांच्या हातावर पाणी घालीत असत. परंतु पुढे पुढे पाणी कोणी घालावयाचे व ही सेवा कोणी करावयाची यासाठी तेथील वायकांची आपापसात भांडणे होऊ लागली. ती भांडणे पाहून एके दिवशी श्रीस्वामीमहाराज आपल्या एका भक्ताला उद्देशून असे म्हणाले की, " छगन ! वामनला बोलव. या पुढे तो माझ्या हातावर जेवण झाल्यावर पाणी घालील. " ही आज्ञा ऐकताच सर्व वायकांचे भांडण थांबले. तेवढ्यात श्री. छगनरावांनी श्रीसद्गुरुनाथ महाराजांना बोलावून आणले. ते आलेले पाहताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " आमचे

दुपारी भोजन झाले की, तू दररोज आमच्या हातावर पाणी घालीत जा. " श्रीसद्गुरुनाथमहाराजांना या अकल्पित सेवाभावाने कल्पनातीत आनंद झाला. त्यांनी त्या दिवसापासूनच श्रीस्वामीमहाराजांच्या हातावर पाणी घालण्याची सेवा सुरु केली. पुढे दररोज तेथील रसोड्यात काम करणाऱ्या बायका लोटी भरून पाणी आणून देत व ते पाणी श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या हातावर घालीत असत.

श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जोपर्यन्त राहिले तोपर्यन्त श्रीस्वामीमहाराजांच्या हातावर पाणी घालण्याच्या त्यांच्या सेवेत कधीही खंड पडला नाही. मात्र एक दिवस दुपारी १२ वाजता श्रीसद्गुरुनाथमहाराज उपनिषदाच्या पाठाची आवृत्ती करण्याकरिता श्रीनारदेश्वराच्या बाहेरच्या कट्ट्यावर जाऊन बसले असताना आवृत्ती संपल्यावर एक दोन मिनिटे तेथेच विश्रांती घेण्याकरिता म्हणून पडले असता त्यांना झोप लागली. त्यानंतर थोड्याच वेळात त्यांना स्वप्नात असे दिसले की, श्रीनारदेश्वराच्या मंदिराच्या दरवाजा समोरील बाजूने मंदिराकडे गळ्यात घुंगुरमाळा घातलेला एक पांढरा शुभ्र नंदी अत्यंत वेगाने आपल्याकडे येत असून तो आपल्याला तुडवून मंदिरात जाणार. असे वाटताच श्रीसद्गुरुनाथमहाराज जागे झाले. त्यावेळी तत्काळ उठून ते श्रीस्वामीमहाराजांच्या झोपडीकडे त्वरित गतीने आले, परंतु तोपर्यंत श्रीस्वामीमहाराजांची भिक्षा पूर्ण होऊन कोणीतरी त्यांच्या हातावर पाणी घातले होते. नंदीने सेवेसाठी उठवूनही एक दिवस सेवेत खंड पडल्यामुळे श्रीसद्रुनाथमहाराजांना मोठी चुटपुट लागून राहिली. त्या नंदीच्या घुंगुरमाळांचा खळखळ आवाज श्रीसद्गुरुनाथ-महाराजांच्या कानात पुढे कित्येक दिवस घुमत राहिला व त्याचे

हृस्वरूप त्यांच्या दृष्टीसमोर कायम तरळत राहिले. आपल्या भक्ताची सेवा त्याच्या भक्ताकडून वेळेवर व्हावी म्हणून देवही कित्येक रूपे घेऊन त्याला जागृत करीत असतो हेच खरे आहे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे दुपारी भिक्षा झाल्यावर थोडी विश्रांती घेऊन श्रीस्वामीमहाराज भक्तमंडळींच्या पत्रांना उत्तरे लिहीत असत. श्रीस्वामीमहाराज त्यांना आलेल्या सर्व पत्रांना स्वत: उत्तरे लिहीत असत; परंतु पुढे पुढे ते श्रीसद्गुरुनाथमहाराजांना समोर बसवून उत्तरे सांगत असत. श्रीसद्गुरुनाथमहाराज त्याप्रमाणे उत्तरे लिहीत असत. पुढे रोजच भरपूर पत्रे येऊ लागली. त्यामुळे हा सर्व पत्रव्यवहार श्रीसद्गुरुनाथमहाराज पाहू लागले. श्रीस्वामीमहाराजांना आलेली सर्व पत्रे ते त्यांना वाचून दाखवीत आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे उत्तरे लिहून पोष्टात टाकीत असत. या सर्व पत्रांचे वाचन करणे आणि त्यांना उत्तरे देणे यामध्येच श्रीस्वामीमहाराजांचा सर्व वेळ जाऊ लागला. अशा प्रकारे सर्व वेळ पत्रोत्तरांमध्ये जाऊ लागल्याचे पाहून एक दिवस श्रीस्वामीमहाराज श्रीसद्गुरुनाथमहाराजांना असे म्हणाले की, " मालक पत्र घेत नाही असे उद्यापासून लिहीत जा. " असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी पत्रव्यवहार बंद केला.

अशा रीतीने पत्रव्यवहार बंद झाल्याचे श्रीस्वामीमहाराजांच्या झोपडीत राहणाऱ्या प. प. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांच्या लक्षात आले. हे प. प. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज मोठे अधिकारी पुरुष होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्यांना आपल्या बरोबरीच्या नात्याने वागवीत असत. असे असले तरी प. प. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज श्रीस्वामीमहाराजांशी अत्यंत आदर ठेवून वागत असत आणि त्यांच्याशी बोलतानाही नम्रतेने बोलत

असत. एक दिवस प. प. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज! आपण सध्या पत्रोत्तरे देणे का बंद केले?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अहो! हल्ली रोज कितीतरी पत्रे येतात. या पत्रांना काही सुमारच नाही. रोज १०-१२ पत्रे आली तर त्यांना उत्तरे देणे सहज शक्य आहे. पण येथे इतकी पत्रे येतात की, त्यातच दिवसाचा सगळा वेळ जातो. आपल्या स्वत:ला काही वेळच शिल्लक राहात नाही. त्यामुळे पत्रोत्तरे देणे बंद केले." श्रीस्वामीमहाराज असे म्हणताच श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "मग आपल्याला रोज दहा पत्रे आली तर त्यांना उत्तरे द्याल ना?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "रोज दहा पत्रांना जरूर उत्तरे देईन."

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज रोज दहा पत्रांना उत्तरे देण्यास तयार झाल्याचे पाहून श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना एकांतात असे सांगितले की, "आलेली सर्व पत्रे क्रमवार लावीत जा आणि त्यातील दहाच पत्रे रोज श्रीस्वामीमहाराजांना देत जा. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे श्रीसद्‌गुरुनाथमहाराज रोज दहाच पत्रे श्रीस्वामीमहाराजांपुढे ठेवीत असत. याप्रमाणे पत्रे जास्त आली की, बाजूला काढून ठेवणे व कमी आली की त्यात भर घालून दहा पत्रे रोज पुरी करण्याचा क्रम सुरू झाला. अशा रीतीने काही दिवस गेल्यावर रोज नेमक्या दहाच पत्रांना आपणास उत्तरे द्यावी लागत असल्याचे पाहून श्रीस्वामीमहाराज श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना असे म्हणाले की, "रोज नेमकी दहाच पत्रे कशी

येतात रे ?" श्रीस्वामीमहाराजांनी हा प्रश्न विचारला तेव्हा श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज जवळच बसलेले होते. ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " महाराज ! आपण साक्षात् श्रीदत्तच आहात. आपल्या अमोघ संकल्पामुळे रोज दहाच पत्रे येणार. जास्ती कशी येणार ?" श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराज हसले. ते हसलेले पाहताच श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! लोक सांसारिक पीडेने त्रस्त झालेले असतात. त्यांना नानातऱ्हेचे त्रास भोगावे लागतात. अशा वेळी आपण त्यांना उत्तरे लिहून त्रासातून व दुःखातून मुक्त होण्याचा मार्ग दाखविण्यासाठी पत्रोत्तरे लिहावीत अशी आपल्या चरणी प्रार्थना आहे." श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांनी अशी प्रार्थना करताच श्रीस्वामीमहाराज पुन्हा पहिल्याप्रमाणे सर्वच पत्रांना उत्तरे देऊ लागले.

श्रीसद्‌गुरुनाथमहाराज ज्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आले त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ श्रीदत्तात्रेयांची मूर्ती किंवा त्यांची प्रतिमा नव्हती. त्यावेळी येणाऱ्या-जाणाऱ्या भक्तमंडळींना दर्शनासाठी व येथे चालणाऱ्या सोहळ्यासाठी अधिष्ठात्री देवतेची प्रतिमा असावी म्हणून श्रीस्वामीमहाराज श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांना असे म्हणाले की, " तुला चित्रकला चांगली येते. तरी येथे एखादे श्रीदत्तात्रेयांचे चित्र काढून दे." हे ऐकताच श्रीसद्‌गुरुनाथमहाराज श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " येथे चित्रासाठी साहित्य गोळा करून दोन-चार दिवसात चित्र काढतो." श्रीस्वामीमहाराजांना सांगितल्याप्रमाणे श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी

तेथे मिळणारे साधे रंग (वॉटर कलर), ब्रश व कागद इत्यादि साहित्य जुळवून व्याघ्रांवरधारी श्रीदत्तात्रेयांचे षड्भुजयुक्त सुंदर चित्र काढले. श्रीस्वामीमहाराजांना ते चित्र दाखविल्यावर ते अत्यंत संतुष्ट झाले. लगेच त्या चित्राला चौकट करून आणून श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी ते चित्र श्रीस्वामीमहाराजांना दिले.

श्रीस्वामीमहाराजांनी तो फोटो आपल्या झोपडीतील चौरंगावर ठेवला व त्याची पहिल्या दिवशी स्वतः पूजा केली. त्या दिवसापासून त्या फोटोची रोज गंध–फुले वाहून पूजा–अर्चा होऊ लागली. हा फोटो श्रीस्वामीमहाराजांनी आपणास द्यावा असे अनेकांना वाटत असे. परंतु श्रीसद्गुरुनाथमहाराज ज्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वराहून परत येण्यास निघाले त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी चौरंगावरील हा फोटो उचलून तो प्रसाद म्हणून श्रीसद्गुरुनाथमहाराजांना दिला.पुढे हा फोटो श्रीसद्गुरुनाथ-महाराजांच्या देवघरात विराजमान झाला. सध्या हा फोटो श्रीवासुदेव निवास, कर्वेरोड, पुणे या ठिकाणी असलेल्या देवघरात विराजमान झालेला आहे.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीसद्गुरुनाथमहाराजांचा मुक्काम वैशाखापासून आश्विनापर्यंत होता. या मुक्कामातच श्रीस्वामी-महाराजांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना "धौती" ही योगातील षट्क्रियांपैकी असलेली एक क्रिया शिकविली. या क्रियेमध्ये तीन बोटे रुंद व एकवीस फूट लांब अशी तलम कापडाची पट्टी गिळून ती परत बाहेर काढावयाची असते. यामुळे शरीरातील कफ व पित्त त्या कापडाला चिकटून बाहेर येतात व हे दोष नाहीसे होतात. त्यामुळे छाती व पोट स्वच्छ होऊन शरीरशुद्धी होते व साधन उत्तम चालते.

श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची श्रीगुरुपौर्णिमा यावर्षी प्रत्यक्ष श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांपाशीच साजरी झाली. त्या दिवशी त्यांना त्यांच्या श्रीचरणकमलपूजेचा पराकाष्ठेचा मोठा लाभ झाला. त्याचप्रमाणे श्रीक्षेत्र हावनूर येथे भाद्रपद शुद्ध १४ ला अर्थात् अनंतचतुर्दशीला श्रीगुरुनाथमहाराजांना मंत्रदीक्षा झाली होती. हा त्यांच्या अनुग्रहाचा वाढदिवसही त्यांनी यावर्षी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीगुरुचरणांच्या सेवेतच साजरा केला व पुढे आयुष्यभर ते हा दीक्षादीन मोठ्या उत्साहाने व आवर्जून साजरा करीत असत. यासंबंधी श्रीसद्‌गुरुनाथमहाराज नेहमी श्रीस्वामीमहाराजांनी रचलेल्या व त्यांनीच त्यांना आवर्जून वाचावयास सांगितलेल्या 'श्रीदत्तमाहात्म्यातील' "आजीवितं त्रयः सेव्या वेदान्तो गुरुरीश्वरः। पूर्वं ज्ञानाप्तये पश्चात्कृतघ्नत्वनिवृत्तये ॥३७.७॥" या वचनाचा उल्लेख करून असे म्हणत असत की, श्रीसद्‌गुरूंनी दिलेली उपासना प्रथम ब्रह्मप्राप्तीकरिता अत्यंत कृतज्ञतापूर्वक करावी आणि ब्रह्मप्राप्ती झाल्यानंतर कृतघ्नता दोष दूर व्हावा म्हणून ती आयुष्यभर करीत असावी, असे उपासनेचे खरे रहस्य श्रीथोरल्यास्वामीमहाराजांनी सांगितले आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना भाद्रपद महिन्यात स्त्रियांना हरतालिकेची पूजा करण्यासाठी श्रीसखीपार्वतीच्या मूर्ती तयार करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाण श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी मूर्ती तयार केल्या व तेथील सुवासिनी स्त्रियांनी भाद्रपद शुद्ध तृतीयेला त्यांची पूजाही केली. श्रीस्वामीमहाराजांचे स्वयंपाकगृहात व इतरत्र काम करणाऱ्या स्त्रियांकडे विशेष लक्ष असे. त्यामुळे ते रोज दुपारी स्वयंपाकापूर्वी स्वयंपाकगृहात जाऊन स्वतः भाज्या चिरून देत असत व त्यावेळी

क्रमशः एकेक पुराण त्या स्त्रियांना सांगत असत. स्वयंपाकगृहात काम करणाऱ्या स्त्रियांना प्रवचनादि ऐकावयास येण्यास वेळ मिळत नसल्यामुळे त्यांच्यासाठी त्यांनी हा उपक्रम योजला होता. स्त्रियांना धार्मिक शिक्षण मिळून त्या बहुश्रुत झाल्या पाहिजेत व त्यांना आपले पुराणादि धर्मग्रंथ ज्ञात झाले पाहिजेत अशी त्यांची दृष्टी होती. ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज स्वयंपाकगृहात भाजी चिरत असत व पुराणे, महाभारत रामायणादि ग्रंथ सांगत असत त्यावेळी इतरांना तेथे जाण्यास बंदी असे. अशा प्रकारे सकाळच्या एक तासाचा हा कार्यक्रम पूर्णपणे स्वयंपाकगृहात काम करणाऱ्या स्त्रियांसाठीच चालत असे. श्रीस्वामीमहाराजांची ही स्त्रियांच्या धार्मिक शिक्षणाची दृष्टी पाहिली म्हणजे त्यांच्या उदार अंतःकरणाचा प्रत्यय आल्याशिवाय राहात नाही.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील श्रीस्वामीमहाराजांच्या मुक्कामात काही अपरूप गोष्टी घडल्या. श्रीस्वामीमहाराज स्त्रियांना कधीही स्वतःला स्पर्शपूर्वक नमस्कार व पूजा करू देत नसत. परंतु हरतालिकेची पूजा झाल्यावर सर्व सुवासिनी स्त्रियांनी मिळून श्रीस्वामीमहाराजांची साक्षात् श्रीमहादेव म्हणून पूजा केली. त्यावेळी सर्व स्त्रिया श्रीस्वामीमहाराजांच्या समोर व बाजूला बसल्या आणि तेथील एका उपाध्याय ब्राह्मणाने ज्याप्रमाणे त्यांना पूजा सांगितली त्याप्रमाणे त्यांनी ती केली. त्या पूजेचा स्वीकार श्रीस्वामीमहाराजांनी मोठ्या आनंदाने केला. श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी स्त्रियांनी केलेल्या श्रीस्वामीमहाराजांच्या भावपूर्ण पूजेचे दृश्य आपल्या अंतःकरणात साठवून ठेवले होते. अशा प्रकारे केलेल्या आपल्या श्रीसद्गुरूंच्या पूजेची दृश्ये भक्तांच्या अंतःकरणावर कायमची कोरली जातात हेच खरे!

अशीच दुसरी एक अपरूप गोष्ट श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र गरुडेश्वरला असतानाच एकदा घडली. चांदोदहून काही हरिजन मंडळी सकाळीच श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामी-महाराजांची कीर्ती ऐकून त्यांच्या दर्शनासाठी नावेतून आली. ही सर्व मंडळी मोठी धार्मिक व आपल्या मर्यादा सांभाळून राहणारी होती. त्यामुळे त्या काळच्या समाजधारणेप्रमाणे ही सर्व मंडळी श्रीनर्मदानदीच्या वाळवंटातच थांबली व त्यांनी एका सद्‌गृहस्थां-बरोबर श्रीस्वामीमहाराजांना असा निरोप पाठविला की, 'प्रभो! आम्ही सर्वजण आपल्या चरणदर्शनाच्या इच्छेने आलो आहोत. तरी श्रीस्वामीमहाराजांनी आम्हा सर्व सेवकांची ही इच्छा पुरवून आम्हाला कृतार्थ करावे. आपण माउली आहात. तरी उदार अंत:करणाने आमचा हट्ट पुरवावा.

त्या सद्‌गृहस्थांनी हा निरोप दिल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी आलेल्या सद्‌गृहस्थांबरोबर त्या सर्व भक्त मंडळींना असा निरोप दिला की, "सायंसंध्या झाली की आपल्याकडे येतो. तोपर्यंत भोजनादि करून विश्रांती घ्यावी" त्या निरोपाप्रमाणे ती सर्व भक्त मंडळी स्नान व भोजन करून आणि विश्रांती घेऊन श्रीस्वामीमहाराजांची वाट पाहात बसली. श्रीस्वामीमहाराजही सायंसंध्या झाल्यावर आपला दंडकमंडलू घेऊन श्रीनर्मदातीरा-वरील वाळवंटात थांबलेल्या आपल्या भक्तमंडळींना दर्शन देण्यासाठी गेले. मात्र तिकडे जाताना त्यांनी सर्वांना असे सांगून ठेवले की, "आम्ही खालील वाळवंटातून परत इकडे वर येईपर्यंत आपल्याला पाहायला तिकडे कोणीही येऊ नये." तेथे गेल्यावर त्या सर्वांनी प्रथम श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांवर मस्तक ठेवून नमस्कार केला व नंतर त्यांना बसवून ते सर्वजण त्यांच्या भोवती

बसले. पुढे तीन–चार तास त्या सर्व मंडळींनी अपूर्व भजन केले. भजन संपल्यानंतर त्या सर्व भक्तमंडळींनी पुन्हा श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांवर मस्तक ठेवून नमस्कार केला. हा सर्व सोहळा झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या भक्तमंडळींना नारळ–प्रसाद देऊन असे विचारले की, " आपणा सर्वांचे समाधान झाले ना ?" ती सर्व भक्तमंडळी " हो " म्हणाल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " तर मग आपण सर्व आजच आत्ता नावेने परत जा. " त्यालाही त्या सर्वांनी होकार दिला व पुन्हा एकदा सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना चरणस्पर्शपूर्वक नमस्कार करून आपली कृतज्ञता व्यक्त केली. त्यानंतर सर्वजण मोठ्या समाधानाने नावेत बसून परत गेले.

ही सर्व हरिजन मंडळी परत गेल्यावर श्रीस्वामीमहाराज श्रीनर्मदानदीवर स्नान करून वर झोपडीत येतील म्हणून वरील सर्व मंडळी वाट पाहात होती. त्यांनी पूर्वी आज्ञापिल्याप्रमाणे कोणीही त्यांना पाहावयास खाली श्रीनर्मदानदीवर गेले नाही. परंतु ज्यावेळी ही सर्व हरिजन मंडळी नावेतून परत गेली त्यावेळी श्रीस्वामीमहाराज रात्री एकटेच जंगलात निघून गेले. अशा प्रकारे कोणाला काहीच न सांगता श्रीस्वामीमहाराज जंगलात निघून गेल्याचे लक्षात आल्यावर सर्व मंडळी अगदी हवालदिल झाली. त्यानंतर पुढे तीन दिवस श्रीस्वामीमहाराज जंगलातून परत न आल्यामुळे सर्वांनाच अत्यंत चिंता लागून राहिली. श्रीस्वामीमहाराज परत येण्याची वाट पाहण्यापलीकडे सर्व लोक दुसरे काहीच करू शकत नव्हते. मात्र सर्वांनी वाट पाहता पाहता " दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा " या महामंत्राचे तीन दिवस अखंड भजन केले. चौथ्या दिवशी सकाळी ज्यावेळी

श्रीस्वामीमहाराज जंगलातून परत आले त्यावेळी ते अत्यंत प्रसन्न व परमतेजस्वी दिसत होते. त्यांचे दर्शन होताच सर्व भक्तमंडळींना परमानंद व परमहर्ष झाला. सर्वांनी त्यांना साष्टांग नमस्कार घालून त्यांचे स्वागत केले. पुढे ज्यावेळी ते आपल्या झोपडीत येऊन बसले त्यावेळी त्यांच्या एका अंतरंग भक्ताने त्यांना असे विचारले की, "प्रभो ! भजन आटोपल्यावर आपण तीन दिवस जंगलात कशासाठी गेला होता ?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्या भक्ताकडे एकदा पाहिले व ते त्याला असे म्हणाले की, "सर्वांनी चरणस्पर्शपूर्वक नमस्कार केल्यामुळे आमच्याकडून जे शास्त्रविरुद्ध वर्तन घडले व त्यामुळे जे पातक लागले ते सर्व तीन दिवस तपश्चर्या करून धुऊन काढले" हे उद्गार ऐकताच त्या अंतरंगभक्ताला परमाश्चर्य वाटले. वास्तविक पाहता श्रीस्वामीमहाराज साक्षात् श्रीदत्तस्वरूप होते. ते प्रत्यक्ष अग्नीस्वरूपच होते. त्यांना पापाचा स्पर्श होणे शक्यच नव्हते. परंतु शास्त्रमर्यादा व धर्ममर्यादा यांचे रक्षण जसे श्रीप्रभुरामचंद्रांनी मनुष्यदेह धारण केल्यावर केले व सर्व जगाला आदर्श घालून दिला त्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी जंगलात जाऊन तपश्चर्या केली व सर्व जगाला शास्त्र, धर्म व आचाराचा परमादर्श घालून दिला. या परमादर्शाच्या प्रकाशात अल्पांशाने का होईना पण वाटचाल करण्याचे भाग्य सर्व साधकभक्तांना लाभावे म्हणून श्रीस्वामीमहाराजांच्या परमकोमल चरणी नम्रपणे प्रार्थना आहे.

उपरोक्त दोन कथांप्रमाणेच आणखी एक अपरूप गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या शेवटच्या काही दिवसात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे असताना घडली. श्रीस्वामीमहाराजांचा एक शूद्र भक्त होता.

तो श्रीस्वामीमहाराजांच्या झोपडी भोवतालची जागा साफ करून त्यावर सडा घालून त्यांना दुरून साष्टांग नमस्कार घालण्याची सेवा करीत असे. या सेवेने प्रसन्न होऊन श्रीस्वामीमहाराज एक दिवस आपल्या भक्तसेवकाला असे म्हणाले की, "अरे! तू आमची रोज जी सेवा करतोस त्यामुळे आम्ही आज तुझ्यावर प्रसन्न झालो आहोत. तरी आज तुझी जी इच्छा असेल ती सांग. आम्ही ती पूर्ण करू." श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे आपल्या भक्तसेवकाला तुझ्या सेवेने आम्ही प्रसन्न झाल्याचे व वर मागण्याचे अभिवचन दिल्यामुळे तो अत्यंत संतुष्ट झाला. त्यावेळी तो भक्तसेवक वर मागताना श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाला की, "प्रभो! माझ्या सेवेने आपण माझ्यावर प्रसन्न झाला हाच मोठा वर आहे. आपल्या कृपेने मला काहीही कमी नाही. आपली माझ्यावर अशीच कृपा राहावी, मला धर्मकाया व धर्मबुद्धी प्राप्त होऊन स्वस्वरूपाचे ज्ञान व्हावे एवढीच आपल्या चरणी प्रार्थना आहे. यापेक्षा मला अधिक काहीही नको." आपल्या शूद्रभक्तसेवकाने केलेली ही निरीच्छ प्रार्थना व मागणी ऐकून श्रीस्वामीमहाराज त्याच्यावर अधिकच प्रसन्न झाले व ते त्याला असे म्हणाले की, "तुला तुझ्या इच्छेप्रमाणे धर्मबुद्धी व धर्मकाया प्राप्त होऊन ज्ञान होईल आणि स्वस्वरूपप्राप्तीही होईल. असे असले तरी आमची तुला काही तरी वस्तू देण्याची इच्छा आहे. तरी तुला आवडेल अशी वस्तू तू आमच्याकडून मागून घे. आम्ही ती तुला आनंदाने देऊ." श्रीस्वामीमहाराज त्या शूद्रभक्तसेवकाला असे म्हणाले तेव्हा तो त्यांना असे म्हणाला की, "प्रभो! आपणास मला काही वस्तू देण्याची इच्छा असेलच तर आपल्या चरणपादुका पूजेसाठी द्या." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले

की, "अरे ! आम्ही तर काष्ठाच्या खडावा कधीही वापरत नाही. तरी तू या डोंगरावर जाऊन पादुकांच्या आकाराच्या दोन शिला घेऊन ये. त्यांना स्पर्श करून आम्ही त्या प्रसाद म्हणून पूजेसाठी देऊ." हे एकताच तो शूद्रभक्तसेवक डोंगरावर गेला. तेथून त्याने पादुकांच्या आकाराच्या दोन शिला शोधून आणून त्या श्रीस्वामीमहाराजांच्या समोर ठेवल्या. श्रीस्वामीमहाराज तत्काळ त्या दोन शिलांवर आपले चरणकमल ठेवून उभे राहिले आणि आश्चर्य असे की, एका क्षणात ते उभ्याउभ्याच ध्यानस्थ झाले. हे दृश्य पाहताच त्या शूद्रभक्तसेवकाच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. त्याच्या शरीराला कंप सुटून घाम आला. त्यावेळी त्या शूद्रभक्तसेवकाला असे दिसू लागले की, जणू काही आपण आणलेल्या शिलापादुकांवर साक्षात् श्रीदत्तप्रभूच उभे आहेत. या स्थितीत काही काळ गेल्यानंतर श्रीस्वामीमहाराज व तो शूद्रभक्तसेवक अर्थात् उभयता गुरु-शिष्य भानावर आले. श्रीस्वामीमहाराज त्या शिलापादुकांवरून खाली उतरले व ते शूद्रभक्तसेवकाला असे म्हणाले की, "हा पादुकाप्रसाद घे. याच्या पूजनाने तुला धर्मबुद्धी व धर्मकाया प्राप्त होऊन आत्मप्राप्ती होईल आणि तू कृतार्थ होशील." या आशीर्वादाने तो शूद्रभक्तसेवक कृतार्थ झाला. त्याने साश्रुनयनांनी त्या पादुका हातात घेतल्या व आपल्या मस्तकावर ठेवून नाचत-गात तो आपल्या झोपडीत गेला. तेथे त्याने आयुष्यभर अत्यंत प्रेमाने व भक्तिभावाने श्रीगुरुपादुका-पूजन केले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या आशीर्वादाप्रमाणे आत्मप्राप्ती होऊन तो मुक्त झाला. त्या शूद्रभक्तसेवकाच्या अस्थी श्रीनर्मदानदीमध्ये विसावल्यानंतर व श्रीस्वामीमहाराजही देहदृष्ट्या तिरोहित झाल्यावर काही दिवसांनी श्रीनर्मदानदीच्या

किनाऱ्यावर श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांच्या मंदिराची उभारणी होऊन त्या मंदिरात त्यांच्या नावाच्या शिवलिंगाची प्रतिष्ठापना झाल्यावर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या शूद्रभक्तसेवकाला दिलेल्या पादुका त्याच्या झोपडीतून आणून त्यांची स्थापना त्यांच्या मंदिरासमोर केली व त्यावर एक सुंदरसे छोटे मंदिर बांधले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या नावाच्या शिवलिंगपूजेबरोबर या पादुकांची पूजाअर्चाही निरंतर होऊ लागली व ती आजतागायत होत आहे.

ही सर्व कथा वाचली म्हणजे साधकाने करावयाच्या स्थूल अशा वाह्य श्रीगुरुभक्तीची किंवा सेवेची ज्याप्रमाणे कल्पना येते त्याप्रमाणेच श्रीगुरुपादुकापूजनेच्या द्वारा सूक्ष्मतम किंवा पर सेवा कशी असते याची प्रचीती येते. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या शूद्रभक्तसेवकाला काहीतरी वस्तू मागण्याची बुद्धी देऊन त्याच्या चित्तात श्रीगुरुपादुका मागावयास लावून व त्या त्याला देऊन श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे पूजन करणे म्हणजे परसेवा करणे होय हे शिकविले व तद्द्वारा त्याला मुक्त केले. या दृष्टीने श्रीगुरुपादुकांच्या पूजेचे रहस्य समजावून घेणे परमावश्यक आहे. हे रहस्य जर अंतरंग झाले व त्याप्रमाणे कृत्ती घडली तर सर्व साधकभक्तांना परममुक्तीचा लाभ झाल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीनेच ही सर्वश्रेष्ठ सेवा कशी करावी अर्थात् मोक्षप्राप्तीसाठी श्रीसद्गुरूंच्या पादुकांची पूजा कशी करावी याचे वर्णन करताना "ज्ञानेश्वरीत" श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें ।
वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूंचीं ।। १५·१ ।।
ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळी ।

भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ।। २ ।।
अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।
तें लागलेंसे अबोट । चंदनाचें ।। ३ ।।
प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळूनि नूपुरें ।
लेवऊं सुकुमारें । पदें तियें ।। ४ ।।
घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ।
तिये घालूं जोडी । आंगोळिया ।। ५ ।।
आनंदामोदबहळ । सात्त्विकाचें मुकुळ ।
तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ।। ६ ।।
तेथें अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें वोवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ।। ७ ।।
माझी तनु आणि प्राण । इया दोनी पाउवा लेऊं श्रीगुरुचरण ।
करूं भोग मोक्ष निंबलोण । पायां तयां ।। ८ ।।
इया श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया दैवा ।
जे सकळार्थमेळावा । पाटु बांधे ।। ९ ।।

अर्थ :– आता आपले हृदय हे चांगले स्वच्छ व शुद्ध करून त्यावर श्रीगुरूंच्या पादुकाची स्थापना करू म्हणजे हृदयकमळाच्या अर्थात् आज्ञाचक्राच्या ठिकाणी श्रीगुरूंचे चरण दृढ धारण करू. नंतर मनातील सर्व भेद नाहीसे करून ऐक्यभावाच्या ओंजळीत सर्व इंद्रियरूपी फुलांच्या कळ्या भरून त्यांच्या चरणावर वाहून अर्घ्य देऊ म्हणजे सर्व इंद्रियांना एकवटून त्यांचे व्यापार त्या चरणाच्या ठिकाणीच अनन्य भावाने समर्पण करू. श्रीगुरुचरणांना अनन्यभावरूपी किंवा एकनिष्ठभावरूपी स्वच्छ उदकाने स्नान घालून नंतर श्रीगुरुचरणनिष्ठारूप वासनेच्या सुवासिक चंदनाचे बोट लावू. प्रेमरूपी सोने शुद्ध करून त्या सोन्याचे पैंजण घडवून

ते श्रीगुरूंच्या सुकुमार पायात घालू. दृढप्रेमाची एक व शुद्ध अव्यभिचारी प्रेमाची एक अशा दोन उत्तम अंगठ्या श्रीगुरूंच्या दोन चरणांच्या बोटात घालू. आनंदरूपी सुगंधाने परिपूर्ण भरलेले व अष्टसात्त्विकभावरूपी आठ पाकळ्यांचे उमललेले कमळ श्रीगुरु-चरणांवर वाहू. श्रीगुरूंच्या पूजेच्या वेळी अहंकाररूपी धूप जाळू. "मी नाही सर्व काही श्रीगुरूच आहेत," या अद्वैत बुद्धिरूप दीपाने त्यांच्या चरणांची आरती करून शेवटी त्यांच्या चरणांशी समरस होऊन जाऊ. आपले शरीर व प्राण यांच्या पादुका करून श्रीगुरूंच्या दोन्ही चरणात घालू व त्या चरणांवरून भोग व मोक्ष हे दोन्ही ओवाळून टाकू. मोक्षासकट सर्व अर्थांची प्राप्ती करून देणे हे या सेवेचे फल असल्यामुळे जो कोणी परम भाग्यवान् असेल त्यालाच या प्रकारची श्रीगुरुचरणांची सेवा प्राप्त होईल.

उपरोक्त तीन गोष्टींप्रमाणेच श्रीसद्गुरुनाथमहाराजांचा मुक्काम श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे असताना श्रीस्वामीमहाराजांच्या परमवैराग्याचा परमादर्श उपस्थित करणारी एक अपूर्व, अलौकिक व अपरूप गोष्ट घडून आली. याच काळात श्रीस्वामीमहाराजांचे एक परमभक्त श्रीशंकरकाका आजेगावकर हे श्रीस्वामीमहाराजांची चरणसेवा घडावी म्हणून श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले होते. एके दिवशी श्रीस्वामीमहाराज स्नानासाठी निघण्यापूर्वीच श्रीशंकर-काका व श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीनर्मदानदीवर स्नानाला गेले. स्नान झाल्यानंतर श्रीशंकरकाकांनी श्रीस्वामीमहाराज स्नान करून आल्यावर त्यांना संध्येकरिता बसण्यासाठी सोवळ्यातील दोन छाट्या श्रीनर्मदानदीच्या काठावरील वाळूत एकमेकांवर अंथरून ठेवल्या व ते श्रीस्वामीमहाराज स्नान करून येण्याची वाट पाहत तेथे उभे राहिले. त्यानंतर थोड्याच वेळात

श्रीस्वामीमहाराज स्नान करून आले. त्यांनी वाळूमध्ये अंथरलेल्या छाटयांवर पाय ठेवताच ते श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या जवळच उभ्या असलेल्या श्रीशंकरकाकांना उद्देशून असे म्हणाले की, "या छाटया येथे कोणी अंथरल्या ?" श्री. शंकरकाकांना हा प्रश्न ऐकताच फार आनंद झाला. आपल्या सेवेची पावती मिळणार असे वाटून ते मोठ्या उत्साहाने श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "मीच अंथरल्या त्या." हे उत्तर ऐकताच श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना असे विचारले की, "एक छाटी अंथरावयाची सोडून एकमेकांवर दोन छाटया घालून त्या का अंथरल्या ?" हा प्रश्न ऐकताच श्री. शंकरकाका असे म्हणाले की, "प्रभो ! खाली वाळू आहे. ती आपणास टोचेल असे वाटल्याने मी त्या दोन छाटया एकमेकांवर अंथरल्या." श्री. शंकरकाकांचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराज एकदम उसळून असे म्हणाले की, "संन्याशाचे वैराग्य असे असते का ? त्याच्या शरीराला वाळू टोचते का ? तो देहभानावर राहून वावरतो का ? असे असेल तर मग उद्या तुम्ही येथे एक पलंग आणून त्यावर गादी टाकून झोपावयास सांगाल व पुढे हे स्वामींना रुचते व बरे वाटते म्हणून त्यांच्या सेवेसाठी व भोगासाठी एक स्त्रीही आणून ठेवाल. संन्याशाला हे सर्व गैर आहे. मी देह नाही, अशा रीतीनेच त्याने वागले पाहिजे. त्यातील एक छाटी काढून घ्या." ही आज्ञा ऐकताच श्री. शंकरकाकांनी एक छाटी काढून घेतली व श्रीस्वामीमहाराजांची संध्या होईपर्यंत ते खाली मान घालून उभे राहिले. आपल्या सेवेने श्रीस्वामीमहाराज संतुष्ट होतील असे जे त्यांना वाटत होते त्याच्या विपरीतच घडले म्हणून त्यांचे मन खट्टू झाले. परंतु परवैराग्य कसे असते व संन्याशाच्या परवैराग्याचा परमादर्श

कसा असतो याचे मूर्तिमंत प्रात्यक्षिक पाहून आपल्याला अशे धगधगीत वैराग्यसंपन्न श्रीसद्‌गुरू लाभले म्हणून श्री शंकरकाकांना व श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना परमानंद झाला. श्री. रामेश्वरभट्ट यांनी " भक्तीज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ।। " असे म्हणून श्रीसंत तुकाराममहाराजांचे जे वर्णन केले आहे त्याप्रमाणेच आपल्यालाही वैराग्याच्या परमपुतळ्याचे दर्शन झाल्याने त्या दोघांना धन्यता वाटली.

हे वैराग्य म्हणजे काय ? ते कसे प्राप्त होते ? ते न केल्याने आशा–दुराशा वाढून जीव संसार बंधनात कसा अडकतो व वैराग्य केल्याने देहात्मबुद्धी नाहीशी होऊन श्रीरामाची प्राप्ती कशी होते हे सांगताना श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज "एकवीस समासी " या प्रकरण ग्रंथात असे म्हणतात की–

तरी निग्रह धारिष्ट जडे । हें वैराग्याविण न घडे ।
दृढ वैराग्य होतां उडे । पांग देहाचा ।। ७.१५ ।।
देहपांग अनादरें बळें । तेथें धारिष्ट उठोनि पळे ।
सद्‌भाव पूर्ण ढांसळे । पूर्ण धारिष्ट नसता ।। १६ ।।
देह पडे कां देव जोडे । ऐशी हांव आंगीं जडे ।
तेणें गुणें वैराग्य चढे । महाप्रबळ ।। १७ ।।
देहपांग नि:शेष भंगे । तेव्हां प्राप्तीसी वेळ न लागे ।
देव भक्तांपाठी लागे । नाभी नाभी म्हणोनि ।। १८ ।।
बाळक आपण रक्षू नेणें । म्हणोनि मातेसि लागे रक्षणें ।
तेचि बाळक शहाणें । होतां माता विसंबे ।। १९ ।।
तैसा भक्त भगवंतीं प्रेमा । लावूनि उल्लंघी देह सीमा ।
तयाचा सांभाळ आत्मयारामा । करणें घडे नेमस्त ।। २० ।।
सर्वस्वाची आस तुटे । तरीच सगुणमूर्ति प्रकटे ।

दुःख संसारींचें फिटे । एकसरा ॥ २१ ॥
परंतु आशा सोडवेना । म्हणोनि प्राप्ति घडेना ।
आशा धरितां सुटेना । प्राणी दुःखापासोनी ॥ २२ ॥
आशा दुराशा दोघी बहिणी । वेढा लाविले सकळ प्राणी ।
दुःखरूप तिया पापिणी । जन्म दाविती मागुता ॥ २३ ॥
आशादुराशाचीं जाळीं । काळें पसरलीं भूमंडळीं ।
पडला प्राणिमात्र आंदोळीं । संसारदुःखीं ॥ २४ ॥
आशा वासनेचें बंधन । वासना जन्मासी कारण ।
वासनेसी आशेवीण । थारा नाहीं ॥ २५ ॥
आशा वासनेची पापिणी । आशा दुःखाची खाणी ।
आशा वासनेची घातघेणी । बळेंचि जन्म दावी ॥ २६ ॥
जयासी ज्याची आस । तयासी त्याचाची ध्यास ।
निदिध्यासें प्राणियास । तेचि प्राप्ति ॥ २७ ॥
बहुतेक ध्यास मनीं । पूर्वाभ्यासेंकरूनी ।
कांता पुत्र आणि धनी । नेमस्त आहे ॥ २८ ॥
अखंड प्रपंचाचे ध्यान । दृढ लागलें अनुसंधान ।
तेणें घडेचिना साधन । परत्रींचें ॥ २९ ॥
उपजतांचि लागवेगें । प्राणी प्रपंच करूं लागे ।
तयासी सांगणेंचि नलगे । प्रपंच करावा ऐसें ॥ ३० ॥
सकळ सृष्टि प्रपंचाकडे । सकळांसी प्रपंच आवडे ।
जाणतेचि ठकले बापुडे । युगधर्ममत्वे ॥ ३१ ॥
आहे प्रपंचीं आसक्ती । म्हणोनि नाना आधार घेती ।
सेखी सर्व सांडोनि जाती । बापुडे मूर्ख ॥ ३२ ॥
चिंतीत असता प्रपंचजयो । एकाएकीं विपरीत समयो ।
आंगीं आदळती लयी । पावति प्राणी ॥ ३३ ॥

अंतीं मति तेचि गती । स्त्री पुत्र आक्रंदती ।
प्रपंचलोभें यातायातीं । पुनःपुन्हां जन्म ॥ ३४ ॥
ऐसाच करी येरझारा । प्रपंचलोभें आत्महत्यारा ।
यमयातना निलाजरा । साहिल्याची साहे ॥ ३५ ॥
ऐसा सृष्टीचा दंडक । लोभें वेष्टिला एक एक ।
जाणत असतांही कौतुक । माया खेळ खेळे हा ॥ ३६ ॥
देखतां दिवसां नागवण । ठकले आपणासी आपण ।
होतां ही परम क्षीण । आनंदचि मानी ॥ ३७ ॥
महावर्तीं बुडतां । दृढ केली देहाहंता ।
देहासी येईल न्यूनता । म्हणोनि सांगे ॥ ३८ ॥
जंव होय देहावसान । तंव न सोडी अभिमान ।
ऐसा अभिमानी जन । सर्वत्र वर्ते ॥ ३९ ॥
एवं महत्त्वाची आशा । महत्त्व नसतांही दुराशा ।
तेणें गुणें जगदीशा । अंतरती प्राणी ॥ ४० ॥
एवं देहाचें थोरपण । तेचि उदास नागवण ।
देहाचेनि लोभें खूण । चुके परमार्थाची ॥ ४१ ॥
देहासी थोरपण आणितां । क्षीणचि उरे तत्त्वतां ।
रासभाचा अश्व होतां । परम संकट ॥ ४२ ॥
देहमात्र तितुका निंद्य । एकें मानिला परमवंद्य ।
तरी तो वंदिता खेद । पावेल तेणें ॥ ४३ ॥

* * *

ऐसा सर्वात्मा श्रीराम । सांडूनि धरिती विषयकाम ।
ते प्राणी दुरात्मे अधम । केलें पावती ॥ ६.५९ ॥
रामेंविण जे जे आस । तितुकी जाणावी निराश ।
माझें माझें सावकाश । क्षीणचि उरे ॥ ६० ॥

जयासि वाटे क्षीण व्हावा। तेणें विषय चिंतीत जावा।
विषय न मिळता जीवा। तळमळ सुटे ॥ ६१ ॥
सांडूनि राम आनंदघन। ज्याचें मनीं विषयचिंतन।
त्यासी कैंचें समाधान। लोलंगतासी ॥ ६२ ॥
जयासी वाटे सुखचि असावें। तेणें रघुनाथभजनीं लागावें।
स्वजन सकळहि त्यागावें। दुःखमूळ जें ॥ ६३ ॥
जेथें वासना झोंबोनि पडे। तेणेंचि अपायें दुःख जडे।
म्हणोनि विषयवासना मोडे। तो एक सुखी ॥ ६४ ॥



अशा रीतीने श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची श्रीगुरुसेवा चालू असताना त्यांना प्रथम अमांशाचा विकार होऊन नंतर ताप येऊ लागला. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रोज रात्री १० ते १–१॥ वाजेपर्यंत भजन चालत असे. भजन संपल्यावर सर्वांना बहुतांशी चांगल्या तुपातील द्रोण भरून शिरा प्रसाद म्हणून दिला जात असे. श्रीसद्‌गुरुनाथमहाराजही हा प्रसाद रात्रीच सेवन करीत असत; परंतु त्यांच्या प्रकृतीला रात्रीचे खाणे न मानवल्यामुळे त्यांना अमांश झाला. त्यातच त्यांना ताप येऊ लागला. श्रीस्वामीमहाराजांना ही गोष्ट कळताच त्यांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना असे सांगितले की, “ अरे ! तुला ताप येत आहे. तरी तो जाईपर्यंत स्नान करू नकोस. ” श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा शिरोधार्य मानून श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांनी स्नान बंद केले. श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचा ताप दूर व्हावा म्हणून श्रीस्वामीमहाराज रोज डाळिंबाच्या रसातून एक माक्षिक त्यांना देत असत. अशा रीतीने एक महिनाभर श्रीस्वामीमहाराजांच्या हातचे औषध भक्षण केल्यावर श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांचा ताप दूर झाला; पण

महिनाभर ताप येत राहिल्यामुळे त्यांना फारच अशक्तता आली होती.

अशा स्थितीत दसरा आला. त्या दिवशी सणाच्या शुभमुहूर्तावर तरी आपणास श्रीस्वामीमहाराजांच्या बरोबर स्नान करण्याचा लाभ व्हावा म्हणून श्रीसद्‌गुरुनाथमहाराज त्यांच्या मागून श्रीनर्मदानदीवर गेले. श्रीस्वामीमहाराज श्रीनर्मदानदीत स्नानाला उतरल्यावर त्यांचे लक्ष ज्यावेळी घाटाकडे गेले त्यावेळी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांकडे त्यांची दृष्टी गेली. त्याक्षणी त्यांनी त्यांना असे विचारले की, " तू आत्ता येथे कशाला आलास ?" हा प्रश्न ऐकताच श्रीसद्‌गुरुनाथमहाराज श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " आज दसरा आहे. तरी आपल्याबरोबर स्नान करण्याची इच्छा आहे. आपण श्रीनर्मदानदीमध्ये जेथे स्नान करीत आहात त्याच्या खालच्या अंगाला उभे राहून मी स्नान करीन म्हणजे आपल्या अंगावरून येणाऱ्या अमृतस्वरूप पाण्याचा मला लाभ होईल. तरी आज आपण मला स्नान करण्याची अनुज्ञा द्यावी ही आपल्या चरणी प्रार्थना आहे. " श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज आपला कमंडलू श्रीनर्मदेच्या पाण्याने भरून घेऊन वर आले व त्यांनी आपल्या कमंडलूतील पाणी स्वतःच्या हाताने श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांच्या अंगावर शिंपडले व त्यांनी त्यांना असे विचारले की, " काय ? स्नान झाले की नाही ? " श्रीस्वामीमहाराजांचा हा प्रश्न ऐकताच श्रीसद्‌गुरुनाथमहाराज त्यांना अत्यंत नम्रतेने असे म्हणाले की, " होय ! स्नान झाले ! " त्यावेळी त्या जलसिंचनामुळे श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना जो आनंद झाला तो अवर्णनीय होता. जणूकाही आपण अंतर्बाह्य शुद्ध झालो आहोत

असेच त्यांना वाटू लागले. इतकेच नव्हे; तर या जलसिंचनामुळे आपली जन्मजन्मांतरींची पाप–तापादि दुःखे व क्लेश कष्टादि त्रास दूर झाले आहेत असेच त्यांना वाटले. श्रीस्वामीमहाराजांनी स्वहस्ते आपल्या कमंडलूतील श्रीनर्मदेच्या जलाने श्रीसद्गुरुनाथ महाराजांवर जलसिंचन करून जो अपूर्व लाभ त्यांना प्राप्त करून दिला होता तशा प्रकारचा अलौकिक व लोकोत्तर लाभ श्रीस्वामीमहाराजांच्या अंतरंग भक्तांपैकी क्वचितच कोणाच्या तरी वाट्याला आला असेल. अशा प्रकारच्या भाग्यामुळेच श्रीसद्गुरु-महाराजांचा शिष्यवेल गगनावर जाऊन त्यांना पुढील आयुष्यात दिगंत कीर्ती मिळाली.

श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे येण्यापूर्वी त्यांची व प. प. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांची भेट झाली होती. त्यावेळी प. प. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामी-महाराज श्रीसद्गुरुनाथमहाराजांना असे म्हणाले की, "आम्ही श्रीगुरुचरणांविषयी पुढील श्लोक रचला आहे. आपण त्याचे एक चित्र काढून त्यांच्या गळ्यात तो श्लोक हाररूपाने गुंफावा व ते चित्र श्रीगुरुचरणी अर्पण करावे अशी आमची इच्छा आहे." प. प. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांची इच्छा म्हणजे आज्ञा मानून श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांच्या गळ्यात पुढील श्लोकबद्ध हार गुंफून एक चित्र तयार केले व ते चित्र घेऊन ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरला आले. ते चित्र फार अपूर्व असून त्यात पुढील श्लोक हारात गुंफला होता.

मे शं के शं सु शं भुं भुवन वन वहं मारहं रत्न रत्नं ।
वंदे श्री देव देवं सुगुण गुरु गुरुं श्रीकरं कज्ज कज्जं ।
सामजं [illegible] सुमहं [illegible] संघे ।

मात: पात: सुतस्ते वहरहसिहरे देशिके शिष्य शिष्यं ॥

याचा अर्थ असा आहे की, " श्रीविष्णू, श्रीब्रह्मदेव व श्रीशंकर अशा त्रिमूर्तिस्वरूप असलेल्या, चतुर्दश भुवने व वेद धारण करणाऱ्या, मदनालाही लाजविणाऱ्या, जितेंद्रिय रत्नांमध्ये अर्थात् पुरुषश्रेष्ठांमध्ये श्रेष्ठ व तेजस्वी असलेल्या, ज्ञानी व गुणसंपन्न अशा श्रीगुरूंचेही श्रीगुरू असणाऱ्या, भक्तांना सर्व प्रकारचे ऐश्वर्य प्रदान करणाऱ्या, हातात दंडकमंडलू धारण करणाऱ्या आणि कमलाप्रमाणे प्रसन्न मुखकमल असलेल्या हे देवाधिदेवा! हे गुरुमाउली !! मी आपल्याला वंदन करतो. हे प्रभो ! मी सर्व वासनांच्या समूहात सापडलेलो असून संसाररूपी अग्नीत पोळून त्रस्त झालो आहे. मी व माझे या भावनांनी मी उन्मत्त झालो आहे., हे देवा ! मी अज्ञानी वालक आहे. याकरिता हे सद्गुरो! आपल्या शिष्यानुशिष्याचा यापुढे अध:पात होऊ नये म्हणून आपण ज्ञान देऊन माझा उद्धार करावा."

श्रीसद्गुरुनाथमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आल्यावर एके दिवशी सवड पाहून ते श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून असे म्हणाले की, " श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी आपले हे श्लोकयुक्त हारवद्ध चित्र माझ्याकडून काढून घेतले असून ते आपल्या चरणी अर्पण करण्यास सांगितले आहे. तरी आपण श्रीदीक्षितस्वामीमहाराजांच्या या भेटीचा स्वीकार करावा." श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी असे सांगून तो फोटो श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवला व ते स्तब्ध उभे राहिले. श्रीस्वामीमहाराजांनी तो फोटो आपल्या हातात उचलून घेतला व त्यातील हारात गुंफलेला श्लोक पाहून एक क्षणभर ते स्तब्ध वसले आणि त्यानंतर त्यांनी तो फोटो उचलून श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या हातात परत दिला व ते त्यांना असे म्हणाले की, "ही वस्तू

स्वामींची आहे. ती त्यांची त्यांना परत करा."

ही सर्व कथा वाचली म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेत श्रीभगवंतांनी "अमानित्वम् ।।१३.७।। " हा ज्ञानी माणसाचा जो मूर्धन्य गुण सांगितला आहे त्या अमूर्त गुणाची श्रीस्वामीमहाराज हे साक्षात्, मूर्तिमंत व साकार सगुण मूर्तीच होते, याचा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाही; कारण प. प. श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांची स्तुती करणारे ते श्लोकबद्ध हारयुक्त चित्र तत्काळ परत करून टाकले. श्रीस्वामीमहाराजांच्या या आंतरिक अलौकिकत्वाचा प्रत्यय घ्यावयाचा असेल तर श्रीसंत ज्ञानेश्वर-महाराजांनी ज्ञानेश्वरीत "अमनित्वम् ।। " या पदाचा जो भावार्थ स्पष्ट केला आहे त्याचे मनन करणे आवश्यक आहे. ते तेथे असे म्हणतात की—

तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे ।
संभावितपणाचें । वोझें जया ।। १३.१८५ ।।
आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचें येतां । रूप आंगा ।। १८६ ।।
तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा ।
कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ।। १८७ ।।
पार्था तेणें पाडें । सन्मानें जो साकडें ।
गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ।। १८८ ।।
पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ।। १८९ ।।
तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी ।
मरणेंसीं साटी । नमस्कारितां ।। १९० ।।
वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।

परि वेडिवेमाजीं दडे । महिमेभेणें ।। १९१ ।।
चातुर्य लपवी । महत्त्व हारवी ।
पिसेपण मिरवी । आवडोनि ।। १९२ ।।
लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु ।
उगेपणीं चांगु । आथी भरु ।। १९३ ।।
जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी ।
ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ।। १९४ ।।
तळौटेपण बाणे । आंगीं हिणावो खेंवणें ।
तें तेंचि करणें । बहुतकरूनी ।। १९५ ।।
हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें ।
तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ।। १९६ ।।
पैं चालतु का नोहे । कीं वारेनि जातु आहे ।
जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होईजे ।। १९७ ।।
माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो ।
मज झणें वासिपो । भूतजात ।। १९८ ।।
ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये ।
नामेंचि जो जिये । विजनाचेनि ।। १९९ ।।
वायू आणि तया पडे । गगनेंसीं बोलों आवडे ।
जीवें प्राणें झाडें । पढियंतीं जया ।। २०० ।।
किंबहुना ऐसी । चिन्हें जया देखसी ।
जाण तया ज्ञानेंसीं । शेज जाहली ।। २०१ ।।

याचा अर्थ असा आहे की, (ज्याच्या ठिकाणी अमानित्व हा गुण साकार झालेला असतो अशा ज्ञानी पुरुषाला) इतर कोणत्याही व्यवहारात एकाही गोष्टीचे बाबतीत कोणाचीही बरोबरी करणे आवडत नाही. त्याला लोकांनी संभावित म्हटले असता भोंदू

पणाचे पराकाष्ठेचे ओझे वाटते. ।।१८५।। त्याच्या अंगी असलेल्या गुणांचे वर्णन केले असता व योग्यतेनुरूप लोकांनी सन्मान केला असता किंवा अंगची योग्यता लोकांनी प्रकट केली असता पारध्यांनी चोहोबाजूंनी वेढलेले हरिण ज्याप्रमाणे घाबरून जाते किंवा नदी आपल्या बाहूबलाने पोहून पलीकडे जात असताना भोवऱ्यात सापडलेला मनुष्य जसा अत्यंत व्याकुळ होतो त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष गडबडून जातो. ।।१८६-१८७।। अशा प्रकारे लोकांनी सन्मान केला तर ज्ञानी माणसाला मोठे संकट पडते व तो कष्टी होतो. त्यामुळे तो आपल्या अंगाकडे मोठेपणा येऊच देत नाही. ।।१८८।। आपणास लोकांनी पूज्य मानलेले आपण आपल्या डोळ्यांनी पाहू नये, आपली कीर्ती आपणच आपल्या कानांनी ऐकू नये आणि "हा अमुक एक मनुष्य असा आहे" अशी लोकांना आपली आठवणसुद्धा होऊ नये (अशी ज्ञानी पुरुषाची इच्छा असते.) ।।१८९।। अशा त्या ज्ञानी पुरुषाला सत्काराची गोष्ट आवडत नाही आणि तो आदराचा स्वीकारही करीत नाही. त्याला जर कोणी नमस्कार केला तर ते त्याला मरणासारखे दुःखकर वाटते. ।।१९०।। त्याला बृहस्पतीसारखी सर्वज्ञता जरी लाभलेली असली तरी तो आपले माहात्म्य वाढेल या भीतीने ते वेडेपणात लपवून टाकतो. ।।१९१।। आपल्या अंगी असलेले चातुर्य तो लपवून ठेवतो, आपला मोठेपणा सोडून देतो आणि मोठ्या प्रेमाने लोकात आपले वेडेपण मिरवतो. ।।१९२।। त्याला लोकात होणाऱ्या आपल्या कीर्तीबद्दल उद्वेग असतो. शास्त्रचर्चा किंवा शास्त्रांच्या वादविवादाबद्दल तो उपेक्षाच करतो. त्यामुळे काही एक न करता स्वस्थपणे बसण्यावरच त्याचा अत्यंत भर असतो. ।।१९३।। इतकेच नव्हे; तर लोकांनी आपला अपमान किंवा

अनादरच करावा व नातेवाईकांनी आपली संगतीच वर्ज्य करावी अशा प्रकारची त्याच्या मनामध्ये फार तीव्र इच्छा असते. ॥१९४॥ (हा ज्ञानी पुरुष) ज्यामुळे अंगात नम्रपणा पूर्ण बाणला जाईल व हीनपणा हेच आपले भूषण होईल, अशाच गोष्टी तो बहुत करून करतो. ॥१९५॥ ज्यामुळे "हा जिवंत आहे किंवा नाही" अशी लोक आपल्याविषयी कल्पना करतील असे आपले वर्तन असावे अशी (ज्ञानी पुरुषाला) आशा असते. ॥१९६॥ हा आपल्या पायांनी चालत आहे की नाही का वाऱ्याने ढकलला जात आहे असा लोकांना भ्रम व्हावा असे आपण व्हावे (असे त्याला वाटते.) ॥ १९७ ॥ आपल्या अस्तित्वाचा लोप व्हावा, आपले नावरूप नाहीसे व्हावे आणि प्राणिमात्राला माझ्यापासून कदाचित् भय वाटेल; पण तसे वाटू नये असे ज्ञानी पुरुषाचे देवापाशी नवस असतात. त्यामुळे तो नित्य एकांतवासात जात असतो व एकांताच्या नावाने जगतो म्हणजे एखादी जागा निर्जन आहे असे ऐकल्याबरोबर त्याला आनंद वाटतो. ॥ १९८–१९९ ॥ त्याचे व वायूचे पटते म्हणून त्याच्या अनुरोधाने तो वागतो, आकाशावरोबर त्याला बोलणे आवडते व त्याला झाडेच जीव की प्राण अशी आवडतात. ॥२००॥ अधिक काय सांगावे! अशी लक्षणे ज्याच्या अंगात पूर्णपणे बाणलेली आहेत असे तुझ्या दृष्टीस पडेल तोच ज्ञानाच्या अंथरुणावर स्वस्थ झाला आहे म्हणजे त्यालाच ज्ञान हस्तगत झाले आहे, असे तू समज ॥ २०१ ॥

* * *

अशा रीतीने श्रीसद्‌गुरुनाथमहारांचा काळ श्रीगुरुचरण सेवेत आनंदात चालला असला तरी मागे कथन केल्याप्रमाणे ते आजारी

पडल्यावर त्यांच्या देहाला जी अशक्तता आली ती काही दूर झाली नाही. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील हवामानात श्रीसद्‌गुरुनाथ-महाराजांची प्रकृती लवकर सुधारणार नाही असे पाहून श्रीस्वामी-महाराज त्यांना आश्विनामध्ये असे म्हणाले की, " तू आता घरी जाऊन काही दिवस विश्रांती घे म्हणजे प्रकृती सुधारेल. आत्तापर्यंत जे शिकविले ते निष्ठेने टिकव म्हणजे सर्व काही सिद्धीस जाईल." अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना श्रीक्षेत्र गरुडेश्वराहून घरी जाण्यास सांगितल्यामुळे त्यांच्या मनाला फार वाईट वाटले. परंतु श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा शिरसावंद्य मानून ते तेथून निघून प्रथम मुंबईला आले व तेथून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला गेले. त्या ठिकाणी काही दिवस राहून पुढे ते कोल्हापूरला गेले. तेथून ते ज्येष्ठ महिन्यात आपल्या जन्मगावी कुडुत्री येथे गेले. तेथे असतानाच आषाढात त्यांना केसरी वर्तमान-पत्रात श्रीस्वामीमहाराजांच्या महाप्रयाणाची वार्ता वाचावयास मिळाली. या वार्तेने श्रीसद्‌गुरुनाथमहाराज, त्यांच्या भगिनी श्रीमती गोदावरीताई आणि त्यांचे बंधू प. प. श्रीशंकरस्वामीमहाराज या सर्वांना जे दुःख झाले त्याचे वर्णन करणे शक्य नाही.

श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या आजाराचे निमित्त करून त्यांना घरी पाठविण्याचे एकमात्र कारण असे होते की, आपल्या महासमाधीच्या वेळी आपला कोणीही अंतरंग भक्त आपल्याजवळ असू नये अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती. त्यामुळेच त्यांनी शेवटच्या काळात प. प. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-स्वामीमहाराज, श्रीसीताराममहाराज, श्रीगांडामहाराज, श्रीगोविंद-महाराज पंडित यांना एक तर श्रीक्षेत्र गरुडेश्वरी येऊ दिले नाही व

ते आले तर त्यांना तेथून परत पाठविले. श्रीस्वामीमहाराजांनी असे का घडविले याची चिकित्सा केली म्हणजे हे लक्षात येते की. आपल्या सर्व अंतरंग सद्भक्तांचे मन आपल्या स्थूल रूपात गुंतून न राहता ते विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा अक्षर, अनाम, आनंद, अज व अव्यय स्वरूपाशी एकरूप होऊन त्यांचा मनोरूप पट फाटून ते सामरस्याच्या महानंदात निमग्न व्हावेत हाच त्यामागील एकमेव हेतू होता. श्रीस्वामीमहाराजांची आपल्या परमप्रिय शिष्यांच्या अपरंपार कल्याणाची ही अस्थूल दृष्टी पाहिली म्हणजे मन विस्मयचकित झाल्याशिवाय राहात नाही, हेच खरे आहे.

या काळातच श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे श्री. धुंडिराजबुवा पुराणिक हे श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आले. श्रीस्वामीमहाराजांचे त्यांच्यावर अत्यधिक प्रेम असल्यामुळे त्यांनी त्यांना तेथे वरेच दिवस ठेवून घेतले. अशा रीतीने काही दिवस सत्संगात घालविल्यावर श्री. धुंडिराजबुवा श्रीस्वामीमहाराजांकडे घरी जाण्याची परवानगी मागू लागले. परंतु श्रीस्वामीमहाराजांची इच्छा त्यांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आपल्यावरोवर राहावे अशी असल्यामुळे ते त्यांना निराळ्या रीतीने थांववून घेत असत. त्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे रोज कोणीतरी नवी मंडळी येतच असत. त्यावेळी श्री. धुंडिराजबुवांच्यासमोर श्रीस्वामीमहाराज त्या लोकांना असे विचारीत असत की, "का हो ! या पुराणिकबुवांचे पुराण तुम्ही कधी ऐकले आहे काय ? ते फार चांगले पुराण सांगतात." हे ऐकले की, तेथे आलेली नवीन मंडळी अर्थात् श्रीस्वामीमहाराजांना असे उत्तर देत असत की, " नाही, आम्ही यांचे पुराण अद्यापपर्यंत ऐकले नाही. " ती सर्व मंडळी असे म्हणाली की, श्रीस्वामीमहाराज

श्री. धुंडिराजबुवांना असे म्हणत असत की, "बुवा! आज तुम्ही पुराण सांगून या मंडळींची इच्छा पूर्ण करा. मग उद्या चला." श्रीस्वामीमहाराजांची ही अनुल्लंघ्य आज्ञा ऐकताच श्री. धुंडिराजबुवांचा त्या दिवशी तेथेच मुक्काम व पुराण होत असे. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी श्री. धुंडिराजबुवांना प्रेमाने बरेच दिवस ठेवून घेतले. कालौघात श्री. धुंडिराजबुवा ज्यावेळी परत जाण्यास निघाले त्यावेळी त्यांना नारळ-प्रसाद व एक छाटी देऊन पूर्ण आशीर्वाद दिला.

अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे कालक्रमण चालू असता एके दिवशी सकाळी भाष्याचा पाठ संपल्यावर आपल्या आयुष्याच्या कालाचा एकंदर सर्व विचार करून वेदान्ताचा साररूप उपदेश सर्वजणांना करून मोकळे व्हावे म्हणून श्रीस्वामीमहाराज सर्वांना उद्देशून एकाएकी असे म्हणाले की, "आजपर्यंत जो प्रत्यक्ष उपदेश केला व ग्रंथ रचना केली त्या सर्वांचे सार आज सांगायाचे आहे. मुक्तीचा लाभ करून घेणे हे मनुष्य जन्माचे मुख्य कर्तव्य आहे. त्याकरिता प्रथम मन स्थिर व्हावे म्हणून "ईश्वरोद्देशें कर्म करितां। चित्ता ये शुद्धता ।। श्रीदत्तमाहात्म्य ८-४०।।" या न्यायाने वर्णाश्रमविहित धर्माचे यथाशास्त्र आचरण केले पाहिजे. त्याचप्रमाणे वेदांताचे श्रवण, मनन व निदिध्यासन नित्यनियमित करीत असावे. त्यात खंड पाडू नये. मुख्यतः श्रवणाकडे अधिक लक्ष द्यावे. त्यामुळे मनातील आसक्ती कमी होईल. सात्त्विक प्रवृत्तीने मानवाची उन्नती होते. सात्त्विक प्रवृत्ती होण्याकरिता आपला आहार हित (हितकारक), मित (अल्प, थोडा) आणि मेध्य म्हणजे पवित्र असण्याकडे लक्ष दिले पाहिजे. आपली प्रकृती सात्त्विक झाली की नाही हे पुढील गोष्टींवरून

किंवा गुणांवरून आपले आपल्यालाच ओळखता येते. हे गुण असे आहेत. स्वधर्मावर दृढ श्रद्धा ठेवणे, स्नानसंध्या, देवपूजा व पंचमहायज्ञ वेळेवर करणे, अतिथीसत्कार, गोसेवा, कथा, कीर्तन व भजन करणे, पुराणश्रवण करणे, सर्वांबरोबर गोड बोलणे, दुसऱ्याचे नुकसान होईल असे न वागणे, माता-पित्यांची सेवा करणे, स्त्रियांनी सासरी राहून सासू-सासरा व इतरही वडील माणसे यांच्या आज्ञेत राहून पतीची दृढनिष्ठेने सेवा करणे इत्यादि सर्व गुण आपल्यामध्ये येणे म्हणजे आपली प्रकृती सात्त्विक बनल्याची लक्षणे आहेत. आपण आपल्या उदरनिर्वाहाकरिता व्यापार, शेती, नोकरी किंवा इतर कोणताही धंदा केला तरी वेदविहित कर्म व गुर्वाज्ञा-पालन हे कधीही सोडू नये. स्वकर्म केले तरच अंतःकरण शुद्ध होते. अंतःकरण शुद्ध झाले तरच उपासना स्थिर होते. उपासना स्थिर झाली तर मनाला शांती मिळते आणि मनाची गडबड थांबली म्हणजे आत्मज्ञान होऊन मोक्षाचा लाभ होतो."

इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराज सर्वांना उद्देशून पुढे असे म्हणाले की, "आता ज्ञानाच्या सात भूमिका थोडक्यात सांगतो. श्रीयोगवासिष्ठ या ग्रंथात महर्षी श्रीवसिष्ठऋषींनीही श्रीरामाला ज्ञानाच्या पुढील सात भूमिका समजावून सांगितल्या आहेत. श्रीवसिष्ठऋषी श्रीरामांना या भूमिका विशद करताना असे म्हणाले की, "हे निष्कलंक रामा! ज्ञानाच्या सात भूमिका कोणत्या आहेत ते मी आता तुला सांगणार आहे. त्या नीट ऐकून घे. या सात भूमिकांचा तू दृढ अभ्यास केलास म्हणजे मोहरूपी चिखलात रुतण्याचा प्रसंग तुझ्यावर केव्हाही येणार नाही. सांख्य योगादि निरनिराळे वादी (दर्शनकार) ज्ञानाच्या

भूमिका निरनिराळ्या रीतींनी वर्णन करतात; परंतु आता मी तुला ज्या भूमिका सांगणार आहे त्या मला पसंत असून त्या परमपुरुषार्थरूपी कल्याणकारक स्थिती प्राप्त करून देणाऱ्या आहेत.

प्रथमतः हे लक्षात घेतले पाहिजे की, अखंड आत्माकार बुद्धिवृत्तीवर आरूढ झालेले ब्रह्म अज्ञानाची निवृत्ती करते. यास्तव तेच ज्ञान होय व ज्याच्या विषयीचे अज्ञान निवृत्त झाले आहे असे ब्रह्मच ज्ञेय आहे. त्यातील ज्ञानाच्या सात भूमी असून म्हणजे हे ज्ञान भूमिकाभेदाने सात प्रकारचे असून ज्ञेय वस्तूलाच मुक्ती असे म्हणतात. सत्य, ज्ञान व मोक्ष ही एकाच वस्तूची पर्यायी नावे आहेत. ज्याला सत्याचा बोध झाला आहे तो जीव पुन्हा जन्म मरण परंपरेच्या चक्रात सापडत नाही. ज्ञानाच्या सात भूमिकांच्या शेवटी मुक्ती ही स्थिती आहे. या मुक्तीमुळेच पुन्हा शोक करण्याचा प्रसंग जीवावर येत नाही.

सत्याच्या शोधात निघालेल्या साधकाच्या मानसिक विकासाच्या सात भूमिका अशा आहेत. "शुभेच्छा", "विचारणा", "तनुमानसा", "सत्त्वापत्ती", "असंसक्ती", "पदार्थाभाविनी" आणि "तुर्यगा" अशी या भूमिकांची क्रमाने नावे असून मुक्तस्थिती ही ह्या सातही भूमिकांच्या पलीकडे असून त्या स्थितीत गेल्यानंतर जीव अखंड आनंदात व आत्मस्वरूपात निमग्न होतो. आता ह्या सातही भूमिकांची लक्षणे क्रमाक्रमाने सांगतो ती ऐक.

ज्ञानाच्या पहिल्या भूमिकेचे नाव "शुभेच्छा" असे आहे. ती माणसाला पुढीलप्रमाणे प्राप्त होते. जीवात्मा ८४ लक्ष योनीत सुखदुःखरूपी कर्मफळ भोगीत शेवटी मनुष्य योनीत जन्म घेतो. नरजन्म प्राप्त झाल्यावरही माणूस आपल्या प्रारब्धानुसार सुखदुःखादि भोग भोगतो. मनुष्य जन्मास श्रीसंततुकाराममहाराजांनी

म्हटल्याप्रमाणे "सुख पाहता जवापडे । दुःख पर्वता ऐवढे ॥" हाच अनुभव पदोपदी येतो. विशिष्ट फलोद्देशाने केलेल्या कर्मापासूनही इष्ट फळ मिळतेच असे होत नाही. असे वारंवार घडल्यामुळे व आधिभौतिक, अधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध तापाने पोळलेला जीव पूर्व सुकृतामुळे असा विचार करू लागतो की, "मी हे सर्व असे का भोगतो आहे ? माझ्या जीवनाचा नेमका व खरा उद्देश काय आहे ? मी कशा करिता जन्माला आलो आहे ? या दृष्टीने काही विचार व कृती न करता उगीच स्वस्थ का बसलो आहे ? मी खरोखरच मूढ आहे." या विचारांमुळे जीवात्म्याच्या बुद्धीत देव, धर्म इत्यादि सर्व विचारांचा प्रादुर्भाव होतो. शास्त्र आणि सत्संग यांच्या संपर्कात त्याज्य काय आणि ग्राह्य काय याचा त्याला उमज पडतो. त्याचप्रमाणे शास्त्रावलोकनाने आणि सज्जनांच्या सहवासाने मी आत्मस्वरूपाचे ज्ञान प्राप्त करून घेईन, अशी वैराग्यपूर्ण इच्छा त्याला होते. यासाठी त्याला नित्यानित्य विवेक, वैराग्य, शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा व समाधान हे साधन षट्क आणि मुमुक्षुत्व हे साधन चतुष्टय प्राप्त करावे असे वाटू लागते. हे सर्व ज्यावेळी घडून येते त्यावेळी ज्ञानाची "शुभेच्छा" ही पहिली भूमिका सिद्ध होते अर्थात् साधक भक्ताचा या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या दुसऱ्या भूमिकेचे नाव "विचारणा" असे आहे. ज्यावेळी माणसाला विषयभोगाची असार्थकता पटते व सुखासाठी बाहेरच्या जगाकडे वळणारी त्याची चित्तवृत्ती अंतर्मुख होते त्यावेळी त्रिगुणात म्हणजे पिंडब्रह्मांडात जी भोगापवर्गार्थता आहे तिच्यातील भोगार्थता संपून अपवर्गार्थतेला प्रारंभ होतो. अंतःकरणातील रजोगुण कमी होऊन सत्त्वगुण वाढीस लागतो त्यामुळे त्याची बुद्धी अधिकाधिक

सात्त्विक होऊ लागते. यावेळी शास्त्र व सज्जन यांच्याशी संपर्क ठेवून साधक भक्त सतत वैराग्याचा अभ्यास, गुरुशुश्रूषा व अंतर्बाह्य शौच, सदाचारादि गुणांचे पालन करू लागतो. हे सर्व ज्यावेळी घडू लागते त्यावेळी ज्ञानाची "विचारणा" ही दुसरी भूमिका सिद्ध होते अर्थात् साधकभक्ताचा या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या तिसऱ्या भूमिकेचे नाव "तनुमानसा" असे आहे. "शुभेच्छा" आणि "विचारणा" या दोन भूमिकांच्या दृढ अभ्यासामुळे शब्दस्पर्शादि विषयांच्या ठिकाणी असलेली आसक्ती नाहीशी झाली किंवहुना इंद्रियांकडून शब्दादि विषयांचे ग्रहण होईनासे झाले अर्थात् ध्येय वस्तूच्या चिंतनात मनुष्य सर्वस्वी गढून गेला म्हणजे त्या स्थितीला "तनुमानसा" हे नाव दिले जाते. पहिल्या दोन भूमिकांच्या दृढ अभ्यासामुळे अधिकारी पुरुषास आत्म्याचे यथार्थ ज्ञान होते. त्यामुळे त्याची अनात्मवासना आपोआप क्षीण होऊन संसार भावनेपासून तो पराङ्मुख होतो. नित्यानित्य-विवेकादि चार साधनांसह श्रवण, मनन व निदिध्यासन केल्यामुळे त्याचे मन क्षीण होते. शब्द, स्पर्श इत्यादि विषयांचे स्वभावतःच ग्रहण न होणे ही मनाच्या क्षीणतेची अर्थात् कृशतेची शेवटची सीमा आहे. तिलाच सविकल्प समाधी असे म्हणतात. श्रोत्रादि इंद्रियांच्या योगाने शब्दादि विषयांचे ग्रहण जोपर्यंत होत असते तोपर्यंत चित्तैकाग्र्यास ध्यान असे म्हणतात व त्याचे ग्रहण होईनासे झाले म्हणजे तेच चित्तैकाग्र्य सविकल्प समाधी होते. ज्यावेळी हे सर्व घडून येते त्यावेळी ज्ञानाची "तनुमानसा" ही तिसरी भूमिका सिद्ध होते. अर्थात् साधक भक्ताचा या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या चवथ्या भूमिकेचे नाव "सत्त्वापत्ती" असे आहे. आतापर्यंत सांगितलेल्या तिन्ही भूमिकांच्या दृढ अभ्यासामुळे

चित्ताच्या ठिकाणी विषयासंबंधाने पूर्ण वैराग्य वाणले आणि सत्य व शुद्ध आत्म्याच्या ठिकाणी बुद्धी स्थिर झाली म्हणजे त्या भूमिकेला "सत्त्वापत्ती" असे म्हणतात. ज्यावेळी "शुभेच्छा", "विचारणा" व "तनुमानसा" या ज्ञानाच्या पहिल्या तीन अवस्था साधकभक्तांच्या चित्तात दृढ होतात त्यावेळी बाह्य विषयांची संस्कारस्व आसक्ती चित्तात राहात नाही व त्याच्या अंगी पूर्ण विरक्तता वाणते. ही विरक्ती दृढ झाली म्हणजे अशा साधकाचे मन शुद्ध व सत्य आत्म्यामध्ये लीन होऊन जाते. ज्याप्रमाणे दुधात पाणी मिसळून एकरूप होऊन जाते त्याप्रमाणे या अवस्थेत साधकाचे चित्त आत्म्यामध्ये त्रिपुटीरहित होऊन मिळून जाते. या चौथ्या भूमिकेत योग्याची निर्विकल्प समाधी सिद्ध होते. ही भूमिका सिद्ध झालेल्या योग्याला "ब्रह्मवित्" अशी संज्ञा प्राप्त होते. हे सर्व ज्यावेळी घडते त्यावेळी ज्ञानाची "सत्त्वापत्ती" ही चवथी भूमिका सिद्ध होते अर्थात् साधकभक्ताचा या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या पाचव्या भूमिकेचे नाव "असंसक्ती" असे आहे. वरील चार भूमिकांचा दृढ अभ्यास झाल्यावर ज्यावेळी चित्तामध्ये अंतर्बाह्य दृढ वैराग्य बाणते आणि समाधिपरिपाकामुळे ब्रह्माचा अपरोक्ष साक्षात्कार होतो त्यावेळी त्या भूमिकेला "असंसक्ती" असे म्हणतात. या अवस्थेत वासना अगदी क्षीण होतात व चित्ताचा बाह्य आणि अभ्यंतर आकारांशी संसर्ग होत नाही. या अवस्थेमध्ये साधक कर्मफलाने बद्ध होत नाही. निर्विकल्प समाधीचा अशा तऱ्हेने परिपाक झाल्यामुळे चित्तात ब्रह्मभाव अधिक दृढ होतो व साधकाचे सम्यग्ज्ञान दृढ होते अर्थात् त्याला निरतिशय आनंद व नित्य "अपरोक्ष ब्रह्मच मी आहे", असा साक्षात्कार होतो. एखाद्या अधिकारी पुरुषाला मंद व मध्यम अधिकाराच्या भूमिकेत

असतानाही ब्रह्मसाक्षात्कार होणे शक्य आहे; पण त्या साक्षात्कारात द्वैत संस्कार थोडे तरी शिल्लक असतात. मात्र "असंसक्ती" च्या या ज्ञानाच्या पाचव्या भूमिकेत द्वैत संस्कारांचा पूर्णपणे उच्छेद झालेला असतो म्हणून या भूमिकेप्रत पोहोचलेल्या योग्याला "ब्रह्मविद्वर" असे म्हणतात. या भूमिकेत अविद्या व तिचे कार्य यांची संसक्ती साधकभक्ताच्या ठिकाणी मुळीच नसते म्हणून या भूमिकेला "असंसक्ती" असे म्हणतात. ज्ञानाची "पदार्थाभाविनी" ही सहावी व "तुर्यगा" ही सातवी भूमिका या हिच्याच उत्तरोत्तर परिपक्व होत जाणाऱ्या अवस्था आहेत. साधकभक्त ज्यावेळी या स्थितिप्रत येतो त्यावेळी ज्ञानाची "असंसक्ती" ही पाचवी भूमिका सिद्ध होते अर्थात् त्याचा या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेचे नाव "पदार्थाभाविनी" असे आहे. ज्यावेळी वर कथन केलेल्या पाच भूमिकांच्या दृढ अभ्यासामुळे साधकयोग्याला आत्मारामता प्राप्त होते म्हणजे तो योगी आत्म्या-मध्येच रममाण होऊ लागतो आणि त्याच्या ठिकाणी अंतर्बाह्य विषयांची भावना यत्किंचितही राहात नाही म्हणजे त्याचे सर्व व्यवहार प्रकृतीच्या प्रेरणेनुसार होऊ लागतात त्यावेळी त्या भूमिकेला "पदार्थाभाविनी" असे म्हणतात. पहिल्या पाच भूमिका सिद्ध झाल्या की, योगी सदासर्वदा अंतर्मुख राहून व "मी ब्रह्म आहे," असा दृढ निश्चय करून क्रमाने मिथ्या बाह्य विषयांना विसरतो. दीर्घकाळ अभ्यास केल्यावाचून हे विषयविस्मरण स्थिर होत नाही. अशा योग्याला आभ्यंतर किंवा बाह्य पदार्थांची भावना होत नाही. वासना क्षीण झाल्यामुळे तो मूढ किंवा बालकावस्थेत असतो. अतिसूक्ष्म ब्रह्मामध्ये त्याने आपले चित्त मिळवून दिलेले

असते. या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला "ब्रह्मविद्वरीय" ही पदवी प्राप्त होते. ज्यावेळी साधकयोग्याला ही पदवी प्राप्त होते त्यावेळी ज्ञानाची "पदार्थाभाविनी" ही सहावी भूमिका सिद्ध होते अर्थात् त्याचा ह्या भूमिकेत प्रवेश होतो.

ज्ञानाच्या सातव्या भूमिकेचे नाव "तुर्यगा" असे आहे. ज्यावेळी साधकयोगी उपरोक्त सहा भूमिकांचा बराच काळपर्यंत दृढ अभ्यास करतो आणि त्यामुळे त्याचे चित्त अखंड स्वरूपनिष्ठ राहू लागते. त्यावेळी त्याला जी स्थिती प्राप्त होते त्याला "तुर्यगा" असे म्हणतात. सहाव्या भूमिकेमध्ये चित्त ब्रह्मलीन करून योगी परेच्छेने भोजनादि करीत असतानाही त्याविषयीची वासना त्याने सर्वथैव सोडलेली असते. ही अवस्था अतिदृढ झाली की, तो तुर्यात्मा होतो. सहाव्या अवस्थेतील ब्रह्माकारता स्थिर करताना योग्याला थोडासा प्रयत्न करावा लागतो. पण या सातव्या भूमिकेमध्ये ती स्थिती स्वभावसिद्ध होते म्हणजे चित्ताच्या ब्रह्माकारतेसाठी प्रयत्न करावा लागत नाही. या भूमिकेमध्ये आरूढ झालेला योगी जीवन्मुक्त होय. पूर्वीच्या भूमिकेत ज्यांना आत्मसाक्षाकार झालेला असतो तेही जीवन-मुक्तच असतात, हे खरे आहे; पण केव्हा केव्हा प्रबल प्रारब्धामुळे त्यांना इष्टानिष्टाचा जसा अनुभव येतो तसा अनुभव या सातव्या भूमिकेतील योग्यांना येत नाही. याचे कारण असे आहे की, योगपरिपाकजन्य पुण्यातीशयामुळे त्याचे प्रबळ प्रारब्ध त्याच्या जीवनापासून (देह धारण करण्याव्यतिरिक्त) दुसरे काहीच करू शकत नाही. सहाव्या भूमिकेचा दीर्घकाळ अभ्यास केल्यामुळे साधकयोग्यास भेदांचे भान होईनासे होते. दुसऱ्याने भगिरथ प्रयत्न केले तरी तो देहभानावर येत नाही. तो स्वाभाविक

आत्मस्थितीचा अनुभव घेतो. या "तुर्यगा" भूमिकेत जाग्रदादि तीन अवस्थांचा साधकयोग्याला गंधही नसतो. या अवस्थेत योगी स्वतः ब्रह्म होतो. या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला "ब्रह्मविद्वरिष्ठ" ही पदवी प्राप्त होते. जीवनमुक्तीची ही शेवटची अवस्था आहे. ज्यावेळी साधकयोग्याला ही स्थिती प्राप्त होते त्यावेळी ज्ञानाची सातवी भूमिका सिद्ध होते. अर्थात् त्याचा या भूमिकेत प्रवेश होतो.

आत्ता सांगितलेली तुर्यावस्था जीवन्मुक्तांच्या ठिकाणी या देहातच विद्यमान असते. विदेहमुक्ती ही देहपातानंतर येणारी स्थिती असून तिलाच मुक्ती असे म्हणतात. ही तुर्यातीत स्थिती म्हणजे ब्रह्मस्थिती असल्यामुळे या स्थितीची गणना भूमिकांमध्ये करता येत नाही. जे महाभाग सातव्या भूमिकेपर्यंत जाऊन पोहोचले आहेत ते महात्मे खरोखरच धन्य होत. ते महात्मे महत्पदाप्रत जाऊन पोहोचले अर्थात् आत्माराम झाले असेच म्हणायला प्रत्यवाय नाही. या स्थितीप्रत जाऊन पोहोचलेल्या जीवन्मुक्तांना सांसारिक सुख–दुःखांची यत्किंचितही वाधा होत नाही. त्यांचे शरीर प्रकृत्तीनुसार किंवा प्रारब्धानुसार वर्तत असलेले दिसते.

या योग्यांच्या ठिकाणी "कर्म करणे किंवा न करणे" या दोन्ही गोष्टी तत्त्वतः नसतात; मात्र शेजारी असलेल्या एखाद्या मनुष्याने सुचविले असता क्रमप्राप्त असे सर्व व्यावहारिक अथवा धार्मिक आचार ते एखाद्या व्यवहारदक्ष मनुष्याप्रमाणे चोख रीतीने करतात. परंतु त्यांचे सुख कोणत्याही बाह्य क्रियेवर केव्हाही अवलंबून नसते. ज्याप्रमाणे गाढ निद्रेत असलेल्या पुरुषांना रूपसंपन्न स्त्रिया सुख देऊ शकत नाहीत त्याप्रमाणे

आत्म्यामध्ये रममाण होणाऱ्या योग्यांना जगातील कोणत्याही क्रिया मोह पाडण्यास समर्थ ठरत नाहीत. ज्ञानभूमिकांचे हे सप्तक केवळ बुद्धिमान माणसांनाच गोचर होत असते. वृक्षादि स्थावर पदार्थ किंवा जीव, पशू आणि म्लेंच्छ म्हणजे देहात्मवादी माणसांना या ज्ञानभूमिका अवगत होत नाहीत. परंतु हा केवळ सामान्य नियम झाला. पशूंमध्ये किंवा म्लेंच्छ जातीमध्येही जन्माला आलेले काही जीव या ज्ञानस्थितीपर्यंत जाऊन पोहोचतात आणि असे जीव देहात असताना किंवा देहपातानंतर मुक्तच असतात यात काहीच संशय नाही.

साधकयोगी सहाव्या भूमिकेत थोडीतरी स्वाश्रमोमचित कर्मे करतो. पण सातव्या भूमिकेत तेही तो करत नाही. कारण आत्माराम पुरुषाला कोणत्याही प्रकारच्या जगत्क्रिया सुखवीत नाहीत. चित् आणि जड यांची हृदयातील ग्रंथी तुटणे किंवा त्यांचा तादात्म्य अध्यास नाहीसा होणे हेच ज्ञानाचे लक्षण असून, ज्ञानाने हृदयग्रंथीचा एकदा विच्छेद झाला म्हणजे मुक्ती सिद्धच असते. मृगजलाविषयी सत्यत्वबुद्धी नाहीशी झाली म्हणजे जीव नित्य आणि शांत असे ब्रह्मच बनतो. काही ज्ञानी दुसऱ्या किंवा तिसऱ्या भूमिकेवर जाऊन अविद्येच्या पलीकडे जाऊन पोहोचतात किंवा चवथ्या भूमिकेत आत्मज्ञान होऊन अज्ञानावरणाचा भंग होऊन ते मोहातून पूर्णपणे पार झालेले असतात, यात काहीच शंका नाही. परंतु प्रबळ प्रारब्धामुळे त्यांच्या चित्तास विक्षेप होत राहिल्याने त्यांना मनोनाशानंतरच प्राप्त होणाऱ्या निरतिशय आनंदपूर्ण स्थितीचा पूर्णपणे लाभ होत नाही म्हणजे ते परमपावन अशा मुक्तिपदापर्यंत जाऊन पोहोचत नाहीत. त्यामुळे आत्म्यामध्ये परायण होऊन ते पुढच्या अवस्थातील कोणत्या [illegible] एका अवस्थेत

राहतात. काही ज्ञानी किंवा योगी एका जन्मातच सर्व भूमिका आक्रमण करून जातात. मात्र वहुतेकजण एक ते सहा भूमिकांमधील काही काही भूमिकाच ओलांडून जातात. अशी जरी वास्तविक स्थिती असली तरी जे ज्ञानी किंवा योगी तृणापासून ब्रह्मलोकांपर्यंत जेवढी उत्तमात उत्तम ऐश्वर्ये किंवा सुखे आहेत त्या सर्वांना तृणाप्रमाणे तुच्छ मानून जे या ज्ञानभूमिकांचा अधिकाधिक अभ्यास करतात ते वंद्य होत.

साधकाचा वासनाक्षय, मन:शम किंवा चित्तक्षय सिद्ध झाला असता कर्मांचे वसतिस्थान असलेली अशी माया नष्ट होते. ज्याची चित्तवृत्ती शुद्ध झाली आहे अशा पुरुषाला संसार अनर्थवाहक असल्यामुळे त्याज्य आहे व मोक्षाचा उपायच ग्राह्य आहे, असा विवेक आपोआप उत्पन्न होतो. अशा प्रकारचा विवेक जागृत झाला म्हणजे त्या निरभिमान व शुद्ध पुरुषाच्या केवळ सत्त्वमय चित्तात क्रमाने सातही ज्ञान भूमिका उद्भवतात व त्या चित्तात प्रकाशित करणाऱ्या असल्यामुळे जीवाचे परमहित होते.

शास्त्रीय साधनचतुष्टायुक्त श्रवणादि प्रयत्न व मोक्षाची अतितृष्णा ही ज्ञानभूमिकांमध्ये स्थित होण्याची दोन महत्त्वाची कारणे आहेत. चित्त एका विषयाचे चिंतन सोडून दुसऱ्या विषयाच्या चिंतनास आरंभ करीपर्यंत जो थोडासा काळ मनरहित अवस्थेत जातो तीच आत्मस्वरूप स्थिती होय. सर्व संकल्पशून्य झाल्यामुळे चित्त स्थिर राहणे व त्याचवेळी जडता व निद्रारहित होणे म्हणजे लौकिक निद्रेत नसताना चित्त संकल्परहित व शांत असणे हीच स्वरूपस्थिती होय. अहंतेचा अंत झाला असताना व भेदाचा अनुभव येईनासा झाला असताना जी अ-जडता म्हणजे चैतन्य अवशिष्ट राहते तेच आत्मस्वरूप किंवा तोच आत्मा

होय.

अज्ञानाच्याही सात भूमिका आहेत. त्या बीज-जाग्रत, जाग्रत किंवा जाग्रतसंसृती, महाजाग्रत, जाग्रत्स्वप्न, स्वप्न, स्वप्नजाग्रत व सुषुप्ती अशा आहेत. याचा अर्थ हा सात प्रकारचा मोह आहे. ज्यावेळी आत्म्याच्या ठायी या मोहाचा किंवा अज्ञानाचा अशेष लोप होतो तेव्हा ज्ञान सिद्ध किंवा प्रकट होते.

सारांश, विवेकी पुरुष या जगात निरनिराळ्या भूमिकांवर आरूढ झाले असून शरीर किंवा घरदार यांच्या ठिकाणी त्यांचा अभिनिवेश राहिलेला नसतो. त्यामुळे ते आत्म्याच्या ठिकाणीच स्थित झालेले असतात. या सात भूमिकांचे आक्रमण करून जे त्यांच्या पलीकडे जाऊन पोहोचतात ते खरोखरच धैर्यवंत होत. ज्या ज्ञानीयोग्यांनी या सात भूमिकांना जिंकले आहे, त्यांना दिग्गजांसह सर्व शत्रूंना जिंकून सप्तद्वीपांवर मिळविला जाणारा विजय तृणा-सारखा तुच्छ वाटतो. इंद्रियरूपी शत्रूंना जिंकून या सप्त भूमिकांवर विजय मिळविणारे आणि स्वराज्यपदाच्या सिंहासनावर आरूढ होणारे माहात्मे निःसंशय वंदनीय आहेत. सर्व भूमंडळाचे आधिपत्य किंवा सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचे पद सुद्धा त्यांना कःपदार्थ वाटत असून ते या जगात विदेह कैवल्यरूपी परमसुख प्राप्त करून घेतात."

असो "आत्तापर्यंत एकदा सर्व सार आपणा सर्वांना सांगावयाचे मनात होते ते आज सर्व थोडक्यात सांगितले आहे. या प्रमाणे जो वागेल तो पूर्ण सुखी होईल." असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशीचे आपले अप्रतिम प्रवचन संपविले.

अशा रीतीने श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेल्या भक्तवृंदांच्या मेळाव्यात श्रीस्वामीमहाराजांचे दिवस मोठ्या आनंदात चालले होते. त्यांच्या वृत्ती तर नेहमीच स्वस्वरूपी लीन असत. असे असले;

तरी बाह्यात्कारी सर्व लोकांमध्ये मिळून मिसळून ते त्यांच्य आनंदामध्ये सहभागी होत असत. हा जीवन सिद्धांत स्वकृत "श्रीदत्तमाहात्म्य" या ग्रंथात मांडताना त्यांनी असे म्हटले आहे की–

**दगडाप्रमाणें संतत । बसणें हें जीवन्मुक्तिव्रत ।**
**म्हणती ते केवळ अज्ञात । श्रुतिसिद्धांत नेणती ते ।।१६.९८।।**

ज्यांच्या वृत्ती स्वस्वरूपी लीन झालेल्या असतात अशा योग्यांना आपल्या मनापुढे काहीतरी ध्येय ठेवल्याशिवाय अर्थात् काहीतरी आवलंबन उपस्थित केल्याशिवाय त्यांचे मन त्या उच्च अवस्थेतून खाली येत नाही. योगाच्या परिभाषेत सांगावयाचे झाल्यास कुंडलिनी शक्ती आज्ञाचक्राचा भेद करून वर गेली म्हणजे ती सहसा खाली उतरत नाही. या अवस्थेत योगी सदासर्वकाळ समाधिलीन राहतो. ज्या महात्म्यांच्या हातून परमेश्वरी इच्छेने लोककार्य व्हावयाचे असते व जे महात्म्ये ईश्वरी अवतार असतात त्यांना सदासर्वकाळ समाधिलीन राहणे नको असते; कारण त्यांना लोकसंग्रह करावयाचा असतो. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाले तर परमेश्वराच्या इच्छेनेच त्यांच्या मागे अशा धर्मकार्याची व धर्मप्रतिष्ठापनेच्या कामांची कायम उपाधीच लागून राहते. श्रीस्वामीमहाराज या कोटीतील महात्मे व ईश्वरी अवतार होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी दिवस उगवल्यापासून मध्यरात्र टळून जाईपर्यंत स्वतःला लोकोद्धाराच्या कार्यात गुंतवून ठेवले होते. त्यांचे स्वतःचे आन्हिक उरकल्यावर लोकांना वेदान्त सांगणे, विविध धर्मग्रंथ सांगणे, ब्रह्मकर्म शिकविणे, ज्योतिष सांगणे व शिकविणे, आपद्ग्रस्तांना त्यांची संकटे निवारण होण्यासाठी उपाय सांगणे, पुराणे सांगणे, प्रवचन करणे अशा अनेकानेक कार्यांमध्ये ते स्वतःला

गुंतवून ठेवीत असत. ज्यावेळी अशा कामांची उपाधी त्यांच्यामागे नसे त्यावेळी ते लौकिकदृष्टचा विश्रांती घेत असत; पण त्यावेळी ते समाधिलीन असत.

अशा आनंदोत्सवामध्ये शके १८३५ म्हणजे इ. स. १९१३चे वर्ष संपले. शके १८३६ म्हणजे इ. स. १९१४ चा चैत्र महिना उजाडला. श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य संगतीमध्ये तो महिनाही कधी संपला ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जमलेल्या लोकांना समजले नाही. वैशाख महिना लागला आणि श्रीस्वामीमहाराजांच्या जन्माचा सोबती असलेल्या अतिसाराच्या रोगाने उचल खाल्ली व त्यांचे शरीर दिवसेंदिवस क्षीण होत चालले. अशा स्थितीत शरीरामध्ये शक्तीचा शेवटचा अंश असेपर्यंत त्यांनी आपले दैनंदिन कर्म केले आणि शेवटच्या क्षणापर्यंत धर्माचरण करण्यात त्यांनी उणीव ठेवली नाही. खरे तर श्रीस्वामीमहाराज या पूर्वीच गलितकर्म अवस्थेत पोहोचले होते; पण धर्मपालनाचा व स्वकर्माचरणाचा परमादर्श लोकांपुढे ठेवण्यासाठीच ते हे सर्व आचरण करीत होते. या दृष्टीनेच त्यांनी स्वकृत "श्रीदत्तमहात्म्य" या ग्रंथात असे म्हटले आहे की-

धर्म आहे सनातन । त्याला न द्यावा सोडून ।
स्वयें धर्म आचरून । जना शिक्षण तें लावावें ॥ १६.२५॥
येणें होय परोपकार । ना तरी सिद्धा पाहूनी इतर ।
वागतील जरी अनाचार । होईल संहार संकरानें ॥ २६॥

यावरून हे स्पष्ट होते की, आपल्या पावलावर पाऊल टाकून लोकांनी धर्माचरण करावे व शास्त्रमर्यादांचे उल्लंघन कधीही करू नये म्हणून परमोच्च अवस्थेत असतानासुद्धा श्रीस्वामीमहाराज शरीर दुर्बल व अस्वस्थ असले तरी आपले नित्यकर्म करीत होते.

श्रीस्वामीमहाराजांचा आजार दिवसेंदिवस वाढतच चालला होता. त्यामुळे त्यांचे शरीर क्षीण होऊ लागले. ही गोष्ट श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील पुजारी मंडळींना व प. प. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज यांना कळली. त्याबरोबर श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराजांनी व पुजारी मंडळींनी मिळून श्रीदत्त पादुकांवर श्रीस्वामीमहाराजांना आयुरारोग्य मिळावे म्हणून अखंड संततधार अभिषेक चालू केला. श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील पुजारी मंडळींनीही श्रीस्वामीमहाराजांवरील अत्यधिक प्रेमामुळे हे अनुष्ठान मोठ्या नेकीने चालविले. त्याचप्रमाणे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीत कोणाला जप करावयाला बसविले, कोणाला श्रीगुरुचरित्राचे सप्ताह करावयास सांगितले आणि कित्येक स्त्रियांना श्रीपादुकांना प्रदक्षिणा घालावयास सांगितल्या. अशा प्रकारे श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज व श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथील सर्व गावकरी-पुजाऱ्यांनी मिळून श्रीस्वामीमहाराजांची प्रकृती सुधारावी म्हणून अनुष्ठान मांडले. इतकेच नव्हे; तर श्रीस्वामीमहाराजांना जो अतिसार झाला होता त्यावर औषध तयार करून श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज ते श्रीदत्तालाच अर्पण करू लागले. त्यानंतर त्यांनी कित्येक पुजारी मंडळींना श्रीस्वामीमहाराजांच्या समाचारा करिता श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे पाठवून दिले आणि आपण स्वतः त्यांच्यासाठी अनुष्ठान करीत श्रीक्षेत्र नरसोबावाडीत राहिले. श्रीदीक्षितस्वामीमहाराज श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी व प्रकृतीची विचारपूस करण्यासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला गेले असते; पण "श्रीदेवांची सेवा करीत वाडीतच राहा, वाडी

कधीही सोडू नका," अशी त्यांना गुर्वाज्ञा होती. त्यामुळे ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरी गेले नाहीत. असे असले; तरी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील सर्व समाचार आपणास रोजच्या रोज कळविण्याची व्यवस्था त्यांनी केली होती. श्रीक्षेत्र नरसोबावाडीतून पूर्वीच काही भक्त श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांच्या चरण-सेवेसाठी जाऊन राहिले होते. त्यांना श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी तेथील हकीकतचे रोज एक सविस्तर पत्र पाठविण्याची आज्ञा केली होती. त्याप्रमाणे श्री. परशुरामभटजी व श्रीमती सुंदराबाई पुजारी रोज एक पत्र लिहून श्रीस्वामीमहाराजांच्या प्रकृतीची हकीकत श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना कळवीत असत.

काही दिवसांनंतर श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील आणखी काही पुजारी मंडळींना श्रीक्षेत्र गरुडेश्वरी पाठविले. ही सर्व मंडळी तेथे गेल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर त्यांना असे सांगितले की, " वाडीत श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी आपल्याला लवकर बरे वाटावे म्हणून पादुकांवर संततधार अनुष्ठान सुरू केले असून श्रीदत्ताला ते औषधही नित्यनियमाने देत असतात." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " स्वामींनी अनुष्ठान व औषधे चालविली आहेत म्हणूनच आपला हा महिना पुढे लोटला गेला. त्यांना सांगा की, उगीच देवाला त्रास देऊ नका. हे शरीर अल्पावधीतच पडणार आहे. याकरिता आरोग्याचे हे सर्व उपाय बंद करा." श्रीस्वामीमहाराज असे म्हणताच श्री. पुजारीमंडळी त्यांना असे म्हणाली की, " महाराज ! श्रीदीक्षित-स्वामीमहाराज आपली कष्टमय स्थिती ऐकून फार शोक करीत आहेत. आपण लवकरात लवकर बरे व्हावे म्हणूनच त्यांनी

अनुष्ठाने सुरू केली आहेत. आपला हा निरोप ऐकून त्यांच्या अंतःकरणाची स्थिती काय होईल ?" श्री. पुजारी मंडळींनी असे सांगताच श्रीस्वामीमहाराजांनी ईशावास्य उपनिषदातील पुढील मंत्र त्यांना म्हणून दाखविला.

**यस्मिन्त्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।**
**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ।। ७ ।।**

याचा अर्थ असा आहे की, "ज्यावेळी विद्वानाला म्हणजे परब्रह्म परमेश्वराला उत्तमप्रकारे जाणणाऱ्या महापुरुषांना असा अनुभव येतो की, सर्व भूतमात्र किंवा प्राणिमात्र एकमात्र परमात्मस्वरूप किंवा आत्मस्वरूपच आहेत त्यावेळी सर्व एकरूप पाहणाऱ्या अर्थात् सर्वच एकमात्र परमेश्वराचाच निरंतर साक्षात् अनुभव घेणाऱ्या साधक-योग्याला कशाचाही शोक मोह होत नाही अर्थात् त्याला कसला शोक आणि कसला मोह ? ; कारण तो शोक व मोहांपासून मुक्त होऊन आनंदपूर्ण होतो."

इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराज श्रीपुजारी मंडळींना उद्देशून असे म्हणाले की, "नरसिंहसरस्वतीस्वामींना शोक, मोहादि काहीच नाही बरे ! ते नुसते शोक-मोहातीत आहेत असे नसून सर्व द्वंद्वांच्या पलीकडे आहेत. तुम्हाला अजून त्यांचे ज्ञान झाले नाही. त्यांनाच काय पण आम्हाला देखील कसलेच कष्ट नाहीत. हे पाहा, आम्ही निरोगीच आहोत. असे म्हणून श्रीस्वामीमहाराज आपला दंडकमंडलू घेऊन उठले व श्रीगरुडेश्वराचे मंदिर ज्या टेकडीवर आहे तेथपर्यंत जाऊन आले. त्यानंतर पर्णकुटीत आल्यावर पुन्हा पूर्ववत् रुग्णस्थिती स्वीकारून निजून राहिले. हे सर्व पाहताच श्री. पुजारी मंडळींना श्रीस्वामीमहाराजांचे व श्रीदीक्षितस्वामीमहाराजांचे मोठे आश्चर्य वाटले. त्यावेळी ते परस्परांना उद्देशून असे

म्हणाले की, "श्रीस्वामीमहाराजांचे दुखणे व श्रीशिष्यस्वामींचे शोक करणे ही दोन्ही मोठी गूढेच आहेत असे दिसते" सारांश दोघांच्या वागण्यावरून व भाषणावरून त्यांच्या अंतरस्थितीचा पत्ता लागणे मोठे दुर्घट होते. ज्यांनी अजातवाद साक्षात् जीवनरूप केला त्यांच्या लेखी जीवजगतादि काही झालेलेच नसते हेच खरे!

यानंतर श्रीक्षेत्र नरसोबावाडीची सर्व पुजारी मंडळी परत श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आली. त्यांनी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी झालेला संवाद व पाहिलेला प्रकार श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांना सांगितला. काही दिवसांनी श्रीस्वामीमहाराज आषाढ शुद्ध प्रतिपदेला समाधिस्थ झाल्याची तार श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आली. ही वातमी ऐकताच श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी तेथे चालू असलेल्या अनुष्ठानांचा आता काही उपयोग नाही असे पाहून ती सर्व बंद करविली.

ज्या दिवशी उपरोक्त प्रसंग घडला त्या दिवशी श्रीब्रह्मानंदतीर्थ-स्वामीमहाराज तेथे होते. आपण मागे पाहिल्याप्रमाणे ते श्रीस्वामी महाराजांबरोबर चातुर्मास करण्यासाठी व जीवन्मुक्तिसुखाची प्राप्ती करून घेण्यासाठी आले होते. त्यांच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना सहवासात ठेवून घेऊन जीवन्मुक्तीचे स्वरूप व तिची साधने सांगून त्यांचा अभ्यासही त्यांच्याकडून करवून घेऊन त्यांना कृतार्थ केले होते. त्यांना उद्देशून श्रीस्वामीमहाराज एकदा असे म्हणाले होते की, "स्वामिन्! आपण नृसिंहवाडीला कधी गेला होता काय? नसाल गेला तर एकदा अवश्य जा. आपण जर तेथे गेलात तर आपणास शिकविलेल्या जीवन्मुक्त लक्षणांची मूर्ती तुम्हाला पाहावयास मिळेल. आम्ही त्या मूर्तीची तेथेच स्थापना करून ठेवली आहे. तेथलेच ते आहेत; पण त्यांना

कोणी ओळखत नाहीत. आमच्यापेक्षा सुद्धा ते कांकणभर अधिक आहेत." इतके सांगून श्रीस्वामीमहाराज स्वस्थचित्त राहिले.

श्रीस्वामीमहाराजांच्या समाधिकाळानंतर श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज काही दिवस श्रीक्षेत्र गरुडेश्वरलाच राहिले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी ज्या श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांची आपल्याजवळ जीवन्मुक्त पुरुष म्हणून स्तुती केली त्यांचे दर्शन घ्यावे या इच्छेने त्यांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाण्याचा निश्चय केला. ज्यावेळी श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जावयास निघाले त्यावेळी त्यांनी तेथील व्यवस्थापकांच्या परवानगीने श्रीस्वामीमहाराजांचे बसावयाचे मृगासन व एक हस्तलिखित छोटीशी पोथी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांना प्रसाद म्हणून देण्यासाठी मागून घेतली. त्यानंतर ते श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले. तेथे आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी वर्णिलेली जीवन्मुक्ताची मूर्ती पाहण्यासाठी ते श्रीब्रह्मानंदांच्या मठात माडीवर गेले. तेथे त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून ऐकल्याप्रमाणे सर्व लक्षणसंपन्न अशा शांत, दांत व ब्रह्मनिष्ठाग्रणी महात्मे असलेल्या श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांचे दर्शन झाले. त्यांचे दर्शन घेताक्षणीच श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज समाधान पावले. श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना विधियुक्त वंदन केले व ते त्यांना असे म्हणाले की, "आम्ही श्रीक्षेत्रगरुडेश्वराहून परत आलो असून आपल्या दर्शनाची फार दिवसांची इच्छा होती. ती आज पूर्ण झाली. आपला महिमा श्रीस्वामीमहाराजांनी स्वमुखाने सांगितला असल्यामुळे येथपर्यंत आलो व आपणासाठी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील व्यवस्थापकांकडून

श्रीस्वामीमहाराजांचे वसावयाचे मृगासन व पोथी मागून आणली आहे." इतके सांगून श्रीब्रह्मानन्दतीर्थस्वामीमहाराजांनी श्रीस्वामीमहाराजांचे मृगासन व पोथी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांना अर्पण केली. त्या दोन्ही वस्तूंचा परमादराने व भक्तिभावाने स्वीकार करून श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांनी त्यांना मोठ्या आदराने आपल्याजवळील आसनावर वसवून घेतले व त्यांच्या मुखातून सर्व श्रीगुरुवृत्त श्रवण केले. श्रीक्षेत्र गरुडेश्वरहून कोणी जरी आला तरी श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज त्याचा फार आदर सत्कार करीत. तसाच आदर सत्कार श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराजांचा करून त्यांना त्यांनी आपल्याजवळ राहवून घेतले. पुढे काही दिवस श्रीब्रह्मानंदतीर्थस्वामीमहाराज श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांच्या सहवासात राहून श्रृंगेरीला परत गेले.

उपरोक्त श्रीक्षेत्र नरसोवावाडीच्या पुजाऱ्यांच्या वावतीत वर्णिलेल्या प्रसंगात ज्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी "हे शरीर अल्पावधीतच पडणार आहे," असे उद्‌गार काढले त्यावेळी तेथे श्री. रामशास्त्री प्रकाशकर व इतरही मंडळी उभी होती. श्रीस्वामीमहाराजांच्या या उद्‌गारांनी सर्वांची अंतःकरणे कंपित व दुःखित झाली. श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणांचे दर्शन आता काही दिवसांचेच आहे या जाणिवेने सर्वांचे हृदय झाकाळून गेले. हे उद्‌गार ऐकताच श्री. रामशास्त्री प्रकाशकरांना आपण मागील वर्षाच्या वैशाख मासात श्रीक्षेत्र गरुडेश्वराला प्रथम श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आलो होतो तेव्हा, "आता येथून आपले कोठे जाणे होणार नाही," हे शब्द आठवले. त्यावेळी श्री. रामशास्त्री प्रकाशकर यांच्या मनात त्या शब्दांचा जो अर्थ आशंकेच्या रूपाने जागृत झाला होता तो आता त्यांच्या समोर

मूर्तिमंत भीतीच्या रूपाने उभा राहिला. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांची खालावत चाललेली प्रकृती पाहून सर्वांनाच चिंता उत्पन्न झाली. खरे म्हणजे आपल्याला आयुष्याचा जास्तीत जास्त वेळ श्रीस्वामीमहाराजांच्या सत्संगतीमध्ये घालविलेल्या त्यांच्या निकटवर्ती भक्तांनीसुद्धा श्रीस्वामीमहाराजांना खऱ्या अर्थाने ओळखले नाही. खरोखर ते ओळखणार तरी कसे ? श्रीदत्तस्वरूप श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांच्या दृष्टिपटलावर आपल्या मायेचा पडदा ठेवल्यामुळे ते त्यांना ओळखणे शक्यच नव्हते.

श्रीस्वामीमहाराजांचे वडोदे येथील भक्त श्री. विठ्ठलराव सोनार यांनी श्रीस्वामीमहाराजांना पंचधातूची श्रीदत्तमूर्ती अर्पण केली होती. त्याच श्रीमूर्तीवर अभिषेकादि सर्व गोष्टी होऊन तिच्या पुढेच सर्व सोहळे होत असत. श्रीस्वामीमहाराजांची प्रकृती ज्यावेळी अधिकाधिक क्षीण होऊ लागली त्यावेळी या श्रीदत्तमूर्तीची काय व्यवस्था करावी असा प्रश्न त्यांच्या मनात उत्पन्न झाला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदेवांनाच असे विचारले की, " प्रभो ! येथील आपल्या श्रीदत्तमूर्तीची व्यवस्था काय करावयाची ? त्यावेळी श्रीदेव श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " आम्हाला येथेच राहावयाचे आहे. मूर्ती कोठेही पाठवू नये. " श्रीदेवांनी असे सांगितल्यावर श्रीदेवांपुढे येणारे सर्व उत्पन्न श्रीक्षेत्र नरसोवाडीला पाठविण्याचे बंद करून त्याचा विनियोग श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथेच करावा असे श्रीस्वामीमहाराजांनी सांगितले.

अशा रीतीने वैशाख महिना संपत आला. या नंतर शेवटच्या ज्येष्ठाच्या महिन्यात जवळ जवळ महिनाभर श्रीस्वामीमहाराज पडूनच होते. आत्तापर्यंत भक्तांकडून आलेल्या पत्रांना ते स्वतःच उत्तरे लिहीत असत; पण आता त्यांना एकदा शकवा आला होता

की, ते दुसऱ्या कोणाकडून तरी पत्रांची उत्तरे लिहून घेत असत. वैशाखातील अमावस्येच्या दिवशी श्री. लळीत नावाचे एक गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले. ते उत्तम ज्योतिषी असल्याचे समजल्यावर श्री. रामशास्त्री, श्री. धोंडोपंत कोपरकर वगैरे भक्तांनी त्यांना असे विचारले की, "श्रीस्वामीमहाराजांना हा त्रास आणखी किती दिवस होणार आहे ? त्यांची प्रकृती केव्हा सुधारेल ? " हे प्रश्न ऐकताच ज्योतिषी श्री. लळीत असे म्हणाले की, "श्रीस्वामीमहाराजांना ज्येष्ठ महिना फार वाईट आहे. तो निभावला तर त्यांच्या प्रकृतीला निश्चित आराम पडेल." श्री. लळीत ज्योतिषी बुवांचे हे भाकित ऐकून आपण भविष्य विचारले नसते तर बरे झाले असते असेच सर्वांना वाटले.

श्रीस्वामीमहाराज या काळात सदासर्वकाळ ध्यानात निमग्न असत. दिवसातून क्वचित् पाच-दहा वाक्येच ते बोलत असत; पण कधीकधी बोलायला लागले म्हणजे फार बोलत असत. मग जमलेल्या मंडळींना असे वाटावयाचे की, श्रीस्वामीमहाराज आता अधिक न बोलतील तर बरे; कारण एक तर फार बोलण्याने त्यांना त्रास होत असे व दुसरे म्हणजे अशा अवस्थेत फार बोलणे शरीरस्वास्थाच्या दृष्टीने चांगले लक्षण नव्हे. या काळात श्री. रामशास्त्री प्रकाशकर, श्री. धोंडोपंत कोपरकर इत्यादि मंडळी श्रीस्वामीमहाराजांची एकनिष्ठपणे सेवा करीत असत.

श्रीस्वामीमहाराजांची खालावत चाललेली प्रकृती पाहून श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेली सर्व भक्तमंडळी श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाली की, "प्रभो ! आपली प्रकृती फारच क्षीण झाली आहे. तरी आपण आपल्यासाठी नको असले तरी आम्हा सर्वांसाठी औषध घ्यावे. आपल्या चरणकमलांचे नित्य दर्शन व्हावे अशी आम्हा सर्व

लोकांची आपल्या चरणी प्रार्थना आहे." श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेल्या व नित्य सेवेत असलेल्या भक्तमंडळींची ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराज सर्वांना उद्देशून असे म्हणाले की, "हा देह लवकरच सोडून जावयाचे आहे. याकरिता आता औषध घेण्याचे काही कारण दिसत नाही. श्रीमदाद्यशंकराचार्य हे बत्तीस वर्षेच राहिले. त्या मानाने हे शरीर फार टिकले. या देहाला दोन वेळा सर्पदंश, तीन वेळा महामारी, एकवेळा सन्निपात, एकवेळा प्लेग, दोन वेळा महाव्याधी, दोन वेळा कोड इतके रोग उत्पन्न झाले. संग्रहणी तर कायमचीच आहे. त्यावेळी कोणी औषध दिले? जन्मापासून ज्या वैद्याला धरले आहे तो वैद्य यावेळीही आहेच. त्याची इच्छा जशी असेल तसे होईल." असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी पितामह पुरुषश्रेष्ठ श्रीभीष्मांनी प्राणत्यागाच्या वेळी शरशय्येवर पडूनच हात जोडून शुचिर्भूतपणे कायावाचामने करून श्रीकृष्णांचे चिंतन करीत आनंद सूचक अशा गंभीर स्वराने श्रीकृष्णांची स्तुती करताना जे श्लोक म्हटले तेच सर्वांना म्हणून दाखविले. श्रीमन्महाभारताच्या शांतिपर्वातील सत्तेचाळीसाव्या अध्यायात हे श्लोक आले असून ते "भीष्मस्तवराज" या नावाने प्रसिद्ध आहेत. विस्तारभयास्तव मूळ श्लोक न देता त्यांचे फक्त भाषांतरच देत आहे. हा सर्व श्लोकार्थ मननपूर्वक वाचला म्हणजे श्रीस्वामीमहाराजांची अंतकाळची मन:स्थिती किती पराकोटीची उच्च व अद्‌भुत होती आणि त्यांनी कोणत्या योगाचा अवलंबन करून शरीराचा त्याग केला याचा प्रत्यय आल्याशिवाय राहणार नाही.

# ॥ सार्थ भीष्मस्तवराज ॥

जनमेजय राजाने असे विचारले की, " बाणरूपी शय्येवर शयन करणाऱ्या भरत वंशियांच्या पितामह भीष्मांनी कोणत्या प्रकारे आपल्या शरीराचा त्याग केला आणि त्यावेळी त्यांनी कोणत्या योगाची धारणा केली ? "

वैशंपायन म्हणाले की, " हे राजा ! हे कुरुश्रेष्ठा ! तू सावधान पवित्र आणि एकाग्रचित्त होऊन महात्मा भीष्मांच्या देहत्यागाचा वृत्तांत ऐक. "

" हे राजा ! ज्यावेळी दक्षिणायन समाप्त होऊन उत्तरायण लागले त्यावेळी माघमासाच्या शुक्लपक्षाच्या अष्टमीतिथीला रोहिणीनक्षत्र असताना मध्यान्हाच्या वेळी महात्मा भीष्मांनी ध्यानमग्न होऊन किंवा समाधी लावून आपले मन परमात्म्याच्या ठिकाणी लीन केले. त्यावेळी शेकडोशे बाणांनी विद्ध झालेले महात्मा भीष्म हे चोहोबाजूला आपली किरणे पसरणाऱ्या सूर्याप्रमाणे उत्तम प्रकाशाने सुशोभित होऊ लागले. त्यांच्या भोवती अनेकानेक श्रेष्ठ ब्राह्मण वसले होते.

वेदवेत्ते व्यास, देवर्षी नारद, देवस्थान, वात्स्य, अश्मक, सुमन्तु, जैमिनी, महात्मा पैल, शांडिल्य, देवल, बुद्धिमान् मैत्रेय, असित, वसिष्ठ, महात्मा कौशिक (विश्वामित्र), हरीत, लोमश, वुद्धिमान् व ज्ञानसंपन्न आत्रेय, बृहस्पती, शुक्र, महामुनी च्यवन, सनत्कुमार, कपिल, वाल्मीकी, तुम्वरू, कुरू, मौद्गल्य, भृगुवंशी परशुराम, महामुनी तृणबिंदू, पिप्पलाद, वायू, संवर्त, पुलह, कच, कश्यप, पुलस्त्य, ऋतु, दक्ष, पराशर, मरीची, अंगिरा, काश्य, गौतम, गालवमुनी, धौम्य, विभाण्ड, मांडव्य धौम्र, कृष्णानु, भौतिक, श्रेष्ठ ब्राह्मण उलूक, महामुनी मार्कंडेय, भास्करी,

पूरण, कृष्ण व परम धार्मिक सूत हे व श्रद्धा, इंद्रियदमन आणि शांती यांनी युक्त असलेले आणखी दुसरेही महात्मे मुनिगण त्यांच्या भोवती वसले होते. त्यावेळी ज्याप्रमाणे ग्रहांनी वेष्टिलेला चंद्र जसा सुशोभित दिसतो त्याप्रमाणे उपरोक्त सर्व ऋषींमध्ये भीष्म शोभायमान दिसत होते. त्यावेळी पुरुषसिंह भीष्म शरशय्येवरच पडल्या पडल्या हात जोडून पवित्र भावाने मन, वाणी आणि क्रियांच्या द्वारा भगवान् श्रीकृष्णांचे ध्यान करू लागले. त्यावेळी ध्यान करता करता ते गंभीर स्वराने भगवान् मधुसूदनाची स्तुती करू लागले.

(ज्यावेळी पितामह भीष्म प्राणत्यागाच्या समयी भगवान् श्रीकृष्णांचे एकाग्रतेने चिंतन करू लागले त्यावेळी "आपले अंतःकरण त्यांच्याकडे ओढले जात आहे," असे सांगून भगवान् श्रीकृष्ण युधिष्ठिरादि पांडवांसह पितामह भीष्मांच्या शरशय्ये-जवळ गेले.) त्यावेळी भाषणाच्या प्रकारांचे ज्ञान असणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ, शक्तिशाली व अत्यंत धार्मिक प्रभू भीष्म पुनरपि हात जोडून योगाधिपती, जगद्व्यापक, विजयशील, जगन्नायक व पद्नाभ श्रीकृष्णांची स्तुती करताना असे म्हणू लागले की–

"मी श्रीकृष्णाचे आराधन करण्याच्या इच्छेने जी वाणी उच्चारावयाचे मनात आणले आहे, त्या संक्षिप्त आणि विस्तृत अशा दोन्ही प्रकारच्या वाणींनी तो पुरुषोत्तम संतुष्ट होवो. जो स्वतः शुद्ध अर्थात् निर्दोष असून ज्याच्या प्राप्तीचा मार्गही शुद्ध अर्थात् दोषशून्य आहे आणि जो हंसस्वरूप असून तत् पदाचे लक्ष्यार्थ असलेला परमात्मा आणि प्रजापालक परमश्रेष्ठी आहे, त्याला सर्व गोष्टींचे संबंध तोडून केवळ त्याच्याशीच नाते जोडून सर्व प्रकाराने मी त्या श्रीकृष्णालाच शरण जातो. त्याला आदीही

नाही आणि अंतही नाही. तोच एकमात्र परब्रह्म, परमात्मा आहे. त्याला देवता आणि ऋषीही जाणत नाहीत. मात्र सर्वांचे धारण–पोषण करणारा एकमेव भगवान् श्रीनारायणहरीच श्रीकृष्णाला जाणतो. या श्रीनारायणामुळेच ऋषिगण, सिद्ध, मोठमोठे नाग, देवता आणि देवर्षीही यांना श्रीकृष्णाचे अविनाशी परमात्म्याच्या रूपात ज्ञान झाले आहे. मात्र देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस आणि नाग यांना श्रीभगवान् कोण आहे ? व त्यांचे वास्तव्य कोठे आहे ? हे कळत नाही. भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणीच सर्व प्राणी स्थित असतात आणि त्याच्यातच सर्व प्राणीमात्रांचा लय होतो. ज्याप्रमाणे सूत्रामध्ये गोवलेली अनेक रत्ने ते सूत्र आधारभूत असल्याने त्याच्याच आधाराने राहतात त्याप्रमाणे सत्त्वादि गुणांपासून उत्पन्न झालेली ही सर्व भूते श्रीकृष्णाच्या आधाराने अस्तित्वात येतात, त्याच्या आधारानेच वास्तव्य करतात व त्याच्या ठिकाणी लीन होतात. भगवान् श्रीकृष्ण सदासर्वदा विद्यमान अर्थात् कधीही नष्ट न होणारा आहे आणि तो एखाद्या ताणलेल्या अशा वळकट व कणखर सूत्राप्रमाणे असून ज्याप्रमाणे दोऱ्यामध्ये फुलाची माळ गुंफलेली असते त्याप्रमाणे हे कार्य कारणरूप जगत् त्याच्यामध्ये गुंफलेले असते. हे संपूर्ण विश्व त्याच्या श्रीअंगात स्थित असून त्यानेच ही विश्वाची निर्मिती केली आहे. त्या श्रीहरीला हजारो मस्तके, हजारो पाय, हजारो नेत्र, हजारो बाहू, हजारो मुकुट व हजारो मुखे असून या सर्वांच्या द्वारा तो दैदीप्यमान व उज्ज्वल दिसतो. श्रीकृष्णच या विश्वाचा परम आधार आहे. त्यालाच श्रीनारायणदेव असे म्हणतात. तो सूक्ष्माहून सूक्ष्म व स्थूलाहून स्थूल आहे. तो श्रेष्ठाहून श्रेष्ठ आणि उत्तमाहून उत्तम आहे. वायू हे ज्याप्रमाणे कर्माला प्रकाशित

करणाऱ्या मंत्रांमध्ये, अनुवाक् म्हणजे मंत्रांचे अर्थ स्पष्ट करणाऱ्या ब्राह्मण ग्रंथातील वाक्यांमध्ये, निषद म्हणजे कर्मांगादिंशी संबंध ठेवणाऱ्या देवतादिकांचे ज्ञान करून देणाऱ्या वचनांमध्ये, उपनिषदे म्हणजे विशुद्ध आत्मा व परमात्म्याचे ज्ञान करून देणाऱ्या वचनांमध्ये आणि सत्य गोष्टी सांगणाऱ्या साममंत्रांमध्ये श्रीकृष्णालाच सत्य आणि सत्यकर्मा असे म्हटले आहे. भक्तप्रतिपालक भगवान् श्रीकृष्ण हा स्वतःच वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध या चार दिव्य, गोपनीय आणि उत्तम नावांनी ब्रह्म, जीव, मन आणि अहंकार या चार स्वरूपात प्रकट झालेला असल्यामुळे व त्या त्या रूपात तो सर्वांच्या अंतःकरणात विद्यमान राहात असल्यामुळे सर्वजण त्याची पूजा करीत असतात. ।। ४६–१६.२७ ।।

भगवान् श्रीवासुदेव प्रसन्न व्हावा म्हणूनच साधकभक्त नित्य तपाचे अनुष्ठान करीत असतात; कारण की, श्रीकृष्ण सर्वांच्या हृदयात विराजमान असतो. तोच सर्वांचा आत्मा, सर्वांना जाणणारा, सर्वस्वरूप, सर्वज्ञ आणि सर्वांना उत्पन्न करणारा आहे. ज्याप्रमाणे अरणि प्रज्ज्वलित अग्नीला प्रकट करते त्याप्रमाणे देवकीदेवीने या भूतलावर राहणाऱ्या ब्राह्मणांचे, वेदांचे व यज्ञांचे रक्षण करण्याकरिता भगवान् श्रीवसुदेवाच्या तेजापासून श्रीकृष्णाचा अवतार करविला. साधकभक्त संपूर्ण इच्छांचा त्याग करून अनन्यभावाने स्थित होऊन मोक्षाच्या उद्देशाने आपल्या विशुद्ध अंतःकरणात पापरहित व शुद्ध बुद्ध अशा परमात्मा श्रीगोविंदाचा ज्ञानदृष्टीने साक्षात्कार करून घेतात. ज्याचा पराक्रम वायू आणि इंद्र यांच्यापेक्षाही मोठा आहे, जो आपल्या तेजाने सूर्याच्या तेजाचेही अतिक्रमण करतो आणि ज्याच्या स्वरूपापर्यंत इंद्रिय, मन आणि बुद्धी ही पोहोचू शकत नाही म्हणजे यांना जो अगोचर आहे त्या प्रजापालक

श्रीकृष्णाला मी शरण जातो. पुराणांमध्ये ज्याचे "पुरुष" या नावाने वर्णन केले आहे आणि युगाच्या आरंभी सर्व जगताचा विस्तार करीत असल्यामुळे ज्याला ब्रह्म असे म्हणतात व संहारकाळी जगताचे आकर्षण करीत असल्यामुळे ज्याला संकर्षण असे म्हणतात त्या उपासनीय परमात्म्याची मी उपासना करतो. जो एक असूनही अनेक रूपात प्रकट झाला आहे, जो इंद्रिये आणि त्यांचे विषय यांपासून नेहमी वर राहणारा असल्यामुळे ज्याला अधोक्षज असे म्हणतात, जो उपासकांच्या सर्व कामना पूर्ण करणारा आहे, यज्ञादि कर्मे आणि पूजनामध्ये निमग्न झालेले जे अनन्य भक्त ज्याचे नेहमी यजन म्हणजे ज्याच्यासाठी हवन करतात, त्याला जगताचा कोषागार असे म्हटले जाते, ज्याच्यामध्ये सर्व प्रजा स्थित असतात, पाण्यामध्ये संचार करीत असलेल्या म्हणजे पाण्याच्या आधाराने चलनवलनादिक क्रिया करणाऱ्या जलचर पक्ष्यांप्रमाणे ज्याच्या आधाराने जगतातील सर्व लोक आपापली कर्मे करतात किंवा जगातील क्रिया होतात, जो परमार्थ सत्यस्वरूप आणि एकाक्षर ब्रह्म म्हणजे प्रणव अर्थात् ॐकारस्वरूप आहे, जो सत्य व असत्य यांहून निराळा आहे, ज्याला आदि, मध्य व अंत नाही, त्याला देवता व ऋषी सम्यक्पणे जाणत नाहीत, आपले मन आणि इंद्रियांना संयमात ठेवून सर्व देवता, असुर, गंधर्व, सिद्ध, ऋषी, मोठमोठे नागगण, ज्याची नेहमी पूजा करतात, जो दुःखरूपी रोगाचे सर्वात मोठे औषध आहे, जो जन्ममरणरहित, स्वयंभू आणि सनातन देवता आहे आणि ज्याला या चर्मचक्षूंनी पाहणे आणि बुद्धीच्या द्वारा संपूर्णपणे जाणणे असंभव आहे अशा भगवान् श्रीहरी नारायणदेवाला मी शरण जातो. ॥२८ ते ३७॥

जो या विश्वाचा विधाता आणि चराचर जगताचा स्वामी

आहे आणि ज्याला संसाराचा साक्षी आणि अविनाशी परमपद असे म्हणतात, त्या परमात्म्याला मी शरण जातो. ज्याची कांती सुवर्णासारखी तेजस्वी आहे, जो अदितीच्या गर्भातून उत्पन्न झाला आहे, जो दैत्यांचा नाश करणारा आणि जो एक असून बारा रूपात प्रकट झाला आहे, अशा सूर्यस्वरूप परमेश्वराला माझा नमस्कार असो. जो आपल्या अमृतमय कलांनी शुक्लपक्षात देवतांना व कृष्णपक्षात पितरांना तृप्त करतो आणि जो सर्व द्विजांचा राजा आहे, त्या सोमस्वरूपी अर्थात् चंद्रस्वरूपी परमात्म्याला मी नमस्कार करतो. अग्नी हे ज्याचे मुख्य आहे, जो संपूर्ण जगताला धारण करणारा देव आहे आणि जो हविष्याचा सर्वप्रथम भोक्ता आहे त्या अग्निहोत्रस्वरूप परमेश्वराला माझा नमस्कार असो. जो अज्ञानमय महान् अंधकाराच्या पलीकडे असून ज्ञानलोकाला अत्यंत प्रकाशित करणारा आत्मा आहे आणि ज्याला जाणून घेतल्यावर मनुष्य मृत्यूपासून कायमचा सुटतो, त्या ज्ञेयरूप परमात्म्याला माझा नमस्कार असो. उक्थ नावाच्या बृहत् यज्ञाच्या वेळी, अग्न्याधानकाळात आणि महायागात ब्राह्मणवृन्द ज्याचे ब्रह्माच्या रूपात स्तवन करतात, त्या वेदस्वरूप भगवंताला माझे नमस्कार असोत. ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद हे ज्याचे आश्रय आहेत म्हणजे या वेदांमध्ये जो वर्ण्यरूपाने वास्तव्य करतो, जो पाच प्रकारच्या हविष्याच्या म्हणजे होमद्रव्याच्या स्वरूपात असतो आणि गायत्रीआदि सात छंद हे ज्याचे सात तंतू आहेत, त्या यज्ञाच्या रूपात प्रकट झालेल्या परमात्म्याला माझे प्रणाम असोत. "आश्रावय" आणि "अस्तुश्रौषट्" या चार अक्षरांच्या योगाने "यज" या दोन अक्षरांनी "ये यजामहे" या पाच अक्षरांनी आणि पुनरपि "वषट्" या दोन

वर्णांनी ज्याला उद्देशून हवन केले जाते, त्या होमस्वरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो "यजुः" नाव धारण करणारा वेदरूपी पुरुष आहे, गायत्री आदि छंद हे ज्याचे हात, पाय इत्यादि अवयव आहेत, यज्ञ हेच ज्याचे मस्तक आहे, आणि "रथन्तर" व "बृहत्" नावांचे साम हीच ज्याची प्रीतियुक्त वाणी आहे, त्या स्तोत्ररूपी भगवंताला माझे प्रणाम असोत. जो ऋषी हजार वर्षांमध्ये पूर्ण होणाऱ्या प्रजापतींच्या यज्ञामध्ये सोन्याचे पंख असलेल्या पक्षांच्या रूपात प्रकट झाला होता. त्या हंसरूपधारी परमेश्वराला माझे प्रणाम असोत. पदांचे समूह हेच ज्याचे अंग आहे, संधी हे ज्याच्या शरीराचे जोड आहेत, स्वर आणि व्यंजन हे ज्याचे अलंकार आहेत आणि ज्याला दिव्य अक्षर असे म्हणतात, त्या वाणीरूपाने असणाऱ्या परमेश्वराला माझे नमस्कार असोत. ज्याने तिन्ही लोकांचे हित करण्याकरिता यज्ञमय वराहाचे स्वरूप धारण करून या पृथ्वीला रसातळातून वर काढले होते, त्या वीर्यस्वरूप भगवंताला माझे प्रणाम असोत. ॥३८ ते ४८॥

जो आपल्या योगमायेचा आश्रय घेऊन हजार फण्या असलेल्या शेषनागाच्या पलंगावर शयन करतो त्या निद्रास्वरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. विश्वेदेव, मरुद्गण, आदित्य, अश्विनीकुमार, वसू, सिद्ध आणि साध्य हे सर्व ज्याच्या विभूती आहेत, त्या देवस्वरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. अव्यक्त प्रकृती, बुद्धी म्हणजे महत्तत्व, अहंकार, मन, ज्ञानेंद्रिये, तन्मात्रा आणि त्यांचे कार्य हे सर्व ज्याचेच स्वरूप आहे, त्या तत्त्वमय परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो भूत, वर्तमान आणि भविष्य अर्थात् कालरूप आहे, जो भूतमात्रादिकांच्या उत्पत्तीला व प्रलयाला कारण आहे आणि जो सर्व प्राण्यांच्या अग्रज म्हणजे आधी झालेला अर्थात्

सर्व प्राण्यांच्या पूर्वीचा आहे; त्या भूतात्मा परमेश्वराला माझे नमस्कार असोत. सूक्ष्मतत्त्व जाणणारे ज्ञानी पुरुष ज्या परमसूक्ष्म तत्त्वाचे अनुसंधान करीत राहतात, जो सूक्ष्माहूनही सूक्ष्म आहे व ब्रह्म हेच ज्याचे स्वरूप आहे, त्या सूक्ष्मात्मारूपी परमेश्वराला माझे प्रणाम असोत. ज्याने मत्स्यशरीर धारण करून रसातलात जाऊन नष्ट झालेले संपूर्ण वेद ब्रह्मदेवांकरिता तत्काळ आणून दिले, त्या मत्स्यरूपधारी श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने अमृतप्राप्तीकरिता समुद्रमंथनाच्यावेळी आपल्या पाठीवर मंदारचल पर्वत धारण केला होता, त्या अत्यंत कठोर देहधारी कच्छरूप भगवान् श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने वराहरूप धारण करून आपल्या एका दाताने वन आणि पर्वतांसहित सर्व पृथ्वीचा उद्धार केला होता, त्या वराहरूपी भगवान् श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने नृसिंहरूप धारण करून संपूर्ण जगताचे रक्षण व्हावे म्हणून भयंकर अशा हिरण्यकशिपू नावाच्या राक्षसाचा वध केला, त्या नृसिंहरूप श्रीहरीला माझे नमस्कार असोत. ज्याने वामनरूप धारण करून मायेच्या द्वारा बलीला बांधून सर्व त्रैलोक्य आपल्या पायाने व्यापून टाकले, त्या क्रांतिकारी वामनरूपधारी श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने शस्त्रधाऱ्यांमध्ये श्रेष्ठ अशा जमदग्निकुमार परशुरामाचे रूप धारण करून ही पृथ्वी निःक्षत्रीय केली, त्या परशुरामस्वरूप श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने एकट्यानेच धर्माच्या गौरवाचे उल्लंघन करणाऱ्या क्षत्रियांचा युद्धामध्ये एकवीसवेळा संहार केला त्या क्रोधात्मा परशुरामस्वरूप श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने दशरथनंदन श्रीरामाचे रूप धारण करून युद्धामध्ये पुलस्त्यनंदन

रावणाचा वध केला होता, त्या क्षत्रियात्मा श्रीरामस्वरूप श्रीहरीला माझे नमस्कार असोत. जो नांगर व मुसळ धारण केल्यामुळे नेहमी अद्‌भुत शोभासंपन्न असा दिसत असतो आणि ज्याच्या श्रीअंगांवर निळेवस्त्र शोभायमान दिसत असते, त्या शेषावतार रोहिणीनंदन श्रीरामाला माझे नमस्कार असोत. जो शंख, चक्र, शार्ङ्‌गधनुष्य, पीतांबर आणि वनमाला धारण करतो, त्या श्रीकृष्णस्वरूप श्रीहरीला माझे नमस्कार असोत. जो कंसवधासाठी वसुदेवाचा शोभायमान पुत्र म्हणून जन्माला आला आणि जो नंदाच्या गोकुळामध्ये नाना प्रकारच्या उत्तमोत्तम लीला करीत राहिला, त्या श्रीकृष्णात्मारूपी श्रीहरीला माझे नमस्कार असोत. ज्याने यदुवंशात प्रकट होऊन वासुदेवाच्या रूपात येऊन पृथ्वीचा भार हलका केला, त्या श्रीकृष्णात्मारूपी श्रीहरीला माझे प्रणाम असोत. ज्याने अर्जुनाचे सारथ्य करताना तिन्ही लोकांवर उपकार करण्याकरिता गीतारूपी ज्ञानमय अमृत प्रदान केले, त्या ब्रह्मात्मा श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. सृष्टीचे रक्षण करण्याकरिता दानवांना आपल्या अधीन केल्यावर जो पुन्हा बुद्धभावाला प्राप्त झाला, त्या बुद्धस्वरूप श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. जो कलियुग आल्यावर घोड्यावर स्वार होऊन धर्माची स्थापना करण्याकरिता म्लेंच्छांचा वध करणार आहे, त्या कल्किरूप श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. ज्याने तारामय संग्रामात दानवराज कालनेमीचा वध करून देवराज इंद्राला सर्व राज्य दिले होते, त्या मुख्यात्मा श्रीहरीला माझे नमस्कार असोत. जो समस्त प्राण्यांच्या शरीरात साक्षिरूपाने स्थित आहे आणि जो संपूर्ण क्षर म्हणजे नाशवान् भूतमात्रांमध्ये अक्षर म्हणजे अविनाशी स्वरूपात विराजमान आहे, त्या साक्षी

परमात्मास्वरूप श्रीकृष्णाला माझे नमस्कार असोत. महादेवा आपल्याला नमस्कार असोत. भक्तवत्सला ! आपल्याला नमस्कार असोत. सुब्रह्मण्य म्हणजे हे विष्णू ! आपल्याला नमस्कार असोत. हे परमेश्वरा ! आपण माझ्यावर प्रसन्न व्हा. हे प्रभो ! आपण अव्यक्त आणि व्यक्त रूपाने संपूर्ण विश्व व्याप्त केलेले आहे. सहस्रनेत्र धारण करणाऱ्या सर्वलोकमहेश्वर, हिरण्यनाभ, यज्ञांगस्वरूप, अमृतमय, सर्वत्र मुखे असलेल्या आणि कमलनयन पुरुषोत्तम असलेल्या अशा श्रीनारायणदेवाला मी शरण जातो. ज्यांच्या हृदयामध्ये मंगलभवन देवेश्वर श्रीहरी विराजमान आहे, त्यांचे सर्व कार्यात नेहमी कल्याण व मंगल होते आणि कधीही कोणत्याही कार्यात त्यांचे अकल्याण व अमंगल होत नाही. भगवान् श्रीविष्णू हा मंगलमय आहे. श्रीमधुसूदन मंगलमय आहे. कमलनयन श्रीविष्णू मंगलमय आहे आणि ज्याच्या रथावर गरुडध्वज आहे तो श्रीविष्णू मंगलमय आहे. ॥ ४९ ते अधिक २६ श्लोक ॥

ज्यांचा सर्व व्यवहार केवळ धर्माकरिताच आहे अर्थात् केवळ धर्माकरिताच ज्यांच्या अवयवांचे सर्व व्यापार घडतात अशा जितेंद्रिय लोकांकडून मोक्षास कारणीभूत होणाऱ्या अशा वेदोक्त साधनांच्या योगाने सज्जनांना संसारातून तरून जाण्याचा मार्ग निर्माण करून जे धर्ममर्यादेचा प्रसार करतात, त्या सत्यस्वरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. निरनिराळ्या प्रकारच्या धर्मांचे आचरण करणारे व निरनिराळ्या धर्मफलाची इच्छा करणारे (पाशुपतादि लोक) त्या त्या धर्माच्या अनुरोधाने ज्याचे पूजन करतात त्या धर्मस्वरूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. ज्या अनंगाच्या प्रेरणेने सर्व अंगधारी प्राण्यांचा जन्म

होतो व जो सर्व प्राण्यांना उन्मत्त करून सोडतो, त्या कामस्वरूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो स्थूल जगतात अव्यक्त रूपाने विराजमान आहे, मोठमोठे महर्षी ज्याच्या परमतत्त्वाचे सतत अनुसंधान करीत राहतात व जो संपूर्ण क्षेत्रात क्षेत्रज्ञाच्या रूपाने राहिलेला आहे, त्या क्षेत्ररूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो सत्त्व, रज व तम किंवा जाग्रत, स्वप्न व सुषुप्ती या तीन गुणांच्या भेदाने त्रिविध रूपाने प्रतीत होतो, जो गुणांना कार्यभूत असलेल्या पंचमहाभूते व अकरा इंद्रियें मिळून सोळा विकारांनी आवृत असूनही आपल्या स्वरूपात स्थित असतो व सांख्यमतानुयायी लोक ज्याला सतरावा पुरुष अर्थात् तत्त्व मानतात, त्या सांख्यरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. ज्यांनी निद्रेला जिंकून प्राणांवर विजय मिळविला आहे आणि इंद्रियांना वश करून घेऊन जे शुद्ध सत्त्वात स्थित झालेले आहेत असे निरंतर साधनयोगाभ्यासात तत्पर असणारे योगिजन ज्याच्या ज्योतिर्मयस्वरूपाचा साक्षात्कार करून घेतात, त्या योगरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. पाप आणि पुण्याचा क्षय झाल्यावर पुनर्जन्माच्या भयापासून मुक्त झालेले शांतचित्त संन्यासी ज्याची प्राप्ती करून घेतात, त्या मोक्षरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. सृष्टीची एक हजार युगे गेल्यावर प्रचंड ज्वालांनी युक्त असलेल्या प्रलयकालीन अग्नीचे रूप धारण करून जो संपूर्ण प्राण्यांचा संहार करतो, त्या घोररूपी परमात्म्याला माझे अनेक नमस्कार असोत. ॥ ५० ते ५७ ॥

अशा प्रकारे संपूर्ण भूतमात्रांचे भक्षण करून जो या जगताला जलमय करून टाकतो आणि स्वतः बालकाचे रूप धारण करून अक्षय्यवटपत्रावर शयन करतो, त्या मायामय बालमुकुंदाला माझे

नमस्कार असोत. ज्या पुंडरीकाक्ष भगवंताच्या नाभीतून ब्रह्मांडकमल प्रकट झाले आहे व जे सर्व जगताचा आधार आहे, त्या कमलरूपधारी परमेश्वराला माझे नमस्कार असोत. ज्याला हजारो मस्तके आहेत, जो अंतर्यामीरूपाने सर्वांच्या अंतःकरणात विराजमान आहे, ज्याचे स्वरूप कोणत्याही सीमेने बद्ध होत नाही म्हणजे तो सीमातीत आहे, ज्यावेळी चारही समुद्र एकत्र मिळाल्याने एकार्णव अर्थात् एकाकार स्थिती होते त्यावेळी योगनिद्रेचा आश्रय घेऊन जो शयन करतो, त्या योगनिद्रास्वरूप भगवंताला माझे नमस्कार असोत. ज्याच्या केसामध्ये मेघ, शरीरातील सर्व अवयवांच्या ठिकाणी नद्या आणि ज्याच्या पोटात चारही समुद्र आहेत, अशा जलरूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. ज्याच्यापासून उत्पत्ती आणि नाश यांनी युक्त असणारी सर्वही कार्ये किंवा विकार निर्माण होतात आणि ज्याच्या ठिकाणी सर्वांचा लय होतो, त्या कारणस्वरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो रात्रीच्या वेळी जागृत राहतो आणि दिवसाच्या वेळी साक्षिरूपाने स्थित राहतो आणि जो नेहमी इष्ट व अनिष्ट अशा सर्व गोष्टींना साक्षिभूत असतो त्या साक्षिस्वरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. ज्याला कोणतेही काम करण्यास अडथळे येत नाहीत म्हणजे जो कोणत्याही कार्यात कुंठित होत नाही, जो धर्माचे काम करण्यास नेहमी उद्युक्त असतो व जो वैकुंठधाम स्वरूप आहे, त्या कार्यरूप श्रीविष्णूला माझे नमस्कार असोत. जो धर्मात्मा असूनही ज्याने क्रुद्ध होऊन धर्माचे अतिक्रमण केल्यामुळे भारभूत झालेल्या क्षत्रियांचा संग्रामामध्ये एकवीसवेळा संहार केला, त्या कठोरतेचा किंवा क्रौर्याचा अभिनय करणाऱ्या भगवान् श्रीपरशुरामाला माझे नमस्कार असोत. जो प्रत्येक शरीरामध्ये

वायूचे स्वरूप धारण करून राहतो व आपल्या स्वतःला प्राण, अपान, व्यान, उदान व समान या पाच स्वरूपात विभक्त करून संपूर्ण प्राण्यांना क्रियाशील करून कर्मे करवितो, त्या वायुरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो प्रत्येक युगात योगमायेच्या बलाने अवतार करतो आणि दिवस, रात्र, महिने, वर्षे, ऋतू व अयन यांच्या द्वारा सृष्टी आणि प्रलय करीत राहतो, त्या कालरूपी परमात्म्याला माझे प्रणाम असोत. ॥ ५८ ते ६७ ॥

ब्राह्मण हे ज्याचे मुख आहे, क्षत्रिय हे ज्याचे हात आहेत, वैश्य हे ज्याच्या मांड्या आहेत आणि शूद्र हे ज्याच्या चरणांचे आश्रित आहेत, त्या चातुर्वर्ण्यरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. अग्नी हे ज्याचे मुख आहे, स्वर्ग हे ज्याचे मस्तक आहे, आकाश ही ज्याची नाभी म्हणजे बेंबी आहे, पृथ्वी हे ज्याचे पाय आहेत, सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत आणि दिशा हे ज्याचे कान आहेत, त्या लोकरूपी अर्थात् विश्वस्वरूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो कालाच्या पलीकडे आहे, जो यज्ञाच्याही पलीकडे आहे, जो श्रेष्ठाहून अत्यंत श्रेष्ठ आहे किंवा अतींद्रिय अशा प्रकृतीच्याही अत्यंत पलीकडे आहे किंवा ईश्वराचाही ईश्वर आहे, जो संपूर्ण विश्वाचा आदि आहे; परंतु त्याचा कोणीही निर्माता किंवा उत्पत्तीकर्ता नाही, त्या विश्वात्मा परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो मेघात विद्युत आणि पोटात अग्नीच्या रूपाने स्थित आहे, जो सर्वांना पवित्र करणारा आहे, ज्याला पावक म्हणजे अग्नी व स्वरूपतः शुद्ध असल्यामुळे शुची असे म्हणतात आणि सर्व भक्ष्य पदार्थांना दग्ध करणारा अग्निदेव हेच ज्याचे स्वरूप आहे, त्या अग्निमय परमात्म्याला माझे नमस्कार असोत. वैशेषिक दर्शनामध्ये सांगितल्याप्रमाणे शब्द, स्पर्श, रूप, रस व

गंध या गुणांच्या द्वारा आकृष्ट होऊन विषय सेवनात जे लोक प्रवृत्त होत राहतात त्यांचे त्या विषयांच्या आसक्तीपासून जो रक्षण करतो, त्या रक्षकरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो अन्न-जलरूपी इंधन प्राप्त करून शरीरामध्ये रस आणि प्राणशक्ती वाढवितो आणि संपूर्ण प्राणिमात्रांना धारण करतो किंवा त्यांना जिवंत ठेवतो, त्या प्राणात्मा परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो प्राणांच्या पोषणासाठीच भक्ष्य, भोज्य, लेह्य व पेय किंवा चोष्य अशा चार प्रकारचे अन्न भक्षण करतो व स्वतः पोटात अग्निस्वरूपाने वास्तव्य करून भोजन करून त्याचे पचन करतो, त्या पाकरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. नरसिंहरूप दानवराज हिरण्यकशिपूचा अंत करताना ज्याचे नेत्र व खांद्यावर रूळणारे केस पिवळे दिसत होते आणि मोठमोठ्या दाढा व नखे हीच ज्याची आयुधे होती, त्या दर्परूपधारी भगवान् श्रीनरसिंहाला माझे प्रणाम असोत. ज्याचे खरेखरे व तत्त्वतः ज्ञान, देवता, गंधर्व, दैत्य व दानव यांना सम्यक्पणे होत नाही, त्या सूक्ष्मरूप परमात्म्याला माझे नमस्कार असोत. जो शोभासंपन्न व सर्वव्यापक भगवान् श्रीमान् अनंत नावाच्या शेषनावाच्या रूपाने रसातळात राहून संपूर्ण जगताला आपल्या मस्तकावर धारण करतो, त्या वीर्यरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. जो या सृष्टीच्या परंपरेचे रक्षण करण्याकरिता सर्व प्राण्यांना स्नेहरूपी पाशाने बांधून मोहित करतो, त्या मोहरूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय अशा पाच कोषांमध्ये स्थित असलेल्या आंतरतम आत्म्याचे ज्ञान झाल्यानंतर विशुद्ध बोधाच्या द्वारा विद्वान् पुरुष ज्याची प्राप्ती करतात त्या ज्ञानस्वरूप परमब्रह्म परमात्म्याला

माझे प्रणाम असोत. ज्याचे स्वरूप तर्कादि प्रमाणांना विषय होत नाही, ज्याचे बुद्धिरूपी नेत्र सर्वत्र व्याप्त असतात आणि ज्याच्यामध्ये अनंत विषयांचा समावेश असतो, अशा दिव्यात्मा परमेश्वराला माझे नमस्कार असोत. ।।६८ ते ७९।।

जो जटा आणि दण्ड धारण करतो, ज्याचे शरीर लम्बोदरयुक्त अर्थात् खूप मोठे पोट असलेले आहे आणि ज्याचे कमंडलू भात्याप्रमाणे काम देते,त्या श्रीब्रह्मदेवस्वरूप भगवन्ताला माझे प्रणाम असोत. जो त्रिशूल धारण करणारा आहे, जो देवतांचा स्वामी आहे, ज्याला तीन नेत्र आहेत, जो महात्मा आहे आणि ज्याने आपल्या शरीराला भस्माचा लेप लावला आहे, अशा श्रीरुद्ररूप परमेश्वराला माझे नमस्कार असोत. ज्याच्या मस्तकावर अर्धचंद्राचा मुकुट आहे, ज्याच्या शरीरावर सर्पाचे यज्ञोपवीत शोभून दिसत आहे, जो आपल्या हातात पिनाक धनुष्य व त्रिशूल धारण करतो, त्या उग्ररूपधारी भगवान् श्रीशंकराला माझे प्रणाम असोत. जो संपूर्ण प्राणिमात्रांचा आत्मा असून त्यांच्या जन्म-मृत्यूचे कारण आहे आणि ज्याच्या ठिकाणी क्रोध, द्रोह आणि मोहाचा सर्वथा अभाव आहे, त्या शांतात्मा परमेश्वराला माझे नमस्कार असोत. ज्याच्या ठिकाणी सर्व विश्व वास्तव्य करीत असते, ज्याच्यापासून सर्वांची उत्पत्ती होते आणि जो स्वत: सर्वस्वरूपी, सर्वत्र विद्यमान, सर्व-व्यापक व सर्वमय आहे, अशा सर्वात्मा व सर्वस्वरूपी परमात्म्याला माझे नमस्कार असोत. हे विश्वाची रचना करणाऱ्या, विश्वाचा आत्मा असणाऱ्या व विश्वाची उत्पत्तीचे स्थान असणाऱ्या,जगदीश्वर परमेश्वरा! तुला माझे नमस्कार असोत. हे प्रभो! तू पंचमहाभूतांच्या पलीकडे असून संपूर्ण प्राणिमात्रांचे मोक्षस्वरूप ब्रह्म आहेस. तुला माझे नमस्कार असोत. तिन्ही लोकांमध्ये वास करणाऱ्या किंवा व्याप्त

असणाऱ्या हे प्रभो ! तुला माझे नमस्कार असोत. हे त्रिभुवनाच्याही पलीकडे असणाऱ्या प्रभो ! तुला माझे नमस्कार असोत.सर्व दिशांच्या ठिकाणी वास्तव्य करणाऱ्या हे प्रभो ! तुला माझे नमस्कार असोत; कारण तू खरोखरच सर्वस्वरूपी असा एक निधीच आहेस. संसाराची उत्पत्ती करणाऱ्या हे अविनाशी भगवान् श्रीविष्णू ! आपल्याला नमस्कार असो.हे हृषीकेशा! आपणच सर्वांचे उत्पत्तीकर्ते व संहारकर्ते आहात. आपला कोणाकडूनही पराजय होत नाही. भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही काळात किंवा स्वर्ग, मृत्यू व पाताळ या तिन्ही लोकात तुझे अस्तित्व आमच्या दृष्टीला गोचर होत नाही किंवा तुझ्या दिव्य जन्म-कर्माच्या रहस्याचा पत्ता आम्हाला लागत नाही. याकरिता मी तत्त्वदृष्टीने आपले जे सनातन रूप आहे त्याकडेच सतत लक्ष्य ठेवीत असतो. हे प्रभो ! स्वर्गलोक आपल्या मस्तकाने, पृथ्वीदेवी आपल्या पायांनी आणि तिन्ही लोक आपल्या तीन पायांनी व्याप्त झालेले आहेत. तू सनातन असा परमात्मा आहेस. हे प्रभो ! दिशा हे तुझे बाहू, चंद्र-सूर्य हे तुझे नेत्र आणि प्रजापती हे तुझे वीर्य आहे. आपणच आपल्या अत्यंत तेजस्वी अशा वायूच्या रूपात आवहप्रवहप्रभृती सात मार्ग रोधून धरलेले आहेत. ज्याची कांती जवसाच्या फुलासारखी सावळी आहे, ज्याच्या शरीरावर पीतांवर शोभून दिसतो आहे आणि जो आपल्या स्वरूपापासून कधीही च्युत होत नाही त्या भगवान् श्रीगोविंदाला जे लोक नमस्कार करतात त्यांना कधीही भय असत नाही. ॥८० ते ९१॥

भगवान् श्रीकृष्णाला एक वेळाही प्रणाम केला तरी तो दहा अश्वमेध यज्ञांच्या शेवटी केलेल्या अवभृथस्नानाच्या योग्यतेइतके

… ३८

फळ देणारा असतो. किंबहुना हा नमस्कार त्याहून देखील अधिक योग्यतेचा असतो; कारण दहा अश्वमेध यज्ञ करणाऱ्या पुरुषाचा पुन्हा या संसारात जन्म होतो म्हणजे तो जन्ममरणचक्रपरंपरेत सापडतो; परंतु श्रीकृष्णाला प्रणाम करणारा मनुष्य पुन्हा भवबंधनात पडत नाही किंवा संसारचक्रात सापडत नाही. ज्याप्रमाणे मंत्राने हवन केलेले तूप अग्नीमध्ये मिसळून जाते त्याप्रमाणे ज्यांनी श्रीकृष्णाच्या भजनाचे व्रत घेतलेले आहे, जे कृष्णाचे निरंतर स्मरण करीत रात्री झोपतात व त्याचेच स्मरण करीत सकाळी जागे होतात ते श्रीकृष्णस्वरूपी होऊन त्याच्याशी एकरूप होऊन त्याच्यातच मिसळून जातात. जो नरकाच्या त्रासापासून संरक्षण करण्यासाठी साधक भक्ताच्या शरीराभोवती संरक्षणमंडलरूपी कवच निर्माण करतो आणि जो संसाररूपी नदीतील भोवऱ्यातून तरून जाण्यासाठी काष्ठाच्या नौकेप्रमाणे उपयोगी पडतो, त्या भगवान् श्रीविष्णूला नमस्कार असोत. जो ब्राह्मणावर प्रेम करणारा आणि गायींचे व ब्राह्मणांचे हित करणारा आहे आणि ज्याच्यामुळे सर्व विश्वाचे कल्याण होते, त्या सच्चिदानंदस्वरूप भगवान् श्रीगोविंदाला माझे प्रणाम असोत. "हरि" ही दोन अक्षरे साधकभक्ताची संसाररूपी अरण्यातील दुर्गम वाटेत संकटाच्यावेळी प्राणांचे रक्षण करणारी शिदोरी असून ती दोन्ही अक्षरे म्हणजे संसाररूपी रोगापासून सुटका करणारे महौषध व सर्वप्रकारच्या दुःख शोकापासून रक्षण किंवा उद्धार करणारी आहेत. ज्याअर्थी सत्य हे श्रीविष्णुमय आहे, ज्याअर्थी सर्व संसार श्रीविष्णुमय आहे आणि ज्याअर्थी सर्वकाही श्रीविष्णुमय आहे त्याअर्थी या सत्याच्या प्रभावाने माझी सर्व पापे नष्ट होवोत. हे देवतांमध्ये श्रेष्ठ अशा कमलनयन भगवान् श्रीकृष्णा ! मी तुझा शरणागत भक्त असून इष्ट अशा शांतिसंपन्न गतीची मला प्राप्ती

व्हावी अशी माझी इच्छा असल्यामुळे तुझ्या भक्ताला काय श्रेयस्कर आहे याचे तू चिंतन कर. जो विद्या आणि तपाचे जन्मस्थान आहे आणि ज्याचा दुसरा कोणीही जन्मदाता नाही म्हणजे जो स्वयंभू आहे त्या श्रीविष्णूचे मी या प्रकारे वाणीरूप यज्ञाने स्तवनरूपी आराधन किंवा पूजन केले आहे. यामुळे तो भगवान् श्रीकृष्ण माझ्यावर प्रसन्न होवो. श्रीकृष्ण हाच परब्रह्म असून तोच परमतप आहे. या परमतपाचे मुख्य फलही श्रीकृष्णच आहे. श्रीकृष्णच सर्वश्रेष्ठ दैवत असून श्रीकृष्ण हाच सदैव सर्वकाही आहे. ॥ ९२ ते १०० ॥

श्रीवैशंपायन म्हणाले की, हे जनमेजया ! अशा प्रकारे स्तुती करीत राहिल्यामुळे पितामह श्रीभीष्मांचे मन पूर्णपणे श्रीकृष्णमय झाल्यामुळे त्यांनी ही स्तुती संपल्यावर "नमः" असे म्हणून श्रीकृष्णांना नमस्कार केला. त्यानंतर भगवान् श्रीकृष्णांना आपल्या योगबळाने श्रीभीष्मांची भक्ती कळून येताच ते त्यांच्या जवळ गेले आणि त्यांना त्रैलोक्यातील सर्व गोष्टींचा बोध प्राप्त होईल असे दिव्य ज्ञान देऊन ते युधिष्ठराजवळ परत आले. योगी पुरुष प्राणत्यागाच्या वेळी ज्याला मोठ्या यत्नाने आपल्या हृदयात स्थापित करतात त्या श्रीकृष्णांना आपल्या समोर पाहात पाहात श्रीभीष्मांनी जीवनाचे सर्वश्रेष्ठ फल प्राप्त करून आपला प्राणत्याग केला होता. ज्यावेळी श्रीभीष्मांच्या मुखातून बाहेर येणारा "नमः" हा शब्द बंद होऊन त्यांचे बोलणे थांबले त्यावेळी तेथे बसलेल्या सर्व ब्रह्मवादी महर्षींच्या डोळ्यात अश्रू भरून आले व त्यांनी आपल्या सद्गद् झालेल्या कंठाने त्या परम बुद्धिमान् श्रीभीष्मांची अत्यंत प्रशंसा केली. त्यावेळी त्या सर्व ब्राह्मण शिरोमणि महर्षींनी पुरुषोत्तम भगवान् श्रीकेशवाची वारंवार स्तुती करीत हळू हळू श्रीभीष्मांची

वारंवार प्रशंसा केली. त्यानंतर श्रीभीष्मांचा भक्तियोग जाणून अत्यंत आनंदित झालेले भगवान् श्रीकृष्ण एकदम उठून आपल्या रथात जाऊन बसले.एका रथातून श्रीकृष्ण आणि सात्यकी हे दोघेजण गेले व दुसऱ्या रथातून महामना युधिष्ठिर व अर्जुन असे दोघेजण गेले. तिसऱ्या रथातून भीमसेन, नकुल व सहदेव हे गेले आणि चौथ्या रथातून कृपाचार्य व युयुत्सु आणि शत्रूला ताप देणारा सारथी संजय असे दोघजण गेले. याप्रमाणे नगरासारखा आकार असलेल्या रथामध्ये आरोहण करून चक्राच्या धावांच्या प्रचंड ध्वनीने पृथ्वी जणूकाही कंपित करीत ते पुरुषश्रेष्ठ मोठ्या वेगाने गेले. त्यावेळी मार्गामध्ये ब्राह्मणश्रेष्ठांनी उच्चारलेली पुरुषश्रेष्ठ श्रीभीष्मांच्या व श्रीकृष्णांच्या स्तुतीने युक्त असलेली वाक्ये त्या उत्कृष्ट अंत:करणाच्या श्रीकृष्णाला ऐकू येऊ लागली. ती त्याने प्रसन्न मनाने ऐकली. दुसरे कितीतरी लोक हात जोडून श्रीकृष्णाच्या चरणांना नमस्कार करीत होते आणि केशिदैत्यनाशक श्रीकेशव मनातल्या मनात आनंदित होऊन त्या लोकांचे अभिनंदन करीत होता. ।। १०१ ते १०९ ।।

जे लोक शार्ङ्ग धनुष्य धारण करणाऱ्या यदुकुलनंदन श्रीकृष्णाची पुरुषश्रेष्ठ श्रीभीष्मांनी केलेल्या स्तुतीप्रमाणे स्तुती करून स्मरण करतात, ही स्तुती वाचतात किंवा ऐकतात ते देहांतानंतर भगवान् श्रीकृष्णामध्ये प्रवेश करतात. त्यावेळी चक्रधारी श्रीहरि त्यांच्या सर्व पापांचा नाश करतो. गंगानंदन श्रीभीष्मांनी पूर्वकालात ज्याचे गायन करून स्तुती केली होती त्या अद्‌भुतकर्मा श्रीविष्णूचा हा स्तवराज येथे पूर्ण झाला. हे स्तवस्तोत्र मोठमोठ्या पातकांचा नाश करणारे आहे. हे स्तोत्रराज पाप्याच्या सर्व पापांचा नाश करणारे आहे, संसार

बंधनातून सुटण्याची इच्छा असणारा जो मनुष्य या स्तोत्रराजाचा पवित्रभावाने पाठ करतो तो निर्मल सनातन लोकांनाही ओलांडून परमात्मा श्रीकृष्णाच्या अमृतमय धामामध्ये किंवा पदात निघून जातो. ॥११० ते ११२॥

यानंतर एक–दोन दिवसातच श्रीस्वामीमहाराजांनी देवांना श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथेच कायमचे राहावयाचे असल्यामुळे त्यांच्या पूजेअर्चेची व नैवेद्य, वैश्वदेवाची सर्व व्यवस्था लागावी म्हणून एक न्यासपत्र (ट्रस्टडीड) तयार केले व त्या उद्देशाने त्यांनी प. प. श्रीब्रह्मानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या साहाय्याने एक पंचमंडळ नेमून दिले. त्या मंडळांवर खालील पदाधिकारी होते.

**अध्यक्ष :– प. प. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज**
**उपाध्यक्ष :– श्री. रामचंद्र विठ्ठल अधिकारी**
**कोशाध्यक्ष :– श्री. परशुराम कुबेरराम भट**
**व्यवस्थापक :– १) श्री. अमृतराम पुरुषोत्तम भट**
**२) श्री. लक्ष्मीशंकर हरिगोविंददास ठाणेदार**
**३) श्री. प्रद्युम्नानंदतीर्थस्वामीमहाराज**

माझे सद्गुरुनाथ श्रीसंत वामनरावजी गुळवणीमहाराज यांना ज्याप्रमाणे श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद-सरस्वतीस्वामीमहाराजांकडून सांख्यज्ञानयोगरूप सिद्धयोगमार्गाची दीक्षा "सोऽहं" मंत्र, श्रीदत्तमंत्र व महावाक्याच्या उपदेशाद्वारा मिळाली त्याप्रमाणेच श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून कर्मयोगरूप सिद्धयोगमार्गाची शक्तिपातयोगदीक्षा शक्तिसंक्रमणपूर्वक मिळाली. श्री. प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांचे श्रीसद्गुरू श्री. प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज हे होते. त्यांचे श्रीसद्गुरू

श्री. प. प. श्रीनारायणदेवतीर्थस्वामीमहाराज हे असून त्यांचे दुसरे प्रख्यात शिष्य श्रीयोगानंद ब्रह्मचारी असून पुढे ते श्रीयोगेंद्र विज्ञानी या नावाने भारतात विख्यात झाले. ज्यावेळी श्रीयोगानंदांना त्यांचे पहिले गुरू श्रीबाबा कृष्णानंद यांनी त्यांना श्री. प. प. श्रीनारायणदेवतीर्थस्वामीमहाराजांकडे इ. स. १९१८ मध्ये नेले त्यावेळी श्री. प. प. श्रीनारायणदेवतीर्थस्वामीमहाराजांनी त्यांना असे विचारले की, " यापूर्वी तू कोणकोणती साधना केली होतीस हे सांग." त्यावेळी श्रीयोगानंद असे म्हणाले की, " हे स्वामिन्! पूर्वजन्माच्या संस्कारांमुळे मला योग शिकण्याची तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाल्यामुळे इ. स. १९०९ मध्ये मी घर सोडून देऊन योगी, महात्मे व संत यांच्या शोधात फिरू लागलो. त्यावेळी ज्या कोणी जेथील पत्ता मला दिला तेथे कितीही कष्ट पडले तरी मी गेलो. त्या काळात ब्रह्मावर्त येथे श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज म्हणून एक महान् सिद्धयोगी होते. त्यांनी मला त्यांच्या जवळ ठेवून घेऊन आपल्या मुलावरील प्रेमाने आसन, प्राणायाम, बंध, मुद्रादि सर्व काही शिकविले. त्यांच्या सेवेत राहून मी चारशे प्रकारची आसने शिकलो. त्यावेळी मी ५॥ तासपर्यंत शीर्षासन करीत असे. त्याचप्रमाणे त्यांनी शिकविलेला कुंभक प्राणायाम मी पंचेचाळीस मिनिटे करू शकत असे. माझे त्यामुळे आसन जमिनीवरून दोन हात उंच वर येत असे. "

इतके सर्व सांगून झाल्यावर श्रीयोगानंदमहाराज प. प. श्रीनारायणदेवतीर्थस्वामीमहाराज यांना पुढे असे म्हणाले की, " मी इ. स. १९१३ मध्ये श्रीगुरूंच्या शोधार्थ श्रीनर्मदा प्रदक्षिणा करण्यासाठी गेलो असता ज्यावेळी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे पोहोचलो त्यावेळी मला पुन्हा एकदा श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज

यांचे दर्शन झाले व तेथे त्यांचा सत्संग झाला. या मुक्कामात मी त्यांच्याजवळ काही दिवस राहिलो असता मला एक आश्चर्यकारक अशी गोष्ट तेथे पाहावयास मिळाली. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांकडे रोजच लोकांची अतोनात गर्दी होत असे. ते नमस्कार करणाऱ्या प्रत्येकाला आपल्या जवळच्या कमंडलूमधील तीर्थ देत असत. त्यांचे हे तीर्थ देण्याचे काम सकाळपासून चालू राहात असे. या काळात श्रीस्वामीमहाराज आपल्या जागेवरून उठत नसत किंवा आपला कमंडलू ते तीर्थाने पुन्हा भरूनही आणीत नसत. अशा स्थितीत अक्षरशः हजारो लोकांना ते आपल्या जवळील कमंडलूतील तीर्थ देत असत. पण त्यांच्या कमंडलूतील तीर्थ कधीही संपत नसे. हा सर्व चमत्कार मी त्यांच्याजवळ बसून पाहात होतो.

अशा प्रकारे श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांची व माझी दोन वेळा भेट झाली. परंतु माझ्या दुर्भाग्यामुळे व प्रारब्धकर्मामुळे मला कोणताच लाभ झाला नाही व माझी कुंडलिनी शक्तीही जागृत झाली नाही. त्यामुळे मी घोर निराशेत बुडून गेलो."

अशी ही सर्व हकीकत श्रीयोगानंदमहाराजांनी आपले परम सद्गुरू प. प. श्रीनारायणदेवतीर्थस्वामीमहाराजांना इ. स. १९१८ मध्ये कथन केली. पुढे त्यांना त्यांच्याकडूनच शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाली.

श्रीस्वामीमहाराजांनी आपला देह विसर्जन करण्यापूर्वीच दोन-चार महिन्यांच्या काळात विशेषपणे व खरे तर श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यापासूनच आपल्या भक्तमंडळींना व

शिष्यमंडळींना जेवढे काही देता येईल तेवढे दिले. या संबंधीची हकीकत श्रीसंत महासिद्धयोगी श्रीगुळवणीमहाराज यांचे गुरुबंधू श्री. शंकरराव आजेगावकर अशी सांगत असत. "एकदा श्रीस्वामीमहाराजांच्यासमोर मी व आणखी काही अंतरंग भक्तमंडळी बसलो होतो. त्यावेळी भक्ती व वेदांतासंबंधी प्रश्नोत्तरे चालली होती. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराज अत्यंत आनंदात असल्यामुळे त्यांच्या मुखातून गंगौघाप्रमाणे ज्ञानाचा प्रवाह वाहत होता. इतक्यात अकस्मात् ते मध्येच थांवले व आम्हा सर्व भक्तमंडळींना उद्देशून असे म्हणाले की, "आज आत्ता तुम्हाला जे काही पाहिजे असेल ते मागून घ्या. तुम्ही जे मागाल ते आम्ही देऊ." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच सर्वजण स्तंभित होऊन त्यांच्याकडे पाहू लागले. या स्थितीत सर्व भक्तमंडळी दिङ्मूढ होऊन वसून राहिली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजही जणूकाही समाधीच्या अवस्थेत बसले आहेत असे वाटत होते. आमच्यापैकी एकाच्याही मुखातून शब्द बाहेर आला नाही. कोणीही कोणतीच मागणी केली नाही. अशा रीतीने अर्धा तास गेल्यावर श्रीस्वामीमहाराज भानावर आले व सर्वांना उद्देशून असे म्हणाले की, "वरे तर ! तुम्हाला कोणाला काहीच नको आहे. असो. आता पुन्हा चर्चा करण्यास हरकत नाही." श्रीस्वामीमहाराजांचे हे बोलणे ऐकताच सर्वजण भानावर आले. आपणापैकी कोणीच काहीही मागितले नाही हे लक्षात येऊन सर्वजण एकमेकाकडे पाहू लागले. त्यावेळी एका भक्ताने धाडस करून असे विचारले की, "प्रभो ! मी आपणाकडे आता काही मागू का ? " त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "ती वेळ आता गेली. मघाशी मागितले असते तर काहीही दिले

असते." श्रीस्वामीमहाराज त्यावेळी जरी त्या भक्ताला असे म्हणाले तरी पुढे त्यांनी त्याच्या इष्ट गोष्टीची पूर्ती केली.

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे आल्यापासून श्रीस्वामीमहाराज आपल्या भक्तमंडळींना अध्यात्मदान अर्थात् ज्ञानदान करण्याच्या अवस्थेतच असल्याचे दिसून येते. आपण आपल्या भक्तमंडळींना जेवढे काही देता येईल तेवढे द्यावे असे त्यांना या काळात वाटत होते. सत्पुरुषांच्या बाबतीमध्ये एक गोष्ट विशेषत्वाने अशी आढळून येते की, आपल्या अवतार समाप्तीच्या वेळी त्यांनी ज्ञानदानाचे अत्यंत उदार धोरण स्वीकारलेले दिसून येते. याबाबतीत शास्त्रीय परिभाषेत बोलावयाचे झाले तर ज्ञानदान म्हणण्यापेक्षा शक्तिपाताच्या द्वारा ज्ञानदान हाच शब्दप्रयोग अधिक समर्पक आहे. भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस शेवटी घशाच्या कॅन्सरने आजारी असताना काशीपूरच्या बगिच्यामध्ये त्यांनी एक दिवस तेथे उपस्थित असलेल्या आपल्या शिष्यांना अगदी मुक्तहस्ते शक्तिदान अर्थात् शक्तिपातदीक्षाद्वारा शक्तिसंक्रमण करून शाश्वत सुखाचे अधिकारी केले. या प्रसंगाचे श्री. न. रा. परांजपे यांनी "श्रीरामकृष्ण–चरित्र" या ग्रंथात पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

(काशीपुरच्या बगिच्यात असताना) श्रीरामकृष्णांना अर्धबाह्य दशा प्राप्त होऊन त्यांच्या तेजःपुंज मुखमंडलावर हास्य झळकू लागले व जवळ उभे असलेल्या भक्तमंडळींकडे पाहून ते असे म्हणाले की, "तुम्हाला आणिक काय सांगू ? तुम्हा सगळ्यांना चैतन्य प्राप्त होवो !" ही वरप्रदानाची वाणी ऐकून मंडळीही आनंदातिशयाने "जय रामकृष्ण ! जय रामकृष्ण !" असा जयघोष करून कोणी त्यांना नमस्कार करू लागले, कोणी

... ३९

त्यांच्यावर फुले उधळू लागले, तर कोणी त्यांची पदधूली ग्रहण करू लागले ! एकजण त्यांच्या पायावर डोके ठेवून उभा राहिला. त्यावरोवर त्या अर्धवाह्य अवस्थेत त्याच्या वक्ष:स्थळावर खालून वर हात फिरवून श्रीरामकृष्ण म्हणाले, " तुला चैतन्य प्राप्त होवो. " दुसरा त्यांच्या पायावर डोके ठेवून उभा राहताक्षणीच श्रीरामकृष्णांनी पुन्हा तसेच केले. तिसऱ्यालाही तसेच आणि चवथ्यालाही तसेच ! अशा रीतीने पायावर डोके ठेवणाऱ्या प्रत्येकाला असाच स्पर्श करून ते आशीर्वाद देऊ लागले आणि त्या अद्भुत स्पर्शाने प्रत्येकाच्या अंत:करणात काही अपूर्व भावांतर उपस्थित होऊन, कोणी हसू लागला, तर कोणी रडू लागला, तर कोणी ध्यानामध्येच निमग्न झाला, तर कोणाचे हृदय आनंदाने पूर्ण होऊन त्या अहेतुक कृपासिंधू श्रीरामकृष्णांच्या कृपालाभाने धन्य होण्यासाठी, तो वाकीच्या सगळ्यांना मोठमोठ्याने हाका मारू लागला.

श्रीरामकृष्णांनी केलेल्या या कृपेमुळे काहीच्या हृदयात आनंदाचे प्रचंड तुफान एकाएकी सुटून ते बेहोश होऊन गेले, कोणाकोणाला आपल्या इष्ट देवतेचे दर्शन झाले, कोणाला काही एक अपूर्व शक्ती आपल्या हृदयात संचार करीत असल्याचाच अनुभव प्राप्त झाला, कोणाच्या मनाचा चंचलपणाच नष्ट होऊन ते अगदी एकाग्र झाले, तर डोळे मिटल्यावरोबर कोणाला एका अद्भुत ज्योतीचेच दर्शन झाले. या निरनिराळ्या दर्शनांशिवाय स्वत:चे मन अत्यंत शांती व अपूर्व आनंद यांनी भरून गेल्याचा प्रत्येकाला अनुभव आला !

परमपूजनीय प्रात:स्मरणीय सन्तश्रेष्ठ महायोगी शक्तिपाताचार्यवर्य. श्रीवामनरावजी गुळवणीमहाराज यांनी सुद्धा आपल्या

अखेरी अखेरीस त्यांच्याकडे येणाऱ्या बहुतेक सर्व साधकांना शक्तिपातयोग दीक्षा दिली. आपल्या अवतार समाप्तीपूर्वी जास्तीत जास्त लोकांचा उद्धार व्हावा हीच या सर्वांची इच्छा होती. श्रीस्वामीमहाराजांनी सुद्धा श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथील मुक्कामातील आपल्या अवतार कार्याच्या अखेरीच्या काळात असेच कल्पतरूव्रत धारण करून मुक्त हस्ताने शक्तीचे दान केले. या सर्व काळात श्रीस्वामीमहाराजांना जरी काही ना काही शारीरिक त्रास होत असला व त्यांची प्रकृती बरी नसली तरी ते नेहमी प्रसन्न व आनंदी असत आणि दर्शनाला आलेल्या प्रत्येक भक्ताला त्याच्या उद्धारासाठी काहीना काही द्यावे अशी त्यांची इच्छा असे. श्रीस्वामी-महाराजांची सकाळची सर्व प्रात:कर्मे आटोपल्यावर ते आपल्या पर्णकुटीच्या बाहेर बसून दर्शनाला येणाऱ्या सर्वांना मुक्तहस्ते आशीर्वाद देत असत. त्या काळात त्यांनी पुष्कळ जणांना मंत्रदीक्षा दिली, कित्येक जणांना योग सांगितला, कित्येकांना वेदान्त सांगितला तर कित्येक भाग्यवंतांना "तुमच्या मनोकामना पूर्ण होवोत," असा आशीर्वाद देऊन त्यांच्या मनोकामना पूर्ण केल्या. अशा रीतीने जे जे भाग्यवान् लोक श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीचरणाजवळ उपस्थित झाले त्या त्या सर्वांना त्यांच्या कृपेचा लाभ झाला.

श्रीस्वामीमहाराज शेवटच्या ज्येष्ठ महिन्यात जवळ जवळ पडूनच असल्यामुळे त्यांचे भिक्षा मागणे बंद झाले. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज जे अष्टग्रास अन्न रोज खात होते तेही बंद झाले. अशा प्रकारे अन्नत्यागामुळे व मुळच्या अतिसाराच्या व्याधीमुळे श्रीस्वामीमहाराजांचे शरीर अतिशय क्षीण झाले होते; मात्र त्यांचा चेहरा अत्यंत तेज:पुंज दिसत असे. श्रीस्वामीमहाराज आजारामध्ये

साधारण सहामासे अन्न (सातूचे पीठ इत्यादि) सेवन करीत असत. शेवटी शेवटी तेही बंद झाले. त्यांच्या शरीरामध्ये एवढा अशक्तपणा आला होता तरी ते शौचासाठी मात्र दूरवर जात असत. शेवटी शेवटी श्रीस्वामीमहाराजांना स्नानासाठी नर्मदेवर जाणे सुद्धा शक्य झाले नाही. त्यामुळे झोपडीच्या बाहेरच एका पाटावर बसून ते श्रीनर्मदेच्या थंड पाण्याने स्नान करीत असत. परंतु एके दिवशी मोठी अप्रूप गोष्ट घडली. पहाटेच्या वेळी सर्व भक्तमंडळी नेहमीप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांना स्नान घालण्यासाठी ज्यावेळी त्यांच्या झोपडीपाशी आली त्यावेळी श्रीस्वामीमहाराज स्नान करून व भस्म लावून संध्येच्या पाटावर बसले होते. श्रीस्वामीमहाराज अत्यधिक आजारी असताना व त्यांना कमालीची क्षीणता आल्यामुळे चालणेही शक्य नसताना ते एकटेच श्रीनर्मदेवर स्नानासाठी कसे गेले असतील या विचाराने सर्व लोक अगदी दिङ्मूढ झाले. त्यामुळे तेथे जमलेल्या भक्तमंडळीतील एका अंतरंग भक्ताने अत्यंत जिज्ञासेपोटी त्यांना असे विचारले की, "प्रभो ! आपण आज अगदी पहाटे एकटेच स्नान करून कसे आलात ? आज इतक्या लवकर स्नान कशाकरिता केले ?" हे प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आज सकाळी महापर्वणीचा महामुहूर्त असल्यामुळे पहाटे आकाशमार्गाने जाऊन श्रीनर्मदेचे स्नान करून आलो. सर्वांना उठवून बरोबर नेणे शक्य नसल्यामुळे आम्ही एकटेच गेलो." हे ऐकताच त्या अंतरंग भक्ताने श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा असे विचारले की, "प्रभो ! असे असेल तर मग आपण रोजच आकाशमार्गाने जाऊन श्रीनर्मदेचे स्नान करून का येत नाही ? खरोखर आपणास काहीही अशक्य नाही !" त्या अंतरंग भक्ताने अत्यंत

भक्तिभावाने विचारलेला हा प्रश्न ऐकून श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, " अशा प्रकारे रोज श्रीनर्मदेच्या स्नानाला जाणे शक्य आहे हे अगदी खरे आहे. मात्र रोज रोज अशा रीतीने सिद्धीचा वापर करणे हे योग्य नाही. आज केवळ महापर्वणीचा महामुहूर्त होता म्हणूनच सिद्धीचा वापर केला. यापुढे अशा प्रकारे सिद्धीचा वापर करण्याचा प्रसंग कधीही येणार नाही. "

श्रीस्वामीमहाराजांच्या स्नानाची ही दिव्य हकीकत व त्या मागची सर्व मीमांसा ऐकताच सर्व लोक आश्चर्याने दिङ्मूढ झाले. श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ अपार सिद्धी असल्या तरी "प्रारब्धकर्मणां भोगादेवक्षयः । " या शास्त्रसिद्धांताप्रमाणे ते आयुष्यभर चालत आल्यामुळे त्यांनी आपल्या कोणत्याही रोगाचा, त्रासाचा, दुःखाचा किंवा कर्माचा परिहार सिद्धी वापरून केला नाही. यासंबंधी त्यांच्या मनाची धारणा अधिक स्पष्टपणे प्रतीत करून घ्यावयाची असेल तर श्रीगुरुचरित्र ग्रंथात श्रीवेदधर्मामुनींनी जे विचार या विषयासंबंधी प्रकट केले आहेत त्यांचा मागोवा घेणे इष्ट ठरेल. श्रीवेदधर्मामुनींचे हे विचार प्रकट करताना श्रीसरस्वती गंगाधर असे म्हणतात की—

**देव अथवा ऋषेश्वरांसी । मनुष्यादि ज्ञानवंतांसी ।**
**क्षालन न होय पापासी । आपुले आपण न भोगितां ॥ २.१७१ ॥**
**भोगिल्यावांचोनि पातकासी । निष्कृती नव्हे गा परियेसी ।**
**जन्मांतरीं बाधिती निश्चयेसीं । धर्मशास्त्रीं असे जाण ॥ २१५ ॥**
**मुक्ती अपेक्षा ज्याचें मनीं । तेणें करावी पापधुणी ।**
**शेष राहतां निर्गुणी । विघ्न करिती मोक्षासी ॥ २१६ ॥**

या दृष्टीने श्रीगुरुचरित्र ग्रंथातील दुसऱ्या अध्यायात आलेले श्रीवेदधर्मामुनी व श्रीदीपक यांचे आख्यान जिज्ञासूंनी मनःपूर्वक

वाचावे म्हणजे श्रीस्वामीमहाराजांची या प्रारब्धकर्मभोगाच्या मागची धारणा काय होती याची स्पष्टपणे प्रतीती आल्याशिवाय राहणार नाही. एवढेच नव्हे; तर या धारणेच्या प्रतीतीच्या प्रकाशात आपल्या जीवनाची वाटचाल कशी करावयाची याची जाणीव झाल्याशिवाय राहणार नाही. अशा प्रकारची जाणीव ही साधकभक्ताला जीवनाधार होऊन त्यामुळेच सुख–दुःख, शीत-उष्ण, मान–अपमान, शत्रू–मित्र, निंदा–स्तुती, गरीब–श्रीमंती, हर्ष–शोक, भय–निर्भयता इत्यादि सर्व द्वंद्वात सम कसे राहावयाचे हे त्याला कळते व " म्हणौनि आपणपां विश्व देखिजे। आणि आपण विश्व होईजे। ऐसें साम्यचि एक उपासिजे। पांडवा गा ॥ ज्ञानेश्वरी ६.४०९ ॥ " अशी श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे त्याची उपासना होऊ लागून ती सिद्ध होते. असा भक्तच ईश्वराला प्रिय असतो. कारण या दृष्टीनेच श्रीमद्भगवद्गीतेत श्रीभगवंतांनी असे म्हटले आहे की–

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १२.१७ ॥**

याचा अर्थ असा आहे की, जो इष्ट वस्तूची प्राप्ती झाली असता हर्ष मानीत नाही, जो अनिष्ट वस्तूची प्राप्ती झाली असता द्वेष करीत नाही, जो प्रिय वस्तूचा वियोग झाला असता शोक करीत नाही, जो न मिळणाऱ्या वस्तूची इच्छा करीत नाही, जो शुभ व अशुभ कर्मांचा परित्याग करतो आणि जो भक्तिमान् असतो तो मला (भगवंताला) प्रिय असतो.

याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "ज्ञानेश्वरीत" असे म्हणतात की–

**जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे ।**

म्हणौनि भोग विशेखें । हरिखेजेना ॥ १२.१९० ॥
आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेला ।
म्हणौनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ १९१ ॥
पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे ।
हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १९२ ॥
आणि जयापरौतें कांहीं नाहीं । हें आपणपेंचि आपुल्या ठायीं ।
जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ १९३ ॥
वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे ।
रात्रिदिवस न घटे । सूर्यासि जेवीं ॥ १९४ ॥
ऐसा बोधुचि केवळु । जो होवोनि असे निखळु ।
त्याहीवरी भजनशीळु । माझ्या ठायीं ॥ १९५ ॥
तरी तया एसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें ।
नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥ १९६ ॥



हा भावार्थ जर अंतरंग झाला तर श्रीस्वामीमहाराजांच्या अंतरस्थितीचा अल्पसा पत्ता लागून आपणही आपले जीवन कसे व्यतीत करावे हे कळेल.

श्रीस्वामीमहाराजांच्या निर्याणाचा दिवस मूळ चक्रनेमीक्रमात ज्येष्ठ वद्य अष्टमी हा ठरलेला होता. अर्थात् कालचक्रामध्ये त्या दिवशी ईश्वराने नियत केल्याप्रमाणे त्यांना या दृश्य सृष्टीच्या आड जाऊन तिरोहित होणे हे क्रमप्राप्त होते. असे सर्व नियत असले तरी श्रीस्वामीमहाराजांना त्या दिवशी देह सोडून देण्याची इच्छा नव्हती. त्यांच्या दृष्टीने हा नियत दिवस देह ठेवण्यास योग्य नसल्यामुळे त्यांनी अष्टमी केव्हा लागते याची आपल्या-जवळील अंतरंग शिष्यांकडे चौकशी करून ठेवली होती. अंतरंग

शिष्यांनी अष्टमी लागण्याचा जो काळ सांगितला होता तो सुरू झाल्यावरोवर श्रीस्वामीमहाराज आपल्या भक्तांना व अंतरंग शिष्यांना असे म्हणाले की, "आम्हाला उठवून वसवा." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे भक्तांनी त्यांना उठवून वसविले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराज तशा क्षीण अवस्थेत तीन तास समाधी लावून बसले. तीन तासानंतर ज्यावेळी श्रीस्वामीमहाराज समाधी उतरवून देहभानावर आले त्यावेळी ते आपल्या भक्तमंडळींना असे म्हणाले की, "आज निर्याणाचा प्रसंग होता. पण तो टळला. आता उत्तम दिवस पाहून देह सोडू." इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांना अत्यधिक क्षीणता वाटू लागल्यामुळे ते शांत वसले.

श्रीस्वामीमहाराजांनी ज्येष्ठ वद्य १३ रोजी म्हणजे देहविसर्जनापूर्वी तीन दिवस अगोदर सर्वांना असे सांगितले की, "आमच्या देहविर्सजनानंतर या देहाला टोपलीत घालून तो श्रीनर्मदेच्या प्रवाहात वाहवून द्यावा." श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे आपल्या देहाची व्यवस्था करण्यास सांगितल्याने श्रीक्षेत्र गरुडेश्वरी जमलेल्या सर्व भक्तमंडळींची अंत:करणे हेलावून गेली व आपल्या देहाबद्दल तें किती उदासीन आहेत हे पाहून सर्वजण स्तंभित झाले.

श्रीस्वामीमहाराज पहिल्यापासूनच आपल्या देहाबद्दल पराकाष्ठेचे उदासीन होते. त्यामुळेच त्यांना आयुष्यभर अनेक रोगांनी त्रस्त केले; तरी त्यांनी "औषधं जान्हवी तोयं वैद्यो नारायणो हरिः।" या न्यायाने कधीही औषध घेतले नाही. वास्तविक पाहता या आयुष्यभरच्या वागणुकीतून आणि उपरोक्त कथनातील शेवटच्या उद्गारातून त्यांना सर्व साधकांना आपल्या प्रत्यक्ष कृतीतून हीच

शिकवण द्यावयाची होती आणि हेच सूचित करावयाचे होते की, "देहाबद्दल पूर्णपणे उदासीन झाल्याशिवाय आणि देहात्मबुद्धी छिन्नभिन्न झाल्याशिवाय ईश्वरप्राप्ती होणे हे कधीही शक्य नाही. या संबंधीचे अत्यंत मार्मिक स्पष्टीकरण व विवेचन श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "एकवीस समासी" या ग्रंथातील "सगुणध्यान" या सातव्या प्रकरणात केले आहे. त्यातील पुढील काही भाग मनन केल्यास श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेप्रमाणे अल्पांशाने वैराग्य प्राप्त होऊन देहात्मबुद्धी छिन्नभिन्न झाल्यास जीवनाच्या कृतार्थतेची वाटचाल होण्यास मदत झाल्याशिवाय राहणार नाही. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज असे म्हणतात की –

देह पडे कां देव जोडे। ऐशी हांव अंगीं जडे।
तेणें गुणें वैराग्य चढे। महाप्रबळ ॥ ७.१७ ॥
देहपांग नि:शेष भंगे। तेव्हां प्राप्तीसी वेळ न लगे।
देव भक्तांपाठी लागे। नाभी नाभी म्हणोनी ॥ १८ ॥
बाळक आपण रक्षूं नेणें। म्हणोनि मातेसि लागे रक्षणें।
तेचि बाळक शहाणें। होतां माता विसंबे ॥ १९ ॥
तैसा भक्त भगवंतीं प्रेमा। लावूनि उल्लंघी देहसीमा।
तयाचा सांभाळ आत्मयारामा। करणें घडे नेमस्त ॥ २० ॥
सर्वस्वाची आस तुटे। तरीच सगुणमूर्ति प्रकटे।
दुःख संसारीचें फिटे। एकसरा ॥ २१ ॥

★ ★ ★

एवं देहाचें थोरपण। तेचि उदास नागवण।
देहाचेनि लोभें खूण। चुके परमार्थाची ॥ ४१ ॥
देहासी थोरपण आणितां। शीणचि उरे तत्त्वतां।
... ४०

रासभाचा अश्व होतां । परम संकट ॥ ४२ ॥
देहमात्र तितुका निंद्य । एकें मानिला परमवंद्य ।
तरी तो वंदिता खेद । पावेल तेणें ॥ ४३ ॥
देह विटाळाचें मूळ । देह अशुद्धाचा गाळ ।
देह नाना अनर्गळ । दुर्गन्धीचा वोतिला ॥ ४४ ॥
देह कृमींचें कोठार । देह अस्थिचा पंजर ।
जंव जिंकिला आहे जर्जर । खंगता भंगे ॥ ४५ ॥
विष्ठा मूत्र वात पित्त । येणेंचि देह चालत ।
नाना दुःखें आदिअंत । ऐसेंचि आहे ॥ ४६ ॥
देह कुश्चिळ अमंगळ । देह अत्यंत अनर्गळ ।
देह वोंगळांत वोंगळ । वाहती नव नाळी ॥ ४७ ॥
देहीं असे नाना विकार । देह अत्यंत असारीं असार ।
ऐसा तोही क्षणभंगुर । अवचिता नासे ॥ ४८ ॥
ऐसा मोधळचाचा अभिमान । माथां वाहती मूढ जन ।
वस्त्रभूषणें शृंगारून । मी थोर म्हणती ॥ ४९ ॥
र्चचितां नाना सुगंध । तरी तो नव्हे कदा शुद्ध ।
अवचितीं सुटे दुर्गन्ध । उपंढर पडे ॥ ५० ॥
माझीं माझीं ऐसें म्हणतां । मरोनि गेले मातापिता ।
तें जाणतचि असतां । पुन्हा म्हणे स्त्री माझी ॥ ५१ ॥
ऐसें म्हणतां म्हणतां तेही मेली । कन्या पुत्र राम झालीं ।
तरी दुराशा धरिली । आपुल्या शरीराची ॥ ५२ ॥
वय वेचलें जाहला उतार । म्हणें माझें पिकलें शरीर ।
भ्रमें मूर्ख अविचार । खंगला अंतीं ॥ ५३ ॥
तारुण्य वैभव निघोनि गेलें । मग मानस पस्तावलें ।
हातींचें रत्न गळोनि पडलें । मग चरफडूं लागे ॥ ५४ ॥

येथें स्वहित तेंचि रत्न । गेले न करिता प्रयत्न ।
म्हणूनि चतुरीं यत्न । केला पाहिजे ।। ५५ ।।



अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या अपार सामर्थ्याने ईश्वराने नियत केलेला पण त्यांना नको असलेला दिवस टाळला. परंतु ज्येष्ठ वद्य अष्टमीनंतर दिवसेंदिवस क्षीणता वाढत जाऊन श्रीस्वामीमहाराजांचे शरीर अधिकाधिक थकत चालले. शेवटच्या सहा-सात दिवसात श्रीस्वामीमहाराजांना अत्यंत वेदना होत होत्या. याकाळात त्यांच्या शरीरात इतकी उष्णता वाढली की, त्या उष्णतेचा दाह कमी करण्यासाठी त्यांच्या सर्व शरीरावर सारखे थंडगार पाणी शिंपडावे लागे. अशा स्थितीत ते मुखाने सारखे " दत्त दत्त " असे म्हणत होते व आपल्या बरोबर इतरांनाही श्रीदत्तनाम घेण्यास सांगत होते. एक प्रकारे या शेवटच्या सहा–सात दिवसात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीदत्तनामाचा अखंड घोषच चालू होता.

श्रीस्वामीमहाराजांनी ज्येष्ठ वद्य १४ ला श्री. धोंडोपंत कोपरकर यांना जवळ बोलावून घेतले व त्यांना अत्यंत प्रेमाने उपदेश करताना ते असे म्हणाले की, " आपणास पूर्वी उपदेश केलेल्या मंत्राचा रोज १२०० जप करीत जा. दरवर्षी श्रीगुरुद्वादशी, श्रीदत्तजयंती व श्रीगुरुप्रतिपदा हे उत्सव करून यथाशक्ती ब्राह्मण भोजन घालीत जा. त्यामुळे अंत:करणशुद्धी होऊन कैवल्यपद मिळेल. " इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या अंगावरची छाटी काढून ती श्री. धोंडोपंत कोपरकर यांना प्रसाद म्हणून दिली. श्री. धोंडोपंतांनी अत्यंत सद्गदीत अंत:करणाने श्रीस्वामीमहाराजांच्या चरणावर मस्तक ठेवून त्यांनी दिलेला तो छाटीचा महाप्रसाद स्वीकारून मस्तकावर धारण केला. हा महाप्रसाद मस्तकावर धारण

केल्यावर श्री. धोंडोपंतांच्या अंगावर रोमांच उभे राहिले व त्यांच्या नेत्रांमधून अश्रुधारा वाहू लागल्या. त्या अवस्थेतच आपल्या सारख्या य:कश्चित भक्ताबद्दल एवढे अपार प्रेम करणारे आपले परम श्रीसद्गुरू, आपले मायबाप एवढेच नव्हे; तर आपले सर्वस्व असलेले श्रीस्वामीमहाराज आपणास लवकरच सोडून जाणार आहेत या जाणिवेने त्यांचे हृदय विदीर्ण झाले. श्रीस्वामीमहाराजांनी या शेवटच्या अवस्थेत केलेला अमृतोपदेश श्री. धोंडोपंत कोपरकर यांनी आपल्या कर्णपुटात साठवून ठेवला आणि पुढे आयुष्यभर त्या उपदेशाप्रमाणे आचरण करून त्यांनी आपले जीवन धन्य व कृतार्थ केले.

ज्येष्ठ वद्य अमावस्या शके १८३६ अर्थात् दि. २३-६-१९१४ रोजी श्रीस्वामीमहाराजांच्या शरीराला अतिशय क्षीणता आली. त्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे पुजारी श्री. आप्पाशास्त्री जेरे यांना सकाळीच जवळ बोलावून घेतले व ते त्यांना असे म्हणाले की, "पूर्वी गृहस्थाश्रमात असताना या देहावर अभिचारिक प्रयोग झाला होता; परंतु आम्ही त्यावेळी त्याचा प्रतिकार केला नाही आणि आताही आपणास त्याचा प्रतिकार करण्याची इच्छा नाही. आज अमावस्या संपल्यावर हा स्थूल देह सोडावयाचा आहे." त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी त्या शेवटच्या दिवशीसुद्धा नित्यकर्म करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या देहाला अत्यधिक क्षीणता आल्यामुळे आचमनाचे पाणी हातात राहीना. हे पाहून "आज काहीही कर्म आपल्या या देहाकडून व्हावे अशी श्रीदेवांचीच इच्छा नाही," असे म्हणून ते स्वस्थ बसले.



श्रीस्वामीमहाराज आषाढ शुद्ध प्रतिपदेला देहत्याग करणार

असल्याचे समजून श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेल्या सर्व भक्त मंडळींच्या हृदयाचे पाणी पाणी झाले होते. परंतु ही घटना काही आकस्मिकरीत्या घडणार नव्हती. हे सर्व पूर्व नियोजित होते व त्या संबंधीच्या सर्व सूचना श्रीस्वामीमहाराजांनी पूर्वीच दिल्या होत्या. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या देहत्यागाची व ते ब्रह्मलीन होत असल्याची अपूर्व घटना साक्षिभावाने पाहण्यापलीकडे तेथ जमलेली भक्तमंडळी काहीही करू शकत नव्हती.

ज्येष्ठ वद्य अमावस्या जशी जशी संपत येऊ लागली तशी तशी श्रीस्वामीमहाराजांची प्रकृती आणखीनच क्षीण झाली. त्यांच्या शरीराचा नुसता अस्थिपंजर तेवढा उरला आहे असे दिसत होते. त्यांना आपली हालचालसुद्धा दुसऱ्याच्या मदतीने करावी लागत होती. श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीमध्ये असलेल्या अंतरंग सेवक मंडळींचे व पर्णकुटीबाहेर जमलेल्या सर्व भक्तमंडळींचे चेहरे अगदी काळवंडून गेले होते. खरे तर गेले चौदा महिने या जागेमध्ये आनंदाचा बाजार भरला होता. या काळात येथे येणारा प्रत्येक भक्त रात्रंदिवस ब्रह्मानंदामध्ये डुलत होता. त्यामुळे कोणालाच काळवेळाचे भान राहिले नव्हते. पण आज येथील वातावरणात एक प्रकारची गंभीर उदासीनता भरून राहिली होती. चौदा महिन्यांपूर्वी श्रीस्वामीमहाराज जेव्हा प्रथम श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आले त्यावेळी निर्जन असलेले हे क्षेत्र आज तीर्थक्षेत्र बनले होते. श्रीगरुड व श्रीनारद यांनी तपश्चर्या करून पुनीत केलेल्या भूमीतील मातीचा कणन्कण श्रीस्वामीमहाराजांच्या पदस्पर्शाने चेतनयुक्त होऊन आनंदाने नाचत असल्याचा व तेथील सर्व वातावरण भक्तीने भरून गेल्याचा प्रत्यय सर्वांनी वारंवार

अखंडपणे घेतला असल्यामुळे आज या पवित्र भूमीचा त्याग

करून श्रीस्वामीमहाराज निजधामाला जाणार असल्यामुळे येथील सर्व गोष्टी जणूकाही आपले काही तरी हरवणार आहे या जाणिवेने मलूल झाल्या आहेत असे सर्वांना वाटत होते. खरे तर अनंतकाळापासून वाहणारी ती पुरातन श्रीनर्मदानदी आजही समुद्रमीलनासाठी उत्सुक होऊन धावत होती आणि त्यावेळचे तेच वृक्ष आजही पवित्रसलिला श्रीनर्मदेच्या तीरावरून येणाऱ्यावाऱ्यावर डुलत होते. त्या वृक्षांवर बसून पक्षी आजही तसेच गात होते; पण श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरी ज्या दिवशी येथे आले त्या प्रथम दिवसाचा, पुढे चौदा महिन्यात क्रमशः वृद्धिगत झालेला, तेथील प्रत्येक साधक-भक्ताने अनुभविलेला व शब्दातीत असा जो आनंद, दिव्यानंद किंवा परमानंद होता तो आनंद आज श्रीक्षेत्र गरुडेश्वरमध्ये नव्हता. आज श्रीक्षेत्र गरुडेश्वर चिंतेच्या छायेत होते. श्री. धोंडोपंत कोपरकरांनी स्वतःच्या हातांनी जी पर्णकुटी श्रीस्वामीमहाराजांसाठी बांधली होती त्या पर्णकुटीमध्ये आज वियोगाची छाया पसरली होती. वियोग हा शब्द आम्हा सामान्य जनांसाठी आहे. त्यामुळे त्याची छाया आम्हाला दिसली. परंतु श्रीस्वामीमहाराजांना वियोग कोठे व कशाचा होणार होता ? त्यांनी मृत्यू कधीच जिंकला होता. खरे तर ते संयोग-वियोगादि सर्व द्वंद्वांच्या पलीकडे जाऊन केव्हाच ब्रह्मरूप झाले होते. याचेच वर्णन त्यांनी " श्रीदत्तमाहात्म्य " या ग्रंथात करताना असे म्हटले आहे की-

जो आत्मरती आत्मतृप्त । आत्मरूपी संतुष्ट ।
त्याचें कार्य न अवशिष्ट । हें सर्व शिष्ट जाणती ॥१६.३६॥
करितां पुण्य त्याणें । न लगे स्वर्गाप्रती जाणें ।
पापही करितां त्याणें । नरकीं जाणें न घडेल ॥ १६.३७॥



अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज या देहीच ब्रह्मरूप झालेले

असले; तरी लौकिक दृष्टीने ते आपल्या पांचभौतिक देहाचा त्याग करणार होते. आजपर्यंत केलेल्या लीलांचा ते उपसंहार करणार होते. एका सीमित क्षेत्रातून ते आता असीम अशा ब्रह्मरूपाशी एकरूप होणार होते. त्या ब्रह्मपूर्ण अवस्थेतराहून ते आपले जगदोद्धाराचे व भक्तोद्धाराचे कार्य करणार होते. पूर्णावतार भगवान् श्रीकृष्णांनी अवतार समाप्ती करताना आपल्या देहाचा त्यागच केला होता. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज, श्रीरमण महर्षी, योगी श्रीअरविंद, श्रीश्रीविजयकृष्ण गोस्वामी, श्रीश्रीविशुद्धानंदसरस्वती यांसारख्या सर्व अवतारी पुरुषांनी देहत्याग करूनच आपली अवतार लीला समाप्त केली होती. या प्रत्येकाच्या वेळी जग हळहळले होते आणि ते आजही हळहळणार आहे; कारण जगाच्या दृष्टीने श्रीस्वामीमहाराज देहाचे विसर्जन करणार होते.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराज आपल्या महानिर्वाणाच्या तयारीत असताना त्यांना भेटण्यासाठी त्या दिवशी दुपारी एक श्रीसंन्यासीमहाराज आले. ते तहानलेले असल्यामुळे पर्णकुटीत आल्यावरोवर त्यांनी पिण्यासाठी पाणी मागितले व ते श्रीस्वामीमहाराजांजवळ जाऊन वसले. त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, " निजिवीर्षुवा ममुर्षवा । " त्या श्रीसंन्यासी महाराजांनी अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांना " जिवंत राहण्याची इच्छा आहे का मरण्याची इच्छा आहे ? " असे विचारताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "येथे कोणाला काय इच्छा आहे हे तुम्हाला माहीतच आहे व ते तुम्ही चांगले जाणतच आहात." श्रीस्वामीमहाराजांचे हे उत्तर ऐकताच ते श्रीसंन्याहीमहाराज तत्काळ उठले व निघून गेले. त्यानंतर ते परत कोणासही दिसले नाहीत. काही जणांच्या मते याच श्रीसंन्यासी महाराजांनी श्रीस्वामी

महाराजांवर अभिचार प्रयोग केला होता व आपण केलेल्या प्रयोगाचा परिणाम बरोबर झाला आहे की नाही हे पाहण्यासाठी ते श्रीक्षेत्र गरुडेश्वरी आले होते. बहुतेक लोकांच्या मते ते श्रीसंन्यासीमहाराज दक्षिणेकडील होते.

ते श्रीसंन्यासीमहाराज निघून गेल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे पुजारी श्री. आप्पाशास्त्री जेरे यांनाजवळ बोलावून घेतले व ते त्यांना असे म्हणाले की, " आज सकाळीच आपणास सांगितल्याप्रमाणे पूर्वी गृहस्थाश्रमात असताना आपल्यावर एका गृहस्थाने अभिचारिक प्रयोग केला होता; परंतु आपणास त्याचा प्रतिकार करण्याची इच्छा नाही. या देहावर अभिचार प्रयोग झाला असल्याने आयुष्य अवशेष असूनही काहीच कर्तव्य अवशिष्ट नसल्यामुळे या देहाचा आम्ही त्याग करणार आहोत."

श्रीस्वामीमहाराजांचे हे बोलणे ऐकल्याबरोबर त्यावेळी तेथे उपस्थित असलेल्या काही भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना अशी नम्र प्रार्थना केली की, " हे प्रभो ! आपण सर्वज्ञ व समर्थ आहात. आपल्यावर झालेला अभिचारिक प्रयोग परत फिरविण्यास आपण समर्थ आहात. आम्हापैकी कोणासही हा प्रयोग परत फिरविण्याचे ज्ञान नाही. तरी आपण हा अभिचारिक प्रयोग परत फिरवून आम्हा सर्व भक्त मंडळींकरता जीवित राहावे अशी आम्हा सर्वांची आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे. आपण आमची ही प्रार्थना मान्य करून संदेह रूपाने राहाल अशी आम्हाला आशा आहे."

श्रीस्वामीमहाराजांनी ज्यावेळी सर्व भक्तमंडळींनी केलेली ही प्रार्थना ऐकली त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, " संन्यासाश्रम घेताना आम्ही सर्व प्राण्यांना अभय वचन दिले आहे. ते आम्हाला पाळले पाहिजे. जर आम्ही अभिचार प्रयोग परत केला तर ज्याने

तो प्रयोग आमच्यावर केला आहे तो मनुष्य प्राणास मुकल्याशिवाय राहणार नाही. अशा प्रकारची हिंसा ही संन्यासधर्माच्या विरुद्ध असल्याने आम्ही अभिचार प्रयोग परत फिरविणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांनी व्यक्त केलेली ही लोकोत्तर, अलौकिक व एकमेवाद्वितीय भावना पाहिली की, मन आश्चर्याने दिङ्मूढ व स्तिमित झाल्याशिवाय राहात नाहीं. "अभयं सर्व भूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम॥" म्हणजे सर्व भूतमात्रांना अभय देणे हेच माझे व्रत आहे असे जे प्रभू श्रीरामचंद्रांनी श्रीहनुमान व श्रीसुग्रीवादि आपल्या सहकाऱ्यांना व सेवकांना सांगून आपल्याला शरण आलेल्या विभीषणाला अभय देऊन जो अलौकिक आदर्श सर्व जगासमोर उभा केला व जी लोकोत्तर धारण प्रकट केली ती ही अपूर्व धारणाच श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचे सार आहे. श्रीस्वामीमहाराजांनी ज्यावेळी संन्यास घेतला त्यावेळीच त्यांनी "नारदपरिव्राजकोपनिषद्", "आरुणिकोपनिषद्" आणि "परम-हंसपरिव्राजकोपनिषद्" यांमध्ये सांगितलेल्याप्रमाणे पुढील प्रतिज्ञा घेऊन त्या आजीवन पाळण्याचे व्रत घेतले होते.

अभयं सर्वभूतेभ्यो दत्त्वा चरति यो मुनिः।
न तस्य सर्वभूतेभ्यो भयमुत्पद्यते क्वचित्॥ ना. परि. ५.१६॥
अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः सर्वं प्रवर्तते॥
सखा मा गोपायौजः सखायोऽसीन्द्रस्य वज्रोऽसि
वार्त्रघ्नः शर्म मे भव यत्पापं तन्निवारय॥ आरुणिकोपनिषद्।३।

याचा अर्थ असा आहे की, जो प्राणिमात्रांना अभय देत पृथ्वीवर भ्रमण करतो त्याला कोणत्याही प्राण्यापासून कधीही भय उत्पन्न होत नाही. (ज्यावेळीं संन्यासी दंड ग्रहण करतात

"४१

त्यावेळी ते अशी प्रतिज्ञा घेतात की,) सर्व हिंस्त्र आणि अहिंस्त्र प्राण्यांना माझ्यापासून अभय प्राप्त होवो. कोणालाही माझ्यापासून भय प्राप्त होऊ नये; कारण की, माझ्यापासूनच हे सर्व विश्व प्रवर्तित झाले आहे. हे दण्डा ! तू माझा मित्र हो. तू माझ्या ओजाचे रक्षण कर. तू माझा मित्र हो. वृत्रासुराला मारणाऱ्या इंद्राचे वज्र हो. हे वज्रा ! मला तू सुख अर्पण कर. संन्यासधर्मापासून खाली ओढणारे जे पाप असेल त्याचे निवारण कर.

श्रीस्वामीमहाराजांनी या प्रतिज्ञेचे आजीवन पालन केल्याने ते उपनिषदोक्त एकमेवाद्वितीय व अपारवार म्हणजे आदि व अंत न लागलेल्या अशा अभयपदाला प्राप्त झाले होते. हे अभयपद म्हणजे साक्षात् ब्रह्मपदच आहे असे उपनिषदातून केलेले वर्णन अवलोकन केले म्हणजे श्रीस्वामीमहाराज साक्षात् ब्रह्मच होते याची प्रचीती येऊन आपण त्यांच्यापासून प्रवाहित झालेल्या साधनगंगेत स्नान करीत आहोत या अखंड प्रचीतीने मन संतुष्ट होऊन या साधनगंगा सेवनानेच आपण धन्य व कृतार्थ होऊ याची जाणीव होते. या दृष्टीनेच निरनिराळ्या उपनिषदातून असे वर्णन आले आहे की—

अभयमशोकमनन्तम् ।। सुबालोपनिषद् ७.२४ ।।
अभयमशोकमानन्दं तृप्तं (ब्रह्म) ।। मैत्रायण्युपनिषद् ६-२३।।
अभयं सर्वभूतेभ्यो न मे भीतिः कदाचन ।।
।। प्राणाग्निहोत्रोपनिषद् १।१२।।
स वा एष महानज आत्माऽजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्माभयं वै ब्रह्माभयं हि वै ब्रह्म भवति य एवं वेद ।।
।। बृहदारण्यकोपनिषद् ४-४-२५।।

**बुद्ध्वाऽनिमित्ततां सत्यां हेतुं पृथगनाप्नुवन् ।**
**वीतशोकं तथा काममभयं पदमश्नुते ॥**

**॥ मांडूक्योपनिषद्कारिकाअलातशांती प्र. ७८ ॥**

याचा अर्थ असा आहे की, " हे अभयपद शोकरहित व अनंत असे आहे. हे अभयपद शोकरहित, आनंदयुक्त व तृप्त अर्थात् परिपूर्ण ब्रह्मच आहे. सर्व प्राणिमात्रांना मी अभय दिलेले असल्यामुळे मला कोणापासून केव्हाही भीती नाही. हा आत्मा महान्, अजर म्हणजे जन्मरहित, अमर म्हणजे मरणरहित, अमृत म्हणजे विनाशरहित व अभय म्हणजे भयरहित असा ब्रह्मच आहे. अभयच ब्रह्म आहे. जो आत्मा हा अभय ब्रह्म आहे असे जाणतो तो अभय ब्रह्मच होतो. चित्त हे निर्मित व सद्रूप आहे असे कळल्यानंतर आणि धर्माधर्मादि कारण दुसरीकडून उत्पन्न होणे शक्य नाही, असे झाल्यानंतर ज्ञानी पुरुषाला काम, क्रोध, शोकादि विकारांनी वर्जित असलेले अभयपद प्राप्त होते. (याचा अर्थ असा आहे की, जन्माला निमित्त असणारे द्वैत निरस्त झाल्यामुळे चित्त निर्निमित्त आहे आणि ते खरोखर आत्मरूप आणि सत्यत्वरूप आहे असे जेव्हा कळते, तसेच देवादिकांची योनी प्राप्त होण्यास कारण असणारी धर्मादि कारणे स्वतंत्रतेने सिद्ध होण्याचा जेव्हा असंभव होतो, अर्थात् याचे तात्पर्य असे की, जेव्हा सर्व आत्मबाह्य वासनांचा त्याग होतो तेव्हा ज्ञानी पुरुष कामक्रोधादि व हर्षखेदादि विकारांना पारखा होतो. तो अविद्या, माया, जन्ममरण इत्यादिकांचे अतिक्रमण करतो. सारांश, तो मायाशून्य होतो. अर्थातच या पुरुषाला शोक, काम व भीतिशून्य असे जे निर्भय मोक्षपद ते प्राप्त होते म्हणजे त्याला पुन्हा जन्मप्राप्ती होत नाही.)

सारांश, श्रीमद्भगवद्गीतेत " अभय " ॥१६.१॥ हा दैवी

संपत्तीचा प्रथम गुण आहे असे सांगितले असून श्रीसंत ज्ञानेश्वर-महाराजांनी "अगा अभय येणे नांवें। बोलिजे तें हें जाणावें। सम्यक्ज्ञानाचे आघवें। धांवणें हें ॥१६.७३॥" असे म्हणून अभय म्हणजे सम्यक्ज्ञानच होय, हा सिद्धांत प्रस्थापित केला आहे.

अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी आपल्यावर झालेला अभिचारिक प्रयोग परत न फिरविण्याची केलेली घोषणा म्हणजे अप्रत्यक्षरीत्या आपण अभयरूप ब्रह्मच आहोत असे सांगून आपली अनाकलनीय, अपारवार, अलौकिक, लोकोत्तर व न भूतो न भविष्यती अशी असलेली स्थितीच कथन केल्यासारखे आहे यात तिल:प्राय शंका नाही. "श्रीस्वामीमहाराज हे अभयरूप ब्रह्म होते," हेच त्यांच्या संपूर्ण चरित्राचे साररूप दर्शन आहे. हा एक जरी गुण श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने आपल्याला प्राप्त झाला तरी आपण मृत्यूला ओलांडून जाऊ शकू व जन्ममरणपरंपरेतून सुटू शकू.

ज्येष्ठ वद्य अमावस्येच्या दिवशी रात्री ११–११॥ वाजेपर्यंत सर्व मंडळी भजन करीत होती. त्यानंतर श्रीब्रह्मानंदसरस्वती-स्वामीमहाराजांनी श्रीमद्भगवद्गीतेचा पाठ वाचून दाखवून तो श्रीस्वामीमहाराजांकडून श्रवण करविला. त्यानंतर अमावस्या संपून प्रतिपदा लागताच श्रीस्वामीमहाराजांनी तेथे असणाऱ्या आपल्या अंतरंग भक्तांना असे सांगितले की, "आता आपणास उठून बसवावे." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे भक्तांनी त्यांना उठून बसविल्यानंतर सिद्धासन घालून ते प्रथम पूर्वाभिमुख बसले; परंतु पूर्वाभिमुख बसल्यामुळे आपली पाठ देवांकडे होते असे लक्षात आल्यावर श्रीस्वामीमहाराज पश्चिमेकडे देवांसमोर आपले मुख करून बसले. त्यानंतर तेथे उपस्थित असलेल्या सर्व

भक्तमंडळींना उद्देशून ते अखेरचा उपदेश करताना अत्यंत क्षीण आवाजात असे म्हणाले की, "कर्ममार्गाचा त्याग करू नका. चित्तशुद्धीसाठी निष्काम कर्मयोग आचरा. कारण चित्ताची शुद्धी मनाने होऊन नंतर कल्याणाची प्राप्ती होते. या देहाला कर्म करण्याची जरूरी नव्हती; तरीसुद्धा लोकांपुढे आदर्श राहावा म्हणून अखेरपर्यंत कर्ममार्गाचा अवलंब केला."

इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराज स्तब्ध झाले. त्यावेळी त्यांचा चेहरा अगदी निर्विकार व शांत होता. त्याक्षणी सर्व भक्त मंडळींचे नेत्र त्यांच्यावर खिळून गेले होते. त्यांच्या देहाला अत्यंतिक यातना होत आहेत असे त्यावेळी कोणालाही वाटले नाही. त्यानंतर एका क्षणात श्रीस्वामीमहाराजांनी देवाकडे पाहून त्राटक केले व प्राणायामाने श्वासनिरोध करून दीर्घ प्रणवोच्चार करीत देहाचे विसर्जन केले आणि ते ब्रह्मस्वरूपी लीन झाले. अशा रीतीने स्वकृत "श्रीदत्तमाहात्म्य" या ग्रंथात सांगितलेल्या प्रक्रियेच्या द्वारा ते ब्रह्मलीन झाले. त्या ग्रंथात ते असे म्हणतात की—

स्वस्वरूपीं दृढ लक्ष धरी । इंद्रियांचा प्रत्याहार करी ।
तयां मनामध्यें लीन करी । मनाचा लय करी प्राणामध्यें ।२१·६६।
तेजामध्यें प्राणलय । करी तेजाचा परदैवतीं लय ।
असा होवोनियां अद्वय । ब्रह्ममय तो झाला ॥ ६७ ॥
नाडीद्वारें लखलखीत । उजेड पडला हृदयांत ।
सुषुम्णा मार्गं धरीत । प्राण ऊर्ध्वगत झाला ॥ ६८ ॥

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज शके १८३६ च्या आनंदसंवत्सरामध्ये आषाढ शुद्ध प्रतिपदा, मंगळवार, आर्द्रा नक्षत्र व उत्तरायण असताना रात्री सुमारे अकरा वाजता आपल्या स्वस्वरूपामध्ये लीन झाले. (दि. २३-६-१९१४) सामान्यजनांच्या दृष्टीने ते देहदृष्ट्या

तिरोहित झाले असले तरी आत्मदृष्टचा ते अनंतामध्ये विलीन होऊन विश्वमय झाले होते. एका अर्थाने देहरूपाने असलेल्या बंधनाचा त्याग करून ते बंधनापलीकडे गेले होते. श्रीस्वामीमहाराजांनी आनंद नावाच्या संवत्सरामध्ये अवतार धारण केला व आनंद संवत्सरामध्येच त्यांनी अवतार समाप्ती केली. या गोष्टीचा विचार केला म्हणजे अवतार धारण व अवतार समाप्ती अर्थात् लौकिक दृष्ट्या जन्म व मृत्यू या दोन्ही गोष्टी आनंददायकच आहेत, हे त्यांनी एका अलौकिक अर्थाने आपल्या जीवनात सिद्ध करून दाखविले.

त्यावेळी आसमंतामध्ये शांतता पसरली होती. चराचरावर घनदाट काळोखाचे साम्राज्य पसरले होते. पावसाळी हवामानामुळे वातावरणात एक प्रकारचा कोंदटपणा निर्माण झाला होता. अकस्मात् घरट्यामध्ये पंखात चोच खुपसून निद्रिस्त असलेल्या पक्षांना जाग येऊन त्यांनी किलबिलाट केला. ज्या महामानवाच्या सान्निध्यामुळे पवित्र झालेल्या हवेत व वातावरणात ती पाखरे गेली चौदा महिने संचार करून उठत होती त्या महामानवाचे निर्गमन झाल्याचे त्यांनाही कळले की काय असे वाटत होते. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज आपल्याला सोडून गेले, असे मनुष्य, पशु, पक्षी किंबहुना स्थिरचराला वाटत असले तरी खरे हेच होते की–

तसे मुक्ताचें प्राण । न जाती निघून ।
स्वरूपीं होती लीन । न जाती निघून कोठेंही

॥ श्रीदत्तमाहात्म्य ३५.९५॥

श्रीस्वामीमहाराजांच्या चिरयोगाच्या दुःखात श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे जमलेल्या सर्व भक्तमंडळींनी ती रात्र मोठ्या कष्टाने व्यतीत केली. दुसऱ्या दिवशी बुधवारी सकाळचा सूर्य सुद्धा म्लानवदन घेऊनच उगवला. त्या दिवशी आकाशात अभ्र जमा झाले होते व

आसमंतात सर्वत्र औदासीन्यच पसरले होते. अशा स्थितीतच सर्व भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांचा देह पर्णकुटीतून वाहेर आणला व दक्षिणेकडील अंगाला मांडी घालून पाटावर वसविला. त्यानंतर सर्व भक्तमंडळींनी मिळून श्रीस्वामीमहाराजांची षोडशोपचारे पूजा केली. पूर्वांग पूजा झाल्यावर सर्व भक्तमंडळींनी मिळून पवमान, पुरुषसूक्त व रुद्र इत्यादि मंत्रांनी अभिषेक केला. अभिषेक संपल्या-नंतर उत्तरांग पूजा करून सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना अत्तरादि लावून त्यांच्या गळचात बेल, तुळशी, फुले इत्यादिकांच्या माळा घातल्या व शेवटी नैवेद्य, फल, तांबूल, दक्षिणादि समर्पण करून त्यांची आरती केली.

त्यानंतर सर्व भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांचा देह पुष्पासना-वर वसवून तो त्यांच्या झोपडीपासून पूर्वेकडे असलेल्या श्रीनारदे-श्वराच्या मंदिराच्या समोर असेलेल्या श्रीनर्मदानदीच्या डोहाकडे नेला. तेथे गेल्यावर श्रीनर्मदानदीच्या तीरावर श्रीस्वामी-महाराजांचा देह ठेवून त्यांनी संन्यासाश्रम घेताना जो दंड ग्रहण केला होता व त्या वेळेपासून हा दंड बरोबर घेऊन व त्याला साक्षी ठेवूच जी तीव्र व कठोर तपश्चर्या केली होती व त्यामुळे जो दंड ब्रह्मचर्य, अहिंसा, अपरिग्रह आणि सत्यधर्माचे साक्षात् प्रतीक बनला होता, त्या दंडाचे तीन तुकडे करून ते त्यांच्या मांडीवर ठेवले. त्या नंतर कमंडलूस भोक पाडून तो त्यांच्या कमरेला वांधला व शास्त्र म्हणून मस्तकावरील सहस्राराच्या ठिकाणी असलेला निर्ऋतिमार्ग शंखाग्राने खुला केला आणि मग श्रीस्वामीमहाराजांचा देह दोरांनी घट्ट वांधून तो पाण्यातून वर येऊ नये म्हणून त्याला दगड वांधले. शेवटी सर्व भक्तमंडळींनी मिळून श्रीनारदेश्वराच्या मंदिरासमोरील श्रीनर्मदानदीच्या डोहात श्रीस्वामीमहाराजांचे परमपवित्र मंगल

शरीर विसर्जित केले. त्यानंतर सर्व भक्तमंडळी श्रीगुरुस्मरण करीत परत आली.

अशा रीतीने श्रीनर्मदामातेने आपल्या लाडक्या व एकांतिक भक्ताला आपल्याशी एकरूप करून घेतले. आपला भक्त आपल्याशीच समरस झाला पाहिजे अशी जी तिची पूर्वीपासूनची इच्छा होती, ती अशा प्रकारे फलद्रूप झाली. श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्त येथे असताना श्रीनर्मदामातेला आपल्या भक्ताच्या विराहाचे दुःख सहन न होऊन तिने त्वचा रोगाचे निमित्त करून श्रीस्वामीमहाराजांना श्रीगंगेचा मोह सोडावयास लावून आपल्या-जवळ यावयास भाग पाडले होते. (खण्ड २ रा पृष्ठ १०३ ते ११३) श्रीनर्मदामातेचे आपल्यावर किती अपरंपार प्रेम आहे याची जाणीव असल्यामुळेच व पुढे आपल्याशी एकरूप असलेल्या श्रीस्वामी-महाराजांनी अव्यक्तरूपाने श्रीनर्मदामातेच्या किनाऱ्यावर राहून श्रीदत्तभक्तीचा प्रसार करावा अशी श्रीदेवांची इच्छा असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी तिच्या कुशीत चिरविश्रांती घेतली.

श्रीस्वामीमहाराज ! आपण अनन्त कोटी ब्रह्माण्डनायक राजाधिराज श्रीसद्‌गुरुनाथमहाराज आहात ! आपण निखिल भूमंडळातील सर्वश्रेष्ठ असे परमहंस परिव्राजकाचार्य आहात! आपण साक्षात् पूर्ण ब्रह्म असून आपल्या रूपाने जणूकाही अमृताची मूर्तीच साकार झाली आहे ! आपण आमच्या हृदयस्थ श्रीसद्‌गुरुनाथ महाराजांचे सद्‌गुरू आहात ! आपला अखण्ड जयजयकार असो!

श्रीस्वामीमहाराज ! हे श्रीसद्‌गुरो ! ! तुमचा जयजयकार असो. तुमचा महिमा असा विलक्षण आहे की, ज्या ब्रह्मस्वरूपाचा ठाव न लागल्यामुळे वेदांनी आपले तोंड मागे फिरविले व जे जाणणे शक्य होत नाही ते अगोचर जाणण्यात येत नसून ध्यानासही विषय होत नाही ते अगोचर

ब्रह्म, ज्या कोणावर आपली कृपा होते, त्याच्या वाणीत सहज येते. हे श्रीसद्‌गुरो ! तुमच्या पदकमली माझा साष्टांग नमस्कार असो. हे श्रीगुरो ! ब्रह्मरूप आकाशातील तुम्ही ज्ञानरूप सूर्य आहात. तुमचा जयजयकार असो. लौकिक सूर्योदय झाला म्हणजे रात्र नाहीशी होऊन सर्व भूतमात्रे आपापल्या कार्यास प्रवृत्त होतात; परंतु तुमचा बोधरूप सूर्योदय झाला म्हणजे देहात्म-भावासह सर्व विश्वच नाहीसे होते. मग कार्यप्रवृत्ती कोणास होणार ? हा बोधरूप सूर्य उगवला म्हणजे आत्मज्ञानाचा प्रकाश पडून रजतमरूप अंधकाराचा नाश होतो व सर्व जगात एकच ईश्वर ओतप्रोत भरला आहे ही भावना दृढ होते. ह्या सूर्याची विवेकरूप किरणे संसाररूप वने जाळून टाकतात व त्यामुळे अद्वय-बोधरूपी नगरात महानंदाची प्राप्ती होते. हे श्रीसद्‌गुरो ! हा तुमचा बोधरूप सूर्योदय, पूर्वादि दिशांसह उदय व अस्त यांचे अस्तित्वच नाहीसे करतो व ज्ञानासकट अज्ञानही नाहीसे करून शेवटी आत्मज्ञानाचा उजेड करतो. फार काय सांगावे ? तो सर्वत्र व सर्वदा प्रातःकालाप्रमाणे सुखकारक आहे. ह्या बोधरूप सूर्याच्या तेजापुढे दिवस व रात्र यांचा भासही होत नाही व हा परप्रकाशित नसून केवळ स्वयंप्रकाश आहे. असे जे केवळ चैतन्यरूपी श्रीगुरु-वासुदेवानंदसरस्वती गुरुमहाराज त्यांना माझा वारंवार नमस्कार असो. हे अद्वयानंद श्रीसद्‌गुरो ! ज्या वेळेस स्तुती करणारा, स्तुती आणि स्तुतीचा विषय ही त्रिपुटी नाहीशी होते तेव्हाच ती खरी स्तुती होते. वाणीने तुमची स्तुती करणे शोभत नाही. सर्व वस्तूंचे ज्ञान नाहीसे होणे हेच ज्या श्रीगुरुदेवांचे जाणणे होय व मौन धरून काही एक न करणे हेच ज्यांचे वर्णन करणे होय आणि

...४२

ज्यावेळेस आपलेपणाची आठवण नाहीशी होते त्यावेळेसच ज्यांची प्राप्ती होते, त्या तुमची स्तुती करण्याकरता पश्यंती व मध्यमा, परेसह वैखरीस पाठीघालून शेवटी आपणही लय पावतात, त्या तुम्हाला हे श्रीगुरो ! मी सेवक या नात्याने हा स्तुतिरूप पुष्पहार घालीत आहे. आपल्यास हा स्तुतिरूप पुष्पहार घालावा अशा हेतूने उत्तम सुवासिक पुष्पे कोठे मिळतील अशा विचारात असताना एकदम आम्हाला असे स्मरण झाले की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या श्रीज्ञानेश्वरी ग्रंथात उत्तम सुगंधीपुष्पांची दिव्य बाग निर्माण करून ठेवली आहे. त्यातून जरूर ती पुष्पे आणावीत व त्याप्रमाणे भ्रमररूपाने त्या बागेत फिरून कालानुरोधाने योग्यायोग्य विचार करून जितकी स्वतःच्या मनबुद्धीने ग्रहण करता आली तितक्यांचा हा स्तुतिरूप वाक्पुष्पहार आपल्या कंठात घालीत आहे. तरी तो आपण ग्रहण करावा अशी सविनय प्रार्थना आहे. ही वाक्पुष्पे जरी व्यवस्थित रीतीने गुंफली गेली नसली तरी त्यांचा अव्हेर न होता आनंदपूर्वक स्वीकारच होईल. अशी आम्ही दीनदासांनी पूर्ण उमेद बाळगली आहे व ती विफल होऊ नये अशी करद्वय जोडून आपल्या चरणी आमची प्रार्थना आहे. ज्याप्रमाणे दिव्यतेजाने प्रकाशित असणाऱ्या सूर्याला कोणी काकडवातीने ओवाळू लागला, तर त्यावेळी काकडवातीचा कमीपणा मनात न आणता त्याच्या भक्तीचीच विशेष योग्यता मानली जाते किंवा लहान बालकाला योग्य काहीच समजत नसले तरी त्याची आई त्याच्या वेड्या कृत्यांचेही कौतुक मानून संतोष पावते त्याचप्रमाणे आम्ही तुमचा गुणानुवाद वेड्या-वाकड्या शब्दांनी वर्णन केला आहे. तरी कनवाळू आईप्रमाणे संतोष मानून अपराधाची क्षमा करावी.

श्रीस्वामीमहाराज ! आपणही श्रीमदाद्य शंकराचार्यप्रमाणे "श्रीनर्मदालहरी" लिहून श्रीनर्मदामातेची स्तुती करून तिचे जे माहात्म्य वर्णन केले आहे तेच ज्याप्रमाणे श्रीगंगेचे पाणी अर्घ्यरूपाने गंगेला अर्पण करून आपण काहीतरी श्रीगंगेला दिल्याचे साधकाला व भक्ताला समाधान वाटते त्याप्रमाणे आपल्या चरणी अर्पण करून तद्द्वारा आपला जयजयकार करून आम्ही स्वतःला कृतार्थ मानीत आहोत. आम्ही केलेल्या या शब्दरूप स्तुतीचा स्वीकार करून आपण आमच्यावर कृपेचा वर्षाव करावा व आम्हाला आपण श्रीनर्मदामातेकडे प्रार्थना केल्याप्रमाणे संसाररूपी महामोहातून, यातनांतून व भीतीतून पार न्यावे आणि भवरूपी विषापासून आमचे रक्षण करून आपण ज्या दिव्य अशा ब्रह्मरूपात स्थिर झाला आहात त्या स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी एकरसरूप करून स्थिर करावे अशी आमची आपल्या पवित्र व कोमलचरणी अत्यंत विनम्र व करुणभावाने प्रार्थना आहे.



## ॥ श्रीनर्मदालहरी स्तोत्र ॥

नर्मदे हरसंभूते हरलिङ्गार्चनादृते ॥
हरलिङ्गाङ्चिततटे जयाघं नर्मदे हर ॥
नमः प्रातर्मातर्गिरिशदुहितर्नर्मद उत ।
क्षपायां रेवे ते नम इतमते मेकलसुते ॥
नमो नित्यं सत्यं हि त उदकमत्यंतकमकं ।
हरत्याधिं मा त्वमविलम्बिवहे तेऽर्पय सुखम् ॥ १ ॥

महेशाङ्गोद्भूता सुरवरनराणामभिमता।
युता सिद्धैर्याता प्रसभमिव पाश्चात्यजलधिम् ॥
वृता भीमेनैषा हृतभजकदोषा वरवृषा।
सुभूषा सद्वेषा रुचिरवपुषा भात्यतिरुषा ॥ २ ॥
तटे यस्यास्तप्त्वा तप उपरिगैर्दुश्चरमरं।
वरं ह्यत्रेः पत्नी परममनसूया गतभया ॥
स्वपुत्रत्वेनैव त्रिभुवनसमाराध्यमभवं।
समापास्मद्दैवं क इह सरितं तां तु न नमेत् ॥ ३ ॥
प्रयान्तीं सिन्धुं या प्रतिहतगतिर्विन्ध्यपदतो।
महावेगाऽभङ्गा सकलमलभङ्गा वरभगा ॥
नगान्भित्वानेकानपि विविधलोकान्स्वबलतः।
पुनातीयं रेवा जगति वरभावाऽहृतभवा ॥ ४ ॥
प्रसिद्धाऽऽस्ते यस्याजनिरमरकण्ठेऽमरवृते।
मते नाभिः सिद्धेश्वरपुर उतासौ भृगुपुरे ॥
परे सिन्धौ लीना जगति मलिनानां सुमतिदा।
समुद्धर्त्री भर्त्री निजभजकलोकस्य गतिदा ॥ ५ ॥
सरस्वत्याः सत्या जलमिह पुनाति त्रिदिनतः।
स्म कालिन्द्या नद्या अपि च सलिलं सप्तदिनतः ॥
महाभङ्गा गङ्गाखिलदुरितभङ्गा सपदि सा।
महाभावा रेवा कथमपि हि दृष्ट्वैव सहसा ॥ ६ ॥
स्वभावादासिन्धोरियमचलजाभास्ति सुलभा।
त्रिषु स्थानेष्वेषा हृतमलिनदोषा न सुलभा ॥

नगर्यामोङ्काराभिधपशुपतेरुत्तरगति-
र्युता वौराभिख्येऽपि च भृगुमुनेः क्षेत्र उशति ॥७॥
पुनन्त्यन्या मान्या अपि जगति गङ्गादिसरितः।
प्रयागादिस्थाने महति न हि सर्वत्र दुरितात् ॥
इयं रेवा देवाधिपतिशिवसेव्योभयतटा।
तटे यत्र क्वापि स्वकमिह पुनात्याजलनिधेः ॥ ८ ॥
त्रिशूलांकान्यच्छान्यगणितविमानानि त उप-
र्युपर्यस्याः कूलं सुविमलमुपादाय सततम् ॥
स्थिताः शंभोर्दूता मृतमिह तु नेतुं शिवपुरं।
वरं तेषामुच्चै रहमहमिकाशब्द उदितः ॥ ९ ॥
बहिःशब्दात्तस्मात्प्रविगलितधैर्या यमभटाः।
मृतान्नेतुं प्राप्ता अपि सपदि ते वेपितहृदः ॥
अधीरा धीरा द्राक् तत उत परावृत्य सजवाः।
स्ववासं संजग्मुः खलु तत इतः को नरकभाक् ॥१०॥
प्रभावोऽस्या मृत्युञ्जयदुहितुरेवं हि सरितो।
यतोऽतोऽसौ रेवा नृमरणभवान्तास्ति विदिता ॥
न तां कः सेवेतानुपदमृतभीतिर्हतमतिः।
समानां तापानामपि च दुरितानां प्रशमनीम् ॥११॥
यदीयांबुस्पृष्टः स्पृशति गतियोगेन पवनो ॥
मनोहृद्यं यं तं तमपि स पुनातीति महिमा ॥
प्रतीतो यस्याः सा जगति गतिदासावभयदा।
सदा सक्तान्युक्तान्किमुत भजतामुद्धरति नो ॥१२॥

यदीयं पानीयं सदमृतमयं चित्सुखमयं।
सुपेयं चायुष्यंमतिदमुत वर्चस्यमभयम् ॥
यशस्यं चक्षुष्यं विहितविजयं स्वर्ग्यमलयं।
सुभव्यं सद्गेयं सकलजगदारोग्यविजयम् ॥ १३॥
सुरप्रार्थ्यं पथ्यं स्वयमिह च पूज्यं विजयते।
जगन्मान्यं धन्यं मलहृदिह लभ्यं तु नियतेः ॥
नियोगात्सा रेवा नृभवदवदावार्तिशमनी।
मनीषीड्या पायादविरतमपायाद्धरधुनी ॥ १४॥
नियम्यात्मानं ये विहितनियमाः सन्ततपरि-
श्रमं कुर्वन्त्यस्या अमलजलसेवैकनियमाः ॥
सुपूतास्ते धन्या जगति बहुमान्याः परगतिं।
व्रजन्त्येवं रेवा जयति खलु शर्वाङ्गजनिता ॥१५॥
अये रेवे देवेडितगुणगणे मर्त्यतरणे।
क्षणेनापि स्नानात्परमगतिदाभीष्टवरदा ॥
त्वमेवातो देवा अपि तव न चेच्छन्ति हि तटं।
परित्यक्तुं वक्तुं तव गुणगणान्कः प्रभुरिह ॥ १६॥
यदीये सत्तोये हिमनगसुतागर्भगगणा-
धिपस्योत्कृत्यारं शिर इह सुरारिः स्वहितकृत् ॥
महामायावी प्राक्षिपदपभयोऽतर्क्यमहिमे-
श्वरस्यात्माच्छीर्षाद्गतरुधिरसंस्पर्शवशतः ॥ १७॥
ततोऽनन्ता आब्धेः स्मरहरसुतायास्तु सलिले-
मलेऽनन्ता जाता इह रुधिरभासः खलु शिलाः ॥

अभूवन्गाणेशा अखिलमलसंक्षालनपरा ।
वरापूज्या विघ्नक्षपणपटवस्तेऽपि वरदाः ॥ १८ ॥
यदीये पानीये भृशममृतसंस्पर्धिजननि ।
क्षपायां ते चोङ्कारेश्वरवरपुरात्पूर्वत उत ॥
महोत्तुङ्गस्थानात्पतित उपलास्ते पशुपते-
र्भवन्त्याहो बाणाभिधपरमलिङ्गानि बहुशः ॥ १९ ॥
महान्तस्ते बाणा अपि परमसूक्ष्माः कतिपयाः ।
शुभाः कर्पूराभाः शशधरकलाढ्याः कतिपयाः ॥
परे केचिच्चित्रा अपि च निखिलास्तेऽत्र भजनात् ।
गजारेः सायुज्यं ददत इति रेवांबुमहिमा ॥ २० ॥
एवंप्रभावे जय देवि रेवे, प्रसीद मे तेंबु सदैव सेवे ॥
श्रीनर्मदे देवि नमो नमस्ते, श्रीशर्मदे सोमसुते नमस्ते
अवतु विगतरोषास्मान्महासिन्धुयोषा ।
परिहृतमतदोषा या नमोमात्रतोषा ॥
जयतु भजकपोषा सा स्रवन्ती विशेषा ।
निरुपमतमभूषा मालिनी दिव्यवेषा॥ २२ ॥
सन्मानसस्वच्छसुदिव्यनीरा ।
नीरागयोग्याश्रितरम्यतीरा ॥
धीरार्चिता नित्यमखण्डपूरा ।
सा रातु रेवेष्टमनंतसारा ॥ २३ ॥
स्वभक्तवरदे सुरद्विषदभेग्रसद्धर्मदे ।
सुदर्शितकर्मदे हतमदेऽपि सद्धर्मदे ॥

अये नदि न दीनतां व्रजसि र्कोहचिच्छर्मदे ।
प्रसीद जनकामदे जय नमोऽस्तु ते नर्मदे ॥ २४॥
यन्मूलेस्त्यमरेश्वरो विजयते श्रीसिद्धनाथस्तथा।
कावेरीपरिवेष्टितो गतिद ओंकारोऽपरे चामिताः॥
मध्येऽन्येऽपि च शूलपाणिसहिताः पाश्चात्यभागे स्थिताः।
सर्वे ते भजतामभीष्टफलदा वर्वर्ति सा नर्मदा ॥ २५॥

(हारबन्ध)

हरपरमरये समस्तमघं मम
कुरु गुरुकरुणां समस्तमते मयि ॥
खलबलदलने समस्तमनोमलम् ।
हर दरमरमप्यमर्त्यमतेऽमले ॥ २६ ॥

यस्य स्मृत्या च सद्यः कलिमलविलयो जायते भावुकानां।
यत्स्मृत्या स्मर्तृगामी भवभयहृदुपेत्यात्मदो भावुकानाम्॥
दत्तात्रेयस्य तस्य प्रशमितमनसः सद्वरीवर्ति मातुः।
स्थानं यस्यास्तटे सा विजयत उशती नर्मदा शर्मदा नः॥२७

( अलंकारः )

कुष्टाद्यार्तोऽप्यरोगो भवति सदनसूयाश्रमे यत्तटे यन्॥
मध्ये शुक्लादितीर्थान्यपि झटिति पुनन्त्युद्धरत्याशु या च।
प्रेतश्राद्धेन नारायणबलित इतं दुर्गतिं मुक्तदां तां॥
रेवामस्तौदखेदां परमसुहितदां नर्मदां वासुदेवः ॥२८॥

(गोमूत्रिकाबन्ध)

भवान्तकेऽभयं देहि सापं मे हर नर्मदे॥

भवात्मके नयं देहि पापं मे हर नर्मदे ॥२९॥
जय जय शिवकन्ये नर्मदे शर्मदे त्वम् ।
जय जय जनमान्ये धर्मदेऽधर्मदे त्वम् ॥
जय जय सुवदान्ये धर्मदे कर्मदे त्वम् ।
जय जय भुवि धन्ये भर्मदे वर्मदे त्वम् ॥
॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचता श्रीनर्मदालहरी संपूर्णा ॥

★ ★ ★

## ॥ सार्थ श्रीनर्मदालहरी स्तोत्र ॥

हे श्रीशंकरांपासून उत्पन्न झालेल्या, श्रीशंकरांच्या अर्चनेमुळे मान्यता पावलेल्या व श्रीशिवलिंगांनी युक्त असे तीर असलेल्या श्रीनर्मदादेवी ! तुझा जयजयकार असो ! तू आमचे पाप हरण कर.

हे श्रीनर्मदादेवी माते ! हे श्रीशिवसुते ! तुला प्रातःकाळी वंदन असो. ज्ञानी लोकांना मान्य असलेल्या हे मेकलकन्ये ! तुला रात्री वंदन असो. हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझे जल हे शाश्वत आणि सत्य असून सर्व आधीव्याधींचा नाश करणारे व सर्व तऱ्हेचे विष समूळ उपटून काढणारे आहे. (या अपूर्वतेमुळेच) तुला नमस्कार असो. तू मला सुख दे. ॥१॥

श्रीशिवशरीरापासून उत्पन्न झालेली, देव आणि मानवांना माननीय व वंदनीय असलेली, सिद्ध व महात्मे लोकांनी युक्त असलेली अर्थात् अनेकानेक सिद्धमहात्म्यांची तीरावर वस्ती असलेली ही श्रीनर्मदानदी जणूकाही त्वरा झाल्याप्रमाणे पश्चिम

... ४३

समुद्राकडे जाते. सहस्त्रार्जुनाने अडविलेली, भजकांच्या दोषांचे हरण करणारी, श्रेष्ठ धर्माचे आचरण करणारी, सुंदर वेष परिधान करणारी व उत्कृष्ट रीतीने श्रृंगार केलेली ही श्रीनर्मदानदी आपल्या सुंदर शरीराने आणि अत्यंत वेगाने वाहत असल्यामुळे शोभून दिसते. ॥२॥

जिच्या तीरावर देवांनाही दुष्कर असे कठीण आणि श्रेष्ठ तप करून अत्रिभार्या अनसूयेने जन्मरहित अशा त्रिभुवनपूज्य ईश्वराला अर्थात् श्रीदत्तात्रेयांना आपल्या स्वपुत्ररूपाने प्राप्त करून घेतले त्या आमचे दैवत असलेल्या श्रीनर्मदादेवी मातेला कोण बरे वंदन करणार नाही ? ॥३॥

विन्ध्यपर्वताच्या पायथ्याशी अडखळत अर्थात् खळखळाट करीत समुद्राकडे जाणारी, प्रचंड वेगशालिनी, अखंड स्वस्वरूपिणी, सकल पातकांचा नाश करणारी, अत्यंत भाग्यशालिनी, श्रेष्ठ भाव असलेली आणि सर्व संसारभयाचे हरण करणारी अशी ही श्रीरेवा आपल्या सामर्थ्याने अनेक पर्वतांचा भेद करीत या विश्वातील (मृत्युलोक, स्वर्लोक किंवा भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्य इत्यादि सर्व) विविध लोकांना पवित्र करते. ॥४॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! सुरवरांनी वेष्टित असलेल्या अशा अमरकंटकपुरात तुझा जन्म झाला आहे हे प्रसिद्धच आहे. प्रसिद्ध असे नेमावर अर्थात् सिद्धपूर हे तुझे नाभिस्थान असून भृगुकच्छ अर्थात् भडोच येथे तू महासमुद्रात लीन होतेस. हे श्री र्मदादेवी माते ! तू जगातील मलिन बुद्धीच्या लोकांना सद्बुद्धी देऊन त्यांचा उद्धार व पोषण करणारी असून तू आपल्या भक्तगणांना उत्तम गती प्राप्त करून देतेस. ॥५॥

सत्स्वरूप अशा श्रीसरस्वतीनदीचे जल हे (जीवांना) तीन

दिवसांमध्ये पवित्र करते, श्रीयमुनानदीचे जल हे सात दिवसांमध्ये पवित्र करते, सर्व पापविनाशीनी व प्रचंड लाटांनी युक्त अशी श्रीगंगा जीवमात्राला तत्काळ शुद्ध करते; मात्र अत्यंत श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व असलेली ही श्रीनर्मदानदी कोणत्याही रीतीने तिचे नुसते दर्शन घेतले असता जीवमात्राला पवित्र करते. ॥६॥

या पर्वतकन्या श्रीनर्मदानदीची शोभा अर्थात् सौंदर्य समुद्रापर्यंत अत्यंत सहज रीतीने व सुलभतेने दिसून येते. परंतु आत्यंतिक पापाचे हरण करणारी व उत्तम गतीने युक्त असलेल्या श्रीनर्मदानदीची शोभा श्रीशंकरांच्या ॐकारेश्वर नावाच्या क्षेत्रात, वौरा नावाच्या क्षेत्रात आणि श्रीभृगुमहर्षींमुळे प्रसिद्ध पावलेल्या भृगुकच्छ अर्थात् भडोच या तीन ठिकाणी सहज सुलभ नाही म्हणजे येथील श्रीनर्मदानदीच्या सौंदर्याचा आस्वाद घेण्यासाठी खूपच कष्ट पडतात. ॥७॥

जगातील श्रीगंगा इत्यादि श्रेष्ठ नद्या श्रीप्रयागक्षेत्रासारख्या मोठ्या ठिकाणीच जीवमात्राला पापापासून मुक्त करतात अर्थात् त्यांना पवित्र करतात. मात्र या नद्या जीवांना आपल्या तीरावरील सर्व ठिकाणी पापापासून मुक्त करीत नाहीत. परंतु आपल्या दोन्ही तटावर देवाधिपती श्रीशिवांची स्थाने असलेली अर्थात् श्रीशिवांनी सेवन केलेली ही श्रीनर्मदानदी समुद्राशी एकरूप होईपर्यंत असलेल्या आपल्या तीरावरील कोणत्याही स्थानी जीवांना पवित्र करते. ॥८॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझ्या तीरावर मृत झालेल्या जीवमात्राला श्रीशिवस्थानाला घेऊन जाण्यासाठी त्रिशूल चिन्हाने अंकित असलेली अशी सुंदर व असंख्य विमाने घेऊन शिवदूत हे सतत येथे उभे असतात. अशा प्रकारे मृतजीवाला श्रीशिवलोकाला

मी नेणार, मी नेणार असे ते सर्व शिवदूत म्हणत असल्याने "अहमहमिका" असा शब्द मोठ्याने निर्माण होतो. ॥९॥

हे श्रीनर्मदादेवी माते! ज्यावेळी यमदूत हे मृत जीवाला यमपुरीमध्ये घेऊन जाण्यासाठी तुझ्या तीरावर येतात त्यावेळी येथे मुळातच उपस्थित असलेल्या शिवदूतांच्या अहमहमिका शब्दाने ते धैर्यहीन होतात. जरी हे यमदूत धैर्यशाली असले तरी उपरोक्त शब्दांमुळे त्यांच्या अंतःकरणाचा थरकाप झाल्याने ते अधीर होऊन तेथून परत फिरून वेगाने आपल्या ठिकाणी निघून जातात. हे श्रीनर्मदादेवी माते! खरोखर तुझ्या तीरावर येऊन (तुझे दर्शन, स्नान व पान करणारा) कोण बरे नरकाचा धनी असेल? अर्थात् कोणाला बरे नरकाची प्राप्ती होईल? ॥१०॥

असा हा मृत्युंजयकन्या म्हणजे श्रीशंकरांची कन्या असलेल्या श्रीनर्मदानदीचा महिमा आहे. यामुळेच ही श्रीनर्मदानदी मनुष्यांच्या जन्म–मरणाचा नाश करणारी आहे. ती याकरिताच प्रसिद्ध आहे. ज्याला सतत मृत्यूचे भय असते असा कोणता दुर्भागी जीव आपल्या संपूर्ण पापतापांचे प्रशमन करणाऱ्या या श्रीनर्मदादेवीची सेवा करणार नाही? ॥११॥

श्रीनर्मदानदीच्या जलाला स्पर्श झालेला वायू हा आपल्या गतीच्या योगाने वाहत असताना ज्या सज्जनाला स्पर्श करतो त्याला सुद्धा तो पवित्र करतो. अशा प्रकारचे जिचे माहात्म्य प्रचीतीस आले आहे ती या जगात जीवांना अभय देणारी व उत्तम गती देणारी आहे. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्रीनर्मदादेवीच्या ठिकाणी सतत आसक्त असणाऱ्या व तिचे अखंड भजन करणाऱ्या व्यक्तीचा ती उद्धार करणार नाही काय? ॥ १२ ॥



हे श्रीनर्मदादेवी माते! तुझे जल अमृतमय, शाश्वतसुखाने

भरलेले, प्राशन करण्यास उत्तम, आयुष्य वाढविणारे, बुद्धी देणारे, तेजस्वी, निर्भयता देणारे, यश प्रदान करणारे, डोळ्यांची शक्ती वाढविणारे, विजय देणारे, स्वर्गदायी, अविनाशी, महान् सज्जनांनी स्तविलेले, सर्व जगाला आरोग्य आणि विजय देणारे असे आहे. ।।१३।।

(त्याप्रमाणेच) हे श्रीनर्मदादेवी माते! तुझे जल सर्व देवांनी प्रार्थिलेले पथ्यकारक अर्थात् हितकारक, सर्व जगाला पूजनीय, धन्य, सर्व रीतीने पापहारक व निसर्गत: अर्थात् सहज मिळणारे असे आहे. त्यामुळेच तुझे जल या जगात पूज्य आहे आणि (ते सतत) विजय देणारे आहे. (अशा प्रकारचा जिच्या जलाचा महिमा आहे) ती श्रीनर्मदादेवी स्वत:चे कर्तव्य म्हणून (अथवा श्रीशिवाज्ञेने) मनुष्याच्या संसाररूपी वणव्याचे शमन करते. मनस्वी लोकांनी जिचे स्तवन केले आहे अशी ही सर्वश्रेष्ठ श्रीनर्मदानदी आमचे सर्व संकटांपासून नेहमी रक्षण करो. ।। १४ ।।

हे श्रीनर्मदादेवी माते! स्वत:च्या मनाचे संयमन करून केवळ तुझ्या निर्मल पाण्याचेच सेवन करण्याचा नियम असलेले जे लोक तुझी प्रदक्षिणा अर्थात् परिक्रमा करतात ते सुपुत्र या जगात कृतार्थ आणि बहुमान्य होतात व त्यांना श्रेष्ठ अशी गती प्राप्त होते. श्रीशिवशरीरापासून उत्पन्न झालेली ही श्रीनर्मदानदी अशा प्रकारे म्हणजे परिक्रमा करणाऱ्यांना श्रेष्ठ गती प्राप्त करून देऊन अखंड विजयी होते. ।। १५ ।।

हे देवांनी (तुझ्या) गुणांची स्तुती केलेल्या व सर्व मर्त्य लोकांना तारणाऱ्या श्रीनर्मदादेवी माते! तू तुझ्या क्षणैक स्नानाने सुद्धा श्रेष्ठ गती व इष्ट वर देतेस. त्यामुळे देवसुद्धा तुझे तीर सोडण्याची इच्छा करीत नाहीत. तुझ्या असंख्य गुणांचे वर्णन करण्यास कोण समर्थ आहे? ।। १६ ।।

श्रीनर्ममानदीच्या सर्वश्रेष्ठ पाण्यामध्ये महामायावी, स्वतःचे हित साधणाऱ्या व निर्भय अशा राक्षसाने पार्वतीच्या सुताचे म्हणजे श्रीगणेशाचे मस्तक उडवून फेकून दिले. त्यावेळी अतर्क्य महिमा असलेल्या ईश्वराच्या अर्थात् श्रीगणेशाच्या मस्तकातून गळणाऱ्या रक्ताच्या स्पर्शामुळे या श्रीशिवसुतेच्या निर्मल जलामध्ये समुद्रापर्यंत असंख्य रक्तवर्णीय शिला निर्माण झाल्या. हे श्रीनर्मदादेवी माते! श्रीगणेशस्वरूप असलेल्या, श्रेष्ठ लोकांकडून पूजनीय अशा सर्व तऱ्हेच्या मलांचे क्षालन करणाऱ्या व जीवांना वर देणाऱ्या अशा तुझ्या तीरावर पसरलेल्या त्या शिला सुद्धा विघ्नांचा नाश करण्यामध्ये कुशल आहेत. ।। १७.१८ ।।

हे श्रीनर्मदादेवी माते ! या तुझ्या अमृताशी स्पर्धा करणाऱ्या प्रचंड जलामध्ये ॐकारेश्वर नावाच्या श्रेष्ठ नगरीच्या पूर्वी म्हणजे ही नगरी वसण्याच्यापूर्वी रात्रीच्यावेळी अतिशय उंच स्थानावरून पडलेल्या शिला श्रीशंकरांचे " बाण " ही संज्ञा धारण करणारी लिंगे झाली आहेत. ।। १९ ।।

त्यातील काही बाण अतिशय सूक्ष्म आहेत तर काही अत्यंत मोठे आहेत. काही बाण शुभ, काही शुभ्र कर्पूरवर्णाचे तर काही चंद्रकलेने युक्त असे आहेत. यातील इतर काही बाण विविध रंगांचे आहेत आणि या सर्वही बाणांची आराधना केली असता ते श्रीशंकरांचे सान्निध्य देणारे आहेत अर्थात् सायुज्य मुक्तिदायक आहेत. असा हा श्रीरेवानदीच्या जलाचा महिमा आहे. ।। २० ।।

अशा प्रकारचा प्रभाव असलेल्या हे भगवती श्रीरेवादेवी माते! तुझा जयजयकार असो. मी सतत तुझ्या पाण्याचे सेवन करतो. तू माझ्यावर प्रसन्न हो. हे श्रीनर्मदेदेवी माते ! तुला वारंवार नमस्कार असो. हे सुखदायिनी ! हे शिवतनये ! तुला अखंड नमस्कार असो. ।। २१ ।।

वंदन करणाऱ्यांचे दोष हरण करणारी, नमस्कारानेच संतुष्ट होणारी, महासमुद्राची पत्नी असलेली आणि क्रोध नष्ट झालेली ही श्रीनर्मदादेवी माता आमचे रक्षण करो. अनुपम अशा शृंगार केलेल्या, नानाविध माला धारण करणाऱ्या, दिव्यवेष परिधान करणाऱ्या, सर्व भक्तांचे पोषण करणाऱ्या व विशेष रीतीने वाहणाऱ्या श्रीनर्मदादेवी मातेचा जयजयकार असो ! ॥ २२ ॥

सज्जनांच्या मनाप्रमाणे निर्मल आणि दिव्य जल असलेली, विरक्त योग्यांनी तीराचा आश्रय घेतलेली, वीरांनी पूजिलेली आणि अखण्ड व परिपूर्णस्वरूप असलेली अशी श्रीरेवादेवी माता आमचे रक्षण करो. ॥ २३ ॥

आपल्या भक्तांना वर देणाऱ्या, असुरांना अभेद्य असे कवच देणाऱ्या, चांगली आणि वाईट गती देणाऱ्या, सर्व कर्मांचा नाश करणाऱ्या, दुःख नष्ट करणाऱ्या आणि सद्धर्माची प्राप्ती करून देणाऱ्या लोकांच्या कामना पूर्ण करणाऱ्या हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझा जयजयकार असो. तुला वन्दन असो. तू प्रसन्न हो. ॥ २४ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझ्या मूलभागी श्रीअमरेश्वर महादेव शोभून दिसतो. तुझ्या तीरावर श्रीसिद्धनाथ महादेव निवास करतो. श्रीकावेरीनदीने वेढलेला व सद्गती देणारा श्रीॐकारेश्वर महादेव आणि इतर असंख्य अशी शिवलिंगे तुझ्या तटावर विराजमान झालेली आहेत. ही सर्वही शिवलिंगे भक्तजनांना इष्ट फल देणारी आहेत. अशी सर्व इष्टफले देणारी ही श्रीनर्मदादेवी माता सर्वश्रेष्ठ आहे. ॥ २५ ॥

हे प्रचंड वेगशालिनी श्रीनर्मदादेवी माते ! माझे संपूर्ण पाप नष्ट कर. सर्वांना पूज्य असलेल्या हे श्रीरेवादेवी ! माझ्यावर अपार करुणा कर. दुष्टांचे सामर्थ्य नष्ट करणाऱ्या आणि देवांना मान्य असलेल्या

हे विमल अर्थात् शुद्ध श्रीनर्मदादेवी माते ! माझ्या मनाची संपूर्ण अशुद्धी आणि भय तत्काल नष्ट कर. ॥ २६ ॥

ज्याच्या स्मरणानेच भाविकांच्या कलिमलाचा तत्काळ नाश होतो, जो स्मरणानेच भाविकांच्या जवळ येऊन त्यांचे संसारभय हरण करतो, जो स्मर्तृगामी आहे आणि जो भक्तांना स्वतःचे दान करतो त्या प्रशान्तचित्त असलेल्या श्रीदत्तात्रेयांच्या मातेचे स्थान जिच्या तटावर शोभून दिसते, त्या पवित्र सुखदायी श्रीनर्मदादेवी मातेचा विजय असो. ॥ २७ ॥

श्रीनर्मदानदीच्या तीरावरील श्रीअनसूयेच्या पवित्र आश्रमात कुष्ठादि रोगांनी ग्रासलेला मनुष्यसुद्धा मुक्त होतो. या महानदीमधील शुक्लादि तीर्थे ही जीवमात्राला तत्काळ पवित्र करतात आणि ही पवित्र नदी दुर्गतीला गेलेल्या जीवाला "नारायणबली" या प्रेतश्राद्धाने मुक्त करते. अशा या श्रेष्ठ, कल्याणदायिनी आणि दुःखहरिणी श्रीनर्मदादेवीची वासुदेवाने स्तुती केली आहे. ॥२८॥

हे संसाराचा नाश करणाऱ्या श्रीनर्मदेदेवी ! तू माझे सर्व कष्ट हरण कर आणि मला अभय दे. श्रीशिवस्वरूप असलेल्या हे श्रीनर्मदा-देवी माते ! तू माझे सर्व पाप हरण कर आणि मला विनय दे. ॥२९॥

हे श्रीशंकरतनये श्रीनर्मदादेवी माते ! तुझा अखंड जयजयकार असो. तू सुख देणारी आहेस. सर्व लोकांना वन्द्य असलेल्या हे श्रीनर्मदादेवी ! तुझा जयजयकार असो. तू धर्म देणारी व अधर्माचा नाश करणारी आहेस. सत्कीर्ती असणाऱ्या हे श्रीनर्मदेदेवी ! तुझा जयजयकार असो. तू धर्मबुद्धी व धर्मकाया देणारी आहेस आणि तू जीवमात्राच्या कर्माचा नाश करणारी आहेस. तू पुष्टी अर्थात् सुख देणारी व संरक्षण करणारी आहेस. हे भूतलावर कृतार्थ असलेल्या श्रीनर्मदादेवी माते ! तुझा अखंड जयजयकार असो !

॥ अशा रीतीने श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद-सरस्वतीस्वामीमहाराज यांनी रचलेल्या श्रीनर्मदालहरीचे भाषांतर पूर्ण झाले. ॥

श्रीस्वामीमहाराज ! आपण मंत्रगर्भ श्रीनर्मदास्तोत्राची रचना करून श्रीनर्मदादेवीला वारंवार वंदन करून तिच्या चरणी ज्याप्रमाणे मोहाच्या नाशाची, यातनारूप अग्निशमन करण्याची, मोक्षप्राप्तीची, संयमाची, चित्तस्थैर्याची, कलिमल नष्ट करण्याची, भवरूपी विष हरण करण्याची, धर्मप्राप्तीची, वासनांपासून मुक्त होण्याची व शेवटी शिवसामरस्याची जी मागणी केली आहे त्याप्रमाणेच आम्हाला या सर्व गोष्टींची प्राप्ती व्हावी व आम्ही आपल्या अतर्क्य, दिव्य व स्वसंवेद्य ब्रह्मस्वरूपाशी एकरूप व्हावे म्हणून या स्तोत्राचे गान करून अशीच प्रार्थना आपल्या परमकोमल, परमपवित्र व परमदिव्य चरणकमलाशी प्रस्तुत करीत आहोत. या स्तुतीचा आपण स्वीकार करून आम्हाला " सा काष्ठा सा परागतिः । " अशा उपनिषदोक्त धन्यतेच्या व कृतार्थतेच्या अंतिम अवस्थेला नेऊन पोहोचवावे अशी आपल्या चरणकमली प्रार्थना आहे.



## ॥ मन्त्रगर्भश्रीनर्मदास्तोत्रम् ॥

वारितानर्थसंघाया अनन्यनतमुक्तये ॥
सुष्टुशर्म निदानायै नद्यैपुंमोहसंहृते ॥ १ ॥
देवर्षिदानवेड्यायै सूक्ष्मवस्तुदृशे नमः ॥
वाक्यार्थायै सोमपुत्र्यै यातनानलशान्तये ॥२॥

नंदायै नर्मदायै ते त्रिधाकर्मविशुद्धये ॥
दयादमःस्थैर्यकर्त्र्यै संसिद्ध्यै देवतात्मने ॥३॥
सत्यसंप्राप्तिकारिण्यै भूत्यैसंतुष्टिहेतवे ॥
रम्यायै तत्त्वरूपिण्यै तपस्व्यभ्यंतरात्मने ॥४॥
स्वच्छस्वर्नद्यविस्वांबु दमितत्रासिभीतये ॥
तीव्रशर्महृतेपुं हृत्तापघ्न्ये हितकीर्तये ॥५॥
कृतापदाविमोक्षायै त्रेधाधर्मांगमूर्तये ॥
तपोदायै तपःसिध्यै यज्ञांग्यै विषभीहृते ॥ ६ ॥
रेवायै नरतापघ्न्यै दिव्यायै षड्द्विषध्दृते ॥
वासना मोक्षदक्षायै गंगायै सत्यकीर्तये ॥ ७ ॥
स्तुतायै नित्यदीप्तायै बलिसर्पददुध्दृते ॥
तितिक्षु शिवसंधात्र्यै रत्यैचेतःसमाधये ॥ ८ ॥
जय जय शिवकन्ये नर्मदे शर्मदे त्वम् ।
जय जय जनमान्ये धर्मदेऽधर्मदे त्वम् ॥
जय जय सुवदान्ये धर्मदे कर्मदे त्वम् ।
जय जय भुविधन्ये भर्मदे वर्मदे त्वम् ॥ ९ ॥

॥ इति श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविचर्चित
मंत्रगर्भश्रीनर्मदास्तोत्रं संपूर्णम् ॥



# ॥ सार्थ मंत्रगर्भश्रीनर्मदास्तोत्र ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तू अनन्त अकल्याणकारक गोष्टींचा नाश करतेस. तू अनन्य भावाने शरण येणाऱ्याला उत्तम प्रकारचे सुख अर्थात् भोग देतेस आणि शेवटी मुक्तीही देतेस. मनुष्याच्या सर्व मोहाचा नाश करणाऱ्या श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥१॥

हे नर्मदादेवी माते ! देव, ऋषी आणि दानवांनी तुझे अखंड स्तवन केले आहे. तू ब्रह्मवस्तू जाणणारी आहेस. तू महावाक्यस्वरूप अर्थात् अहं ब्रह्मास्मि, तत्त्वमसि, प्रज्ञानं ब्रह्म व अयमात्माब्रह्म या चार महावाक्यस्वरूप श्रीशिवकन्या आहेस. सर्व प्राणिमात्रांचा यातनारूपी अग्नी शान्त होण्यासाठी श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ २ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तू आनन्ददायिनी आहेस. तू कायिक, वाचिक व मानसिक अशा तीन प्रकारच्या कर्मांची शुद्धी करणारी आहेस. तू दया आणि संयम यांचे स्थैर्य चित्तात अर्थात् अंतःकरणात निर्माण करतेस. सर्व जीवमात्रांना मोक्ष प्राप्ती व्हावी म्हणून देवतास्वरूप श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ ३ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तू सत्तत्त्वाची प्राप्ती करून देणारी आहेस. तूच एकमात्र साधनेचे कारण आहेस. तुझे तात्त्विकस्वरूप किंवा तत्त्वस्वरूप अत्यंत रमणीय आहे. तूच सर्व तपस्व्यांचे अंतरंग-रूप आहेस. सर्व जीवमात्रांना ऐश्वर्याची प्राप्ती व्हावी म्हणून श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ ४ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तू स्वर्नदीपेक्षा आणि श्रीगंगेपेक्षा श्रेष्ठ व स्वच्छ पाण्याने ओतप्रोत भरलेली असून संसारतापाने त्रासलेल्या सर्व जीवांची भीती नष्ट करणारी आहेस. तू जीवमात्रांना आत्यंतिक

कल्याणाची प्राप्ती करून देतेस. तू सर्व मनुष्यांच्या अंत:करणातील मल नष्ट करतेस. सर्व जीवमात्रांना सत्कीर्ती प्राप्त व्हावी म्हणून श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ ५ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! जीवाला प्राप्त होणाऱ्या सर्व संकटांपासून तू मुक्त करतेस. तू तीन प्रकारच्या धर्मांची साक्षात् मूर्तीच आहेस. तू तपाचे दान अर्थात् तप करणाऱ्याला स्फूर्ती व तपाची सिद्धी देतेस. तू साक्षात् यज्ञस्वरूपच आहेस. सर्व जीवमात्रांचे भवरूपी विष हरण व्हावे म्हणून श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ ६ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तू मनुष्यांचा ताप घालविणारी आहेस. तू दिव्यस्वरूप व षड्रिपूंचा नाश करणारी आहेस. तू मनुष्याला वासनांपासून मुक्ती देण्यात कुशल आहेस. सर्व जीवमात्राला ब्रह्मज्ञानाची प्राप्ती व्हावी म्हणून श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥ ७ ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! तूच स्तुती करण्यास योग्य आहेस. तू नित्य तेजस्वी व तुझ्या तीरावर नारायण नागबली करणाऱ्यांचा उद्धार करणारी आहेस. तुझ्या ठिकाणी अत्यंत श्रेष्ठ प्रकारची तितिक्षा अर्थात् सहनशक्ती आहे. तू (तुझे दर्शन, स्नान व पान करणाऱ्यांना) श्रीशिवांशी एकरूप करणारी आहेस. सर्व जीवमात्रांना ही रती अर्थात् श्रीशिवांशी एकरूप करणाऱ्या सिद्धयोगाचे म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने अनादि निद्रिस्त आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होऊन ती सुषुम्नामार्गाने सहस्रारात गमन करून श्रीशिवसामरस्याचे साधन उपलब्ध व्हावे म्हणून श्रीनर्मदादेवी मातेला नमस्कार असो. ॥८॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! हे श्रीशंकरतनये ! ! तुझा निरंतर जयजयकार असो. तू सुख देणारी आहेस. सर्व लोकांना वंद्य

असलेल्या हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझा जयजयकार असो. तू धर्म देणारी व अधर्माचा नाश करणारी आहेस. सत्कीर्ती असणाऱ्या हे श्रीनर्मदादेवी माते ! तुझा जयजयकार असो. तू धर्म देणारी अर्थात् प्राण सुषुम्नागामी करून साधकाच्या कर्माचा नाश करणारी आहेस. तू पुष्टी अर्थात् सुख किंवा भोग देणारी व संरक्षण करणारी आहेस. हे भूतलावर कृतार्थ असलेल्या श्रीनर्मदादेवी माते ! तुझा अखंड जयजयकार असो! ! ॥९॥

॥ अशा रीतीने श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांनी रचलेल्या मंत्रगर्भ श्रीनर्मदा स्तोत्राचे भाषांतर पूर्ण झाले. ॥

हे श्रीनर्मदादेवी माते ! अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे तुझे नुसते स्मरण केले तरी तू भाविक भक्तांचा समस्त कलिमल धुऊन टाकतेस यात काहीच शंका नाही. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे षड्रिपू, जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार व अविद्या हे अष्टबंध, घृणा, लज्जा, भय, शोक, निंदा, कुल, शील व जाती हे अष्टपाश आणि मल, विक्षेप व आवरण या सर्व गोष्टीच कलिमल असून त्या दूर होण्यासाठी त्वत्स्वरूप श्रीस्वामीमहाराजांच्या चरणांना शरण जाऊन त्यांच्या चरणांचाच आश्रय घेणे व "यास्तव तुझिया केशव नमितो पद कमला" असे म्हणून नमन व जयजयकार करून अनन्यभावाने प्रार्थना करणे एवढेच आमच्या हातात असल्यामुळे हीच शब्दांजली आपल्या चरणी अर्पण करीत आहोत.

# ॥ आरती ॥

जय देवी जय देवी जय रेवामाते हो शिवगंगे सरिते।
तुझिया दर्शनी हरती तापत्रय दुरिते ॥ध्रु०॥
शंकरजटेतुनी जो जलबिंदु स्त्रवला।
पुढती वाढत तोची सिंधुमय झाला ॥
घेउनी कन्यारूपा चकवित देवाला।
दीर्घ तपाते करूनी शंकर तोषविला ॥जयदेवी० ॥१॥
त्यांच्या वरप्रसादे अक्षय तू झाली।
भक्तांची हितकर्त्री भूलोकी आली ॥
तारुनिया जडजीवा कीर्ती बहु केली।
दक्षिण गंगा नामे ख्याती मेळविली ॥जयदेवी० ॥२॥
वरिष्ठ देवांनीही तप येथें केले।
सिद्धी प्राप्त करोनी लिंगा स्थापियले ॥
शंकर कैलासाते सोडुनिया आले।
ऐसे महात्म्य तव हे पुराणि ऐकियले ॥जयदेवी० ॥३॥
गंधर्वादिक मानव देवासुर यांनी।
तुझिया वरप्रसादे कीर्ती मेळवूनि ॥
स्थापुनि स्वनामलिंगे उभय तटावरुनि।
ज्याते भजता जाती प्राणी उद्धरुनी ॥जयदेवी० ॥४॥
करुणामय कितीतरी तू उद्धरशी सकला।
भेद नसे तुजशी तो जरि पापी असला।
स्नाने पावन करुनी तारिशी तूं त्याला।
यास्तव तुझिया केशव नमितो पद कमला ॥जयदेवी० ॥५॥


श्रीस्वामीमहाराज आपण श्रीनर्मदा महानदीशी एकरूप होऊन

आपली जीवनलीला संपविलीत व या भरतखंडातील प्राणिमात्राच्या कल्याणासाठी श्रीनर्मदामातेच्या रूपाने अखंड प्रवाहित झालात. तिच्या पवित्र जलप्रवाहाच्या रूपाने जरी आम्हाला आपले दर्शन होत असले तरी एकदा आपल्या प्रत्यक्ष विग्रहामध्ये अर्थात् रूपामध्ये दर्शन होऊन आपल्या परमपवित्र व परमकोमल चरणांवर मस्तक ठेवून मन शांत करावे असे वाटते. जरी आपल्या परमपवित्र चरणांवर मस्तक ठेवण्यास आम्ही पात्र नसलो तरी आपण आमच्या पात्रापात्रतेचा विचार न करता आम्हाला पदरात घ्या. हे प्रभो ! आपल्या चरण वियोगामुळे आमचे प्राण खरोखरच अगदी व्याकुळ झाले आहेत. ते अगदी कंठाशी आले आहेत. त्यामुळेच आपले परमभक्त व पूर्वाश्रमातील धाकटे बंधू श्रीसीताराममहाराज यांनी एका पदात स्वतः म्हटल्याप्रमाणे " कधि मजसी भेट देशी गुरुराया सांग बा। तुजविण या जगीं त्राता अन्य नसे कोणि बा ।। " या प्रार्थनेप्रमाणे आपल्या चरणांपाशी आपल्या भेटीची अत्यंत कळकळीने, अनन्यभावाने व करुणरसाने परिप्लुत होऊन प्रार्थना करीत आहोत. आमची ही अत्यंत विरह-संपन्न अवस्था परमावधीला जावी व अत्यधिक विरहामुळे गोपींचा सर्व अहंकार गळून गेल्यामुळे त्यांना ज्याप्रमाणे श्रीगोपालकृष्ण-नाथांची प्राप्ती झाली त्याप्रमाणे आमचा अहंकारही आपल्या विरहाग्नीत जळून जाऊन आपले दर्शन व्हावे अशी अनन्यभावाने आपल्या चरणी प्रार्थना आहे. आपण ती मान्य कराल ना ? आम्हा बालकांची प्रार्थना अमान्य करून आमचा विरस करू नका. प्रभो ! कृपा करा ! कृपा करा !! कृपा करा !!!

श्रीस्वामीमहाराज ! आमची ही आपल्या चरणकृपेची प्रार्थना मान्य करून मोठ्या आपण " प्रार्थि तुला सितारामा दर्शन दे

लवकरी " या मागणीप्रमाणे दर्शन देऊन कृतार्थ करावे एवढेच पुन्हा एकदा अनन्यभावाने आपल्या चरणी प्रस्तुत करून " यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ।। ज्ञानेश्वरी १४–१५ ।।" अशा रीतीने मौन पत्करून व आपल्या चरणकमली माथा ठेवून थांबतो.



## ।। पद ।।

कधिं मजसी भेट देशी गुरुराया सांग बा ।
तुजविण या जगीं त्राता अन्य नसे कोणि बा ।।धृ०।।
तोयविना मत्स्य जैसा तडफडुनी राहतो ।
धेनुविना वत्स जैसा हंबरुनीं पाहतो ।।
चातक तो मेघमार्गा दिनरात्रीं लक्षितो ।
त्वद्विरहा न साहेची दास तुला बाहतो ।।कधिं० ।।१।।
भवडोहीं बुडुनि जातों घालिं उडी झडकरी ।
अजि सखया रूसुं नको तूं धरिं हाता मम करीं ।।
भक्तांचा सारथी तूं स्मृतिवाक्या मनिं धरीं ।
ब्रीद तुझें बा न सोडी ह्या दीना उद्धरी ।।कधिं० ।।२।।
मोहादि जलचर हे बहु मजला भक्षिती ।
तृष्णेच्या लहरि मोठ्या अज्ञजळीं बुडविती ।।
शब्दादि विषय हेचि वायुरूपें पीडिती ।
नावाडी बनुनि ज्ञानोडुपिं मज तूं बैसवी ।।कधिं० ।।३।।
हो शास्ता षड्रिपूंसी दे मजला ज्ञान तें ।
तव चरणीं अर्पियेले मन माझें सत्य तें ।

स्वस्वरूपाचें लागलें मम चित्ताला ध्यान तें ।
प्रार्थि तुला सिताराम दर्शन दे लवकरी ।।काँध० ।।४।।



## ।। प्रातःस्मरणयुक्त ध्यान ।।

## ।। श्रीगुरुस्तोत्रम् ।।

नमः श्रीगुरो मेशधीशो दयाब्धे ।
भयार्तिघ्नते स्वात्मदो वासुदेव ।।
यतीट्सेवितानन्दपादाब्जयुग्मं ।
सदा मे हृदि स्थास्नुतां यातु देव ।।१।।
भक्तिश्रद्धे देहि मे ते दयालो ।
दासो दीनो भावतापेन तप्तः ।।
सर्वैस्त्यक्तो द्वारि तेऽत्र प्रसंस्थोऽ - ।
हं मां मातः पालयाऽद्य स्वबालम् ।।२।।
आलोक्य मामच्युत ईश्वरोऽपि ।
भीतोऽगमत्सागरसूरशैलान् ।।
सत्यं तथा च तव हृत्कमले स्थितो यः ।
श्रान्तः स्व दर्शय यते गुरुवासुदेव ।।३।।
मा भीरिति वचनं मे देहि दयालो गुरो यतिश्रेष्ठ ।।
नान्यो मे रक्षार्थं धावति भोः श्रीगुरो जगन्मातः ।।४।।
त्वयि भक्ति मे वर्धय दुर्हृतम ईश नाशय अशेषं ।।
यच्च तवेष्टं तत्कुरु मयि भोः सर्वज्ञ वक्तुमसमर्थः ।।५।।
भक्ति च मे वर्धय भोत्स्वदीये ।

रूपे तथा नाशय हृत्तमश्च ।।
दुर्वासनाश्च गुरुवर्य दयानिधे ते ।
यच्चेष्टमेव करु तन्मयि सार्वभिज्ञ ।।६।।
मा भीश्च भोस्तेऽस्त्वभयं सदैव ।
याचेऽहमेतद्वचनं गुरो ते ।।
अज्ञोऽहमीश करुणाघन वासुदेव ।
रक्षस्व मां सर्वत एव सर्वदा ।।७।।
प्रसीद मे सागस आर्तबन्धो ।
कारुण्यसिन्धोऽनुपमास्तबन्धो ।।
बन्धो मृषापि व्यथयत्ययं मां ।
स्वप्नोपमं छिन्ध्यवसर्व तो माम् ।।८।।



## ।। श्रीसद्गुरुप्रार्थना ।।

पापी नास्ति हि मत्समो गुरुवर ब्रह्माण्डभाण्डोदरे ।
हर्ताऽघस्य च नास्ति नास्ति हि समस्त्वादृग्दयासागर ।।
अन्याधारविहीनमीश भगवन् दीनं ग्रहग्रासितम् ।
रक्षस्वाद्य च वासुदेव गुरुवर्याऽऽद्य प्रभो मां भवात् ।।



## ।। भजन ।।

पितांबराची कास कसूनी शेला झळकला ।
गरुडावर बैसोनि माझा कैवारी आला ।।

## परिशिष्ट क्रमांक १

# ॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर माहात्म्य ॥

**श्रीक्षेत्र गरुडेश्वर कसे निर्माण झाले : –**

श्रीदत्तावतार परमसमर्थ सद्गुरू श्रीमद् वासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी आपल्या जीवनाची अंतिम लीला ज्या ठिकाणी केली ते ठिकाण श्रीक्षेत्र गरुडेश्वर हे अतिवृष्टी, अकाल आदि अनिष्टांचे नाश करण्यास समर्थ असून ते या भूमीवर वैकुंठासारखे प्रसिद्ध तीर्थक्षेत्र झाले आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वर हे क्षेत्र म्हणून कसे निर्माण झाले याचा इतिहास असा आहे.

प्राचीन काळी या ठिकाणी गज नावाचा असुर राहात होता. एकदा त्याने हत्तीचे रूप धारण करून गरुडाबरोबर भयंकर युद्ध केले. त्या युद्धात गरुडाने गजासुराचे प्राण हरण केल्यावर त्या दैत्याची हाडे एका पर्वतावर जाऊन पडली. पुढे पावसाळ्यात ती पर्वतावरील गजासुराची हाडे श्रीनर्मदानदीत जाऊन मिळाली. त्याबरोबर श्रीनर्मदानदीच्या दिव्य पाण्याच्या स्पर्शाने गजासुर जिवंत होऊन त्याचे शरीरही दिव्यरूप झाले. या स्थानाचा इतका अपार महिमा आहे असे लक्षात आल्यावर गजासुराने त्या ठिकाणी १०० वर्षे अत्यंत कठोर तपश्चर्या केली. गजासुराने आपल्याला प्राप्त झालेल्या दिव्य शरीराने जी तपश्चर्या केली त्यामुळे श्रीभोलेनाथ शिवशंकर प्रकट होऊन त्याला असे म्हणाले की, “तपश्चर्येमुळे मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे, तरी तू मला इष्ट असा वर माग.” त्यावेळी गजासुर भगवान् श्रीशिवशंकरांना वर मागताना असे म्हणाला की, “या स्थानाशी माझे नाव

कायमचे जोडलेले राहावे आणि अनंतकालपर्यंत येथे येणाऱ्या लोकांना सत्कर्मे करण्याची बुद्धी व्हावी. याचा अर्थ असा की, जे कोणी या ठिकाणी येऊन स्नान, संध्या, देवपूजन, तर्पण, ब्राह्मणभोजन, दान इत्यादि सत्कर्मे करतील त्यांची पापे तत्काळ नष्ट व्हावीत. त्याचप्रमाणे अमावस्या, संक्रांत इत्यादि पर्वविशेष, ग्रहण, व्यतिपात, अधिकमासातील रविवार व सोमवार या दिवशी जे लोक स्नान, दानादि सत्कर्मे करतील त्यांना त्याचे फळ तत्काळ मिळावे. हे क्षेत्र श्रीक्षेत्र कुरुक्षेत्राप्रमाणे पवित्र व्हावे आणि केवळ या क्षेत्रात येऊन जे कोणी श्रीनर्मदास्नान करतील त्यांच्या सर्व पापांचा नाश व्हावा. त्याचप्रमाणे मला आपल्या गणांमध्ये सर्वश्रेष्ठ स्थान द्यावे आणि माझे कातडे आपण पांघरावे. ज्या ठिकाणी गरुडाच्या हातून माझा मृत्यू झाल्यामुळे मला लाभ झाला त्या ठिकाणचे नाव पुढे येणाऱ्या सर्व युगांमध्ये अक्षय्य राहावे. हे प्रभो शिवशंकरा! हे महादेवा! ! हे सांबसदाशिवा!!! शेवटी माझे आपल्या चरणांपाशी इतकेच मागणे आहे की, आपण या ठिकाणी निरंतर वास करावा आणि येथे येणाऱ्या भक्तांच्या सर्व कामना पूर्ण कराव्यात." अशा रीतीने गजासुरामुळे हे क्षेत्र श्रीगरुडेश्वर या नावाने प्रसिद्ध झाले.

गजासुराची ही प्रार्थना ऐकून श्रीभोलेनाथ शिवशंकरांनी त्रिभुवनात विचरण करताना गजचर्मांबर धारण करण्याचे, श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे अखंड निवास करण्याचे आणि येथे येणाऱ्या भक्तांच्या सर्व मनोकामना पूर्ण करण्याचे गजासुराला वचन दिले.

त्यानंतर भगवान् श्रीसांबसदाशिवांनी गजासुराला या स्थानी "गरुड" नावाने लिंग स्थापन करण्याची आणि श्रीनर्मदेच्या तटावर "करोडीश्वर" लिंगाची प्रतिष्ठापना करण्याची आज्ञा

केली आणि त्याला असे वचन दिले की, "जो मनुष्य या दोन्ही लिंगांची शुद्ध भावाने पूजा करील त्याचा मी उद्धार करीन. त्याचप्रमाणे जो मनुष्य शुक्ल आणि कृष्णपक्षाच्या अष्टमीच्या आणि चतुर्दशीच्या दिवशी दोन्ही लिंगांची पूजा करून जागरण करील त्याच्या २१ पिढ्यांचा मी उद्धार करीन."

त्यानंतर भगवान् श्रीसांबसदाशिव महादेव गजासुराला असे म्हणाले की, "या ठिकाणी श्रीनर्मदानदीत जो बेंबीपर्यंतच्या पाण्यात उभे राहून पितृतर्पण करील त्याच्या पूर्वजांना मी कैलासाला घेऊन जाईन. या स्थानी जो कोणी एका ब्राह्मणाला भोजन देईल त्याला मी लक्ष ब्राह्मणांच्या भोजनाचे पूर्ण फल देईन. या स्थानी ज्याच्या अस्थी श्रीनर्मदा नदीच्या पाण्यात पडतील त्याला मी निश्चितपणे कैलासात स्थान प्राप्त करून देईन आणि शेवटी श्रीमंताच्या घरी त्याला उत्तम जन्म देऊन राजवैभवाचा अनुभव देईन. हे गजासुरा! तूं निःशंक राहा. जो कोणी या स्थानी शिवालय तयार करून अंतःकरणपूर्वक या तीर्थाचे माहात्म्य ऐकील त्याला मी सर्व पापांपासून मुक्त करीन आणि माझ्या चरणांपाशी स्थान देईन." असे सांगून भगवान् श्रीसांबसदाशिव महादेव अंतर्धान पावले आणि खास विमानाने गजासुराला कैलासाला घेऊन गेले. त्या दिवसापासून श्रीनर्मदानदीच्या तटावरील हे स्थान श्रीक्षेत्र गरुडेश्वर या नावाचे पुण्यक्षेत्र बनले. (परमपूजनीय श्रीरंगअवधूतमहाराज विरचित श्रीगुरुलीलामृत, अध्याय १४६).



# परिशिष्ट क्रमांक २

## ॥ श्रीनारदेश्वरतीर्थ माहात्म्य ॥

श्रीनारदेश्वतीर्थाचे माहात्म्य वर्णन करताना श्रीमार्कण्डेय महामुनी असे म्हणाले की, " हे राजश्रेष्ठ युधिष्ठिरा ! यानंतर तू श्रीनारदाने प्रस्थापित केलेल्या परमश्रेष्ठ अशा श्रीनारदेश्वर-तीर्थाची यात्रा कर. " हे ऐकताच श्री. युधिष्ठिर असे म्हणाले की, " हे मुनिश्रेष्ठा ! श्रीनारदांनी हे तीर्थ का व कसे तयार केले ? हे सत्पुरुषश्रेष्ठा ! ! जर तुम्ही माझ्यावर प्रसन्न असाल तर हे सर्व मला सांगा. " हे ऐकताच श्रीमार्कण्डेय महामुनी असे म्हणाले की, " हे पृथुनंदना ! श्रीनारद हे ब्रह्मदेवाचे पुत्र असून ते सर्व मुनींमध्ये श्रेष्ठ आहेत. श्रीनर्मदातीरावर त्यांनी पहिल्या प्रथम तप केले. हे युधिष्ठिरा ! ज्यावेळी तपश्चर्येने श्रीनारदांच्या सर्व नाड्या शुद्ध होऊन सर्व इंद्रियांचा व मनाचा पूर्ण निरोध झाला आणि त्यांना अंतिम स्थिती प्राप्त झाली त्यावेळी त्यांच्या-वर श्रीशंकर प्रसन्न झाले व ते त्यांना असे म्हणाले की, " हे योगिनाथ ! हे अयोनिज ! ! हे ब्राह्मणश्रेष्ठा ! ! ! मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. हे वत्सा ! तुझ्या मनात जी इच्छा असेल तो वर मागून घे. ॥१–५॥

श्रीशंकरांचे हे म्हणणे ऐकताच श्रीनारद त्यांना असे म्हणाले की, " हे शंभो ! आपल्या कृपेने माझा योग सिद्ध व्हावा आणि आपल्या चरणी माझी अचल भक्ती राहावी, मी सर्व वेदवेदांगात पारंगत असा विद्वान् व्हावे आणि माझ्या इच्छेनुसार मला कोठेही संचार करता यावा. हे विश्वनाथा ! मी अखंड त्रिकालज्ञ आणि सर्व गायन प्रकारांचा ज्ञाता व्हावे. हे महेश्वरा ! स्वर्गात, पृथ्वीवर

किंवा पाताळात देव, मनुष्य आणि दानव यांच्यांमध्ये दररोज जे युद्ध चाललेले असते ते मी आपल्या कृपेने पाहू शकलो पाहिजे. मी आपल्याला व माता श्रीपार्वतीला दररोज पाहू शकलो पाहिजे. हे तीर्थ माझ्या नावाने सर्व लोकात प्रसिद्ध व्हावे आणि या तीर्थामुळे सर्व लोकांच्या पापांचा क्षय व्हावा असा आपण मला वर द्यावा. ॥६-९॥

श्रीनारदांनी असे वरदान मागताच श्रीसदाशिव त्यांना असे म्हणाले की, "हे नारदा! तू जे वरदान मागितले आहेस त्याप्रमाणेच सर्व काही होईल यात काहीच संशय नाही. माझ्या कृपेने तू ज्या गोष्टीचे चिंतन करशील त्या त्या सर्व गोष्टी सिद्धीस जातील. हे वत्सा! तू स्वर्ग, पृथ्वी व पाताळ या तिन्ही लोकांत इच्छेनुसार विचरण किंवा भ्रमण कर. तुला कोणीही अडवू शकणार नाही. माझ्या कृपेने तुला संगीतातील सात स्वर, तीन ग्राम, एकवीस मूर्च्छा व एकोणपन्नास ताना प्राप्त होतील. मला जे अत्यंत प्रिय असे दिव्य नृत्य व गीत आहे ते सर्व तुला प्राप्त होईल. देव, दानव व किन्नर यांच्यामधील नित्य युद्ध तू पाहू शकशील. माझ्या अनुग्रहामुळे तुझ्या नावाचे हे तीर्थ पृथ्वीवर परम पुण्यप्रद असे होईल. तू संपूर्ण ज्ञानात कुशल व वेद-वेदांगात पारंगत असा तत्त्वज्ञ होशील. हे नारदा! माझ्या दयेने तू एक निःसंग व आसक्तिरहित असा महात्मा होशील." अशा प्रकारे श्रीनारदांना वरदान देऊन श्रीशंकर अंतर्धान पावले. त्यानंतर हे राजेंद्रा! श्रीनारदांनी सर्व जीवांचे कल्याण करणाऱ्या श्रीशंकरांना लिंगरूपाने अत्यंत प्रेमाने त्या ठिकाणी स्थापित केले." ॥१०-१५॥

अशा प्रकारे श्रीनारदांनी आपल्या नावाने स्थापित केलेले हे श्रीनारदेश्वर लिंगतीर्थ सर्व पृथ्वीमध्ये उत्तम आहे. हे राजश्रेष्ठा!

जो मनुष्य इंद्रियांना जिंकून या तीर्थाला जातो तो कृतार्थ होतो. हे कुंतीनंदना ! या श्रीनारदेश्वर तीर्थात भाद्रपद महिन्यात कृष्णपक्षातील चर्तुदशी तिथीला अत्यंत भक्तीने उपवास व जागरण करावे व शुभलक्षणांनी संपन्न अशा ब्राह्मणाला छत्र दान करावे. जे लोक शस्त्राघाताने मरण पावले आहेत त्यांचे श्राद्ध येथे करावे; कारण येथील पिंडदानाच्या प्रभावाने हे लोक उत्तम लोकात जातात. ॥१६–१८॥

हे भरतवंशोत्पन्न युधिष्ठिरा ! या श्रीनारदेश्वर तीर्थक्षेत्रात "आमचे सर्व पितृगण परमगतीला प्राप्त होवोत," असा उच्चार करून पितरांच्या उद्देशाने कपिला गाय श्रेष्ठ अशा ब्राह्मणाला दान दिली पाहिजे. असे श्राद्ध केल्यामुळे, ब्राह्मण प्रसन्न झाल्यामुळे, श्रीनर्मदाजलाच्या प्रभावाने आणि न्यायोपार्जित धनाच्या दानाने अर्थात् या सर्वांच्या प्रभावाने "प्रेत परमगतीला प्राप्त होवो," असे म्हणून ब्राह्मणाला आपल्या शक्तीनुसार दक्षिणाही दिली पाहिजे. हे विशालनेत्र राजन् ! ह्या श्रीनारदेश्वर तीर्थात ब्राह्मणाला हविष्य म्हणजे पवित्र सात्त्विक अन्नही दिले पाहिजे. त्याचप्रमाणे या क्षेत्रात जो मनुष्य भक्तिपूर्वक शिवमंदिरात दीप प्रज्ज्वलित करील तो सर्व पुण्य फले प्राप्त करून रुद्रलोकात जाईल असे श्रीशंकरांनी स्वतः म्हटले आहे. येथे जो विद्यादान करील तो मनुष्य अक्षयगती प्राप्त करतो. ॥१९–२४॥

हे राजन् ! या तीर्थक्षेत्रात घोडे व धान्याने संपन्न अशा हिरव्यागार शेतीने युक्त अशी भूमी दान दिली पाहिजे. येथे पवित्र मंत्रांनी भक्तिपूर्वक आधिक प्रज्ज्वलित असलेल्या अग्नीला प्रसन्न व तृप्त करावे. हे भारता ! जे लोक या तीर्थक्षेत्रात तूप आणि अन्य हवनीय द्रव्यांनी महेश्वरी भक्तिभावाने यज्ञ

त्रिकाल नृत्य करतात ते धन्य होतात. हे जे श्रीनारदेश्वर नावाचे तीर्थ श्रीनर्मदानदीच्या उत्तर तटावर वसलेले आहे तेथे अग्निदेवाचे वास्तव्य असून सर्व देवमय ऋषींचे येथे वास्तव्य आहे. या ऋषींच्या द्वाराच सर्व देव संतुष्ट होतात. याकरिता येथे विशेषत: अग्निदेवाला प्रसन्न व तृप्त करणे योग्य आहे. येथील अग्निदेवाची पूजा केल्यावर पुन्हा दारिद्रय येत नाही आणि प्रत्येक जन्मात धनामुळे अत्यंत सुख प्राप्त होते. जे लोक असे करतात ते श्रेष्ठ कुलात उत्पन्न होतात. त्यांचा वेष नेहमी सुंदर असतो आणि ते नेहमीच धनाने संपन्न असतात. ज्याप्रमाणे पुरामुळे नदीला, पतीमुळे स्त्रियांना, सदाचारपरायण राजामुळे प्रजेला, धनामुळे मनुष्याला आणि ऋतुमुळे वृक्षाला निघून गेलेले यौवन प्राप्त होते त्याप्रमाणे येथे तप करणाऱ्या माणसांना सर्व प्रकारचे स्वामित्व पुन्हा प्राप्त होते. धनेश कुबेराने या तीर्थातच धनदभाव म्हणजे धनाचे स्वामित्व प्राप्त केले. श्रीनारदेश्वर तीर्थक्षेत्रातच यमाने नियामकत्व आणि वज्रधारी इंद्राने इंद्रपद प्राप्त केले. इतर अनेक राजांनी येथेच तपश्चर्या करून राजपद प्राप्त केले आणि श्रीनारदेश्वराच्या महिम्यानेच ध्रुवाला निश्चलता प्राप्त झाली. श्रीनारदांनी स्थापित केलेले हे श्रीनारदेश्वर तीर्थक्षेत्र सर्व तीर्थात श्रेष्ठ तीर्थ आहे. ते श्रीनर्मदेच्या उत्तरतटावरील पृथ्वीवर समुद्रापर्यंत पसरलेले आहे. हे श्रीनारदेश्वरतीर्थ महापापांचा नाश करणारे आहे. (श्रीनर्मदापुराण, रेवाखंड, अध्याय ७८)

...४६



# परिशिष्ट क्रमांक ३

## ॥ श्रीकरोडीश्वरतीर्थ माहात्म्य ॥

श्रीमार्कण्डेय महामुनी असे म्हणाले की, "हे राजेंद्र युधिष्ठिरा ! आता श्रीकरोडीश्वरतीर्थाचे माहात्म्य ऐक. श्रीनर्मदा प्रदक्षिणा करताना श्रीकरोडीश्वरतीर्थाला अर्थात् श्रीक्षेत्र गरुडेश्वराजवळील या तीर्थक्षेत्राला जावे. या ठिकाणीच आपल्या अनुचरांवरोबर हजारो दानव मारले गेले आहेत. जयाची अपेक्षा असणाऱ्या व निरंतर प्रसन्न इंद्रादि देवांनी त्या दानवांना आणि त्यांच्या पुत्रपौत्रांना आपल्या पूर्वीच्या वैराचे स्मरण करून मारले. संतप्त झालेल्या देवांनी संग्रामात दानवांना मारले आणि त्यांची शिरे घेऊन बंधुभावाचे वारंवार स्मरण करून ती शिरे श्रीनर्मदेच्या जलात टाकून दिली आणि तेथे स्नान करून सर्व देवांनी मिळून श्रीशंकरांची स्थापना केली. त्यानंतर सर्व देवांनी इंद्रावरोवर लोकसिद्धिकरिता भगवान् श्रीशंकरांचे पूजन केले आणि अत्यंत प्रसन्न चित्ताने सर्व देव आकाशात निघून गेले. ॥१–५॥

हे महाभाग्यशालिन् युधिष्ठिरा ! या ठिकाणी देवांनी करोड दानवांचा वध केल्यामुळे त्यावेळेपासून हे तीर्थ पृथ्वीवर "श्रीकरोडीश्वरतीर्थं" या नावाने प्रसिद्ध झाले. हे युधिष्ठिरा ! हे श्रीकरोडीश्वरतीर्थं सर्व पापांचे नाश करणारे आहे. या तीर्थक्षेत्रात शुक्ल व कृष्णपक्षाच्या अष्टमी व चतुर्दशी तिथीला भक्तिपूर्वक उपवास करून श्रीकरोडीश्वर शंकरांच्यासमोर जागरण करावे. त्याचप्रमाणे रात्रभर उत्तमोत्तम कथा वाचाव्यात आणि वेद म्हणावेत. त्यानंतर प्रातःकाल झाल्यावर देवेश्वर भगवान् श्रीशंकरांचे पुन्हा पूजन करावे. त्यावेळी पंचामृताने पूजा करून

श्रीशंकरांना चंदनाने लेपन करावे व अत्यंत सुंदर व श्रेष्ठ अशी पत्रपुष्पे त्यांना प्रयत्नपूर्वक वाहावीत. त्यानंतर दक्षिण दिशेला बसून श्रीशिवमंत्राचा पुन्हा जप करावा. मग पुन्हा त्या मंत्राचा जप करीत करीत शास्त्रोक्त विधानाने दक्षिण दिशेकडे नाभिप्रमाण पाण्यात उभे राहून प्रेताच्या निमित्ताने तिलांजली द्यावी. जितेंद्रिय होऊन या स्थानी ब्राह्मणद्वारा श्राद्ध करावे. ॥६–११॥

या श्रीकरोडीश्वरतीर्थात विद्वान्, सदाचारी व वेदपठनामध्ये तत्पर असलेल्या अशा योग्य ब्राह्मणास गाय, सुवर्ण, भोजन, पादुका व तांबूल दक्षिणादि सर्व भूषणे देऊन त्याचे पूजन करावे. अशा रीतीने ब्राह्मणाला सत्कृत केल्याने करोडोपट अधिक फल मिळते यात काहीच संशय नाही. याबद्दल विचार करण्याचे कारण नाही. हे राजन् ! या श्रीकरोडीश्वरतीर्थात जो मनुष्य शास्त्रीय विधानाने शरीर त्याग करतो त्याला येथे जे पुण्य प्राप्त होते ते तू ऐक. जोपर्यंत मेलेल्या माणसाची हाडे श्रीनर्मदानदीत राहतात तोपर्यंत तो धर्मात्मा मनुष्य परम दुर्लभ अशा शिवलोकात निवास करतो. त्यानंतर पुण्यविशेषाचा भोग संपल्यावर तो तेथून खाली येतो व त्याला पुन्हा मनुष्य जन्म प्राप्त होतो. तेथे त्याची राजाकडून पूजा होते व तो श्रीमंत होतो. त्याचप्रमाणे हा माणूस पृथ्वीवर सर्व धर्मांनी युक्त होऊन बुद्धिमान्, बलशाली, पुत्रवान् व दीर्घायू असा होतो. हे राजश्रेष्ठा ! त्या मनुष्याला पुन्हा जन्म आल्यावर त्याला त्या तीर्थाचे स्मरण होते व तो तेथे जाऊन श्रीकरोडीश्वराची पूजा करून गती प्राप्त करून घेतो. इंद्र, चंद्र, यम, रुद्र, वसू व विश्वेदेव इत्यादि सर्व देवांच्या द्वारा या श्रीकरोडीश्वर शंकरमहादेवांची स्थापना झालेली आहे. जो भक्तियुक्त होऊन लोकांच्या कल्याणाच्या इच्छेने श्रीनर्मदेच्या

उत्तर तटावर भवन निर्माण करतो आणि न्यायाने कमावलेल्या धनाने त्या तीर्थात दगड, विटा इत्यादींनी सुंदर भवन तयार करतो त्या मनुष्याला निश्चितपणे उत्तम गती प्राप्त होते. जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, स्त्री आणि इतर कोणीही हे कार्य करतील ते सर्व देवांकडून पूजित होतात व शेवटी शिवलोकात जातात. हे राजन् ! जो माणूस या श्रीकरोडीश्वरतीर्थाचे माहात्म्य अत्यंत प्रेमाने ऐकतो त्याचे सहा महिन्यातील सर्व पाप नष्ट होते. (श्रीनर्मदापुराण, रेवाखंड, अध्याय ६२)



## परिशिष्ट क्रमांक ४

॥ श्रीवासुदेवदत्तप्रसन्न ॥

# ★ श्रीगुरुमहाराजांच्या तोंडचे आत्मज्ञान ★

हा विषय वेदमूर्ती श्री. वाळिंबे यांनी यापूर्वी "मुमुक्षु" वर्तमानपत्रात प्रसिद्ध केला होता. तोच या ठिकाणी साधकभक्तांसाठी आम्ही प्रस्तुत करीत आहोत श्री. वाळिंबे म्हणतात–

श्रीस्वामींच्या भेटीस नुकताच गेलो होतो. त्यांची तब्बेत चांगली असून मुक्काम येथेच श्रीगरुडेश्वरी हमेश राहील असे वाटते. श्रीस्वामीमहाराजांच्या संगतीत राहिले असता श्रवणभजनादिकांचा लाभ होऊन वृत्ती आनंदमय होते. रात्री भजनानंतर श्रीमहाराजांना मी सहज पुसले.

**प्रश्न :–** संसार दुःखमय असून अखेर रडविणारा आहे असा नित्य अनुभव आहे. सुख व आनंद कशात आहे, व "मी, माझे माझे" असे म्हणणारा मी कोण हे मला समजत नाही. कृपा करून

सांगावे.

**उत्तर :–** हे पाहा, मी सुखी, मी दुःखी, शरीरहस्तपादादि माझे, पुत्र, कांताधनादि माझे, हे म्हणताना " मी, माझे " या शब्दांचा उपयोग तुम्ही केला आहे. जगातील व्यवहारात निराळा पदार्थ असेल त्या वेळी मी, माझे या शब्दांचा उपयोग होतो. हे तुम्हास आत्म-प्रचीतीने समजले. जो ज्याला पाहतो, तो त्याहून निराळाच असतो; ह्या न्यायानेच जे दिसते ते आपल्याहून निराळेच जाणावे व जे दृश्य ते जड असा वेदान्त सिद्धांत आहे. जे आपणास व परास जाणवत नाही ते जड व आपणास व इतरास जाणते ते चेतन होय. हेच निर्विकार कूटस्थ साक्षिचैतन्य प्रत्यगात्म्याचे स्वरूप अज व अजरामर होय.

**प्रश्न :–** " उद्वेजयति सूक्ष्मोऽपि चरणं कंटकाकुरः ।" असा जर अनुभव आहे तर देह जड कसा ?

**उत्तर :–** हेच तुमचे विपरीत ज्ञान पाहा ! जर देह चेतन असता तर पाहिजे तिकडे तो पाहता, बोलता व ऐकता; श्रोतृ, नेत्र इत्यादि इंद्रियसामुग्रीची त्यास गरज लागली नसती; परंतु तसे होत नाही. देह जड असून तो अजडासारखा भासतो. यास अहंकार कारण होय. आत्म्याशी अहंकाराचा तादात्म्यध्यास झाल्यानंतर अहंकार आपादतलमस्तक व्यापून राहतो, तेव्हा जागृतावस्था होते. त्यावेळी लोकव्यवहार सुरू होतात; देह अजडासारखा भासतो. अर्धा अहंकार विकास पावतो त्यावेळी स्वप्नावस्था होते व अहंकारलीन झाला म्हणजे निद्रावस्था होते. तेव्हा सर्व लोकव्यवहार नाहीसे होतात. पुण्य, पाप, शोक, मोह, भय, सम, विषम इत्यादि काहीच स्मरत नाही. तर दुसरे असे की, चेतनास जन्ममरण नाही. देहावर जन्ममरणादि सहा विकारांची उघड छाप पडली आहे. ह्या पंचीकृत

पंचभूतांचा पिंड अन्नमयकोश आहे. जीवात्म्याच्या ठिकाणी पांचभौतिक शरीरे उत्पन्न होतात, जातात, देहद्वारा बरीवाईट कर्मे घडतात. जीवात्म्याला पूर्वी असाच देह होता; म्हणून बरीवाईट कर्मे घडली. त्यामुळेच हा देह घ्यावा लागला. आताही ह्याच डोळ्यांनी मुक्तीचा सोहळा पाहण्यास न मिळाला तर जुने वस्त्र टाकून नवे वस्त्र घेतात, त्या न्यायाने तत्त्वज्ञानाने मोक्ष होई पावेतो वारंवार असेच घडेल. तेव्हा आईबापांनी खाल्लेल्या अन्नाच्या रक्तरेतोरूपी परिणामाने हा भौतिक अन्नमय देह कर्मयोगाने बनून पुढे अन्नानेच वाढेल. अतएव हा जड विकारी असून दृश्य आहे. जे दृश्य ते जड असा वेदान्त सिद्धांत आहे.

**प्रश्न** :– सत्य आहे. परंतु समजूत होत नाही. जीव देहाहून वेगळा कसा ते सांगा.

**उत्तर** :– असे पाहा, हा देह आईबापांच्या रक्तरेताने उत्पन्न झाला. जसे आधण ठेवून वर दाथर घालून मोदक उकडतात; त्याप्रमाणे मूत्राचे आवण, विष्ठा दाथर व वारीचे वेष्टणरूप पात्रात मोदकाप्रमाणे रेतरक्त कढून हा देह होतो. हाडे, स्नायू, मज्जा, पित्याच्या रेताचे व त्वचा, मांस, रक्त आईच्या रक्ताचे होतात. असा हा कफ, वात, पित्त, धातुवद्ध, मलमूत्र व श्लेष्मपूर्ण देह नऊ महिन्यांनी अनुक्रमे करून रजस्वलेच्या विटाळात बनतो. सहा महिनेपर्यंत तर हालचाल नसून मांसाच्या गोळ्याप्रमाणे असतो. सातव्या महिन्यांत टाळू भेदून ईश्वरानुग्रहरूपी "अनुप्रवेश" होतो. तेव्हा हालचाल समजते. गर्भात अनुप्रवेश झाल्या वर हा पूर्वकर्मस्मृतीने दुःखी होऊन अशी प्रार्थना करतो की, "हे ईश्वरा! हे दत्तात्रेया!! माझ्या कर्मयोगाने नरकवासापेक्षाही हा घोर गर्भवासरूपी नरकवास मला दाखविलास पुरे! पुरे!

आता मी तुला शरण येतो. एकदा येथून सुटका कर म्हणजे "सोऽहं" असे तुझे अभेदाने भजन करून मुक्ती घेईन. अशी नित्य प्रार्थना करून आईने खालेल्या अन्नरसाचा द्रव बेंबीच्या नालाच्या द्वाराने मिळून तेवढ्यावर वाचतो. नंतर दहावे मासी आईस मरणप्राय दुःख होऊन सूतिवायूच्या योगाने किड्याप्रमाणे योनिद्वारा बाहेर पडताच पूर्वीचे "सोऽहं" विसरून "कोऽहं कोऽहं" करू लागतो. पूर्वीच्या भजनाचा करार एकीकडे ठेवून बालपण खेळात घालवितो. ज्या खाण्यापिण्याचे मलमूत्र होते, त्यावर अल्पासक्ती ठेवून सदोदित खाऊनपिऊन शरीर पुष्ट करून विषयकर्दमात लोळून तारुण्य घालवितो. जरी जारकर्माने यमयातना-नरक भोगून वारंवार श्वानसूकरादि योनी पुनः पुनः भोगाव्या लागतात, असे कथापुराण मार्गाने कानावर आले तरी "अँ: !" करून काही विवेक न करिता पाहिजे तसे भोग भोगून जीव देहतादात्म्याने यौवनसरिता आटवून टाकतो. पुढे वृद्धावस्थेने गलितशरीर पोराबाळांच्या चिंतेने व्यापून त्यांच्याकडून पदोपदी अवमान होत असतानाही माझे बरे व्हावे, असे चिंतन करीत शेवटी मोठ्या कष्टाने मरतो. जातेवेळी धनादिकांपैकी एक कवडीसुद्धा बरोबर येत नाही. बरेवाईट कर्म केलेले मात्र पाठीशी लागून तेच अवश्य फळ भोगविते. मरण देहास येते. जीव मरतच नाही. तो अजन्मा, अजरामर आहे. जो जिवलग देह पूर्वी अत्यंत प्रीतिपात्र होता, तोच निर्जीव झाला म्हणजे अमंगल होऊन अत्यंत भयंकर दिसतो. मग त्यास घट्ट बांधून स्मशानात जाळतात. याप्रमाणे जीव देहाहून निराळा आहे.

प्रश्न :- जीव कोणास म्हणतात? स्त्रीपुन्नपुंसकत्व जीवास आहे काय?

उत्तर :- अधिष्ठानभूत चैतन्य व पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये

पाच प्राण व मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे अंतःकरणचतुष्टय मिळून एकोणीस अवयवांचा एक सूक्ष्म देह व त्या सूक्ष्म लिंगदेहामध्ये पडलेली चैतन्याची छाया मिळून जीव म्हटला जातो.

जीवाला स्त्रीपुन्नपुंसकादि लिंग नाही. जसे पूर्वार्जित असेल त्याप्रमाणे देह मिळतो, तद्वत् स्त्रीपुंसकत्व येते. स्त्री मेली तर तिचा जीव गेला असा पुल्लिंगीच प्रयोग होतो. तेव्हा जी स्त्री ती स्त्रीच राहील असे नाही. एखाद्याला भाग्याने संन्यास घडला तर " पुंजन्म लभते माता पत्नी च प्रैषमात्रतः " त्याच्या मातेला व पत्नीला पुढे पुंजन्म मिळतो व पुरुष असून स्त्रीवेष घेतला तर त्याला पुढे स्त्रीजन्म मिळतो. अशी अनेक कारणे लिंग पालटण्याची आहेत.

**प्रश्न** :– जर देह जड आहे व जीव असंग आहे, प्राण देहाहून निराळा आहे तर सुखदुःखादि संबंध प्राणाला असावा. प्राण देहाला हालचाल देतो, देहामध्ये राहून बल देतो व इंद्रियांना स्वकार्यार्थ वळवितो. भूक, तहान प्राणाचा धर्म होय. प्राणच देतो व घेतो. निजल्यावर श्वासोच्छ्वासरूपाने प्राणच शरीर राखतो, जागृत करतो. प्राणाला चेतनाही आहे. तर प्राणाला आत्मा का न म्हणावा ?

**उत्तर** :– प्रश्न चांगला विचारला. प्राण हाच आत्मा असा निर्धार केला तर प्राणलोकी काही काल गती होईल; पण पुनरावृत्ती चुकणार नाही. कारण प्राण हा आत्मा नव्हे; तर बाहेरच्या वायूप्रमाणे हाही जड आहे. प्राणाला चेतनत्व नाही. पाहा ! प्राण हा चेतन असता तर झोप लागल्यावर तो जागा असताही अंगावरील वस्त्र, अलंकार चोराने काढून नेले तरी त्याला काहीच कळत नाही. मला भूक लागली, तहान लागली, माझे प्राण व्याकुळ झाले इत्यादि स्पष्ट व्यवहारावरून असे म्हणणारा प्राणाहून वेगळा असलाच पाहिजे तो प्राण [illegible] आहे व बळ देऊन शरीर धारणा करणे

व वाचविणे हे काम केवळ प्राणाचेच म्हटले जात नसून, प्राणाच्याही आत असणारा अंतर्यामी जो तोच वल देतो व प्राणाला हृदयात खेळवून खाणेपिणे करवितो. खाल्लेले अन्न पचविण्याकरिता प्राणादि द्वारा अंतर्यामीच आत्मा सर्व करवितो; पण करवून सुद्धा कर्ता, करविता न होता निर्लेप राहतो. तेव्हा प्राणाप्रमाणे हा आत्मा अचेतन (जड) नव्हे. स्वसन्निधानाने सर्व करूनही हा आत्मा अकर्ता राहतो. जीव सर्वथा पराधीन आहे. डोळ्यांची पापणीसुद्धा हलविण्याचे सामर्थ्य जीवाचे नाही. मी हे केले म्हणूनच झाले, माझ्यासारखा कोणी शहाणा आहे काय ? इत्यादि मीपणा हा केवळ अहंकार आहे. अहंकार ठेवून केलेले कर्म बंधनास कारण होते. सोन्याची व लोखंडाची बेडी दोन्ही बांधण्यास सारख्याच आहेत, त्याप्रमाणे पापपुण्य दोन्हीही मोक्षप्रतिबंधास सारखीच आहेत. जसे पाप नरकयातना भोगविते तसे संकल्पपूर्वक फलकामना धरून केलेले पुण्य, स्वप्नसुखाप्रमाणे थोडाकाल स्वर्गसुख दाखवून पुन: दु:सह अध:पात देते. म्हणून आपले स्वाधीन काही नाही असा पदोपदी विचार करून कर्तेपणा व करवितेपणा घालून निर्लेप राहावे. संकल्प-पूर्वक फलकामना टाकून केलेल्या कर्माचे पुण्य ईश्वरप्रीत्यर्थ अर्पण केले तर ईश्वरप्रसादाने बुद्धिसिद्धिद्वारा ज्ञान होऊन याच जन्मात मोक्ष मिळतो. देहाहून वेगळा असणारा प्राण व वाचा, हस्त, पाद, गुद, उपस्थ ही पाच कर्मेंद्रिये मिळून हा लिंगदेह होतो. यांपैकी एक प्राणमय नावाचा कोश होय. आत्मा याहून निराळाच आहे.

**प्रश्न :–** जसा देह पंचीकृत पंचमहाभूतांचा आहे तसाच लिंगदेहही पंचभौतिक आहे काय ? या देहद्वयी पंचमहाभूतांचे कसकसे अंश आहेत हे सांगावे.

उत्तर :– प्रथम सांगितला तो स्थूल देह, दुसरा सूक्ष्म देह व तिसरा कारणदेह, असे देह तीन आहेत. आकाश, वायू, तेज, उदक आणि पृथ्वी ही पाच महाभूते असून प्रत्येकी पाच तत्त्वे निरनिराळी आहेत. ती अशी–

१ आकाश :– काम, क्रोध, शोक, मोह व भय.
२ वायू :– चलन, वलन, प्रसरण, आकुंचन, निरोध.
३ तेज :– क्षुधा, तृषा, आलस्य, निद्रा, मैथुन.
४ उदक :– लाळ. मूत्र, शुक्र, शोणित, मज्जा
५ पृथ्वी :– अस्थी, मांस, त्वचा, नाडी व रोम.

याप्रमाणे पंचवीस तत्त्वांच्या कर्दमापासून पिंडोत्पत्ती आहे. सूक्ष्म लिंगदेहाची तत्त्वे अशी आहेत–

१ आकाश :– अंत:करण, मन, बुद्धी, चित्त, अहंकार.
२ वायू :– प्राण, अपान, व्यान, उदान व समान.
३ तेज :– श्रोत्र, त्वचा, चक्षू जिव्हा, नासिक.
४ आप :– वाचा, पाणि, पाद, शिश्न, गुद.
५ पृथ्वी :– शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध.

ही सूक्ष्म देहाची पंचवीस तत्त्वे होत. यात वायू पाच प्रकारचे असून उपवायू पाच प्रकारचे आहेत. त्यांची स्थाने व क्रिया अशी.

| स्थान | क्रिया |
|---|---|
| १ प्राण–हृदय. | श्वासोच्छ्वास व क्षुधा, तृषा इत्यादि उत्पन्न करणे. |
| २ अपान–गुदद्वार. | मलमूत्र व शुक्रउत्सर्जन करणे. |
| ३ व्यान-सर्वांगसंधीमध्ये भरून असणे. | शरीरात चलन करणे. |
| ४ उदान–कंठ. | शब्दोच्चार करणे. |
| ५ समान–नाभी | अन्नादि पचन करणे. |

## पाच उपवायू–लक्षणे

नाग–शिंक येणे. कूर्म–जांभई. कृकल–उचकी. देवदत्त–ढेकर. धनंजय–नयनोन्मीलन.

यानंतर तिसरे तेज (अग्नी) तत्त्व हे श्रोत्र, त्वचा, चक्षू, जिव्हा आणि घ्राण या पाच प्रकारांनी विभागले आहे. त्यास ज्ञानेंद्रियपंचक म्हणतात व उदकतत्त्व वाचा अर्थात् परा पश्यंती, मध्यमा, वैखरी, पाणि, पाद, शिश्न, गुद मिळून पाच प्रकारांनी विभागले आहे. त्यास कर्मेंदियपंचक म्हणतात. यानंतर पृथ्वीतत्त्व शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पाच प्रकारांनी विभागले आहे. ज्यांची त्रिभुवनात ख्याती आहे व जे स्वर्ग नरकदायक ते हे पंचविषय होत.

हे विषय ज्ञानेंद्रियपंचकापासून उत्पन्न होतात म्हणजे ज्ञानेंद्रियाने विषय जाणावे व मग यथाविधीने ते स्वीकारावेत. ते स्वीकारल्यानंतर कर्मेंद्रियद्वारे त्यांचे ग्रहण, गमन, त्यागादि कार्य करावे. अशी विषयांची उपपत्ती आहे. या विषयांचा मुळीच त्याग केला तर शरीर पडेल. जर विशेष अविधीने सेवन केले तर अपाय घडेल. म्हणून शास्त्राधीनतेने विधियुक्त आचरण केले तरच ते इहपरलोकी सुखदायक होते.

आकाशाच्या पाच तत्त्वांची रूपलक्षणे अशी आहेत की, नाभिस्थानी शुद्धसंकल्पात्मक उद्‌भवणारे जे स्फुरण तेच अंतःकरण होय. ते निजांगाने परावाचेसहित शब्दरूपाने आकाश होय. सर्व शरीराचा मध्यभाग नाभिस्थान असून तेथे पंचप्राणांचा संयोग होतो. त्या स्थानी शब्दरूपाने उद्‌भवलेली वृत्ती अंतःकरण पुढे पश्यंती वाणीसह हृदयभुवनास आक्रमून तेथे विकल्पाचा वारा लागला म्हणजे ते संकल्पविकल्पात्मक अंतःकरण "मन" होय. पुढे वृत्ती सरसावून मध्यमसहित कंठस्थानी येऊन निश्चयपूर्वक

स्थिरावली म्हणजे ती "बुद्धी" होय. पुढे ही बुद्धी मस्तकी परा, पश्यंती, मध्यमेसहित ब्रह्मरंध्रास समत्वाने चेतना देते ते "चित्त" होय. तेथून वृत्ती शब्दरूपाने वैखरीस आली म्हणजे तो "अहंकार" होय.

आकाश कार्यकारण स्थूलसूक्ष्म देहद्वयात दहारूपाने व्यापून राहिले आहे. काम, क्रोध, शोक, मोह आणि भय ही आकाशाची पाच तत्त्वे अंतःकरणपंचकाच्या शवलवृत्तीचे स्फुरण आहे. हे स्फुरण शुद्ध आणि शवल अशा दोन भागांनी शरीरी पावते. ते असे :-

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. काम—वृत्तीचे स्फुरण | शुद्धांश. | अंतःकरण. | शवलांश. | काम, भोगेच्छा. |
| २. क्रोध-संकल्प-विकल्पात्मक वृत्ती | ,, | मन | ,, | क्रोध |
| ३. शोक-वृत्तीचा कृतनिश्चय | ,, | बुद्धी | ,, | शोक |
| ४. मोह-चेतव्यवृत्ती | ,, | चित्त | ,, | मोह |
| ५. भय-कार्यकर्तृत्ववृत्ती | ,, | अहंकार | ,, | भय |

आता तिसरा कारणदेह. तो अज्ञानात्मक आहे. केवळ न समजणे म्हणजे मी कोण हे आपल्यास न समजणे ते अज्ञान होय. स्वस्वरूपी विस्मरण झाल्याने, मी जीव, हे शरीर माझे, हा प्रपंच माझा, सर्व माझे असे दृढ मानून प्रपंची अडकून लक्ष्यपूर्वक रात्रंदिवस प्रपंच करीत कालवंचना करणे ते अज्ञान होय. देहद्वयाचे बीजरूप कारण हे अज्ञान असल्यामुळे त्यास "कारणदेह" असे शास्त्रात म्हटले आहे. या कारणदेहाची पंचभौतिक पंचवीस तत्त्वे अशी आहेत. :—

| भूतपंचक | प्रत्येकाच्या पाच प्रकारांची नावे | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १. आकाश-मद | मत्सर | दंभ | कृत्रिमता | अनित्यता | |
| २. वायु-उन्माद | वासना | वांच्छा | चिंता | चेष्टा | |
| ३. तेज-निद्रा | मरण | अभिलाषा | भ्रम | विस्मरण | |
| ४. आप-करुणा | कल्पना | भ्रांती | प्रमाद | अनर्थ | |
| ५. पृथ्वी-अवकाश | अज्ञान | अविवेक | वंचना | मूर्छा | |

याप्रमाणे देहत्रयी पंचभौतिक तत्त्वे व्यापून राहिली आहेत. ही तत्त्वे क्षणभंगूर अर्थात् देहही क्षणभंगूर होय. देह वर्तविण्याची शक्ती या तत्त्वांची नसून ती सत्ता आत्म्याचीच आहे. ही तत्त्वे आत्म्याची छाया असून हिलाच प्रकृती म्हणतात. पंचवीस तत्त्व-युक्त पंचभौतिकांनी फक्त देहाची अचेतन (निर्जीव) मूस तयार केली. आत्म्याची सत्ता नसती तर ही मूस निरुपयोगी होय. श्रीमद् भगवद्गीतेत श्रीभगवंतांनी असे सांगितले आहे की—

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥७.४॥**
**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥**

पंचभौतिक ही अपरा प्रकृती असून ती निर्जीव सत्तारहित आहे. स्थूलदेही जीवन प्राप्त होते ती सत्ता परा म्हणजे जीव-भूताप्रकृतीची होय. अपरा ही पंचीकृत व्यक्त प्रकृती आहे व परा प्रकृती अपंचीकृत अव्यक्त आहे. म्हणून अपरा प्रकृतीशी जेव्हा परा प्रकृतीचा मिलाफ होतो तेव्हा अपंचीकृत सूक्ष्म जीवभूताच्या सान्निध्याने पंचीकृत देहात जीवन प्राप्त होते. ज्ञानाला चेतना येते, मनाच्या ठिकाणी मानसिक शक्ती येते व बुद्धीच्या ठिकाणी ज्ञान व अहंकार उत्पन्न करते. म्हणून परा म्हणजे जीवभूतप्रकृती ही

आत्म्याची सत्ता होय. आत्मसत्तेचे हे गुण हिरण्यगर्भात्मक ब्रह्मांडाच्या देहाचे आगंतुक घेऊन शरीर-उभारणी केली. हे गुण स्थूलांशी कोणाचे, कोणकोणते येऊन मिळाले ते असे आहेत. :-

| सूतपंचक | हिरण्यगर्भात्मक अपंचीकृत देह | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आकाश | विष्णु. | चंद्रमा. | चतुरानन. | नारायण. | शंकर. |
| | १ | २ | ३ | ४ | ५ |
| वायू | प्राण | अपान | व्यान | उदान | समान |
| तेज | दिग्पाल | पवन | सूर्य | वरुण | अश्विनौदेव |
| आप | अग्नी | इंद्र | त्रिविक्रम | प्रजापती | नैऋत्येश |
| पृथ्वी | आकाश | प्रभंजन | तेज | आप | पृथ्वी |

| भूतपंचक | निजगुण | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आकाश | अंत:करण | मन | बुद्धी | चित्त | अहंकार |
| | १ | २ | ३ | ४ | ५ |
| वायू | प्राण | अपान | व्यान | उदान | समान |
| तेज | श्रोत्र | त्वचा | चक्षु | जिव्हा | घ्राण |
| आप | वाचा | पाणी | पाद | शिश्न | गुद |
| पृथ्वी | शब्द | स्पर्श | रूप | रस | गंध |

याप्रमाणे अपंचीकृत पंचभूतांच्या पंचवीस अव्यक्त तत्त्वांनी जी शरीर उभारणी केली ती जलबिंबवत होय. उदकी सूर्यबिंब दिसते; परंतु सूर्य त्यात नाही. प्रतिबिंब सूर्य नव्हे. तो त्याहून वेगळाच आहे.

त्याप्रमाणे शरीरात आत्म्याचे सत्तारूपाने प्रतिबिंब आहे. हे प्रतिबिंब जीव होय. " ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन:। " असे भगवंताचे वचन आहे. अंत:करणात भरलेला जो ओतप्रोत परमात्म्याचा ज्ञानरूप प्रकाश तोच अहंकुरणात्मक जीव

होय. यालाच " चिदाभास" म्हणतात व या प्रतिबिंबालाच "अंश" असे शास्त्रात म्हटले आहे.

**प्रश्न :–** हे स्थूल, सूक्ष्म व कारण शरीर पंचभौतिक पंचवीस शबल अशा अशुद्धांच्या संयोगाने उत्पन्न झाले. स्थूलास उत्पन्न करणारा सूक्ष्मदेह आणि सूक्ष्म उद्युक्त करणारा अज्ञान कारणदेह आहे असे आपल्या कृपेने आता मी समजलो. तरी या अज्ञान कारणदेहास उद्युक्त करणारा असा शुद्ध तत्त्वांशाचा पंचभौतिक आणखी देह आहे काय ?

**उत्तर :–** ठीक. तुमची गती बरी आहे. असे आतआत चाचपून पाहिले तरच वस्तुलाभ होईल. देहत्रयास उद्युक्त करणारा चतुर्थ महाकारण देह होय. तो ज्ञानरूप आहे. तीन देहांप्रमाणे महाकारण-देहही पंचभौतिक पंचवीस तत्त्वांचा आहे. परंतु देहत्रय अशुद्धांशांचे आहेत व महाकारणदेह शुद्धतत्त्वांशांचा आहे. जसे शुद्ध ब्रह्म निर्गुण असून तदंगाने व शवलांश ईश्वर सगुण आहे तसे शुद्ध पंचभौतिक तत्त्वांशांच्या महाकारणदेहापासून देहत्रय शवलांश होत. म्हणजे ज्ञानरूप महाकारणाचा अज्ञान कारणदेह कार्य होय, अज्ञान-कारणाचा सूक्ष्म लिंगदेह कार्य व सूक्ष्माचा स्थूलदेह कार्य होय. स्थूल सूक्ष्म हे अन्यथा (विपरीत) ज्ञान अज्ञानापासून विकास पावले असून कार्यकारणत्वाने उत्पन्न झाले.

आता या तीनही देहांना उद्युक्त करणारा ज्ञानरूप महाकारण-देह पंचभौतिक सूक्ष्म, अव्यक्त, शुद्ध पंचवीस तत्त्वात विभागला आहे. ती अव्यक्त तत्त्वे ही आहेत.



# महाकारणदेह

भूतपंचक :– अव्यक्त पाच प्रकारची नावे.

१ आकाश :– पूर्ण, अज, अदाह्य, अक्लेश, अशोष्य.

२ वायु :– असंग, अच्छेद्य, ऊर्ध्व, जीवन, कारण.

३ तेज :– व्यापक, परात्पर, प्रकाशरूप, ज्योतिर्मय, पावन

४ आप :– सर्वजीवन, निर्मल, चैतन्य, अमृत, समृद्ध.

५ पृथ्वी :– अखंड, अचर, अनर्घ्य, कृपाण, आधार.

याप्रमाणे ज्ञानरूप महाकारणदेहात शुद्धरूप पंचभूतात्मक पंचवीस तत्त्वे केवळ अनंगत्वाने–अंग नसून नसल्याप्रमाणे वेगवेगळी आहेत. हे चारी देह ॐकाराचे आहेत. अकार स्थूलदेह, उकार सूक्ष्मदेह, मकार कारणदेह, व अर्धमात्रा महाकारणदेह होय. शुद्ध सत्त्वगुण मायेमध्ये प्रतिबिंबित झाला. तो समष्टी, सर्वज्ञ, ईश्वर व मलिन सत्त्वगुण मायेमध्ये प्रतिबिंबित झाला. तो व्यष्टी, किंचिज्ज्ञ, ईश्वराधीन जीव होय. पंचीकृत भूतांपासून जारज, अंडज, स्वेदज, उद्भिज ह्या चार जीवखाणी झाल्या. बाह्यदेह स्थूल हा जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षयिते व नश्यति असा षड्भावविकारी आहे. मनुष्यांमध्ये ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण, तसेच ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी हे चार आश्रम स्थूल देहावर कल्पिले जातात. तमोगुणमायेपासून आकाश, वायू, तेज, जल आणि पृथ्वी ही पंचभूते होऊन, त्यापासून पंचज्ञानेंद्रिये झाली. भूतसत्त्वगुण एकत्र होऊन अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त, अहंकार झाले. भूतरजोगुणांशाने पाच कर्मेंद्रिये झाली. रजोगुण एकत्र होऊन पंचप्राण झाले. ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, पंचप्राण, अंतःकरण व विषय मिळून लिंगदेह किंवा सूक्ष्मदेह झाला. यांच्या योगाने जन्म-मरण, सुख-दुःखादि सर्व

घडते. अज्ञान हे कारणशरीर होय. अस्मिता महाकारण. (१) स्थूल देह अन्नमय कोश. (२) कर्मेंद्रिये व प्राण हा प्राणमय कोश. (३) ज्ञानेंद्रिये व मन हा मनोमय कोश. (४) ज्ञानेंद्रिये व बुद्धी हा विज्ञानमय कोश. (५) व कारणदेही प्रिय, मोद, प्रमोद ज्या वृत्ती त्यांसह सत्त्वगुण तो आनंदमय कोश होय. या देहचतुष्टयाची अवस्था, अभिमान, स्थाने इत्यादि अशी आहेत. :–

| देह | अवस्था | अभिमान | स्थान | भोग |
|---|---|---|---|---|
| स्थूलदेह | जागृतावस्था | विश्वाभिमानी | नेत्रस्थान | स्थूलविषय |
| सूक्ष्मदेह | स्वप्नावस्था | तैजसाभिमानी | कंठस्थान | प्रविविक्त |
| कारणदेह | निद्रावस्था | प्रज्ञाभिमानी | हृदयपुलीत | आनंदभोग |
| महाकारण-देह | समाधी, तुर्या, उन्मनी | प्रत्यगात्माभिमानी | मूर्धा (ब्रह्मरंध्र) स्थान. | परमानंद-भोग |

| गुण | वाचा | मात्रा | देवता | वर्ण |
|---|---|---|---|---|
| रजोगुण | वैखरी | अकार | ब्रह्मदेव | रक्तवर्ण |
| सत्त्वगुण | मध्यमा | उकार | विष्णू | श्वेतवर्ण |
| तमोगुण | पश्यंती | मकार | महादेव | कृष्णवर्ण |
| शुद्धसत्त्वगुण | परावाचा | अर्धमात्रा | परमात्मादेव | सुनीलवर्ण |

निरनिराळे देह ते पिंड, त्यांना व्यष्टी अशी संज्ञा आहे व ते चर्तुदशभुवनांसह एकत्र होऊन समष्टी विराट देह होत.

(१) विराट, (२) हिरण्यगर्भ, (३) माया (४) अव्याकृत असे विराटाचे चार देह होत. विराटदेह असा आहे. :–

## विराटदेह

दंत, हास्य, निमिषोन्मेष, कटाक्ष, कुक्षी, नाड्या, केश, रेत, अस्थी, मांस व त्वचा ही अनुक्रमे नक्षत्रे, माया, रात्र, दिवस

सृष्टी, समुद्र, नद्या, वृक्ष, वृष्टी, पर्वत, भूमी, जडवातावरण.

**ज्ञानेंद्रिये**

कान, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका; दिशा, वायू, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार.

**कर्मेंद्रिये**

वाक्, हस्त, पाद, गुद, अग्नी; इंद्र, विष्णू, मृत्यू, लिंग, ब्रह्मा.

**अंतःकरण**

मन, बुद्धी, चित्त, अहंकार; चंद्र, गुरू, विष्णू, रुद्र.

**पादापासून कंबरेपर्यंत विराट देहाची रचना**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अतल, | वितल, | सुतल, | महातल, | तलातल, |
| पादाधोभाग. | पादोर्ध्वभाग. | घोटे. | पोटऱ्या. | गुडघे. |
| रसातल, | पाताल, | | | |
| मांड्या. | कंवर. | | | |

**नाभिपासून मस्तकापर्यंत विराट देहाची रचना**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| भूर्लोक. | भुवर्लोक. | स्वर्लोक. | महर्लोक. | जनोल्लोक. | तपोलोक. | सत्यलोक |
| नाभी. | कुक्षी. | हृदय. | कंठ. | मुख. | भ्रूमध्य. | मस्तक. |

**प्रश्न :–** जर आकाश निर्गुण शून्य आहे, तर शून्य आकाशात पंचभूतोद्भव दिसून येतो, आकाश, निर्गुण व पंचभूते सगुण आहेत म्हणून आकाशात पंचभूते कशी उत्पन्न झाली ?

**उत्तर :–** दरेक भूतात सहजस्वभावपरिच्छिन्न एक शवल व दुसरा शुद्ध भागाचा असे दोन गुण आहेत. ते असे :–

**दोन गुण**

| भूतपंचक | शुद्धभाग | शबलभाग |
|---|---|---|
| १) आकाश | पोकळ | घन |
| २) वायू | चंचल | निषिद्ध |

| | | |
|---|---|---|
| ३) तेज | तेजाळ | दृश्य |
| ४) उदक | पातळ | मृदू |
| ५) पृथ्वी | कठीण | जड |

आकाशात आकाश सहजच आहे. वायूही तितका तेवढाच स्तब्ध-रूपाने आहे. आकाशात अवकाशरूपी जो भास आहे तीच आकाशात तेजाची उत्पत्ती. तसेच मृदुत्वाने जे आकाश तेच उदक होय. आकाश सघन आणि शून्यवत् संपूर्ण आहे. शून्यभासी जडपण भासले तीच आकाशात पृथ्वी होय. याप्रमाणे आकाशात पंचभूतोद्भव होय.

**प्रश्न :–** सद्गुरूंनी पंचभौतिक तत्त्वांची माहिती सांगितली. त्यावरून स्थूलदेह शवलतत्त्वांशाचा अस्थी, मांस, रुधिरयुक्त असून तो सूक्ष्म-लिंगदेह कारणाचा कार्य असून अन्नमय कोशाने मर्यादित असल्याने तो आत्मा नव्हे. परंतु त्याचा कारणदेह जो सूक्ष्म तो शुद्धांश अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त, अहंकार या पंच-तत्त्वांचा आहे. तरी सूक्ष्म देह आत्मा नव्हे काय ?

**उत्तर :–** आत्मा सर्व कर्मांचा व वस्तूंचा ज्ञानरूपी साक्षी आहे. म्हणून तो दुसऱ्या कोणालाही ज्ञेय होत नाही. जगातील सर्व दृश्य नाशवंत वस्तू जाणण्याला मन, बुद्धी वगैरे इंद्रिये ही साधने लागतात. कारण त्या वस्तूंचे ज्ञान होण्यापूर्वी त्या अज्ञात असतात. परंतु आत्मा चिद्रूप म्हणजे ज्ञानरूप असल्याने तो सदा ज्ञातच आहे. म्हणून त्याचे ज्ञान होण्यास देहेंद्रियादिकांचे साधन लागत नाही. झोपेमध्ये इंद्रियादिक नसून जागा झालेला मनुष्य स्वानुभव सांगतो. यावरून इंद्रियादि साधनांवाचून सुषुप्तीत ज्ञान आहे. ज्या वस्तूंचे ज्ञान साधनांवाचून होते तिला "स्वयंप्रकाश" म्हणतात. म्हणूनच आत्मा "स्वयंप्रकाश" आहे. स्थूल–सूक्ष्म

देहद्वये पन्नास तत्त्वसमूहाची असून षोडश अवस्थायुक्त आहेत. म्हणून ते परिच्छिन्न होत. स्थूलदेहाच्या जागृतावस्थेत जे जे कर्म केले त्या त्या कर्माचा आत्मा वेगळेपणाने साक्षी असून कर्मजन्य सुखदु:ख साक्षित्वाने भोगतो. विश्वाभिमानी जीवाचाही आत्मा वेगळेपणाने साक्षी आहे. "मी–माझे" असा जागृतावस्थेतील अभिमान धरणाऱ्या जीवाचा जर आत्मा साक्षी आहे तर जागृतीतील अवस्थेच्या सुख–दु:खभोगाचाही आत्मा वेगळेपणाने अव्यंग साक्षी आहे.

सूक्ष्मदेहाची पंचभौतिक पंचवीस तत्त्वे त्रिगुणजन्य अष्टावस्थायुक्त आहेत. त्यांनाही आत्मा साक्षित्वाने आहे. प्रथम सत्वगुणाची ज्ञानशक्ती होय.

त्या ज्ञानशक्तीपासून अंत:करणपंचक व्यक्तरूपास आणले. अंत:करण, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे ज्ञानशक्तीचे व्यक्तरूप पंचक असून ते आकाशाचे तत्त्वपंचक होय. क्रियाशक्ती रजोगुणमयी आहे. तिच्यापासून पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये व पंचप्राण ही पंधरा तत्त्वे. व्यक्तरूपास आली. द्रव्यशक्ती तमोगुणमयी आहे. म्हणून विषयपंचक तमोगुणजन्य होय. या पंचवीस सत्त्वयुक्त सूक्ष्मदेहाहून आत्मा साक्षित्वाने भिन्न असून कार्यकारणत्वाने वर्तत आहे. ज्या ज्या तत्त्वाचे जे जे कार्य त्या त्या कार्याचा आत्माराम श्रीगुरू असून, कारणानुसार कार्य व अकार्य तत्साक्षित्वाने संपादन करतो. देहसंगतीने आत्मा सुखदु:खांहून वेगळा राहूनच भोगतो. मला क्रोध आला होता, दु:खशोकाने माझे अंत:करण व्यापून गेले होते, इत्यादि स्पष्ट व्यवहारावरून आत्म्याकडे वेगळिकत्वाने सहजच साक्षित्व आले. जर आत्मा स्वत: कामक्रोधरूप असता तर परस्पर शरीरसंगतीने दचकला नसता किंवा भिऊन पळाला

त्ता किंवा अहंकाराने ताठला नसता. म्हणून आत्मा देहद्वय-रिच्छिन्नाचा साक्षी असून साक्षित्वाने स्थूल, सूक्ष्म, देह "माझा, माझा" म्हणत संचार करतो. ज्या ज्या तत्त्वावर हात ठेवावयास जावे त्यावेळी त्या त्या तत्त्वापासून तो "मी" भिन्न आहे असे समजावितो. अंत:करणसंगतीने व्यानाधारे आत्मा श्रोतेंद्रियात संचरून, शब्द ऐकून, तदनुसार निजवाचेने उत्तर देतो. मनाच्या संगतीने समानाधारे आत्मा त्वचेंद्रियात संचरून, स्पर्श विषय घेऊन, निजहस्ते स्वीकार व त्याग करतो. बुद्धीच्या संगतीने उदानाधारे आत्मा चक्षुरिंद्रियात संचरून, रूप विषय पाहून, आदराने निजपदी गमन करतो. चित्तसंगतीने प्राणाधारे आत्मा जिव्हेंद्रियात संचरून, रसविषय घेऊन, शिश्नेंद्रियाने त्याग करतो. अहंकारसंगतीने अपाना-धारे आत्मा घ्राणेंद्रियात संचरून, गंधविषय घेऊन, त्याचा गुदद्वारे मळदुर्गंधीचा त्याग करतो. याप्रमाणे आत्मा सूक्ष्मदेहात शरीरकर्मे चालवितो. म्हणून सूक्ष्मदेहापासून आत्मा भिन्न आहे. यदर्थी संदेह काय? देह म्हटला, मग तो कोणताही असो की, तो आत्म्याहून वेगळा हा सिद्धांत आहे. स्थूल, सूक्ष्म, कारण या शवल पंचभौतिक पंच्याहत्तर तत्त्वसमुच्चययुक्त देहत्रयास साक्षित्वाने व्यापून देहत्रय ओलांडून अन्वयव्यतिरेकाने आत्मा वर्तत आहे. विपरीत ज्ञानासही अज्ञान क्रमून आत्मा त्यावेगळा साक्षी अपरिच्छिन्न होय.

**प्रश्न** :– सद्‌गुरूंनी कृपा करून सांगितले; हे संयुक्तिक मी समजलो, परंतु मला असे वाटते की, मी पाहतो, बोलतो, ऐकतो, नोकरी–कामधंदा करतो, इत्यादि व्यवहारावरून इंद्रियांना चेतना असावी. म्हणून इंद्रियांना किंवा इंद्रियचालक मनाला आत्मा का न म्हणावे? कारण "मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो:।" तसेच "मन:कृतं कृतं राम न शरीरकृतं कृतम्। येनैवालिंगिता कांता

तेनैवाऽलिंगिता सुता ।। " इत्यादि प्रमाणे उपपत्ती पाहता मनच आत्मा ठरतो. बंधमोक्षव्यवस्थासिद्धीही मनानेंच होते. देहिक अहंकार व गृहदारादिकांचे ठायी ममत्व मनच करते, जाणणेपणा हा मनाचाच धर्म आहे. मन स्थिर नसेल तर कामकाज नीट होत नाही. तर मनच आत्मा म्हणण्यास काय हरकत आहे ?

**उत्तर :–** इंद्रियास आत्मे कसे म्हणता येईल ! जसे शरीर पंचभौतिक जड आहे तशी इंद्रिये ही भौतिक जड कारणे आहेत. जसा प्राण हा रजोगुणी भूतविकार आहे, तसे मनही सत्त्वगुणी भूतविकार आहे. जसे केवळ मातीच्या भांडयापेक्षा माती गाळून भट्टी लावून केलेल्या काचपात्राला चकाकी येते म्हणून तो विकार मातीचा नव्हे असे म्हणता येत नाही; त्याप्रमाणे अन्नाच्या सूक्ष्म वाफेने बनलेल्या मनाला आत्मा म्हणता येणार नाही. हे मन (अन्नमय) भूतविकारच आहे व कामादि अवस्थेने हे क्षणोक्षणी भ्रमी होते व संकल्पविकल्पात्मक असल्यामुळे हे चंचल आहे. आत्मा निश्चल आहे. मन विषयांकरिता इंद्रियांना क्षोभविणारे आहे. त्रैलोक्यातील सर्व वैभव मिळाले तरी आशा तृष्णारूपी वृत्तीने मन कधी तृप्त होत नाही. आत्मा तर नित्यतृप्त आहे. मन दुर्वासना धरून पुढे भूतप्रेतपिशाच्चादि भावाला पावविते. आत्मा सर्वव्यापी असल्यामुळे अपरिच्छिन्न असून मन परिच्छिन्न आहे, हे उघड कळते. " अगमन्मे मनोऽन्यत्र सांप्रतं च स्थिरीकृतं ।। " माझे मन दुसऱ्या ठिकाणी गेले होते ते पुन: परत आले, त्याला आता स्थिर केले. असे स्वानुभावाने सर्वांनाही कळते. हे परिच्छिन्न नसेल तर जाणेयेणे कसे घडेल ? व जे कर्म पुढील जन्माला फलोन्मुख होते त्या त्या आकाराचे मन अंतकाली होते; म्हणून त्या त्या जन्माला जावे लागते. जो ज्याला जाणतो तो तो त्याहून निराळाच असतो. ह्या न्यायानेच आपले मन गेले,

झाले इत्यादिक ज्याला कळते, तो आत्मा त्या जड मनाहून निराळाच आहे, हे जागेपणी उघड कळते. स्वप्नामध्ये वाचा आदिकरून सर्व इंद्रिये मनात लीन होतात म्हणजे मनाच्या ताब्यात राहतात. म्हणूनच मन स्वत: आपणच ग्राह्य विषयरूपी होऊन ग्राहक इंद्रियेही आपण स्वत:च बनून देणे–घेणे इत्यादि सर्व व्यापार आत्मसान्निध्याने वळ पावून करते. आत्मा तर स्वयंज्योती आहे. त्या आत्म्याला स्वप्नावस्थेमध्ये कार्य, ज्योती, सूर्य, चंद्र, कर्म इत्यादिक नसताना व करण, ज्योती, नेत्र, कर्ण इत्यादि इंद्रिये नसतानाही स्वचैतन्याकाशाने मन:कृत सर्व पदार्थांना प्रकाशित करतो तो आत्मा मन व मनोव्यापार या सर्वांहून निराळा साक्षि-भूत निर्विकार आहे. मन निश्चल झाले म्हणजे तो निश्चल आहे हे कळू लागेल.

"मनोजृंभणराहित्ये यथा साक्षी निराकुल:।।" इत्यादि प्रमाणाने पाच ज्ञानेंद्रिये व सविकल्पविकल्पात्मक मन मिळून लिंगदेहापैकी एक मनोमय कोश आत्म्यास उपाधिभूत आहे. त्यामुळे तो आत्मा उपाधीहून वेगळाच आहे. उगीच मनाच्या तादात्म्याभासाने भरून आशाभूत होऊ नये.

**प्रश्न** :– मन हे अती चंचल असून बलवान् व अभेद्य आहे. त्याचा निग्रह करणे हे वायूप्रमाणे दु:साध्य आहे, असे मी ऐकतो. तर मन निश्चल कशाने होईल, हे कृपाकरून सांगावे.

**उत्तर** :– मन आवरत नसेल व रूपलावण्यसौंदर्यादिकांना भुलून हट्टी, द्वाड पोराप्रमाणे आवरले असतानाही पुन: पुन: चपळ-पणाने पळत असेल, तर श्रीगुरुदत्तात्रेयांची सुरेख प्रतिमा करून, आपल्या अधिकारानुसार प्रतिष्ठा करून, यथाविधी पूजन–अर्चन करून, पायापासून मस्तकापर्यंत ध्यान करून, स्थिरासनावर बसून

हृदयकमलात ती प्रतिमा साठवून ठेवावी. ध्यान सुटले तरी नाउमेद न होता तशीच आपादतलमस्तकापर्यंत पुन: पुन: भरून घ्यावी. जरी महिना, दोन महिने, वर्षपर्यंत मन स्थिर न झाले तरी खेद न करिता उमेद धरून हात धुऊन मनाच्या पाठीस लागावे म्हणजे त्याची उच्छृंखलता मोडून श्रीदत्ताच्या पादुकांचे चिंतन करताच ते मन आपोआप स्वाधीन होऊन शांत होईल. श्रीभगवद्गीतेत श्रीभगवंतांनी असे सांगितले आहे की–

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ६.३५ ॥**

**प्रश्न :–** सत्य वचन सांगितले व आजपर्यंत श्रीहरीचे जे काही चिंतन, नामस्मरण केले त्या पुण्याचेच फल हे श्रीसद्गुरूंचे दर्शन होऊन श्रवण घडले, तेव्हा हे मन भौतिक जड आहे व मनासह वाचा परत फिरते, पण त्याला आत्मा अगोचर आहे असेही कानावरून गेले आहे. तेव्हा मनाची नियंत्री बुद्धी असून तो स्वतंत्र आहे. बुद्धी करील ते होईल. बुद्धी जर नसेल तर प्रत्यक्ष, अनुमान, उपमान ही प्रमाणे करता येणार नाहीत. स्मरण, ऊहापोह व व्यवहारज्ञान बुद्धीवाचून तरी कसे होईल ? कर्तृत्वसुद्धा बुद्धीलाच आहे, तेव्हा बुद्धीला आत्मा का म्हणू नये ?

**उत्तर :–** ईश्वराने तप करून पंचमहाभूते केली ती त्रिगुणात्मक असल्यामुळे प्रत्येकाच्या रजोशांनी वेगळाली पाच कर्मेंद्रिये झाली व अवशिष्ट सर्व रजोगुणांश एकत्र होऊन प्राण झाला. तो वृत्तिभेदाने पाच प्रकारचा झाला व आकाशादि पंचमहाभूतांच्या सत्त्वाशांनी निरनिराळी पाच ज्ञानेंद्रिये झाली व अवशिष्टच सर्व सत्त्वांश एकत्र होऊन अंत:करण झाले. ते वृत्तिभेदाने संकल्पात्मक मन व निश्चयात्मक बुद्धी अशा दोन प्रकारचे आणले त्याबद्दल

हे पंचीकरणावरून तुम्हास समजले आहे.

जरी प्राधान्याने बुद्धी सात्त्विक आहे तरी तिला अंगभूत रजतम-गुण आहेत. म्हणून त्रिगुणात्मिका ही बुद्धी तीन अवस्थांना पावते.

**"बुद्धेस्त्रिधा वृत्तिरपीह दृश्यते ।**
**स्वप्नादिभेदेन गुणत्रयात्मनः ।।"**

बुद्धीला स्वतंत्र कर्तव्य मानले तर बोधण्याकरिता दुसरी बुद्धी पाहावी लागेल, तर तसे नाही. अग्निसंगाने जसे लोहाला दाहकत्व येते, तसेच आत्मसांनिध्याने बुद्धीला चेतनत्व भासते. बुद्धी झोपेत लीन होते व जागृतीत आपादतलमस्तक व्यापते, तेव्हा बुद्धीला आत्मा म्हटले तर आत्मस्वरूप काजव्याप्रमाणे ठरेल. तर ते आत्म्याला साजेल काय ? बुद्धीच पाप–पुण्य करील तर स्वर्ग–नरक बुद्धीलाच मिळेल. मग जीवाकडे काय संबंध राहिला ? एकाने करावे व दुसऱ्याने भोगावे असे घडेल काय ? नाही, नाही. असे घडणार नाही. यावत् बद्धदशा आहे तावत् जीवाला आध्या-त्मिक कर्तृत्वादिक शास्त्राने मानले आहे. पाचज्ञानेंद्रिये व बुद्धी मिळून सूक्ष्म लिंगदेहापैकी जो एक विज्ञानमय कोश हाच आत्मा असे बौद्धांनी म्हटले ते अगदी चुकीचे आहे. "इंद्रियाणि पराण्या-हुरिंद्रियेभ्यः परं मनः ।.मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥श्रीमद् भगवद्गीता ३.४२॥"

तेव्हा बुद्धीचा साक्षी बुद्धीहून पर असणारा जो तो आत्मा, बोधृत्व, साक्षित्व असूनही स्वये निर्विकार आहे.

**प्रश्न :**— अहंकार लीन झाला म्हणजे निद्रावस्था असे सांगण्यात आले व आता बुद्धी लीन झाली म्हणजे निद्रा व बुद्धिव्याप्ती झाली म्हणजे जागृती असे सांगितले. या दोहींचा अंतरभाव एकच

आहे काय ?

**उत्तर :–** कित्येक चार अंतःकरणभेद–मन, बुद्धी, अहंकार, चित्त असे मानतात. कित्येक दोन मानतात. तेव्हा मनामध्ये चित्ताचा व बुद्धीमध्ये अहंकाराचा अंतर्भाव मानतात म्हणून तसे म्हटले आहे. चार्वाकादिक व पामरजन देहालाच अहंपणा देतात, तो अहंपणा मिथ्या होय. मीमांसादिक चिदाभासाला (जीवाला) अहंपणा देतात, तर तो अहंकार गौण होय. वेदान्त सिद्धांती अकर्ता, अभोक्ता, गमनागमनादिरहित, प्रत्यगात्म्याला अहंब्रह्म असे मुख्यत्वे लक्षणा वृत्तीने अहंकार लक्ष्यार्थ कूटस्थ चैतन्याचे नित्य, शुद्ध ब्रह्माशी सामानाधिकरण्य करतात. तो अहंकार लक्ष्यार्थ मात्र आत्मा म्हटला जाईल. वाच्यार्थरूपी जड अहंकार तर बुद्धीप्रमाणे जड आहे. हा अहंकार जोपर्यंत गळाला नाही तोपर्यंत ब्रह्मदेवाजवळ जरी वास केला तरीही "पुनरपि जननं पुनरपि मरणं, पुनरपि जननी जठरे शयनम्।" ही पुनरावृत्ती चुकणार नाही.

**प्रश्न :–** देहापासून अहंकारापर्यंत जे त्यापैकी एकालाही आत्मा म्हणता येत नाही व आणखी यापुढे काही नाही अर्थात् बाकी शून्य राहिले. जागृतावस्थेत घडलेले व्यापार सुषुप्तीमध्ये अत्यंत लीन होतात. मात्र कित्येक दृष्टश्रुतादि व्यवहार स्वप्नामध्ये मानसिक काही वेळ भासतात, तेही निद्रेमध्ये लीन होतात. हे आपण सांगितले आहे. त्यावेळी परमानंदही होतो; तर मग आनंदरूपी शून्य हाच आत्मा काय ?

**उत्तर :–** बुद्धीमध्ये चैतन्याचे प्रतिबिंब पडले तोच जीव होय. ह्या जीवाला बुद्धिद्वारा स्थूल देहाचे तादात्म्य घडते तेव्हा प्राधान्याने नेत्रांत स्थिती होऊन इंद्रियांनी विषयांचे ग्रहण होते ! ही

स्थूल भोगरूपी जाग्रदवस्था "विश्व" नामक जीव अनुभवितो व तोच जीव इंद्रिये मनात लीन झाल्यावर कंठस्थानी लिंगदेहाशी तादात्म्य पावून तोच विश्वनामक जीव "तैजस" संज्ञक होऊन जागृतावस्थेत पाहिलेले, ऐकिलेले इत्यादि विषयांचा संस्काररूपी प्रविविक्त भोग अंत:प्रज्ञेने घेतो व त्यानंतर नाडीमार्गाने हृदयवेष्टनरूपी पुरी तन्नामाचे पोकळीत येऊन "प्राज्ञ" नामक होत्साता ब्रह्मरूपी शय्येवर निजूनच तो सुखाने परमानंदभोग घेतो; पण पाण्यात पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणे ब्रह्मस्वरूपी मिसळून जात नाही. जसा पाण्याने भरलेला शिसा तोंड घट्ट करून पाण्यात ठेवला तरी ते पाणी जसे ठेवलेल्या पाण्यात मिसळत नाही व पुन: शिसा उचलला तर तेच पाणी तसेच असते; त्याचप्रमाणे अनिर्वचनीय अज्ञानाने आवरलेला जीव झोपेमध्ये ब्रह्मस्वरूपी मिळाला तरी आपले प्रारब्ध भोगण्यासाठी ईश्वरेच्छेने तोच जीव त्याच स्वरूपामध्ये पुन: जागा होऊन देहावर येतो. पूर्वी केलेले व पुढे करण्याचे आपले सर्व उद्योग आठवितो. पण ब्रह्मज्ञानानेच नष्ट होणारे उपाधिभूत अज्ञान नष्ट झाल्यावाचून निरुपाधिकपणे ब्रह्मस्वरूपात अत्यंत लीन होणार नाही. हा जो अवस्थावान् जीव व ह्याचे अवस्था व्यापार जाणणारा, त्या सर्वांहून विलक्षण असून सर्वसाक्षी आहे. तो शून्याहून निराळा शून्याचाही साक्षी आहे. अन्यथा शून्य तरी कोणास कळले ? ज्याला शून्य कळो आले तो तर शून्याहून निराळाच आहे.

प्रश्न :– गाढ झोपेमध्ये त्याचे साक्षित्व कसे समजावे व जागेपणी त्याची ओळख कशी पटावी ?

उत्तर :– ग्रहणकाली सूर्य किंवा चंद्रमंडळ पाहणाऱ्यास स्पष्ट दिसून न आले तरी तेवढ्याने ती मंडळे नाहीतच असे होत

नाही. मात्र स्पष्ट भासत नाहीत; पण तसल्या त्या खग्रासाच्या वेळी खग्रासातिरक्तपणाने त्या मंडळांचा भास होतोच होतो. त्याप्रमाणे सर्वेंद्रियांतःकरणोपरमरूपी निद्रेमध्ये शून्य साक्षीपणाने राहून जीवाला उठल्यावर स्मरण करून तोच देतो, इत्यादि प्रमाण आहे. म्हणून झोपेतून उठलेला जीव मी सुखाने इतका वेळ निजलो होतो, मी काही जाणले नाही, असे उद्‌गार काढतो. पूर्वी अनुभविल्यावाचून हे स्मरण तरी कसे व्हावे ? तेव्हा त्यावेळीही हा अनुभव आहे व दुसरे असे, हा जीव म्हणजे ब्रह्मस्वरूपाहून एक निराळाच पदार्थ आहे असे नाही.

"ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः" ॥

असे प्रमाण आहे. जोपर्यंत संघाताचा अभिमान धरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी इत्यादि रूपाने व्यवहार करतो तेव्हा जीव म्हटला जातो. हा जीव स्वतः सच्चिदानंद-स्वरूपी असूनही देहादिकांचे ठायी निमग्न होऊन मायेने मोहित होऊन सुखासाठी अहर्निश तळमळ करून मनाला प्रिय वाटणारे वरेच संबंध करतो.

"यावंतः कुरुते जंतुः संबंधान्मनसः प्रियान् ।
तावंतोऽस्य निखन्यंते हृदये शोकशंकवः ॥"

"सुखमस्याऽत्मनो रूपम् ॥"

मी सुखरूपी आहे असे खरोखर जोपर्यंत कळले नाही तोपर्यन्त देहाला, प्राणाला, मनाला, बुद्धीला व शून्याला आत्मा म्हणून भ्रांतपणे वाद मात्र करण्याचा; पण ह्या शून्याचाही साक्षी व धर्माधर्मादिरहित, कार्यकारणभाववर्जित असून भूतभविष्यवर्तमान कालाने परिछिन्न होत नाही. अतएव षड्भावविकार ज्याला नाही असा नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, परमानंदाद्वितीयरूपी आत्मा कळ-

ण्याला कठीण आहे. जागेपणी ह्याची ओळख पटण्याला कठीण नाहीच नाही. सर्व विकल्प दूर करून स्वसंवेद्य आत्मस्वरूप आपणच ओळखावे. जसा वारा आत घुसल्याने पाण्यावर पाण्याचा तरंग निराळ्या स्वरूपाचा भासतो; पण त्याच्या आत पूर्वेकडे पाणी व पश्चिमेकडेही पाणी व जिकडून आला व जिकडे जातो ते सर्व पाणीच पाणी. तोच वायू शांत झाला म्हणजे तरंग म्हणून काही निराळा पदार्थ आहे काय? काही नाही. त्याप्रमाणेच भूतभौतिक देव, नर, नारी, पशू, पक्षी, कृमी, कीट, वृक्ष, वल्ली इत्यादि विविधरूप बाह्यदृष्टीने जे जे भासते ते ते सर्व एक सच्चिदानंदात्मक स्वरूपच आहे. दुसरे काही नाही. जे स्थावर जंगम अणूरेणू पर्यन्त दिसते त्याचे नामरूप सोडून एक सच्चिदानंददृष्टीनेच सर्व पाहावे. मग कोण प्रिय, कोण अप्रिय, मित्र, शत्रू कोण? कोण साधू, कोण असाधू, वियोग व योग कोणाचा? हे सर्व मायिक असून व्यवहारिक कहाणी आहे.

**प्रश्न** :– सत्य आहे. पण हे भिन्नपणाने नामरूपात्मक जगत् ढळढळीत दिसत असता त्याची आटणी करून हे एकच आहे असा मनाचा निश्चय कसा होईल?

**उत्तर** :– **वर्षोपला यथाऽभिन्ना अपि भिन्ना इहांभसि ॥**
**ब्रह्मणीदं तथा विश्वं ब्रह्माभिन्नं विनिश्चितु ॥**

जलरूपी गारा घट्ट रूपाने जळावर पडल्या तरी जळाहून त्या निराळ्याच दिसतात. पण विचक्षण लोक गारा पाणीच आहे अशा दृष्टीने पाहतात व क्षणांतरी त्या गारांचे पाणी होते. ह्या न्यायाने अखिल जगताचे नामरूप सोडून निरंतर सच्चिदानंद दृष्टी मात्र विवेकाने ठेवावी हेच विवेकाचे कार्य होय. दगड मारून घडा फोडल्याप्रमाणे अजिवात नामरूप नाहीसे करावे असे

कर्तव्य नाही. ते नामरूप आकाराला पावलेले जगत् विवेकानंतर दग्धपटन्यायाने वापुडे राहीना का? एक वेळ बाधित केल्यावर बाधितानुवृत्तीने राहिले तरी त्यापासून मग काय बाधा आहे? काही नाही. यावत् व्यवहारक्षयापर्यन्त वापुडे खुशाल राहो. कारण की, "करें निर्मिले तें मनें तोडवेना। मनें निर्मिलें तें करें मोडवेना॥"

**प्रश्न :–** चित्ताची एकाग्रता होऊन अद्वैतवासना होण्याची मुष्कील पडते यास काय करावे?

**उत्तर :–** या तुमच्या प्रश्नावरून असा निश्चय होतो की, अद्यापि तुमच्यावर ईश्वराचा अनुग्रह झाला नाही. त्यावाचून केलेले श्रवण "नळी फुंकिली सोनारें। इकडून तिकडे गेले वारे॥" याप्रमाणे आहे. किंवा काही समजले तरी ते नुसते शब्दज्ञान, काय त्याचा उपयोग? लोकांमध्ये वटवट करण्यापुरता मात्र उपयोग होईल. "लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण॥" तर असे श्रवण करू नये. लक्षपूर्वक श्रवण घडले पाहिजे.

**प्रश्न :–** ज्या योगाने श्रवण केलेले अंगी बाणून त्याचे मनन व निदिध्यासन घडेल असा ईश्वरानुग्रह कसा व्हावा?

**उत्तर :–** सर्व जीवांना आपल्याप्रमाणेच देहादिक प्रिय असून जसे आपणास दुःख होते असेच इतरांना होईल व देह हे मंदिर आहे व त्यामध्ये राहणारा जीव हा सदाशिव आहे, असा निश्चय करून अहिंसारूप जे पुष्प त्याला आवडते ते देऊन निरंतर "सोऽहं भावाने पूजा करावी." हिंसा म्हणजे प्राणच घेणे असा अर्थ नव्हे; तर कायावाचामनाने दुसऱ्यास पीडा न देणे हा अर्थ समजावा. अतएव निरर्थक कोणाचे मन देखील दुखवू नये. कायावाचामनाने केलेले सर्व कर्म ईश्वराला समर्पण करावे, मने स्वच्छ राखावी, सरळ वागावे, असत्य भाषण करू नये, क्रोधरूपी [illegible] स्पर्श

होऊ देऊ नये, झालाच तर स्नान करावे. कसे कोणी बोलोत, आपण शांती धरावी, दुर्जनपणा करू नये, इंद्रिये आपल्या ताब्यात ठेवावीत, प्रिय भाषण करावे, वाईट कर्मांची लाज ठेवावी, हानी झाल्यास खचू नये, इष्टवियोग झाला तरी हळहळू नये, मोठेपणा सोडून द्यावा, बाह्याभ्यंतर शौच (शुद्धी) करावे, संगती करावी तर सज्जनांचीच करावी, मिळेल त्यात संतोष मानावा व घडेल तसतसे श्रवण आदराने करावे. असे वागल्यास अवश्यमेव ईश्वराचा अनुग्रह होईलच होईल.

प्रश्न :– सोऽहंभावाने पूजा करावी म्हणून सांगितले तो सोऽहंभाव कसा ?

उत्तर :– सोऽहं हे संस्कृत वाक्य आहे. सः म्हणजे तो-परोक्षदूर असणारा, अहं–म्हणजे मी–अपरोक्ष स्वयंप्रकाश, हे दोन पदार्थ आहेत. यांनाच जीवशिव म्हणतात. सोऽहं या वाक्याची सः अहं ही दोन त्याची पदे होत. या प्रत्येक पदाचे वाच्यार्थ व लक्ष्यार्थ असे दोन अर्थ आहेत. त्यातून पंचभौतिक स्थूलदेह हा पहिला; पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये, पंचप्राण व मन बुद्धी मिळून एक लिंगदेह हा दुसरा. अज्ञान कारणदेह हा तिसरा, मिळून देहत्रयवेष्टित जे चैतन्य अविद्याविद्या प्रतिबिंबित जीव अविद्याधिष्ठान चैतन्य हा अहंपदाचा वाच्यार्थ आहे व साक्षीकूट प्रत्यगात्मा हा अहंपदाचा लक्ष्यार्थ आहे. विराटदेह :– सप्तपाताललोक पायापासून कंबरेपर्यन्त व भूरादिलोक नाभिपासून मस्तकापर्यन्त इत्यादि हा त्याचा स्थूलदेह होय. दिशा, वायू, वरुण, अश्विनीकुमार, अग्नी, इंद्र, प्रजापती, मृत्यू, मन, बुद्धी, चित्त, अहंकार असा हिरण्यगर्भाख्य ज्याचा लिंगदेह व माया अव्याकृताख्य कारणदेह ज्याचा, ह्या देहत्रयाने वेष्टित जे ब्रह्मचैतन्य माया, मायाधिष्ठान

ब्रह्मचैतन्य व माया प्रतिबिंबित (ईश्वर) हा सः या पदाचा वाच्यार्थ होय व सत्य ज्ञानानंत परमानंद लक्ष्यार्थ होय. तेव्हा दोन्ही वाच्यार्थांना विरोध आला तरी वाच्यार्थ सोडून (देहप्राणें-द्रियमनोबुद्धी अहंकाराहून वेगळा; विश्व असून तैजस, प्राज्ञ हे तीन देहाचे अभिमानी विकारी याहून निराळा; जाग्रत्स्वप्न-सुषुप्तीचा साक्षी, अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंद-मय ह्या पंचकोशांच्या व्यतिरिक्त जो मी कूटस्थ साक्षी प्रत्यगात्मा तोच हा विराट सूत्रात्मा अव्याकृतमाया ह्या देहत्रयांहून निराळा व त्याचे अभिमानी वैश्वानर, हिरण्यगर्भ, ईश्वर त्याहून वेगळा व सृष्टिस्थितिप्रलय हे त्यांचे व्यापार जे त्यांचा साक्षी, सत्य, ज्ञान, अनंत, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव परमात्मा आहे.) असेच दोन्ही लक्ष्यार्थांचे अखंड तैलधारेप्रमाणे निरंतर चिंतन करावे, हेच निदिध्यासन (ध्यान) होय.

जीवशिव एकच आहे असा वेदान्त ऐकून निर्धार करणे ते श्रवण होय. श्रवणाने संशय नष्ट होतात. अविद्योपाधीने जीवाला किंचिज्ञ-पणा आला व विद्या (माया) उपाधीने शिवाला (ईश्वराला) सर्वज्ञपणा आला. या दोन्ही उपाधी सोडल्यावर परस्परांचे एकत्व संभवते; असे अनुसंधान श्रवणानुसाराने करणे ते मनन होय. मननाने असंभावना नष्ट होते. स्वप्नाप्रमाणे दिसणारे नामरूपा-त्मक जगत् मृगजळाप्रमाणे किंवा रज्जुसर्पाप्रमाणे आहे व श्रवण मननाने निःसंशयपणे ठरलेले. जीवशिवांचे एकत्व मात्र सत्य आहे अशी धारणा लावून चित्ताने जीव-शिवैक्य ध्येयाचे निरंतर चिंतन करणे ते निदिध्यासन होय. ह्या ध्यानाने विपरीत भावना नष्ट होते; मन नामरूप कुलजातिसंबंध सोडून देहाला मी म्हणतात त्याप्रमाणे शिव परमात्मा मी आहे. असे दृढतर होऊन झोपेप्रमाणे

सर्व विसरून जाणे ही उपरती (निर्विकल्प समाधी) होय. ह्याने कृतकृत्यता येते. पुनः जन्म येत नाही. ज्ञानसमकालच मुक्ती आहे. तरी लोकदृष्टीने यावत्प्रारब्ध देह राहो. एक वेळ आवरण भंग झाल्यावर पुनः देहादिकांचा तादात्म्यध्यास होत नाही. हेच बोधाचे वैभव. अभ्यासाने बोध दृढ करून मनोभंग, वासनाक्षय ज्यांनी केला त्याला ही जीवमुक्ती मिळते. विशेष काय सांगावे, एक वेळ आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे मोह, शोक, रागादि नष्ट होतात, संशय फिटतात, हृदयग्रंथी तुटतात, जन्म-मरण देणारी कर्मे खुंटतात, सर्व पाश तुटतात. मग तेथे कर्तृत्व, भोक्तृत्व, पाप-पुण्य कोठून येणार? ह्याप्रमाणे ह्याच डोळा जीवन्मुक्तीचा हा सोहळा ज्यांनी अनुभविला त्यांचे प्रारब्ध संपल्यावर पिकल्या पानाप्रमाणे देह कोठेही पडो, प्राणोत्क्रांती होणार नाही. तापलेल्या दगडावर टाकलेल्या पाण्याप्रमाणे सर्व कला स्वरूपात लीन होताच पूर्वी ब्रह्मच असून जीवपणा भ्रमाने आलेला तो ज्याचा गेला असा तो ब्रह्मच होतो. हे सारांशभूत वेदान्ततात्पर्य आहे.

**॥ श्रीगुरुदेवदत्त ! श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजकी जय ! ॥**



# परिशिष्ट क्रमांक ५

**॥ श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्रीस्वामीमहाराजांनी महासमाधी घेतल्यावरही त्यांचे तेथे निरंतर वास्तव्य असल्याची प्रचीती ॥**

श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथें श्रीस्वामीमहाराजांनी महासमाधी घेतल्यानंतर ज्यावेळी तेथील श्रीदत्तमंदिराचे व श्रीसमाधिमंदिराचे बांधकाम सुरू झाले त्यावेळी तेथे काम करणाऱ्यांपैकी एका कारागिराच्या पायाला सूज आल्यामुळे त्याला फार त्रास होऊ लागला. त्यामुळे त्याला तेथील काम करणे अगदी अशक्य झाले. पुढे पुढे तर त्याला चालताच येईना. त्याला बसल्या बसल्या सरकूनच शौचाला जावे लागत असे. त्यामुळे त्याच्या मनाला अत्यंत खेद झाला व उद्विग्नता आली. त्याला असे वाटू लागले की, "आता आपल्याला येथून घरी जाणेच भाग आहे. हे देवाचे काम करणे व तद्द्वारा देवाची सेवा करणे हे काही आपल्या प्रारब्धात नाही." या विचारांमुळे त्या कारागिराला अत्यंत उदासीनता आली.

अशा स्थितीतच एके दिवशी तो कारागीर नित्याप्रमाणे बसल्या बसल्या सरकत सरकत शौचाला निघाला असता समोरून एक भगवे वस्त्र अंगावर पांघरलेले व भगवी लंगोटी नेसलेले श्रीसंन्यासी महात्मे त्या कारागिराच्या जवळ आले व त्यांनी त्याला जवळचे एक झाड काढून दिले व ते त्या कारागिराला असे म्हणाले की, "अरे! या झाडाचे पंचांग म्हणजे मूळ, खोड, पान, फळ व फूल हे सर्व बारीक वाटून शिजव व ते पायाच्या सुजेवर लावून शेक. असे केले म्हणजे तुला लवकर बरे वाटेल व तुझ्या इच्छेप्रमाणे

तुझ्याकडून मंदिराचे बांधकाम होऊन तुला देवाची सेवा घडेल." श्रीसंन्यासीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्या दिवशीच त्या कारागिराने त्या झाडाचे औषध तयार करून आपल्या पायावरील सुजेला लावले. आश्चर्याची गोष्ट अशी की, त्या कारागिराच्या पायाची सर्व सूज नाहीशी होऊन दुसऱ्या दिवशीच तो अगदी खडखडीत बरा झाला.

आपल्याला पायावर उभे राहता येते व आपण चांगले चालू शकतो हे पाहून तो कामावर गेला. तो कामावर आल्याचे पाहताच कामावरील मुकादमाने त्याला असे विचारले की, "तू कालपर्यंत तर फारच आजारी होतास. तुला उभेही राहता येत नव्हते. अशा स्थितीत तू एकदम बरा कसा झालास ? तू कोणता उपाय केलास ?" हा प्रश्न ऐकताच तो कारागीर आपल्या मुकादमाला असे म्हणाला की, "काल एक संन्यासी महात्मे मला भेटले व त्यांनी एका झाडाचे औषध मला दिले. त्यांनी सांगितल्याप्रमाणे माझ्या पायाच्या सूजेवर लावताच तो पाय बरा झाला. त्यामुळे माझी प्रकृती निरोगी होऊन मला काम करण्याची उमेद आली. त्यामुळे मी कामावर हजर झालो."

त्या कारागिराचे हे उत्तर ऐकताच मुकादमाला व इतर कारागीर मंडळींना कमालीचे आश्चर्य वाटले. त्यावेळी मुकादमाने त्या कारागिराला असे विचारले की, "ते संन्यासी महात्मे कोण होते ? हे तुला माहीत आहे काय ? त्यांचे नाव काय होते ? ते तुला भेटल्यावर कोठे गेले ?" हे सर्व प्रश्न ऐकताच तो कारागीर असे म्हणाला की, "मला त्या संन्यासी महात्म्यांचे नाव माहीत नाही. मात्र मला भेटून ते श्रीनर्मदानदीकडे निघून गेल्याचे मी पाहिले." त्या कारागिराने असे सांगताच मुकादमाने त्याला

श्रीस्वामीमहाराजांची तसबीर दाखवून असे विचारले की, "या तसविरीतील बावाजी व तुला भेटलेले बावाजी या दोघात अंतर होते की, ते दोघे एकच होते ?" हा प्रश्न ऐकताच त्या कारागिराने एकदा त्या तसविरीकडे निरखून पाहिल्यावर तो असे म्हणाला की, "केवळ कपड्याच्या रंगाशिवाय मी पाहिलेले बावाजी व या तसविरीतील बावाजी (संन्यासी महात्मे) हुबेहूब एक सारखेच आहेत. त्यांच्यात इतर कोणताच फरक नाही. या तसविरीतील बावाजींच्या वस्त्राचा रंग काळसर आहे. मात्र मला जे बावाजी भेटले होते त्यांची वस्त्रे लालसर भगवी होती. याखेरीज दुसरे अंतर मला दिसत नाही."

त्या कारागिराचे हे बोलणे ऐकताच व ही हकीकत सर्वांना माहीत होताच मुकादमाला, कामावरील सर्व मंडळींना व श्रीक्षेत्र गरुडेश्वरी असलेल्या श्रीस्वामीमहाराजांच्या सर्व भक्तमंडळींना श्रीस्वामीमहाराज अदृश्य रूपाने येथे (श्रीक्षेत्र गरुडेश्वरी) आहेत याची खात्री पटून फारच धन्यता वाटली. श्रीस्वामीमहाराज देहरूपाने तिरोहित झाल्यावरही ते येथील सेवेकरी मंडळींची पूर्वीसारखीच काळजी घेतात हे पाहून सर्वांच्या डोळ्यात आनंदाश्रू उभे राहिले. श्रीस्वामीमहाराजांनी जरी लोकदृष्टीने देहाचे विसर्जन केले असले तरी तें वास्तविक पाहता अज, नित्य, अव्यय, अक्षर, अनाख्येय, आनंद, अमृतानंत आणि वाणी मनास अविषय असल्याने त्यांच्या लीला अगम्य आहेत.

अशा प्रकारच्या श्रीस्वामीमहाराजांच्या लीला या नित्यशः चालू असून, हे जे सात खंडातील बृहत्‌चरित्र लिहून व छापून प्रसिद्ध झाले आहे, हा त्यांच्या लीलेची एक अभूतपूर्व चमत्कार व अद्‌भूत आविष्कार आहे, यात काहीच शंका नाही.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

## परिशिष्ट क्रमांक ६

— श्रीसीतारामहाराज विरचित —

# ॥ अथ श्रीमद्वासुदेवानंद लहरी प्रारम्भः ॥

ॐ नमोजी गजवदना । प्रसन्नवक्त्रा विघ्ननाशना ।
ग्रंथारंभीं करितों स्मरणा । सिद्धी पाववी दातारा ॥१॥
तुझें स्मरण केलिया । मग विघ्नें जाती लया ।
हेंचि जाणोनी गणराया । स्तवितों तुज भावेंसी ॥ २ ॥
विघ्नअरण्य छेदावयासी । हातीं परशू धारण करिसी ।
आपुलिया भक्तां प्रतिपाळिसी । सर्व संकटें हरोनी ॥३॥
गणांचें पालन करिसी ।
म्हणोनि गणपति हें नांव मिरविसी ।
तरी मज पामरासी । रक्षी आता एकदंता ॥ ४ ॥
असो आतां माझ्या बोला । ऐकोनी येई कृपाळा ।
गाईन आतां श्रीगुरुलीला । सिद्धि पाववी वेगेंसी ॥५॥
आतां नमूं शारदेसी । जगन्माता तूंचि होसी ।
हंसावरी बैसूनि वेगेंसी । धांवत येई लवलाहें ॥ ६ ॥
असें मी अल्पमति हीन । काय वर्णूं तुझे गुण ।
मज पामरासी देई वरदान । स्फूर्ति येवो कवनासी ॥७॥
तुज नमूं ब्रह्मकुमरी । पुस्तकवीणा जियेचे करीं ।
वसोनि माझिये जिव्हाग्रीं । ग्रंथ सुरस वदवीं तूं ॥८॥

शोभती चार बाहू जिला। धारण करी स्फटिकाक्षमाळा।
दुसरा हस्त मिरवी भला। शुभ्रकमलेसी ॥ ९ ॥
भक्तांचे हृदयीं बैसोन। बुद्धीसी करी चेतन।
ती तूं मज हो प्रसन्न। गुरुकथामृत वदवी हें ॥ १० ॥
नमोनमोजी सद्गुरू। तुझी लीला अपरंपारू।
परी भवसागरपैल पारू। तूंचि करिशि स्वामिया ॥ ११ ॥
तुझी कृपा ज्यासी होय। तोचि जाणे मोक्षसोय।
इतर बापुडे ते काय। गेले वाहत स्वमतेंसी ॥ १२ ॥
तुझ्या अनुग्रहावीण। काय देती देव जाण।
देव कर्माआधीन। देती फळ भक्तांसी ॥ १३ ॥
गंगास्नानें पाप जाय। चंद्र तापातें नेई लया।
कल्पद्रुम दैन्य हराया। समर्थ होई ॥ १४ ॥
तुझ्या दर्शनमात्रेंसी। पाप ताप दैन्यराशी।
नुरती क्षणमात्रेंसी। अगाध महिमा असे तुझा ॥ १५ ॥
अनेक मतें ग्रंथांतरीं। वावरताती नाना परी।
अंतीं दुःखसागरीं। नेवोनि घालिती ॥ १६ ॥
कोणी करिती उपासना। कोणी करिती योगानुष्ठाना।
करिती पंचाग्निसाधना। आपुलिया मतेंसी ॥ १७ ॥
कोणी यज्ञयाग करिती। म्हणती येणें स्वर्गप्राप्ती।
नेणती मूर्ख स्वर्गस्थिती। पावती पतन स्वर्गींचे ॥ १८ ॥
कुमार्ग ऐसे आचरून। पावती प्राणी अधःपतन।
सद्गुरुकृपेवीण जाण। पुनरावृत्ति न चुके कदा ॥ १९ ॥

यास्तव देव आणि दैत्य । सद्गुरूसी भजति नित्य ।
गुरु तारील हेंचि सत्य । सुमार्ग दावोनी ॥ २० ॥
गुरु आहेती पुष्कळ । काय करावे निष्फळ ।
ज्ञाता न ये मोक्षफळ । व्यर्थ कष्ट देती जे ॥ २१ ॥
नाहीं केली उपासना । टाकोनि देती वर्णाश्रमा ।
नित्य नैमित्तिक तपानुष्ठाना । सांडिलें जिहीं ॥ २२ ॥
यम आणि नियम । साधन संपत्तीही नेणे जाण ।
श्रृतिस्मृति पुराण । न देखे न ऐकिजे कदाही ॥ २३ ॥
नाहीं अनुबंधचतुष्टय । न देखे जो गुरूची सोय ।
ऐसा गुरु देईल काय । म्हणोनी तयासी न सेविजे ॥२४॥
शुष्क वेदान्तचर्चा करिती । जगीं धन्य म्हणोनि मिरविती
विद्वज्जनांसी निंदिती । ऐसे दांभिक असती बहु ॥२५॥
नेणे ध्यान समाधी । न तुटे मनांतील आधी ।
नेणे हो अंतरशुद्धी । केवळ बकध्यानी जे ॥ २६ ॥
दया क्षमा आणि शान्ती । नेणे कदाही विरक्ती ।
अखंड असे आसक्ती । विषयांमाजी ॥ २७ ॥
अभक्ष्य पदार्थ भक्षिती । शिष्यांमाजी प्रसाद देती ।
असे दुराचारी वर्तती । प्रत्यक्ष अवतार कलीचे ॥२८॥
सदा पाहिजे मिष्टान्न । न रुचे कदा कदन्न ।
शीतोष्णादि द्वंद्व जाण । साहूं न शकती कदाही ॥२९॥
धूर्त बहु वाचाळ । जगीं दावी नाना खेळ ।
वेदान्ताचा करी सुकाळ । परी अंतर्मुख नोहे कदा ॥३०॥

कलीमाजी ऐसे गुरू । सृष्टीवरी अपरंपारु ।
उपदेशुनी वारंवारू । सोडिती वर्णाश्रमासी ।। ३१ ।।
आतां ऐका सद्‌गुरूचें लक्षण । मन होईं समाधान ।
जेणें तुटे भवबंधन । साधकाचें ।। ३२ ।।
आपण असोनि अंतर्निष्ठ । जनासी मार्ग दावी नीट ।
ऐसा ज्ञानी वरिष्ठ । श्रेष्ठ होय सर्वांसी ।। ३३ ।।
कर्मनिष्ठ जन असती । त्यांची घडे जों संगती ।
आपण वर्ते तैसी स्थिती । कायावाचामनेंसी ।। ३४ ।।
जिज्ञासूची झालिया भेट । नैष्कर्म्याची दावोनि वाट ।
ज्ञानमार्ग सांगे सुभट । पुनरावृत्तिरहित जो ।। ३५ ।।
जयासी जैसा अधिकार । तैसा सांगे प्रकार ।
करोनी सारासार विचार । वागे जो का ।। ३६ ।।
कर्म उपासना योग । आपण करोनि यथासांग ।
साधकांसी दावी मार्ग । उत्तम जो का ।। ३७ ।।
श्रुतिस्मृति पुराणें । यथायोग्य देई प्रमाणें ।
जेणें मना होय समाधान । साधकाचेनी ।। ३८ ।।
स्वधर्माचरणीं धीट । अनाचार पाहतां ये वीट ।
तितिक्षा राखी जो बळकट । तो होय पूज्य सर्वांसी ।।३९।।
नित्यनैमित्तिक अनुष्ठान । ईश्वरार्पणबुध्या करिती जन
ते पाहोनी हो समाधान । प्रीती राखे तयांवरी ।।४०।।
क्षमा दया शान्ति । जयासी दासी शोभती ।
अष्टसिद्धी वावरती । रात्रंदिवसेंसी ।। ४१ ।।

अंतरीं ज्ञानसूर्याची शोभा । मुखावरी फांकली प्रभा ।
दुर्जन साम्होरेसी उभा । राहों न शके कदाही ।। ४२ ।।
ऐसा असे जो का ज्ञानी । पूर्ण पावला समाधानी ।
जयाच्चियेनी दर्शनी । पालटे बुद्धि त्वरितेंसी ।। ४३ ।।
कृतकृत्य असोनी आपण । परोपकारी देह झिजवून ।
कष्ट करी रात्रंदिन । नाहीं अभिमान तिळभरी ।।४४।।
शत्रुमित्र समान । मानापमान दे सोडून ।
सुखदुःख शीतोष्ण । न शिवे द्वंद्व जयासी ।। ४५ ।।
स्वशरीरीं उदासीन । परकार्यीं अतिनिपुण ।
जयाचिये मनीं शीण । न वचे जाय कदाहीं ।। ४६ ।।
आपण तीर्थरूप असोनी । तीर्थें फिरे अनुदिनीं ।
स्नानसंध्यादि सारोनी । अलिप्त असे सर्व काळ ।।४७।।
ऐसा असे जो का गुरू । तोचि जाणा सर्वेश्वरू ।
तयासी माझा नमस्कारू । कायावाचेमनेंसी ।। ४८ ।।
गुरु ब्रह्मा गुरु विष्णु । गुरुचि होय उमारमण ।
गुरु प्रत्यक्ष ब्रह्म जाण । निरुपाधिक असे जें ।। ४९ ।।
गुरुवांचोनि ज्ञानप्राप्ती । न वचे कदा कल्पांतीं ।
सद्‌गुरुकृपा होय निगुती । सर्व सिद्धी लाहिजे ।।५०।।
म्हणोनी कीजे गुरुस्तुती । जेणें देव संतुष्ट होती ।
प्राप्त होती चारी मुक्ती । अनायासेंसी ।। ५१ ।।
यासी प्रत्यक्ष प्रमाण । गुरुमुखें घडलें वेदान्तश्रवण ।

जयाचियेनि कृपावलोकनें जाण । गेलें अज्ञान लयासी ५२
श्रीगुरूची होतां कृपा । चुकल्या जन्ममरण खेपा ।
सुषुम्णेचा मार्ग सोपा । दाविला जेणें ।। ५३ ।।
आतां कैचें जन्ममरण । कैचें येईल अज्ञान ।
लाधलें स्वरूपानुसंधान । अखंडैकरसेंसी ।। ५४ ।।
बहुतां जन्मीं होती आस । सद्‌गुरूचें व्हावें दास ।
पूर्ण करोनी ब्रह्मरस । देशिकवरें पाजियेला ।। ५५ ।।
या कलियुगामाझारीं । पातक होत असे भारी ।
आचार सांडिला द्विजवरीं । म्हणोनी होती अदृश्य ।५६।
असों आम्ही प्रारब्धहीन । अंतरले श्रीगुरूचे चरण ।
दुजावरी कां बोल ठेवणें । होणार न टळे कदाही ।।५७।।
किती रम्य मनोहरी । मूर्ति शोभे साजिरी ।
बाप हो स्मरा अंतरीं । गुणकर्मे अत्यद्‌भुत ।। ५८ ।।
स्मरण होतां चित्तास । प्राण होय कासावीस ।
गुरुमायेनें निराश । केलें सकळ भक्तांसी ।। ५९ ।।
होतों आनंदसागरीं । भय नसे कवणेपरी ।
अवचित वज्रपाताचे परी । केला घात दुर्दैवें ।। ६० ।।
आतां न व्हावें निराश । स्थिर करोनी चित्तास ।
स्मरावें श्रीगुरुवचनास । अहर्निशेंसी ।। ६१ ।।
बोध केला वारंवार । त्याचा न पडावा विसर ।
करोनी सारासारविचार । प्रपंचीं अलिप्त असावें ।।६२।।
प्रसंगीं झालें निरूपण । त्यांचें करूनियां स्मरण ।

सदा स्वरूपीं स्थिर मन । कीजे अवश्य ।। ६३ ।।
मागुती ऐसा उपदेश । ऐकोंचि न येईल कर्णास ।
ऐसा निश्चय करोनि खास । निःसंगता लाहिजे ।।६४।।
श्रीगुरुरायाचे वचन । होय जरी विस्मरण ।
तरी पुनरपि न चुके जन्ममरण । कल्पांतीही ।। ६५ ।।
मनीं धरोनी विश्वास । पूर्णपणें निदिध्यास ।
जप करावा रात्रंदिवस । सोहं मंत्रेंसी ।। ६६ ।।
जयासी जें साधन । केलें असेल निरूपण ।
होतां अभ्यास परिपूर्ण । देती दर्शन श्रीगुरू ।। ६७ ।।
लौकिकदृष्टचा गुप्त होती । भाविकांसी स्मरण देती ।
जागृत असों भूवरती । स्मर्तृगामी म्हणोनियां ।। ६८ ।।
वासुदेवानंदसरस्वती गुरू । न म्हणावें तयांसी नरू ।
जाणावा तोचि अवतारू । श्रीदत्तात्रेय ।। ६९ ।।
बहुतां जन्मीचें सुकृत । फळासी आलें अत्यद्भुत ।
प्रत्यक्ष श्रीगुरु दत्त । देखिले नयनीं ।। ७० ।।
करूं नये आतां खेद । मार्ग दाविला अतिविशद ।
प्रस्थानत्रयाचा बोध । उपदेशियेला ।। ७१ ।।
अधिकार नसे वेदांताचा । तयासी ध्यान आणि योगाचा ।
अथवा मंत्रोपदेशाचा । करिती बोध ।। ७२ ।।
आनंदाचा सागर । देखिला आम्ही महीवर ।
बाप हो ऐसा प्रकार । डोळां देखों न येई ।। ७३ ।।
गुरुमातेचें होता स्मरण । जाऊं पाहे माझा प्राण ।

कोण करी समाधान । इये सभयीं ।। ७४ ।।
ऐसा होतां प्रकार । स्वप्नीं येवोनी गुरुवर ।
निरूपिला अर्थ गृह्यसूत्र । यज्ञो वै नम इति प्रकारेंसी ।७५।
वेदान्ताचा उपदेश । करोनि सुखविलें चित्तास ।
जागृती पाहतां अदृश्य । जाहले तेथेंची ।। ७६ ।।
साक्षात् ईश्वर अवतार । अवतरला भूमीवर ।
स्वधर्माचा प्रकार । दाविलासे कलियुगीं ।। ७७ ।।
प्राकृत आणि संस्कृत । ग्रंथ निर्मिले अत्यद्भुत ।
भरिलें असे अद्वैतामृत । वेदान्तविषयेंसी ।। ७८ ।।
कर्मउपासनायोग । भक्तिज्ञान यथासांग ।
सुगम दाविला मुक्तिमार्ग । सुभाविकांसी ।। ७९ ।।
कित्येक गद्यपद्यात्मक । नाना छंद अत्यंत रसिक ।
विद्वज्जनासीं कौतुक । होत अतिशयेंसीं ।। ८० ।।
म्हणती हा हो योगीश्वर । करावया जगदुद्धार ।
स्थूल दृष्टचा नराकार । भासे प्राकृत जनांसीं ।। ८१ ।।
अंत न लागे कवणासी । विद्या कला चातुर्येंसी ।
पाहो येती देशोदेशी । दर्शनें चकित होती समस्त ।।८२।।
ऐशी हे गुरुमूर्ती । प्रख्यात जहाली भूवरती ।
दर्शनें कुंठित होई मती । विद्वज्जांनची ।। ८३ ।।
तोचि सद्गुरु जाणावा । देव तेथेंचि पडे ठावा ।
धरितां मनीं सद्भावा । परतीरा पाववी जो ।। ८४ ।।
अगाध संसार सागरीं । पडिले अती घोरांधारीं ।

ऐशिया जनांतें रक्षण करी । गुरुचरण नौका हे ॥८५॥
सद्‌गुरु उपदेशें करून । प्राप्त झाले दिव्य ज्ञान ।
स्वरूपीं पावलों विश्राम । तें सरस किंचित वर्णावें ॥८६॥
नित्यनिरुपम निर्व्यापार । अमाय निष्कल निर्गुणाकार ।
निर्विकल्प अजरामर । शुद्धबुद्धात्मा प्रकाशे ॥ ८७ ॥
अस्तिभाति प्रियत्व । वस्तुमात्रीं व्यापकत्व ।
विष्णुशब्दें निर्देशत्व । वेदीं असे वर्णिला ॥ ८८ ॥
स्वाविद्यें होवोनी बद्ध । मोहें कर्म करी विरुद्ध ।
दैवयोगें होतां चित्त शुद्ध । स्वात्मज्ञानी मुनी होय ॥८९॥
मायावशें निद्रिस्त होता । अनेक स्वप्न पाहे मागुता ।
बाल्य यौवन वृद्धावस्था । आणि वर्णाश्रमादि ॥ ९० ॥
शरीरीं दृढ झाली अहंता । वाढे स्त्रीपुत्रावरी ममता ।
शत्रुमित्रादि द्वंद्वता । भिन्नत्व स्वमतें कल्पीतसे ॥९१॥
ऐसा स्वप्नीं बरळत । अनेक जन्मीं फेरे घेत ।
जीव दुःखें हो संतप्त । म्हणे यासी काय करूं ॥ ९२ ॥
कवणालागीं जावें शरण । कोणाचे करूं पूजन ।
कैसें निरसावें बंधन । त्रिगुणात्मक असे जें ॥ ९३ ॥
नाना स्वप्नीं व्यापला । जीव संतापें पोळला ।
म्हणे आतां कोण भला । मार्ग दावी ॥ ९४ ॥
वीतरागी मुमुक्षु पाहतां । कींव येई श्रीगुरुनाथा ।
म्हणे यासी उपेक्षितां । जाई ब्रीद आमुचें ॥ ९५ ॥
ऐसा निश्चय सिद्ध होतां । शिष्या प्रबुद्ध करिती तत्त्वता ।

उपदेशिती वेदान्ता । ऐतरेयोपनिषद्भागेंसी ।। ९६ ।।
बारे शिष्या तूं धन्य । कृतकृत्य आणि वदान्य ।
कुल पवित्र जगमान्य । तूंचि होसी ।। ९७ ।।
मायापाशें झालों बद्ध । आवरणें केले नयन अंध ।
आतां नित्यमुक्त शुद्धबुद्ध । मी ब्रह्म केवीं होई ।।९८।।
ऐसा विवेक तव चित्ता । उपजलासें तत्त्वतां ।
यास्तव निवृत्ति आली हातां । पूर्वसुकृतेंसी ।। ९९ ।।
पितरांसी ऋणमुक्त । करावया समर्थ होती सुत ।
परी मायासंबंधा पासाव मुक्त ।
आपला आपणचि होईजे ।। १०० ।।
जेवीं मस्तकावरील भार । कोणी अन्य न करी दूर ।
क्षुधादि दुःखपरिहार । करावा स्वकीय सुखेंसी ।।१०१।।
रोग होई जयासी । तेणेंचि सेविजे पथ्यौषधासी ।
तरी आरोग्य तयासी । जेवीं होय ।। १०२ ।।
चंद्रा पाहणें असे जया । स्वकीय नेत्रेंसी दिसे तया ।
तैसें बोधचक्षू वांचोनियां । न होईजे स्वरूपज्ञान ।।१०३।।
अविद्या कामकर्मादि पाश । बंधमोचन करावयास ।
आपणावांचोनी इतरांस । कल्पशतांती न घडे हें ।।१०४।।
शब्दजाल महारण्य । हें चित्तभ्रमासी कारण ।
यास्तव तत्त्वविदा पासोन । आत्मा यथार्थ जाणिजे।१०५।
मनइंद्रियांची ऐकाग्र्यता । हें परम तप आदरितां ।
सहज ये मुमुक्षुता । वीतरागी हो जेणें ।। १०६ ।।

सर्व साधनांमाजी श्रेष्ठ। मोक्षालागीं बोध वरिष्ठ।
अन्योपायें नाना कष्ट। देती पुनरावृत्ती जे ॥ १०७ ॥
धनंजयावांचोन। पाकनिष्पत्ती नोहे जाण।
तेवी अपरोक्ष ज्ञानेंविण। मुक्ती न लाभे सर्वथा।१०८।
कर्म अज्ञानासी अविरोध। यास्तव अविद्येचा न हो बाध।
विद्यें अविद्या होई दग्ध।जैसा प्रकाशें तिमिरनाशी।१०९।
जो आत्मा अपरिच्छिन्न। अज्ञां भासे परिच्छिन्न।
नष्ट होतां आवरण। हो अधिष्ठान चराचरीं ॥११०॥
मायावशें झाला ईश। अविद्यें जीवत्व ये त्यास।
माया अविद्या होतां नाश। न जीवेश केवल हो ॥१११॥
जोंवरी मी ब्रह्म। हे न जाणिजे वर्म।
तयासी जें मुख्य शर्म। न मिळे खास कदाही ॥११२॥
मोक्षाची असे चाड जया। शरण व्हावें सद्गुरुराया।
मग ते निवारिती भया। निःसंदेहें ॥ ११३ ॥
काया वाचा मनेंसीं। शरण व्हावें संतांपाशी।
दाविती सुगम मार्गासी। अनायासें ॥ ११४ ॥
म्हणोनि वर्णाश्रमोचित। करावें कर्म सुनिश्चित।
तेणें होतां शुद्ध चित्त। अंगीं विरागिता बाणे ॥११५॥
वैराग्य दृढ होतां। साधनसंपत्ती ये हाता।
अनुक्रमें सिद्धता। प्राप्त होय गुरुकृपें ॥ ११६ ॥

॥ इति श्रीमद्वासुदेवानंद लहर्यां प्रथमोध्यायः ॥

★

## ॥ अथ द्वितीयाध्याय प्रारंभः ॥

श्रीदत्त । प्रथमारंभी श्रीगुरूसी । नमन कीजे साष्टांगेंसी ।
जयाचियेंनि कृपेसरशीं । ये स्फुरण बुद्धीतें ॥ १ ॥
आचार हा असे आद्य । जो इहपर फल दे सत्य ।
तया आचरितां अनवद्य । मिळेल पद अढळ जें ॥ २ ॥
जिहीं आचार सांडिला । उभय लोकीं भ्रष्ट झाला ।
अंत्यजवत् तयाला । त्यजावा हें श्रुतिसंमत ॥ ३ ॥
(कर्मब्रह्मोभयभ्रष्टं तं त्यजेदंत्यजं यथा)
अनाचारें ये मालिन्य । अत्याचारें हो मूर्खपण ।
विवेकें करितां आचरण । मनःशुद्धी हो जेणें ॥ ४ ॥
आचारप्रभवो धर्म । ऐसें भगवान् बोले वर्म ।
तो आदरितां मिळे शर्म । ब्रह्मपद उत्तम जें ॥ ५ ॥
नित्य आणि नैमित्तिक । कर्में करितां सम्यक् ।
चित्तशुद्धया शमादिक । मग सहजचि प्राप्त होती ॥६॥
शमादि संपत्ती मिळतां । ज्ञानासी नसे दुर्लभता ।
ज्ञानें अविद्या नष्ट होतां । काय नवल ॥ ७ ॥
यास्तव अहंकाररहित । करावें कर्म ईश्वरार्पित ।
तेणें दोष जाती समस्त । अनेक जन्मार्जित असती जे ॥८॥
यासी रामगीता प्रमाण । सौमित्रीसी सांगे राम ।
चित्तशुद्धीलागी कर्म । साधकें कीजे ॥ ९ ॥
(आदौस्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः ।

कृत्वा समासादितशुद्धमानसः।
समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः।
समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये ॥ १ ॥)
केवळ कर्मे करूनी। जनकादि झाले ज्ञानी।
भगवद्गीतेमाजी वृष्णी। किरीटीसी बोधीतसे॥ १० ॥
(स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धि लभते नरः ॥१८.४५)
कर्मे समस्त दोष जाती। कर्मे शुद्ध होई मती।
कर्मे हो भगवत्प्राप्ती। अंतीं हो नैष्कर्म्यता ॥११॥
हिरण्यगर्भादि स्थावरांतीं। यदेकं चैतन्यमस्ति।
तदेवाहमस्मि इति। धिषणा दृढ जंव न होये ॥१२॥
तोंवरी कर्मासी अधिकार। बोले लक्ष्मणासी जानकीवर।
जगदखिल मदाकार। न देखिजे जोंवरी ॥१३॥
(यावन्न पश्येदखिलंमदात्मकं।
तावन्मदाराधनतत्परोभवेत् ॥१॥)
माझे ठायीं सर्व जग। जगीं असें मीच अव्यंग।
पाहे होवोनी निःसंग। तोचि अधिकारी जाणपां ॥१४॥
मग ईश्वराची होय कृपा। सन्मार्ग तो होय सोपा।
वाव न मिळे पुण्यपापा। निस्त्रैगुण्यत्व तया बाणे ॥१५॥
भेदाभेद गलित होती। पुण्यपापें लया जाती।
मायामोह नाश पावती। संदेहवृत्ति नष्ट होय ॥१६॥
शब्दातीत गुणरहित। तत्त्वावबोध होतां प्राप्त।
निस्त्रैगुण्यमार्गी वर्तत। विधिनिषेध मग केंवी ॥१७॥

निस्त्रैगुण्याचें लक्षण । निर्द्वंद्व नित्यसत्वस्थपण ।
निर्योगक्षेम स्वानुसंधान । मिळे अंतीं सायुज्यता ॥१८॥
जयासी जो वर्णाश्रम । तयासी जें उचित कर्म ।
तेंचि कीजे निष्काम । मिळे सिद्धि मानवा ॥१९॥
(स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विदंति मानवः।१८.४६।)
निरभिमान कर्म केलिया । कामादि रिपू जाती लया ।
निर्विकल्प समाधी तया । प्राप्त हो क्रमेंसी ॥२०॥
यासी असे साधन । नैराश्यें विविक्त सेवन ।
नियतवाक्कायमन । करावें प्रयत्नेंसी ॥२१॥
नित्य असावें ध्यानयोगपर । वैराग्यीं व्हावें सादर ।
काम क्रोध दर्प अहंकार । परिग्रहादिक त्यजावें ॥२२॥
निर्ममता असावी । देहबुद्धि वर्जावी ।
तरी शान्ति मिळे आघवी । ब्रह्मभूयीं समर्थ हो ॥२३॥
असावें सम सर्वभूतीं । होय परा मद्भक्ती ।
हेंचि असे सदुक्ती । श्रीकृष्णार्जुनसंवादीं ॥ २४ ॥
सर्व कर्में सदा करी । मदाश्रयें राहे जरी ।
मत्प्रसादें मिळे तरी । शाश्वत पद अव्यय जें ॥ २५ ॥
क्रिया शरीरोद्भव हेतु । हें वाक्य स्मृतिसिद्धांतु ।
ऐसें मानी जो अभक्तु । तया अधिकार कैसेनी ॥२६॥
कर्में अविद्या वाढे । तरी जनकादि काय वेडे ।
व्यर्थ कर्माचें सांकडें । कासया वाहती ॥ २७ ॥
जैसी मोक्षासी साधन विद्या । तेवीं चित्तशुद्ध्यर्थ हे क्रिया ।

शेखी समाधिसुख योगिया । प्राप्त हो अनायासे ॥२८॥
श्रीरामें केला बोध । लक्ष्मणासी अतिविशद ।
त्याचा येथे अनुवाद । सांप्रतू कीजे ॥ २९ ॥
(श्लोक) ननु क्रिया वेदमुखेन चोदिता ।
यथैव विद्या पुरुषार्थसाधनं ।
कर्तव्यता प्राणभृतः प्रचोदिता ।
विद्या सहायत्वमुपैति सा पुनः ॥ १ ॥
कर्माकृतौ दोषमपिश्रुतिर्जगौ ।
तस्मातसदा कार्यमिदं मुमुक्षुणा ॥ २ ॥)
जरी असे ज्ञान प्राप्ती । कर्माची नसे समाप्ती ।
पार्थालागीं हे नीती । तृतीयाध्यायीं वर्णिली ॥ ३० ॥
(उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहं ।
संकरस्य च कर्ता स्वामुपहन्यामिमाः प्रजाः ॥३.२४॥
न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचारन् ॥३.२६॥)
यावद् रागादिवृत्तीलय । नोहे सत्त्वाचा उदय ।
तावत् कर्माचा क्षय । नोहे सहसा ॥ ३१ ॥
फलेच्छा त्यागावी । सत्क्रिया ते आदरावी ।
जोंवरी उत्तम पदवी । मिळे ब्रह्मविद्वरिष्ठता ॥ ३२ ॥
सागरतुल्य अपरिमित । आचार असे विस्तृत ।
मुनिजनांसीहि असंभावित । परि आदरें सेविजे ॥३३॥
पाराशरादिकीं संमत । असे जो का सारभूत ।

उत्तम गति होय प्राप्त । तया आचरितां ॥३४॥
कर्म करणें ईश्वरार्पण । अंतीं करावें विष्णुस्मरण ।
यस्य स्मृत्येति उच्चारून । आपण अलिप्त असावें ॥३५॥
यत्करोषी यदश्नासीती । गीतेमाजी अर्जुनाप्रती ।
बोध करी जगत्पती । भक्तवत्सल परमात्मा ॥३६॥
तें करीं गा मदर्पण । जें का घडे शुभाशुभ कर्म ।
मग तूं सहजपणें मुक्त जाण । होसी पार्था ॥३७॥
श्रुतिस्मृतिपुराणोक्त । आचार सेविजे यथोक्त ।
तेणें होतां शुद्ध चित्त । साधनसंपत्ती आदरिजे ॥३८॥
साधनसंपत्तीचें लक्षण । सर्वत्र असे निरूपण ।
परि सारभूत विवरण । श्रोतीं परिसावें ॥३९॥
(साधनान्यत्रचत्वारि कथितानि मनीषिभिः ।
येषु सत्स्वेव सन्निष्ठा यदभावे न सिध्यति ॥१॥)
साधनें हीं असती चार । तीं सेविजे सादर ।
अन्यथा साधनाचा बडिवार । कासया बोलिजे ॥४०॥
जेवीं उदरपूर्ती अन्नानें । तैं मोक्षप्राप्ति होय ज्ञानें ।
परि अन्नार्थीयासी साधनें । कीजे पाकादिक ॥४१॥
केवळ अन्नाचें स्मरण । करितां नोहे उदरभरण ।
तेवीं साधनव्यतिरिक्त ज्ञान । न होइजे कालत्रयीं ॥४२॥
दीप उजळितां जाय तिमिर । ज्ञानें अविद्या हो संहार
परी तैलवर्तीं न्यून मात्र । होतां दीपप्रभा केवीं ॥४३॥
नाहीं केला शत्रुसंहार । अखिल भूमीचें नसे ऐश्वर्य ।

राजाहमिति शब्दमात्रें । सार्वभौमत्व होय कीं ॥४४॥
यास्तव प्राहिजे साधन । नातरी तें अन्यथा ज्ञान ।
कासया कीजे व्यर्थ श्रम । भार वाही खर जेवीं ॥४५॥
प्रथम नित्यानित्य विवेक । ऐहिकामुष्मिकविरागचोख ।
तृतीय शमादिषट्क । मुमुक्षुत्व तुरीय जें ॥४६॥
ब्रह्म एक असे सत्य । नामरूपात्मक जग असत्य ।
ऐसा विवेक जो तथ्य । योगियां होय संमत जो ॥४७॥
देहादि सत्यलोकपर्यंत । अनित्य असे भोगजात ।
दोषदृष्टि अवलोकित । असावें चतुरीं ॥ ४८ ॥
मग तो होय यथासांग । इहामुत्रफलविराग ।
साधकासी निःसंग । करी जो कां ॥ ४९ ॥
स्वलक्ष्यीं मन स्थिर । करी दृश्याचा संहार ।
यापरी करणें विचार । तया शम बोलिजे ॥ ५० ॥
श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें पंच । वागादि कर्मेंद्रियें पंच ।
तयां बाह्यव्यापार संकोच । करणें तो होय दम ॥५१॥
विषयांचें अनालंबन । स्वरूपाचें आलंबन ।
वृत्तीलागीं हें साधन । उपरति तेचि जाण पां ॥ ५२ ॥
चिंता विलाप न करितां । शीतोष्णादि सहिष्णुता ।
अथवा शत्रुमित्रादि समता । हे तितिक्षा जाणावी ॥५३॥
चित्ताचा थारा मोडून । शुद्ध ब्रह्मीं स्थिर मन ।
या नांव समाधान । बुद्धीसी समता हो जेणें ॥ ५४ ॥
शास्त्र आणि गुरुवचन । हेंचि मुख्य प्रमाण ।

ऐसें बुद्धीसी अवधारण । ठेविजे हेंचि श्रद्धा ।। ५५ ।।
या नांव शमादिषट्क । साधकें सेविजे सम्यक् ।
तोचि अधिकारी चोख । हो मुमुक्षुत्वा ।। ५६ ।।
ऐका मुमुक्षुतेचें लक्षण । जेणें होय दिव्य ज्ञान ।
विषय होती सर्व शून्य । अंगीं विरक्तता ये सहज ।।५७।।
मरणोन्मुख प्राणी होतां । इंद्रियें सोडिती विषयचिंता ।
किंवा स्त्रीपुत्रादि रुदन करितां । न देखिजे तें ।।५८।।
कीं राजा करी शासन । दे सुळावरी नेवोन ।
तेथें तया मिष्टान्न । देतां प्रिय होय कीं ।। ५९ ।।
दावाग्नीनें पोळला । मार्ग न मिळे तयाला ।
म्हणे आतां कोण भला । दावील पंथ ।। ६० ।।
ऐशिया परी जाण । गेला प्रपंचीं पोळून ।
चिंता करी रात्रंदिन । शांतवील मज कोण ।। ६१ ।।
त्रिगुणात्मक हे पाश । तेणें झालों परवश ।
प्राण होय कासावीस । आतां मुक्तता कैसेनी ।। ६२ ।।
कवणालागीं जावें शरण । कवण्या देवाचें करूं पूजन ।
अथवा तीर्थ व्रत हवनें । तुटे बंध ? ।। ६३ ।।
पावकें गृह वेष्टितां । आपणिया ये दग्धता ।
तैं स्त्रीपुत्रावरी ममता । ठेवील केवीं ।। ६४ ।।
लगबग ये बाहेर । शीतळ करी उपचार ।
परी पुत्रादि स्वजनाचा विसर । पडे तेव्हां ।। ६५ ।।
यापरी भवदवें पोळला । मृगजलासम प्रपंचाला ।

मानी तो तीव्र मुमुक्षु भला । अधिकारी पात्र हो कीं ।६६।
या नांव मुमुक्षा जाण । निवटोनी जाई जन्ममरण ।
पूर्ण ब्रह्म सनातन । होय अंगीं ।। ६७ ।।
क्षुधितासी अन्न । कीं तृषार्तासी जलपान ।
तेंवी साधकालागीं साधन । दे तृप्तीला ।।६८।।
हा दृष्टांत एकदेशी । क्षुत्पिपासा अर्हानिशी ।
पीडा करी जंतूसी । उदर भरण निमित्तें ।। ६९ ।।
साधन हें तयापरी । न मानावें चतुरीं ।
कोटी जन्माची फेरी । चुकवील जें ।।७०।।
बाल्यावस्थेपासून । करावा अभ्यास परिपूर्ण ।
विषयाभिरुचि नोहे जाण । इंद्रियांलागीं ।।७१।।
हा अभ्यासासीं मुख्य समय । इतर तो गौण होय ।
मनाचा विषयीं होता लय । नावरे कीं ।।७२।।
यासाठीं प्रल्हादें । बोध केला विनोदें ।
तयाचा येथें अनुवाद । केला असें कीं ।।७३।।
(कौमार आचरेत्प्राज्ञोधर्मान्भागवतानिह ।)
या अवस्थेमाजीं । ईश्वर त्वरें हो राजी ।
ध्रुवादिक सद्भक्तां जी । गती देई उत्तम ।।७४।।
हा मार्ग असें उत्तम । प्राप्त होय सायुज्यधाम ।
विघ्नें निवारी पुरुषोत्तम । निश्चयेंसी ।।७५।।
ऐसे हें साधन बरवें । प्राप्त होय जरी आघवें ।
मग गुरूसी भजावें । कायावाचा मनेंसी ।।७६।।

गुरु साक्षात् ईश्वर । न म्हणावें तया नर ।
जो करी पैलपार । भवनदीच्या ।।७७।।
शाब्द आणि परब्रह्म । हें जाणील जो वर्म ।
ऐसा गुरु उत्तम । साधकें सेविजे ।।७८।।
मग निःशंक होऊन । साष्टांगें करोनीं प्रणाम ।
समयोचित करावा प्रश्न । सेवा करोनी संतोषविजे ।७९।
पूर्वयुगीं शिष्यांकरवीं । सेवा घेवोनी बरवी ।
प्रसन्न होतां आत्मपदवी । देती इच्छामात्रेंसी ।।८०।।
कृतयुगीं तेजोराशी । होता एक धौम्य ऋषि ।
तिघे शिष्य होते त्यासी । बैद अरुण उपमन्य ।।८१।।
प्रथम छात्र तो अरुण । सेवेलागीं निष्णात पूर्ण ।
गुरु तया सांगती तूर्ण । क्षेत्रासी उदक देईजे ।।८२।।
वंदन करोनी गुरुचरणीं । निघता जाहला तत्क्षणीं ।
क्षेत्रीं येवोनी पाहे पाणी । पल्वल अति सखोल जे ।।८३।।
करोनी अति प्रयत्न । तोय आणी तो अरुण ।
सवेगें प्रवाह परिपूर्ण । जाऊं पाहे अन्यत्र ।।८४।।
करितां पाषाणचय । जलओघें स्थिर न होय ।
म्हणे क्षेत्रीं न जातां तोय । गुरु मज धिक्कारिती ।।८५।।
गुरुनिमित्त मरावें । परी कार्य सिद्धीलागीं न्यावें ।
स्वशरीर स्थापोनी बरवें । नेलें उदक क्षेत्रासी ।।८६।।
मग इतुकिया अवसरीं । धौमऋषी पातला क्षेत्रीं ।
जलपूर्ण पाहतां अंतरीं । हर्षभरित जाहला ।।८७।।

परी शिष्या न देखे डोळां । उच्चस्वरें पाचारी तयाला ।
बा रे मन्निमित्त कष्टविला । स्वदेहासी ॥८८॥
ऐसा मनीं विचार करी । तों शिष्या देखे जलाभीतरीं ।
अभयकरें धरोनी वरी । सप्रेमें काढी तयासी ॥८९॥
प्रसन्न होवोनी गुरुवर । मस्तकीं तो ठेवी कर ।
म्हणे विद्याकलाचतुर । जहालासी तूं ॥९०॥
जावोनी आपुलिया गृहासी । भेटें मातापितयासी ।
कीर्तिवंत तूंची होसी । भोगी सर्वैश्वर्यातें ॥९१॥
गुरुआज्ञा घेऊन । गेला स्वस्थानीं तो अरुण ।
कीर्तिध्वज उभारून । कृतार्थ जाहला ॥९२॥
मग दुसरा अंतेवासी । बैदनाम असे तयासी ।
अंगीकारी गुरुवाक्यासी । भक्तिभावे करोनी ॥ ९३ ॥
धौम्य ऋषी म्हणती तया । तुवां शेतीं जावोनियां ।
धान्य राखावें बा सखया । पक्व होय तोंवरी ॥ ९४ ॥
ऐकतांची गुरुवचना । नमस्कारोनी गुरुचरणा ।
निघाला तो शिष्यराणा । प्रेमभरें डुल्लत ॥ ९५ ॥
येवोनिया क्षेत्रापाशीं । धान्य रक्षी अहर्निशीं ।
परिपक्व होतां गुरूसी । निवेदन करीतसे ॥ ९६ ॥
गुरु म्हणती शकटास । जुंपोनियां एक महिष ।
वेगें नेई शेतास । धान्य आणी सत्वर ॥ ९७ ॥
मग तो घेतसे गाडा । तयासी जुंपी एक रेडा ।

दुजे ठायीं आपुला नरडा। बांधोनी शकटा तो नेई ।९८।
या परी तो शिष्योत्तम राशी । भरोनी घे धान्यासी ।
निघोनि येतां आश्रमासी । गाडा रुतला कर्दमीं ।।९९।।
एकीकडे तो महिष । दुजे ठायीं आपणांस ।
बांधोनी ओढितां गळां फांस। पडिलासे तयाच्या ।१००।
तेणें होय कासावीस । मनीं चिंती गुरुचरणास ।
ऐसें होता त्या समयास । धौम्य ऋषि पातले ।। १०१ ।।
अवलोकुनी शिष्यासी । गहिंवर दाटला गुरूसी ।
तात्काळ मुक्त करोनी तयासी । वर देती सप्रेमें ।।१०२।।
बा रे शिष्या तूं धन्य । भुवनत्रयीं होसी मान्य ।
तुजसम दुजा वदान्य । न मिळे जाण सर्वथा ।।१०३।।
सर्वविद्यापारंगत । जहालासी शुचिष्मंत ।
मेदिनीवरी भाग्यवन्त । जहालासी तूं ।।१०४।।
ऐसा वर लाधोन । गुरूसी साष्टांग नमन ।
करिता झाला पुनः पुनः । प्रेमभरेसी ।।१०५।।
आज्ञा घेवोनी सत्वर । गुरूसी स्मरे वारंवार ।
संतोषवी मातापितर । अतिगौरवें करोनी ।।१०६।।
असा प्रतापी पुण्यवंत । बैदनामें विख्यात ।
लाधे चारी पुरुषार्थ । श्रीगुरूंचिया प्रसादें ।।१०७।।
मग तिसरा उपमन्यु । स्वप्नींहि नसे जया मन्यु ।
जयाचा महिमा अनुपमन्यु । कवणा वर्णवे ।।१०८।।
कोणी एके दिवशीं । धौम्य सांगे तयासी ।
गाई चारावया काननासी । तुवां नेईजे ।।१०९।।

परिसोनि गुरुवचना । गोसंरक्षणार्थं निघे वना ।
समय होतां मध्यान्हा । भोजनार्थ ये गृहीं ॥११०॥
ऋषि म्हणती त्वरित । कां येसी आश्रमांत ।
सायंकाळापर्यंत । धेनु राखी वनीं तूं ॥१११॥
गुरुवचन परिसोनी । गाई चारावया निघे विपिनीं ।
समय होतां मध्यान्हीं । क्षुधेनें व्याकूळ जाहला ॥११२॥
म्हणे आतां काय करूं । जातां आश्रमीं कोपेल गुरू ।
क्षुच्छमनार्थं आहारू । कोण देई ॥११३॥
ऐसा विचार करी मनीं । तंव द्विजअग्रहारा देखे नयनीं ।
मग भिक्षार्थ निघे तत्क्षणीं । ब्राह्मणगृहीं ये त्वरें ॥११४॥
भिक्षान्नासी दोष नसे । ऐसा स्मृत्यर्थ स्पष्ट असे ।
भिक्षान्न सोमरस ऐसें । बुधजनीं समंत ॥११५॥
(श्लोक) (भिक्षाहारी निराहारी । भिक्षा नैव प्रतिग्रहः ।
भिक्षाहारी प्रकुरुते । षोमपानं दिने दिने ॥१॥)
भिक्षेसी अधिकार । सांगे स्मृति वारंवार ।
तयाचा भिन्न प्रकार । सांगितलासे ॥११६॥
(अध्वगः क्षीणवृत्तिश्च विद्यार्थी गुरुपोषकः ।
यतिश्चब्रह्मचारीच षट्पक्वान्नस्य भिक्षुकाः ॥१॥)
आणोनी भिक्षान्नातें । भक्षी सप्रेमभरें तें ।
सायंकाल समयातें । पातला धौम्याश्रमासी ॥११७॥
यापरी काल क्रमितां । स्मरण झालें गुरुनाथा ।
म्हणती अन्न न सेविता । देहपुष्टता कैसेनी ॥११८॥

शिष्य म्हणे ऋषीसी । भिक्षा मागें ब्राह्मणगृहासी ।
करीं भोजन मध्यान्हसमयासी । नित्य नेमें ।।११९।।
ऐकतांचि शिष्यवचन । म्हणे गुरु त्यासी धिक्कारून ।
एकलाचि करिसी भोजन । भिक्षा आणोनी दे गृही ।१२०।
नित्य भिक्षा वेळ दोन । प्रथम गुरूसी करी अर्पण ।
दुसरिया भिक्षान्ने करी भोजन । उपमन्यु ।।१२१।।
पुनरपि एके दिवशीं । गुरु पुसती शिष्यासी ।
भिक्षा गृहीं आणितोसी । काय खासी तूं नित्य ।।१२२।।
भिक्षा करी वेळ दोन । प्रथम गुरूसी अर्पण ।
द्वितीय भिक्षेने स्वयें भोजन । करितों नित्य ।।१२३।।
ऋषी म्हणती उपमन्यूसी । दोन्ही भिक्षा गृहासीं ।
दे आणोनी प्रतिदिवशीं । नित्य नेमें करूनी ।।१२४।।
ऐसा तो शिष्यराणा । भिक्षा अर्पी गुरुचरणा ।
करी मध्यान्हीं उपोषणा । अल्प शेष घे ।।१२५।।
एके दिनीं मध्यान्हीं । क्षुद्व्याधीनें पीडित होवोनी ।
गोवत्स पीतां देखे नयनीं । वाहे क्षीर भूमीसी ।।१२६।।
करितां दुग्धप्राशन । तेणें झालें क्षुच्छमन ।
गृहीं भिक्षा दे नेवोन । दुग्धपान करी नित्य ।।१२७।।
मागुती एके दिनीं । ऋषी पुसती तया लागोनी ।
देसी भिक्षा आणुनी । काय खासी वनीं तूं ।।१२८।।
उपमन्यु म्हणे तयास । सेवी वत्स पीतावशेष ।
गुरु म्हणती उच्छिष्ट । भक्षितां मति भ्रष्ट होई ।।१२९।।

पुनरपि एके दिनीं । अर्कक्षीर वाहतां देखे नयनीं ।
हें शुद्ध एसें जाणोनी । करी प्राशन ते वेळां ॥१३०॥
जातां दुग्ध तया नयनीं । अंध जहाला तत्क्षणीं ।
पडिला तो धरणीं । मार्ग न मिळे तयासीं ॥१३१॥
मग तो बहु दुःख करी । पातला ऋषी ते अवसरी ।
म्हणे अश्विनीकुमारां जरी ।स्तवितां येती नयन तुझे
परिसोनि गुरुवचना । स्तवन करी शिष्यराणा ।
दिव्यदृष्टि ये तत्क्षणा । श्रीसद्गुरुप्रसादें ॥१३३॥
मस्तकीं ठेवितां कर । जाहला विद्याकलाचतुर ।
जेवीं प्रकाशी दिनकर । तम नासोनी ॥१३४॥
सद्गुरुकृपेचा महिमा । वेदा न मिळे ज्याची सीमा ।
जो नेई निजधामा । भाविकासी ॥१३५॥
जया अधिकार जैसा । सांगताती प्रकार तैसा ।
अथवा करविती योगाभ्यासा । अनुक्रमेंसी ॥१३६॥
कृष्ण सांगे अर्जुनासी । कर्मी ज्ञानी आणि तापसी ।
श्रेष्ठ हो योगाभ्यासी । सर्वांहोनी ॥१३७॥
म्हणोनी करावा योग । साधेल जरी यथासांग ।
जो करी दुःखवियोग । पुनरावृत्ती न दे जो ॥१३८॥
॥ इति श्रीमद्वासुदेवानंदलहर्यां साधनसंपत्ति निरूपणं नाम द्वितीयोध्यायः ॥

## ।। अथ तृतीयाध्याय प्रारंभः ।।

ॐ नमो नमोजी सद्‌गुरुनाथा ।
बहुत लाविले परमार्थपंथा ।
परी योगाभ्यासगाथा । सांगा मज अनुकंपें ।।१।।
योग म्हणजे काय । तो केवीं प्राप्त होय ।
तद्रक्षणार्थ सदुपाय । बोलिजे सांगोपांग ।।२।।
कोण असे अधिकारी । यती वनी ब्रह्मचारी ।
गृही अथवा नारी । निरोपिजे दातारा ।।३।।
परिसोनी शिष्यप्रश्नासी । हर्ष झाला मानसीं ।
मग सांगती योगासी । पातंजलीसंमत जो ।।४।।
जया म्हणती हठयोग । जो करी दुःखवियोग ।
जीवाशिवासी संयोग । होय जेणें ।।५।।
बोले गोरक्षसंहिता । स्पष्ट करी या अर्था ।
दावीतसे सुगमपंथा । उन्मनी अवस्था होणें जे ।।६।।
(हकारः कितितः सूर्यष्ठकारश्चंद्र उच्यते ।
सूर्यचंद्रमसोर्योगाद्धठयोगो निगद्यते ।)
हकार तो होय सूर्य । ठकार तो चंद्र होय ।
उभयांसी एकीकरणोपाय । तया हठ बोलिजे ।।८।।
प्राण आणि अपान । यांसी कीजे समान ।
दोहोंलागीं एकीकरण । हाचि योग जाणिजे ।।९।।
अथवा जीव आणि शिव । यांचा जो ऐक्यभाव ।
द्वैतासी न मिळे वाव । जया योगीं ।।१०।।

करिता योगसाधन । परमात्मबुद्धि मिळे जाण ।
सागरासी जेवी लवण । मिळतां होय एकरस ।।११।।
नातपस्विनो योगस्सिध्यति । ऐसें सूत्रकार बोलती ।
तपी तेची पात्र होती । अधिकारासी ।।१२।।
सकळसाम्राज्यवैभवासी । अथवा सत्यलोक विलासेंसी ।
लक्ष्मी आलिया जयापाशीं । परी थुंकोनीं तीसी पुसेना
तोचि अधिकारी जाण । जो निःसंगें पूर्ण ।
तयासी योगसाधन । प्राप्त होय अनायासें ।।१४।।
संगें समस्त दोष येती । संगें भ्रष्ट हो मती ।
आत्मपुराणीं विख्याती । बोलली असे ।।१५।।
(निस्संगता मुक्तिपदं यतीनाम् ।
संगादशेषाः प्रभवंति दोषाः ।
आरूढयोगोपि निपात्यतेधः ।
संगेन योगी किमुता प्रसिद्धः ।।१।।)
यास्तव धरिजे असंगता । तेणेंच सिद्धि मिळे हाता ।
परी कुपथ्यान्न भक्षितां । रोगग्रस्त हो योगी ।।१६।।
सेवावें नित्य पथ्यान्न । हें योगरहस्यवचन ।
हो वृद्धिगत सात्वगुण । होय जैसेनी ।।१७।।
(क्षाराम्लतिक्त कटुरुक्ष कदन्न शाकस्त्यग्न्यध्वभाङ्न
भजतेऽकुशलोस्य सिद्धिं । शुंठीसितासुमनशालि
सदन्नमुद्गचाक्षुष्यशाक घृतदुग्ध सदंबुपथ्यं ।।१।।)
भोजनाचें प्रमाण । भागद्वय भक्षिजे अन्न ।

एक भाग जलें भरोन । वायुसंचारार्थ तुरीय जो ॥१८॥
(द्वौभागौपूरयेदन्नैस्तोयेनैकं प्रपूरयेत् ।
वायोःसंचारणार्थाय चतुर्थमवशोषयेत् ॥१॥)
आतां अभ्यासाचें स्थान । वर्जावा देश दुर्जन ।
सुराज्य सुभिक्ष धार्मिक जन ।
असावा उपद्रवरहित जो ॥१९॥
(वर्जयेत् दुर्जनप्रांतं वन्हिस्त्री पथिसेवनं ।
प्रातःस्नानोपवासादि कायक्लेशविधि तथा ॥१॥
सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे ।
एकान्ते मठिकामध्यें स्थातव्यं हठयोगिना ॥२॥)
ऐका मठाचें लक्षण । कीजे सुदृढ नूतन ।
अल्पद्वार शोभायमान । रंध्रविवर रहित जो ॥२०॥
अत्युच्च ना अतिनीच । गोमयें लिप्त कीजे साच ।
कीट पिपीलिकादि किंच । नसती जेथें ॥२१॥
कीजे सुशोभित मडप । वेदी सन्निध असावा कूप ।
सुपुष्पित वृक्ष अमूप । प्राकारें वेष्टित असींजे ॥२२॥
ऐसा मठ सुरुचिर । योगियांहि मनोंहर ।
मग अभ्यासीं सादर । असावें साधकें ॥२३॥
स्त्री अग्नी पथिसेवन । वर्जावें प्रातःस्नान ।
शरीरकष्ट उपोषण । न कीजे सर्वथा ॥२४॥
धौती आणि वस्ती । नेती आणि त्राटक रीती ।
नौलिका कपालभाती । देहशुद्ध्यर्थ षट्कर्म ॥२५॥

यमनियम आसन। हो येणें नाडीशोधन।
मग जिंकावा प्राण। गुरुचिया अनुग्रहें ॥२६॥
प्राणायामें पापक्षय। प्रत्याहारें विषयजय।
धारणेनें प्रमादसंक्षय। ध्यानें रागद्वेष नष्ट होती ॥२७॥
समाधीनें चित्तैकाग्यता। स्वरूपीं मन स्थिरावे तत्त्वतां।
विवेकें सायुज्यता। प्राप्त होय अनुक्रमें ॥२८॥
ऐसा असे योगमहिमा। कोण जाणे याची सीमा।
वश करी पुरुषोत्तमा। अनायासेंसी ॥२९॥
यमनियमादि अनुक्रमें। साधावा प्राणायाम।
जेणें हो निष्काम। मन योगियाचें ॥३०॥
(यमैश्च नियमैश्चैव ह्यासनैश्चसुसंयुतः।
नाडिशुद्धिंच कृत्वाऽऽदौ प्राणायामं समाचरेत् ॥१॥)
यमनियमाचें लक्षण। परिसा एकाग्रमन।
दशसंख्याक यम। नियम अवतारसंख्याक ॥३१॥
अहिंसा, सत्य, अस्तेय,। आर्जव, दया, ब्रह्मचर्य,।
क्षमा, मिताहर, धैर्य,। शुचित्व, हेचि दश संख्या ॥३२॥
कायावाचा मनेंसी। न दुखवावें प्राण्यासी।
आपुलिया देहासरसी। अवलोकिजे सर्वथा ॥३३॥
सर्वस्य चाहं हृदि संनिविष्ट। स्मृत्यर्थ हा असे स्पष्ट।
ठेविजे सर्वत्र समदृष्टी। हे अहिंसा जाणावी ॥३४॥
ऐकिलें असे जें श्रवणीं। जें देखिजेल नयनीं।

तेचि बोलिजे मृदु भाषणीं । सत्यत्व जाणिजे सर्वथा ।३५।
परकीयाच्या वस्तूसी । मनें ही स्पर्श न कीजे त्यासी ।
ह्या अस्तेयलक्षणासी । जाणावें साधकें ।।३६।।
मरणं बिंदुपातेन । हें असे स्मृतिवचन ।
जीवन हो बिंदुधारणें । यास्तव मैथुन वर्जावें ।।३७।।
वर्णी यतीवांचोन । पर्वणी दिवा श्राद्धदिन ।
अमा अष्टमी निषिद्ध दिन । गृहस्थें मैथुन वर्जावें ।३८।
हें ब्रह्मचर्य लक्षण । दे स्मृति धृति बल पूर्ण ।
म्हणोनी वीर्य संरक्षण । कीजे सर्वथा ।।३९।।
शत्रुभाव सोडोनी । निष्कपटें राहिजे सरळपणीं ।
आपपर न धरी मनीं । हें आर्जव जाणिजे ।।४०।।
जैसे वृक्षनानापरी । दुःख भोगुनी स्वशरीरीं ।
फलपुष्पकाष्ठपत्रीं । सुख देती अहर्निशीं ।।४१।।
यापरी आपुलिया देहेंसी । सुखवावें प्राणिजनासी ।
दयेचिया लक्षणासी । जाणिजे चतुरें ।।४२।।
पृथ्वीपाशीं जैशी क्षमा । न मिळे भुवनत्रयीं उपमा ।
यास्तव अन्वर्थक हे क्षमा । शोभे अभिधान जियेसी ।४३।
यापरी साधकें । सहावीं सर्व दुःखें ।
परी धर्मनीतीलागीं सुखें । राखिजे सतत ।।४४।।
कोणी पूजितां अथवा गांजिता । हर्ष विषाद नाणी चित्ता ।
शीतोष्ण द्वंद्वसहिष्णुता । साहिजे हेची क्षमा ।।४५।।
भागद्वय भरावे अन्नानें । तृतीय तो जलानें ।

हीं मिताहारलक्षणें । वायुसंचारार्थ तुरीय जो ॥४६॥
संपत्ति किंवा विपत्ति। येतां धैर्य धरावें चित्तीं।
जैसा कां सरित्पति । नुल्लंघी मर्यादेसी ॥४७॥
मृज्जलें बाह्यशुद्धि । सदाचारें अंतःशुद्धि ।
जाणिजे हा शुचित्वविधि। एवं दशविध यम जाण।४८।
जप, तप, श्रद्धा, संतोष, । आतिथ्य, गुरुसेवा विशेष, ।
ईश्वरार्चन, सिद्धांत श्रवणीं विश्वास, ।
व्रत, तीर्थाटन, दश नियम ॥४९॥
जन्मविच्छेदक जकार । पापविनाशक पकार ।
ऐसा हा जयप्रकार। दे चतुर्विध पुरुषार्था ॥५०॥
तप म्हणजे स्वधर्माचरण। कीजे कृच्छ्र चांद्रायण।
मनेंद्रियांसी एकाग्रपण। हें परम तप जाणिजे ॥५१॥
गुरुवाक्य वेदान्तवचन । अथवा सगुणमूर्तिउपासन ।
यावरी ठेविजे विश्वास जाण। बोलिजे हेंचि श्रद्धा।५२।
यदृच्छालाभसंतोष। कृष्ण सांगे अर्जुनास ।
धरोनी अजगरवृत्तीस । रहावें अनुदिनीं ॥५३॥
अकस्मात् आश्रमाप्रती। प्राप्त होय तो अतिथी।
कां असो भलते याती। भक्तिभावें पूजावा ॥५४॥
आतिथ्य असे या नांव। वशवर्ती हो देव।
प्रसन्न हो सदाशिव। अतिथीचिया संतोषें ॥५५॥
कायावाचा मनेंसी। देह झिजावा गुरुसेवेसी ।
जैशी कां पतिव्रता पतीसी । संतोषवी निजसेवें ॥५६॥

देहाच्या पादुका करोनी । समर्पिजे गुरुचरणीं ।
तथापि गुरूंचिया ऋणापासोनी ।
सहसा मुक्त न होई ॥५७॥
देवानुग्रहहेतुक । त्रय हेंचि असे देख ।
मनुष्यत्व, मुमुक्षुत्व, चोख ।
महापुरुषाश्रय, तृतीय जो ॥५८॥
म्हणोनी करावें ईश्वरार्चन । भावे तोषविजे रमारमण ।
मग हो जरी प्रसन्न । वश करी भुवनत्रय ॥५९॥
मोक्षाची जरी असे आस ।
सिद्धान्तशास्त्रीं ठेविजे विश्वास ।
श्रवण मननीं मिळे खास । अक्षय अव्यय अढळपद ।६०।
करितां एकादशी व्रत । राजा अंबरीष हो मुक्त ।
व्रतमहिमा अत्यद्भुत । कीजे शक्या यथाविधी ॥६१॥
वाल्मीक पुलस्त्यादि आश्रम । पुष्करादि तीर्थें पावन ।
बदरिकाश्रमादि चतुर्धाम । ज्योतिर्लिंगें द्वादश ॥६२॥
अयोध्यादि सप्तपुरी । जावें मानससरोवरीं ।
कृष्णावेणीं कावेरी । रेवादि तीर्थयात्रा करिजेती ॥६३॥
एवं हे दहा नियम । असती हे पूर्णकाम ।
आतां सांगिजे आसनक्रम । ऐका श्रोते एकचित्तें ॥६४॥
स्थिर सुखमासनं । हें सूत्रकारप्रमाण ।
तथापि मुख्यत्वें सिद्धासन । सर्व सिद्धांसी संमत ॥६५॥
(मुख्यं सर्वासनेष्वेकं सिद्धाः सिद्धासनं विदुः ।

चतुरशीतिपीठेषु सिद्धमेव सदाभ्यसेत् ।। १ ।।)
सिद्धासने श्वासोच्छ्वास । हो गति मंद सरळ श्वास ।
प्राणवाहक्क नाडीमलास । दूर करी सत्वर जें ।।६६।।
उन्मनी अवस्था ये मग । कामविकार हो भंग ।
मिळे मोक्ष मग चांग । आसन सांग होतांचि ।।६७।।
अथवा कीजे पद्मासन । करी श्वासोच्छ्वासगती हीन ।
वृत्तिस्थैर्य करी परम । हो रुधिराभिसरण योग्यत्वें ।६८।
या आसनें सहज । हो रोगाचें निर्बीज ।
दिसे शरीर सतेज । निरलस हो योगी ।।६९।।
आसनजयें हो श्वासजय । श्वासजयें मनोजय ।
मनोजयें द्वंद्वसंक्षय । हो अनायासें ।।७०।।
मग करावा प्राणायाम । सांगे उद्धवासी श्रीकृष्ण ।
स्कंद एकादश परम । चतुर्दशाध्याय असे बरवा ।।७१।।
(सम आसन आसीनःसमकायो यथासुखं ।
हस्तावुत्संग आधाय स्वनासाग्रकृतेक्षणः ।।१।।
प्राणस्य शोधयेन्मार्गंरेचपूरककुंभकैः ।
विपर्ययेणापि शनैरभ्यसेन्निर्जितेंद्रियः ।।२।।)
श्वासोच्छ्वासगती जो प्राण । तयाचा निरोध तो याम ।
यासी बोलिजे प्राणायाम । चतुर्धा असे ।।७२।।
रेचक पूरक कुंभक । तुरीय केवलकुंभक ।
तोची सगर्भ असे ऐक । सांगिजेल अनुक्रमें ।।७३।।

दक्षिणवाम, नासाछिद्रें । तयां बोलिजे सूर्य, चंद्र ।

वाहती निस्तंद्र । नाडिका पिंगला, इडा, भेदें ।।७४।।
वामनासापुटीला तद्वारे । इडानाम असे जिला ।
तद्वारें बाह्य वायूला । करिजे पूरक सुयुक्ति ।।७५।।
कमलांनालातुनी जल । ओढिता ये अंतराल ।
तैं षोडश मात्रा मित काल । भरिजेल शान्तपणें ।७६।
मग लावोनी जालंधर । करावा कुंभर सुंदर ।
चतु:षष्ठी मात्रा परिकर । होतां पूर्ण ।।७७।।
दक्षिण नासापुटीं पिंगला । तद्वारा रेचकू भला ।
कीजे द्वात्रिंश मात्रेला । मंदमंद गतीनें ।।७८।।
उड्डियाण जालंधर । हे कुंभकरेचक हितकर ।
असती हे चतुरें । कीजे अवश्य ।।७९।।
पूरक तो वेगानें । बंध लाविजेती दोन ।
मूलाधार उड्डियाण । हे जाणावे गुरुमुखें ।।८०।।
सायंप्रातर्मध्यान्हीं । तैसाची मध्यरजनी ।
एवं चतुर्वार प्रतिदिनीं । करावा प्राणायाम ।।८१।।
अशिति संख्याक प्रतिवेळ । करिजे प्राणायाम सोज्वळ ।
षण्मासाभ्यंतर नाडी निर्मळ । हो वेगेंसी ।।८२।।
हा अगर्भ प्राणायाम । ऐकिजे सगर्भ लक्षण ।
अभ्यासें निर्मळ मन । हो योगियाचें ।।८३।।
मूलाधारापासोन । चक्रब्रह्मरंध्र चरम ।
पृष्ठी मेरुदंड लक्षून । सुषुम्ना नाडीं वसे तेथें ।।८४।।
तद्द्वारें वायूचा । मार्ग उत्तम असे साचा ।





बंधत्रयसहित आसनाचा। होता अभ्यास द्वार दे जी।८५।
मत्स्येंद्र, पश्चिमतान,। कंदताडन, परिधान,।
भस्त्रिकादि यथाक्रम। गुरुसान्निध्यें अभ्यसिजे ॥८६॥
मग सरल मार्ग वायूसी। होतां जपोनी प्रणवासी।
प्राणसमागमें प्रणवनादासी। ब्रह्मरंध्रीं नेईजे ॥८७॥
तेथें सहस्रदलकमल। स्थिर होतां यो[illegible] काल।
मग चित्त होईल निर्मल। अनुसंधानीं ॥८८॥
स्थिरवोनी चित्तास। कीजे नादानुसंधानास।
सप्रणव त्रिकाल अभ्यास। होतां प्राण वश हो त्वरें।८९।
ह्या सगर्भ प्राणायामें। होईजेल प्रसन्न मन।
दुर्वासना नासोन। ये सद्वासना पाटव ॥९०॥
आतां बोलिजे सबीज। मग दुसरा निर्बीज।
हे प्राणायाम सहज। दाविती सद्वस्तु ॥९१॥
सगुण मूर्तीचें ध्यान। त्यासह कीजे प्राणायाम।
सुयुक्ति विषयां पासाव मन। वश हो सबीजें ॥९२॥
शब्दादि विषयांपासोनी। चित्तातें आकर्षोनी।
लाविजे स्वरूपानुसंधानीं। निर्बीजें प्राप्त हो ब्रह्मवस्तु ९३
(नोच्छ्वसेन्नचनिःश्वासेन्नैव गात्राणि चालयेत्।
एवंच तान्नियुंजीत कुंभकस्येति लक्षणं ॥१॥)
रेचक पूरक अनादृत्य। योगशास्त्राचें हें तथ्य।
हो केवळ कुंभक सत्य। न कीजे गात्रचापल्य ॥९४॥
बंधत्रयाचें लक्षण। साधिजेल करोनी प्रयत्न।

जें करी बंधविमोचन । दवडोनी मृत्यूसी ॥९५॥
करोनि सिद्धासन । योनी दाविजे वामपादपार्ष्णीनें ।
अपानासी ऊर्ध्व करोनी । मूलाधार अभ्यासिजे ॥९६॥
उदर ओढोनी पृष्ठभागीं । वायू आकर्षिजे सवेगीं ।
पुढें ऊर्ध्व करोनी नाभी । साधावा उड्डियाणबंध ॥९७॥
कंठ आकुंचन करोनी । हनु लाविजे हृदयस्थानीं ।
जरा मृत्यु विनाशी जाणोनी । कीजे बंध जालंधर ।९८।
(सर्वचिंतां परित्यज्य सावधानेन चेतसा ।
निर्विकल्पः प्रसन्नात्मा प्राणायाम समभ्यसेत् ॥१॥ )
एवं प्रकारें प्राणायाम । करिजे स्थिरवोनी मन ।
विषयीं यातां आकर्षोन । विवेकपाशें आवरिजे ॥९९॥
पुनः पुनः बाहेर । जातां करोनी प्रत्याहार ।
स्वरूपचिंतनीं सादर । असावें साधकें ॥१००॥
हें प्रत्याहार लक्षण । करावें चित्तसमाधान ।
मग धारणेसी योग्य मन । हो योगियाचें ॥१०१॥
धारणेचे द्विप्रकार । असनी बाह्याभ्यंतर ।
वायूसह मन स्थिर । कीजे तत्तद्देशीं ॥ १०२ ॥
नासिकाग्र भ्रूमध्यस्थान । तेथें ठेविजे चित्तासह नयन ।
करावें स्वरूपचिंतन । बाह्य धारण जाणिजे ॥१०३॥
मूलाधार, स्वाधिष्ठान, । मणिपूर, अनाहत जाण, ।
विशुद्ध, अज्ञाचक्र, मिळोन्न । हीं षट् चक्रें आंतर्य ।१०४।
प्रत्येक चक्रावरी । वायूसह मन स्थिर करीं ।

हो धारणेची परी । यथासांग ॥१०५॥
धारणेच्छिया अभ्यासें । वाव न मिळे प्रमादास ।
स्थैर्य करी चित्तास । वश होत सर्व सिद्धी ॥१०६॥
कंठकूपीं धारणा ठेवोन । बसावें स्वस्थ योगियानें ।
येणें क्षुत्पिपासाशमन । होय सहसा ॥१०७॥
मूर्ध्नि ज्योतिःस्वरूप । तें धारणा ठेविजे आपोआप ।
सिद्धांचें दर्शन अमूप । होत अनायासें ॥१०८॥
हृदयेचित्त संवित । असे सूत्रकारमत ।
हो परचित्त ज्ञात । योगियासी ॥१०९॥
ऐसे हे बहु प्रकार । धारणा दावी परिकर ।
साधकें सर्व करोनी दूर । करावें भगवत्ध्यान ॥११०॥
ध्यान प्रभाव अघटित । कीटा भ्रभरत्व येत ।
गुर्वनुग्रहें भगवंत । ध्यातां तद्रूप निजांगें ॥१११॥
ज्ञानाध्द्यानं विशिष्यते । ऐशिया परी भगवंतें ।
बोध केला अर्जुनातें । भक्तियोगामाझारीं ॥११२॥
बहूनां जन्मनामंते । ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
ध्यानें तत्काल मद्भक्तें । आकर्षिलें सहजपणें ॥११३॥
यास्तव करिजे ध्यान । असे योगरहस्यवचन ।
अंगुष्टपरिमित प्रमाण । मूर्ति सुकुमार मनोहर ॥११४॥
(अंगुष्ठमात्रं पुरुषं दत्तात्रेयं दिगंबरं ।
ध्यायेत्सिद्धासनासीनं द्युनिशं कंठसस्थितं ॥१॥)

 

हृदयकमल अधोमुख । भावना कीजे ऊर्ध्वमुख ।
तयावरी मूर्ति संमुख । ध्याइजे मनोभीष्ट ॥११५॥
पादांगुलीपासोन । अवयव प्रत्येक भिन्न ।
एवं आनखाग्र पूर्ण । करावें ध्यान साकल्य ॥११६॥
मग सर्वावयव सोडोनी । मुखस्थ हास्य ध्याइजे मनीं ।
तो मी परमानंद म्हणोनी । पुनःपुनः ध्याइजे ॥११७॥
मग ये सहजस्थिती । मनोन्मनीं होय गती ।
हे ध्यानप्रभावस्थिती । चित्ता चिद्रूपता दे ॥११८॥
रागद्वेषादि दोषजात । ध्यानें भस्म होती समस्त ।
शत्रुमित्रभावरहित । हो भगवद्भक्त ॥११९॥
ऐशिया अनुक्रमेंसी । अभ्यासीजे अहर्निशीं ।
सांगिजे आतां समाधिविधीसी । श्रीसद्गुरूंचिया अनुग्रहें
उच्चावच पक्षीगण । करिती शक्त्यनुसारें उड्डाण ।
तेवीं हें बालभाषण । समर्पिजे गुरुचरणीं ॥१२१॥

॥ इति श्रीमद्वासुदेवानंद लहर्यां हठयोगे
योगांगनिरूपणंनाम तृतीयोध्यायः ॥



## ॥ अथ चतुर्थाध्याय प्रारंभः ॥

ॐकरोनी श्रीगुरूसी नमन । आतां निरूपिजेल ज्ञान ।
जीवशिव ऐक्यपण । होय जेणें ॥१॥
विचारें पाहतां एकवस्तुसी । अविद्यें नानात्व ये तिसी ।

नाश होतां अज्ञानासी । एकचि उरे ॥२॥
स्वभावें पाहतां दर्पण । एकाचें देखिजे दुजेपण ।
परंतु द्विधा न हो आपण । तेवीं भासती जाण हे ॥३॥
एक असे सर्वज्ञ । दुजा तो किंचिज्ज्ञ ।
हें वर्म जाणती तज्ज्ञ । अज्ञ बापुडे नेणती कीं ॥४॥
एकासी मुक्त म्हणती । दुजा तो बद्ध कल्पिती ।
परी बद्धमुक्ताची स्थिती । नेणती सहसा ॥५॥
बद्धमुक्ताचें लक्षण । सांगे उद्धवासी श्रीकृष्ण ।
उभयांसी कारण । गुणचि एक ॥६॥
मायेपासाव गुणोत्पत्ती । माया मृगजळासम भासे ती ।
यास्तव बद्धमुक्तस्थिती । वाचारंभण मात्र ॥७॥
(बद्धोमुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुतः ।
गुणस्य मायामूलत्वान्नमे मोक्षो न बंधनं ॥१॥
जेवीं श्वेतपीत कृष्ण रक्त । ठेवितां स्फटिक तेथ ।
तो तदाकार भासत । परि तो अतिशुद्धचि असे ॥८॥
तेवीं जीवात्मा गुणसंगें बद्ध । भासे तरी तो अति शुद्ध ।
नेणोनी हा निजबोध । विवादती परस्पर ॥९॥
कोणी देहातें आत्मा मानिती । कित्येक इंद्रियांतें कल्पिती।
प्राणासी आत्मत्व देती । बोलती आत्मा मनातें ॥१०॥
बुद्धिलागीं आत्मत्व । अन्य म्हणती आत्मा शून्यत्व ।
कित्येक चिज्जडयुक्त । मानिती आत्मा ॥११॥

ब्रह्मांडीं पुरुष म्हणती । पिंडीं जीव तया बोलती ।

परि मायेचा हा भाव नेणती । ना जीव ना शिव ब्रह्म एक
अविद्या प्रतिबिंबित जीव । द्रष्टा याचा सदाशिव ।
परी ऐक्यतेचें वैभव । निजस्वभाव न तुटेची ॥१३॥
विद्यारण्य महामुनी । सांगती जीवेश्वर लक्षणीं ।
परिसा श्रोते सावधानीं । एकचित्तें करोनियां ॥१४॥
सत्त्वशुध्द्यविशुद्धीनें । मायाअविद्या हो उत्पन्न ।
मायाबिंबित ईश्वर आपण । वश ठेवी तियेसी ॥१५॥
अविद्या बिंबितजीव । पाहतां तियेचें वैभव ।
भुलोनी विसरे निज ठाव । वागे अधीन तियेच्या ।१६।
स्त्रीबुद्धिः प्रलयाय वार्ता । श्रुतीची असे तत्त्वता ।
यास्तव जीवस्थिती पाहतां । कवणा वर्णवे ॥१७॥
पाहोनी वैचित्र्य तियेचें । आपण परतंत्र होवोनी नाचे ।
पहा हो वैभव जीवाचें । व्यापिलें ब्रह्मांडीं ॥१८॥
ईक्षणादि प्रवेशान्त । ईशसृष्टि असे निर्मित ।
जागृदादि मोक्षपर्यंत । जीवें सृष्टी निर्मियेली ॥१९॥
शुद्धसत्त्वापासाव मायोत्पत्ती । ये ईश्वरीं सर्वज्ञता ती ।
जीवा अविशुद्धीं उत्पत्ती । ये किंचिज्ज्ञता योग्यत्वें ।२०।
एका अश्वत्थवृक्षावरी । दोघे पक्षी वसती अहोरात्रीं ।
एक फळें भक्षण करी । निरन्न दुजा साक्षित्वें ॥२१॥
यास्तव कल्पिती बद्धता । दुजियाची असे मुक्तता ।
बद्धमुक्तस्थिती पाहतां । अविद्यामूल ॥२२॥
असती ईश्वरशक्ती दोन । विक्षेप दुजी आवरण ।

ज्ञानासी प्रतिबंध पूर्ण । दे आवरणशक्ती ॥२३॥
ज्ञानावांचोनी आवरण । न दुरावे एकही क्षण
कर्मयोग उपासना । दे चित्तशुद्धीते ॥२४॥
कैवल्यंज्ञानादेव । बोले श्रुति स्वयमेव ।
मोक्षाचें जें वैभव । ज्ञानचि एक ॥२५॥
देहाभिमानादभिवर्धते क्रिया । गलिताहंकृति हो विद्या ।
उभयविरुद्ध वाक्या । ऐक्यता कैसेनी ॥२६॥
प्रकाश आणि तिमिर । उभयांसी विरोध फार ।
एके समयीं व्यवहार । केवीं होय ॥२७॥
संन्यास आणि गृहाश्रम । करितां एकसमयावच्छिन्न ।
हें उपहासासी कारण । होय जनीं ॥२८॥
गुणवैभवें घडे कर्म । निस्त्रैगुण्यत्वें प्राप्त ज्ञान ।
उभयां समुच्चयो न । घडे कालत्रयीं ॥२९॥
भिन्न दोघांसी व्यापार । फलवैपरीत्य असे फार ।
एकीं जन्ममृत्यु वारंवार । एक तो सदा अविनाशी ।३०।
विद्यैव तन्नाशविधौ पटीयसी । न कर्म तज्जत्व असे त्यासी
एवं बोध करी सौमित्रीसीं । दाशरथी श्रीराम ॥३१॥
चित्तस्य शुद्धये कर्म । पूर्वाचार्यांचें हें वर्म ।
विना विचारें वस्तु उगम । न हो कोटचवधी कर्में ।३२।
न योगेन न सांख्येन । उपासनें न तुटे बंधन ।
जीव परमात्मैक्य लक्षणें । मोक्षसिद्धी ये हाता ॥३३॥
शास्त्रें धुंडितां अपार । ये बुद्धीसी भ्रमपूर ।

साधकासी पैलपार । न मिळे कल्पांतीं ॥३४॥
यास्तव भ्रमोत्पादक शास्त्रातें । सांडोनी आपुलिया मतें ।
सेविजे सिद्धांतातें । यावत् दृढबोधपर्यंत ॥३५॥
सांख्य योग आणि वेदान्त । तिहींचा हो सिद्धांत ।
इतर शास्त्रीं शुष्क वेदान्त । प्रतिपादिलासे ॥३६॥
आत्मत्वाचा निर्धार । दावी सांख्यशास्त्र चतुर ।
वृत्तिशून्यत्वें साक्षात्कार । हो योगाभ्यासें ॥३७॥
मायोपबृंहित साकार । दृश्य वस्तु चराचर ।
सर्व होय निराकार । वेदान्तशास्त्रविचारें ॥३८॥
ग्रंथविस्तार न करितां । निश्चय ब्रह्मस्थितीचा आतां ।
बोलिजे अनुभवसिद्धता । साधकांप्रती ॥३९॥
भक्ति वैराग्य आणि ज्ञान । हीं मुक्तीचीं साधनें ।
या तिहींचें पर्यवसान । हो आत्मस्वरूपीं ॥४०॥
होतां आत्मस्वरूपाचें ज्ञान । चराचरीं स्वयें आपण ।
भासे सर्वदा परिपूर्ण । एकचि अखंड अद्वय ॥४१॥
मग जाय जेथ मन । आत्मत्वावीण न भासे आन ।
सहजपणें पंगू होउन । उन्मनी अवस्था घे त्वरें ॥४२॥
(यत्रयत्र मनो याति तत्रतत्र समाधयः ॥)
म्हणोनी आत्मा अनंत । जग दृश्यत्वें नाशिवंत ।
ब्रह्मसबाह्य अभ्यंत । स्फुरे सत्तामात्रीं ॥४३॥
घटः सन् पटः सन् । सन्मात्रें उरे आपण ।
नामरूप मिथ्या जाण । हो स्वप्रकाशें ॥४४॥
रज्जूवरी जैसा अही । तैसा जगत्प्रत्यय पाही ।

विचारें सर्व लया जाई । उरे एकलाचि आपण ॥४५॥
ना तरी अवस्था भिन्न । याचा प्रत्ययो घे कोण ।
जडासी अनुभवू न । घडे कालत्रयीं ॥४६॥
स्वयंप्रकाश चैतन्य । सर्व अवस्था व्यापून ।
निर्बाधत्वें परिपूर्ण । असे स्थूळसूक्ष्मीं ॥४७॥
तोचि आत्मा मी ऐसें । प्रत्ययो ये आपैसे ।
मग उपपत्तीनें ठसे । सर्वं खल्विदं ब्रह्मेति ॥४८॥
ब्रह्मचि आपण केवळ । आपणामाजी सृष्टि सकळ ।
सृष्टीमाजी सोज्वळ । भासे आपणचि एक ॥४९॥
सृष्टि स्थिति प्रलय । आपणामाजी सर्व होय ।
यास्तव जाणणें नुरे काय । ज्ञानियांसी ॥५०॥
आत्मज्ञानावांचून । बळें वैराग्य करीं धारण ।
जेवीं पर्वतावरील पाणी । जाय वेगें सखोल भूमी ॥५१॥
अथवा वैराग्येंवीण ज्ञान । नोहे तया स्थिरपण ।
जेवीं विष्णुपदीं चपला जाण । प्रकाश दावी ॥५२॥
यास्तव प्रयत्नें करून । घेईजे गुरुमुखें आत्मज्ञान ।
जें सच्चिदानंदघनपूर्ण । हंसरूपें कथिलें ब्रह्मयासी ।५३।
विद्या आणि अविद्या शक्ती । ज्ञानाज्ञाना कारण होती ।
जेवीं प्रकाश आणि तमःस्थिती । होतसे जगतीं या ।५४।
होतां अत्यंत तिमिर । आपणिया न दिसे स्वशरीर ।
तथापि मी असें नर । जाणतसे स्वप्रभें ॥ ५५ ॥

॥ चौथा अध्याय समाप्त ॥

॥ इति श्रीसीतारामहाराजकृत
श्रीमद्वासुदेवानंदलहरी संपूर्णा ॥

## ॥ भजन ॥

कवी – श्री. सेवानंदस्वामी
मु. श्रीक्षेत्र गरुडेश्वर

निराकार ब्रह्म ऐसीं संज्ञा जयाला
वासुदेवानंद रुपे पाहिले मी त्याला ॥धृ०॥
वास सर्वांतरी वासनाविण रुपे
सुहृद सर्व जीवांचा आनंदाच्या गुणे
देव जो देवांचा देवांसी दुर्लभ
वरेण्य सर्वांसी ऐसा मी पाहिला ॥१॥
वाचेसी मिळाली गोडी या नामाची
सूर्यप्रभा पाहिली नेत्रांनी या
देता घेता खाता पिता उठता बैसता
वदे वासुदेव हा रसनेचा चाळा ॥२॥
वास खास याचा गरुडेश्वरास
सुवर्णाची कांती ऐसा देह मुक्त
देवनदीरेवा वाहे नित्य निर्मळा
वराभय देण्या नित्य सिद्धासनी बैसला ॥३॥
पाहणे लोचनी सजीव हे रूप
हीच मृत्यु जीवनाची कला असे एक
माझा सारा मीपणा.गळुनिया गेला
मरुतीही सेवानंद सेवेसाठी उरला ॥४॥